मानस गूढार्थ चंद्रिका

# अयोध्याकाण्ड

## खंड - ४

लेखक
श्री.प.प.ब्र.स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती





॥ श्री सद्गुरवे नमः ॥

॥ श्री राम समर्थ ॥



# ※ विनम्र आवाहन ※

श्रीरामकृपेने महाराष्ट्रीय संतांच्या मंदियाळीतील आधुनिक 20व्या शतकातील संत परमपूज्य प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी यांचे स्मारकरूपाने श्रीराम - मंदिर ''श्रीराम विश्रामधाम'' या नांवाने परांडा येथे विद्यमान आहे. या मंदिरातील श्रीराम - सीता सिंहासनाधिष्ठित, चरण स्पर्शित हनुमान, व लक्ष्मण या मूर्तींची प्रतिष्ठापना राष्ट्रसंत पू. मुरारी बापूंचे शुभहस्ते 2003 मध्ये झाली आहे तर भरत, शत्रुघ्न व नंदिसह शिवलिंगाची प्राणप्रतिष्ठा पू. आचार्य किशोरजी व्यास (प. पू. गोविंद देवगिरी स्वामी) यांचे शुभ हस्ते झाली आहे. तसेच या मंदिरात गणेश, दास-मारूती, माखनचोर याही मूर्ती असून या संगमरवरी मंदिरात श्रीरामचरितमानसातील मंगलाचरणे, दोहे चौपायाही कोरलेल्या आहेत. कारण श्रीरामचरितमानसावरच प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींनी आपले समग्र जीवन समर्पित केलेले होते. हे अति सुंदर मंदिर आपण एकदा तरी आवर्जून पहावेच पहावे असे आहे कारण 'संपूर्ण राम दरबार' फारच क्वचित आढळतो तो पाहिल्याने खऱ्या अर्थी मनास ''विश्राम'' मिळतो.

ह्या मंदिरात भोजनशाळा व भक्तनिवासाचे बांधकाम लवकरच सुरू करीत आहोत. तरी यासाठी आपणासारख्या उदार दात्यांकडून सढळ हाताने आर्थिक देणग्यांची अपेक्षा आहे. देणग्यांसाठी 80G आयकर सवलत उपलब्ध आहे. तरी आपण आपले चेक, डी. डी. वा मनी ऑर्डर्स ''श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळ'' या नावाने खालील पत्यांवर पाठवाव्यात ही विनंतीवजा कळकळीची प्रार्थना.


(१) **सौ. रेखा नी. पटवर्धन,**
अक्षय रेस्टॉरंट समोर, 'पटवर्धन' बंगला, मिरज. जि. सांगली - 416410.
फोन : (0233) 2221083

(२) **सौ. राजश्री भा. दिवाकर,**
'मल्हार' बंगला समर्थ नगर, मु. पो. उस्मानाबाद (धाराशिव)- 413501
फोन : (02472) 224989


## विशेष सूचना -

सदर श्रीराम मंदिर व प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींची समाधी (त्याच वास्तूत प. पू. हंसराज स्वामी व प. पू अनंतदास रामदासी यांच्या समाधी) ''हंसराज मठ'' या एकाच वास्तूत आहेत. ही दोन्ही स्थाने पंढरपूर जवळील कुर्डुवाडी पासून 20-22 कि. मी. वरील परांडा बस स्थानकापासून चालत केवळ 5 मिनीटांचे अंतरावर आहेत प. पू. तेजोमयानंद स्वामीजी प. पू. शंकराचार्य इ. संत येथे आवर्जून येतात.

आपल्या विनम्र
**डॉ. कमल वैद्य,**
**सौ. रेखा नी. पटवर्धन**

*येन केन विधि देतां दान करी कल्याण ॥*
*तें धन धन्य जयां प्रथम गति (दान)॥ (श्रीरामचरितमानस उत्तरकांड)*

# श्रीरामचरित मानस गूढार्थचंद्रिका

## द्वितीय सोपान अयोध्याकाण्ड

### खण्ड ४ था

'रामचरित मानस' यावरील मराठी बृहत् टीकेचा अंश
(दोहा २४३ ते दोहा ३२६ अखेरपर्यंत)

लेखक : प. पू. स्वामी प्रज्ञानानन्द सरस्वती

प्रकाशक
रामचरितमानस प्रेमी मंडळ,
डोंबिवली.

# प्रस्तावना

भावुक वाचकहो,

राम-भरत भेटीचे देहभान हरपविणाऱ्या सुंदर वर्णनानंतर गोस्वामी रामगुरूंना कसे प्रेमादरपूर्वक भेटले ते सांगतात. त्यानंतर 'रामसखा' त्याचे अपरिमित प्रेम जाती-मर्यादा उल्लंघून कसे व्यापक बनते ते दाखवतात. सर्व लोकांची आर्तता जाणून राम त्यांचेवर कशी करुणा करतात, अन् तेही अतिशय गुप्तपणे तेही रेखाटन अतिशय भावविभोर असे आहे. राम मातांना भेटतात तेव्हा त्यांचा क्रम अति लक्षणीय-चिंतनीय कसा आहे ते टीकेतून स्वामी स्पष्ट करतात. सीता सासवांना पाहताच आपले डोळे भितीने का मिटून घेते तेही स्वामी 'तैं पृथ्वीवर पसरे करुणा' यातून आणखी विस्तारपूर्वक स्पष्ट करतात. अशा दुःखद प्रसंगीही 'जगगति मायिक' ह्या सैद्धांतिक मर्माचा उलगडा करण्यास विसरत नाहीत.

'प्रभू' 'जगदीश' असूनही धर्म मर्यादा पुरुषोत्तमत्त्व पित्याच्या उत्तर क्रियादींद्वारे कसे सिद्ध करतात ते सूक्ष्म नजरेने वाचावे असेच आहे. अन् भक्ताच्या दुःखाने भगवंत कसे दुःखी होतात याचे नेमके छायाचित्र गोस्वामी जणू आपल्यापुढे ठेवतात. त्यानंतर अयोध्यावासीयांची चित्रकूटावरील दिनचर्या रेखाटन करताना स्वामींची लेखणी भावजलात अक्षरशः चिंब न्हालेली दिसते. कारण चित्रकूटावरील कोळी किरात-भिल्लादीच खऱ्या अर्थाने रामभक्तीत चिंब बुडालेले असल्याने स्वामीलेखणी त्या प्रेमाला वश होते.

सीतेने सासवांची कशी सेवा केली ते पाहताना अलिप्त वा निर्लेप, निर्लोभी वृत्तीने सेवा कशी करावी हा आदर्श पहावयास मिळतो. म्हणून तेथे गोस्वामींना 'अवनि यमां मागत कैकेयी । महि ठाव विधि मरण न देई ।' असे लिहिणे का भाग पडले ते टीकेतूनच उलगडेल.

नंतर भरतांच्या मनातले विचारतरंग फार उत्तम तऱ्हेने उमटलेले दिसतात. चित्रकूटावरील सभा किंवा दरबार यांना प्रारंभ होतो तो पहिल्या खाजगी सभेने. त्यात रामगुण वर्णनाने कसा प्रारंभ होतो ते सांगून 'रामाज्ञा रुचि राखणे' हे सर्वांनाही कसे हितकर आहे तो संपूर्ण भाग लक्षपूर्वक वाचावा असाच आहे. त्यातून वसिष्ठांचे 'रघुकुलाचे गुरू' हा व्यक्तिमत्त्व विशेष कसा खास उठून दिसतो ते पहावे. अन् त्याचा परिणाम वसिष्ठांसारख्या गुरुंवर का झाला ते पाहताना भरताचे आदर्श शिष्यत्व ध्यानी येते.

त्यानंतर चित्रकूटावरील पहिला दरबार सादर करताना भरतामधील भावुक सेवकातील सेवा करण्यातील परमातुर भाव, त्यांचा पराकोटीचा विनय, संकोच हे सारे रेखाटण्यातील बारकावे स्वामी टीकेत सुस्पष्ट करीत जातात. त्यानंतरची भरतांची आत्म-ग्लानी वा स्वदोषकथन वाचताना तर प्रत्येक हृदय द्रवून जाते. त्यावर रामांचे बोलणे म्हणजे मातेच्या सहृदयतेने, वत्सलतेने भरताच्या दुःखी हृदयावर फुंकर घातलेली पाहणे त्यात रामांची भक्तवत्सलता शब्दाशब्दांतून ठिबकत राहते. रामांचे 'करुं अवश्य म्हणाल जो कांही' या वचनाने देवराज इंद्रासह सर्व देवगणांत कशी घाबरगुंडी उडाली त्याचे चपखल शब्दचित्र इथे पहावयास मिळते. त्यावेळी चित्रकूटावर भरत आपल्यावर सर्व भार आहे हे जाणून कसे रामांचे आदर्श धर्मबंधु या भूमिकेतून बोलतात ते अति सुंदरपणे स्वामी चित्रित करतात. तेथे ते स्वतःच 'नीच दास' का म्हणवून घेतात हे विशेष लक्षपूर्वक पहावे. तसेच तेथे 'रामाज्ञा पालन' याचे सर्व स्तरावरील आत्यंतिक महत्त्व स्वामी सविस्तर विशद करतात.

'चुप रघुनाथ बसति संकोची' वरील टीकेतून रामप्रभुंचे सनाथत्व स्वामी समर्थपणे सिद्ध करून दाखवतात.

अशा या धर्मसंकट प्रसंगी जनकदूतांचे 'आगमन प्रसंग' हा बौद्धिक व भावुक ताण काहीसा सैल करतो. इथे तुलसीदासांमधील नाटक निर्माता प्रकर्षाने जाणवतो. त्यानंतर जनक-सुनयना व मिथिलावासी यांच्या चित्रकूटागमनाने पुन्हा सर्वजण करुणानदीत कसे वाहवले गेले त्याचे सुरेख चित्र समोर स्वामी उभे करतात. हे प्रदीर्घ रूपक नेहमीच्या शैलीत स्वामी सुस्पष्ट करतात. त्यानंतर जनकादींचा पाहुणचार कोणी व कसा केला ते सविस्तर वर्णिले आहे. जनकांसह सर्वांची चित्रकूटावरील दिनचर्या कशी होती, त्यातील विशेष मर्मे स्वामी स्पष्ट करतात.

मग कौसल्या-सुनयनादींच्या भेटीत दोघींचे धर्म नीती, ज्ञानादींचे दर्शन घडविताना, कौसल्येचे भरत-प्रेम व त्या प्रेमापोटी त्याचेविषयीची काळजी स्पष्ट होते. या भेटीची समाप्ती करतानाचे सु-मित्रेचा व्यक्तिविशेष स्वामी सजगतेने टिपतात. त्यापुढे सीता आपल्या परिजन-जनकादींना भेटते तो प्रसंग तर एका सुरेख रूपकाद्वारे स्वामी सुबोध करून दाखवतात. त्या प्रसंगाच्या समापन प्रसंगी सीतेचे तेथे राहणे का व कसे 'अनुचित' हे वर्णन करताना सीतेचे बालवयातले अनेक गुण स्वामी आपल्या ध्यानी आणवून देतात.

जनक-सुनयना संवादातून एक आगळे वेगळे 'भरत-दर्शन' घडते. वसिष्ठ-जनक भेटीत वसिष्ठ आपली असमर्थता सांगून सर्व भार जनक-विदेहांवर कसा

घालतात ते विशेष अभ्यासनीय आहे. त्यानंतरच्या भरत-जनक संवादातून भरतांचे रामगुण सादृश्य दाखवता दाखवता, जनकांचे ज्ञानी-गुणज्ञ राजपद कसे डोकावते तेही स्वामी दाखवतात. लगेच स्वार्थी सुरांची भय-व्याकुळता दाखवताना स्वामी त्यांना शाब्दिक तडाखे, फटकारे मारायला कमी करत नाहीत. इथे स्वामींच्यातील निःपक्षपातीपणा, भक्ताची अभयता वा निर्भयता विशेष ध्यानी येते.

चित्रकूटच्या दुसऱ्या दरबारात 'भरत-विवेक वराहा'चे दर्शन घडवून स्वामी रूपक व कोष्टकातून अगदी अलगदपणे तो सर्व विषय हातावर ठेवतात. प्रभुपदपद्म पराग-शपथ पूर्वक भरत आपले विमल मानस प्रगट करतात. त्याबरोबर स्वर्गस्थ देवांची अवस्था पुन्हा भयभीत कशी झाली ते वर्णन करून पुन्हा भरत गुणगान करतात. त्यावर श्रीरामाचे भाषण स्पष्ट करताना श्रीरामांच्यातील कनवाळू राजा, प्रेमळ बंधू, कसकसे प्रगट होतात हे सुरेख सांगतात. भरतांनी जो सुवर्णमध्य अवलंब-उपाय योजला त्यामागचे रहस्य स्वामी टीकेतून उलगडून दाखवतात. राम त्याबद्दल त्यांना कसे सुरेख मार्गदर्शन करतात. त्यातून श्रीरामांचा 'स्वयें अमानी सकलां मानद' हा विशेष कसा दिसतो, ते प्रत्येकाने सूक्ष्मपणे अभ्यासून आचरावे इतके ते अनुकरणीय आहे.

'भरतांची चित्रकूट यात्रा' ह्या प्रकरणातून तीर्थयात्रा सशास्त्र कशी करावी ते स्वामी स्वानुभूतीपूर्वक फारच सुंदरपणे सांगतात. 'तीर्थयात्रा ते अधमाधमा' असलेलीही अशा भावभक्तीपूर्णतेने कशी 'परमोच्चतम' होऊ शकते हे एक नवीनच दर्शन घडते.

चित्रकूटच्या तिसऱ्या दरबारात भिडस्त, संकोची हा रामस्वभाव विशेष जाणून भरत आपण होऊन त्यांचा निरोप कसा मागतात ते पाहून, त्यावरून प्रत्येक भक्त-शिष्य-साधकास किती शिकण्यासारखे आहे ! इथे 'भरत रविवंश तडागाचा हंस - त्याचा नीरक्षीरविवेक विशेषत्वाने कळतो. दो. ३१५ हा मननीय असा सर्वांना, विशेषतः राज्यभार सांभाळणाऱ्यांना कसा विशेष अनुसरणीय आहे ते त्यावरील टीका वाचल्याशिवाय कसे ध्यानी येईल ?

प्रभूंच्या खडावा कोणत्या या सामान्य जनांच्या शंकेचे निरसन करून स्वामी 'चरणपीठ', 'स्नेह रत्न संपुट' 'कुलकपाट' अन् भरताचे 'मुद अवलंबन' या शब्दांतून त्याचा गौरव भक्ति प्रेमादरपूर्वक कसा करतात ते अति सूक्ष्मपणे वाचावे-मनन-चिंतन करावे.

त्या पादुका घेऊन भरत नगराकडे निघाल्यावर सर्व देव कसे सुटकेचा निःश्वास सोडतात ते स्वामी सांगतात.

'जिथें जनक गुरु मति गति कुंठित । प्राकृत प्रीती वदणें अनुचित' या नंतर कवि आपली 'पाषाण हृदयता' कशी कबूल करतो ते स्वामी सांगतात, असे म्हणून आता भरत-भेटीचा उपसंहारही अति भावुक करुणेने भरलेला असा केला आहे. अयोध्येत सर्वजण पोचल्यानंतरचा दो. ३२२ यात रामराज्याचे मूळ कसे दिसते ते भक्त बनून पहावे.

जनक राजांच्या मार्गदर्शनाखाली भरतांनी अयोध्येची 'न्यासी' बनून कशी व्यवस्था लावली हे आजच्या सर्वच्या सर्व प्रतिष्ठानाच्या न्यासी वा विश्वतांनी सूक्ष्मपणे अभ्यासून कसे वागावे याचा 'आदर्श' इथे मिळतो.

'निरूपाधी प्रभु-पादुका सिंहासनि' प्रतिष्ठित करून भरत स्वतः आपले जीवन मापन कसे करतात हे शेवटच्या 'भरत राहणी' या प्रकरणातून स्वामी सर्व बारीकसारीक कंगोऱ्यांसह अगदी सुस्पष्ट दर्शन घडवितात. 'रामप्रेमास्पद भरत' यातून स्वामी तपस्वी भरत-दर्शन घडवितात.

रूपक-शरद राकावर्णन हा एक जसा उत्तम साहित्यिक नमुना तसाच त्यातील भक्तिरस पान करावा असा सरस-सुरस आहे. भरत राहणीतून स्वामींना सद्गुरु वा सद्गुरुपदरजशी भरतांची तुलना करणे भाग पडले. इथेच भरत-महत्ता ध्यानी येते.

शेवटच्या दोह्यात भरत-चरित्राचे जो प्रेम व आदरपूर्वक श्रवण करतो त्याचे भवभय हरण नक्की होईल असा स्वामीही निश्चयात्मक निर्वाळा देतात.

आपला स्वानुभव आपल्या शिष्य-भक्तांचे हृदयीं बिंबविण्यासाठी त्यांनी भरतचरित्र व श्रीरामचरित्र त्यांच्या नेहमीच्या शैलीने कोष्टकरूपाने सुबोध करून दाखवले आहे.

तर अयोध्याकांडाच्या दुसऱ्या परिशिष्टांतून स्वामींची संशोधक अभ्यासकाची दृष्टी कळते.

'जग जपि राम राम जपि ज्यांही' असे 'रामस्नेहमूर्ती'चे सर्वकष व्यक्तिमत्त्व स्वामींनी आपल्यापुढे अगदी स्पष्ट करून ठेवले आहे. जणू भरत-चरित्र हा गोस्वामी-चरित्राचा (आदर्श) निर्मळ, नितळ पारदर्शि आरसाच आहे !

— श्री गुरुचरणरज

**प्रज्ञाशिष्या रामदासी**

## अयोध्याकांड (दो.२४३ - १-५)

हिं. *। सीलसिंधु सुनि गुर आगवनू । सिय समीप राखे रिपुदवनू ॥१॥*
*। चले सबेग रामु तेहि काला । धीर धरम धुर दीनदयाला ॥२॥*
*। गुरहि देखि सानुज अनुरागे । दंड प्रनाम करन प्रभु लागे ॥३॥*
*। मुनिबर धाइ लिए उर लाई । प्रेम उमगि भेंटे दोउ भाई ॥४॥*
*। प्रेम पुलकि केवट कहि नामू । कीन्ह दूरि तें दंड प्रनामू ॥५॥*

म. *। श्रवुनि शीलनिधि गुरु-आगमना । सीतेपासिं ठेउनि रिपुदमना ॥१॥*
*। चलति सवेग राम तात्काळ हि । धीर धर्मधुर दीनदयाळ हि ॥२॥*
*। गुरुस बघुन सानुज अनुरागति । नमन दण्डवत् प्रभु करुं लागति ॥३॥*
*। मुनिवर धावुनि हृदयीं धरती । प्रेमभरें उभयांस भेटती ॥४॥*
*। पुलकित नाविक नामा वदला । दुरून दण्डवत् प्रणाम केला ॥५॥*

**अर्थ** - शीलसागराने गुरुजींचे आगमन ऐकले व शत्रुघ्नाला सीतेपाशी ठेऊन -॥१॥ राम तात्काळ वेगाने चालू लागले; कारण (= हि) ते धीर धर्मधुरीण आणि (= हि) दीनदयाळ आहेत.॥२॥ गुरूंस पाहतांच अनुजांसहित राम अनुरागाने भरले व प्रभु (असून) दण्डवत नमस्कार करू लागले.॥३॥ (तोच) मुनिश्रेष्ठांनी धावत येऊन त्यांस प्रेमभराने हृदयाशी धरले व मग प्रेमभराने भरत व लक्ष्मण या उभयांस भेटले.॥४॥ (तोच) नावाड्याने (प्रेमाने) पुलकित होऊन आपले नाव सांगून त्यांस दुरूनच दण्डवत प्रणाम केला.॥५॥

**टीका. चौ. १-२ (१) शीलनिधि = शीलसिंधु,** जसा जलनिधि = सागर, तसा शीलाचा सागर. 'शीलस्नेहार्जव-सुख-सागर' असे राम आहेतच; म्हणूनच येथे अत्यंत त्वरा करून गुरुदर्शनास निघाले. **(क) धीर** - प्रेमसमाधीत अगदी मग्न होते पण ताडकन विद्युद्वेगाने उठले. हे करण्यास किती धैर्य धरावे लागले असेल ! **(ख) धर्मधुर =** धर्माची धुरा = धर्मधुरीण. **गुरु - आगमन कळतांच शक्य तितकी अत्यन्त त्वरा करून** जाऊन भेटणे - **दर्शनास जाणे हा शिष्याचा धर्म आहे**; त्याचे आचरण स्वतः करून दाखवीत आहेत. **(ग) दीनदयाळ** - सर्व सेवक, पुरवासी वगैरे विरहदग्ध दीन झालेले आहेत. त्यांच्यावर दया करून त्यांस सुख द्यावयाचे आहे; कशी दया केली हे लवकरच दिसेल. **(घ) सितेपाशिं ठेउनि रिपुदमना - I** इतके सर्व मुनि तेथे असता व अयोध्येतील सैन्य जवळच

असता सीतेच्या संरक्षणाची उत्तम व्यवस्था करून जात आहेत. व्यवहार दृष्टीने त्या मुनींमध्ये मुनिरूप घेतलेला एखादा राक्षस नसेल कशावरून ? याने दाखविले की अशा परिस्थितीत स्त्रीला एकटी ठेऊन एक क्षणभर सुद्धा बाहेर जाणे हा धर्म नव्हे. दुसरे हे दाखविले की सीतेला एकटी टाकून रामलक्ष्मण हे दोघे कधी जात नसत; कोणीतरी एकजण सीतेच्या संरक्षणार्थ तिच्याजवळ रहात असत. **II** शत्रुघ्नाला ठेऊन गेले. यावरून सुचविले की भरत व लक्ष्मण यांना बरोबर घेऊन गेले. लक्ष्मणास भेटण्याची सर्वांचीच इच्छा असणार म्हणून त्यांस घेतले व भरत पितृवचनानुसार अयोध्याधीश आहेत म्हणून त्यांस सीतेच्या संरक्षणासाठी ठेवणे योग्य नव्हे; म्हणून त्यांस घेतले बरोबर.

**चौ. ३-४ (१) गुरुस बघुन सानुज अनुरागति** - जेथून गुरु स्पष्ट दिसले तेथूनच नमस्कार करण्याची तयारी केली; हात वर केले व जमिनीवर टेकण्यासाठी खाली करीत आहेत, तोच ते पाहून गुरु धावतच आले व रामचंद्रांस पुरते जमिनीवर पडू दिले नाहीत. **(क) धावत आले** म्हणजे रथांतून येत नव्हते हे ठरले धावत येऊन त्वरेने धरून अत्यंत प्रेमाने, प्रेमाचा उमाळा येऊन, आलिंगन दिले. राम परमात्मा आहेत हे वसिष्ठ जाणत असले तरी इतर वेळी दण्डवत करताना असे धरले नाहीत व आशीर्वाद दिले आहेत. येथे मात्र आशीर्वाद दिला नाही; कारण राम परमात्मा आहेत हे आता अयोध्यावासी प्रजेला कळले आहे. **(ख) सानुज अनुरागति** - अंगावर रोमांच उठले; हे अनुरागाचे लक्षण प्रगट झाले. गुरुजनांना नमस्कार करताना भगवत् स्मरण करताना वगैरे अंगावर रोमांच येणार नाहीत तर **ज्याचे त्याने समजावे की प्रेम नाही. 'स्मरतां रामहि, रणिं भिडत, देत, पडत गुरुपाइं ॥ तुलसी जे ना पुलकती वृथा जन्म जगिं जाइ ॥'** (दोहा. ४२). (ग) उभयांस = भरत व लक्ष्मण यांना.

**चौ. ५ - (१) पुलकित नाविक नावा वदला - नाविक =** नावाडी. येथे हा शब्द चौथ्या वेळी वापरला आहे. वसिष्ठ सर्वज्ञ त्रिकालज्ञ असल्यामुळे त्यांनी जाणले की हा नावाडी बनला म्हणूनच आम्हांस रामविरहसागर लवकर तरून जाता आला. (दो. २४१ मध्ये पहा). **(क) दुरून दण्डवत् प्रणाम केला** - पूर्वी सुद्धा दुरूनच प्रणाम केला होता - **'बघुन दुरून नाम निज सांगुन । कृत मुनिवरा दण्डवत प्रणमन'** (२९३।५) पण त्या वेळी प्रेमाने अंगावर रोमांच उठले नव्हते. भरताबद्दल प्रेम तर नव्हतेच पण परीक्षा पाहण्यासाठी गेला होता; व मुनिवरास

प्रणाम केला होता; रामगुरुला नव्हे. दुरून प्रणाम करण्यास हेतु एवढाच की आपली छाया वसिष्ठांच्या अंगावर पडू नये.

*हिं.* *। रामसखा रिषि बरबस भेंटा । जनु महि लुठत सनेह समेटा ॥६॥*
*। रघुपति भगति सुमंगल मूला । नभ सराहि सुर बरिसहिं फूला ॥७॥*
*। एहि सम निपट नीच कोउं नाहीं । बड़ बसिष्ठ सम को जगमाहीं ॥८॥*

*हिं.दो.* *। जेहि लखि लखनहु तें अधिक मिले मुदित मुनिराउ ॥*
*॥ सो सीतापति भजन को प्रगट प्रताप प्रभाउ ॥२४३॥*

*म.* *। रामसख्या ऋषि बळें भेटले । प्रेम लुटत महिं जणुं आवरलें ॥६॥*
*। रघुपति-भक्ति सुमंगल-मूला । वानिति नभिं सुर वर्षति फूलां ॥७॥*
*। नसें नीच अति असा कुणि महीं । थोर न जगिं कुणि वसिष्ठसम ही ॥८॥*

*म.दो.* *॥ बघत लक्ष्मणाहुनि अधिक प्रेमें या मुनिराव - ॥*
*॥ भेटति; सीतापति भजनिं प्रगट प्रताप प्रभाव ॥२४३॥*

**अर्थ** - ऋषि रामसख्याला बलात्काराने असे भेटले की जणू जमिनीवर गडबडा लोळत असलेले (राम-) प्रेमच आवरून - गोळा करून - घेतले ॥६॥ रघुपति भक्ति सुमंगलांचे मूळ आहे; अशी प्रशंसा करून देवांनी आकाशांतून पुष्पवृष्टी केली.॥७॥ (व म्हणाले की) याच्यासारखा अति नीच पृथ्वीवर कोणी नाही अणि वसिष्ठांसारखा मोठा (थोर) जगात दुसरा कोणी नाही.॥८॥ (असे असून) याला बघतांच मुनिराज लक्ष्मणापेक्षा सुद्धा अधिक प्रेमाने भेटले; (हा केवळ) सीतापतिभजनाचा (भक्तिचा) प्रगट (उघड उघड दिसणारा) प्रताप व प्रभाव आहे ! ॥दो. २४३॥

**टीका. चौ. ६ - (१) ऋषि बळें भेटले** - त्याने पुलकित होऊन दुरून दण्डवत घातले तोच वसिष्ठ जवळ जाऊन त्यास उचलून भेटण्याचा प्रयत्न करू लागले. पण वसिष्ठांनी स्पर्श करण्यास आपण पात्र नाही; कारण ते सर्वश्रेष्ठ ऋषि व मी एक नीच अस्पृश्य ! या भावनेने तो जमिनीवर गडबडां लोळू लागला. तथापि वसिष्ठांनी त्याला धरलाच. **हा आट्यापाट्यांचा खेळ किती मनोवेधक व परिणामकारक झाला हे पुढे (२४४।५) दिसेलच. (क)** या लोळण्यावर व उचलून घेण्यावर कवि उत्प्रेक्षा करतात - की **'प्रेम लुटत महिं जणुं आवरलें' - लुटत =** लोळत असलेले; **आवरले =** एकत्र केले, गोळा केले. रामसखा नव्हे रामप्रेम (रामस्नेहच) जमिनीवर मातीत लोळत असलेले वसिष्ठांस दिसले; ते न

पाहवल्यामुळे त्यांनी ते सगळेच्या सगळे गोळा करून आपल्या हृदयपात्रांत साठवून ठेवण्यासाठीच की काय हृदयाशी घट्ट आवळले. स्नेह, प्रेम, प्रीती, प्रेमा हे समानार्थक शब्द आहेत.

(२) **शृंगवेरपुरास वसिष्ट असे त्यास भेटले नाहीत.** - कारण (**क**) त्यावेळी त्याचें शरीर पुलकित झालें नव्हतें व मुद्रा संशयग्रस्त दिसत होती. (**ख**) राम त्यास हृदयाशीं धरून भेटले होते हें जगजाहीर झालें नव्हते; तें भरत-राम सखा भेटींत देवांनी जगजाहीर केले. (**ग**) तो सहजस्नेही रामसेवक आहे हें आतां सारखें सर्वांच्या प्रतीतीस आलें नव्हते; म्हणून सर्वज्ञ असल्यामुळें सर्व जाणत असले तरी धर्ममर्यादासंरक्षक रघुकुळाचे ते कुलगुरू असल्याने त्यावेळी भेटणें योग्य नव्हते. एक कारण नाविक शब्दाच्या टीकेत (चौ. ५) दिलें आहे. (**घ**) भरताच्या संगतीने व कृपेने गुह आता साक्षात् रामस्नेहमूर्तीच बनला आहे. हे येथे सहज दाखविले गेले. भरताच्या संगतीने, त्यांच्या स्पर्शाने व भरत निषादराजावर संतुष्ट, प्रसन्न होण्याने चार पांच दिवसांच्या प्रवासांत निषादराजाचें प्रेम कसें वाढत गेले हे आतांपर्यंत आपण पाहिले आहे.

**दो. (१) लक्ष्मणाहुनि अधिक प्रेमे मुनिराव भेटति** - लक्ष्मणास जेवढ्या प्रेमाने मुनिराज भेटले त्यापेक्षा अधिक प्रेमाने ते गुहाला भेटले. याचा अर्थ असा नव्हे की लक्ष्मणाचे रामप्रेम गुहाच्या रामप्रेमापेक्षा कमी दर्जाचे आहे. लक्ष्मण सुमित्रानंदन, दशरथांसारख्या रामभक्ताचा पुत्र, रामाचा भाऊच; त्याचें रामावर निःसीम, अलौकिक प्रेम असलें तर काही नवल नाही. पण हा जातीचा निषाद, अस्पृश्य, साधन, सत्संग, सच्छात्रश्रवण इत्यादि कोणतीच अनुकूलता नसता, सहज रामप्रेममूर्ति बनला आहे, हें लक्ष्मणापेक्षा अधिक प्रेमाने भेटण्याचे कारण आहे. काशीतील उत्तम ब्राह्मण पंडित एक तासभर निर्दोष अस्खलित संस्कृत बोलला आणि एक मुसलमान तरुण तसेच संस्कृत भाषेत बोलला तर आश्चर्य आणि कौतुक कोणाविषयी वाटेल? आणि कोणाशी प्रथम परिचय करण्याची इच्छा होईल? (**क**) **सीतापतिभजन** - येथे भजन म्हणजे भक्ति असा अर्थ आहे. या अर्थाने भजन शब्द अनेक ठिकाणी वापरला आहे. **प्रस्तावनेत पृ. ३३६ वर ३ 'भजन = भक्ति' पहा.** I रामभजन न म्हणता सीतापति-भजन म्हणण्यांत भाव आहे की तो सीता व राम या दोघांचा भक्त आहे. सीता = भक्ती व राम = सच्चिदानंद = ब्रह्म (२३९); म्हणजे तो ज्ञानी भक्त आहे. दुसरा भाव हा की उद्भव स्थिति संहार कारिणी, क्लेशहारिणी

सर्वश्रेयस्करी सीता = आदिशक्ति, ही ज्यांची पत्नी आहे त्यांच्या भक्तीनें याचें श्रेय, कल्याण, शुभमंगल होईल व हा स्वतः मंगलरूप वसिष्ठांनी भेटण्यासारखा पावन बनेल यांत नवल काय? (ख) **रघुपतिभक्ति सुमंगल मूला'** असे म्हणून उपक्रम केला देवांनी; व सीतापतिभजनाचा प्रताप व प्रभाव सांगून उपसंहार केला. येथेच **भक्ति = भजन = भक्ति हे सुचविले आहे.** रामचंद्रास 'दीनदयाळ' (चौ. २) म्हटलें त्याची प्रतीति आता पहा -

*हिं.* *। आरत लोग राम सबु जाना । करुनाकर सुजान भगवाना ॥१॥*
*। जो जेहि भायँ रहा अभिलाषीं । तेहि तेहि कै तसि तसि रुख राखी ॥२॥*
*। सानुज मिलि पल महुँ सब काहू । कीन्ह दूरिं दुख दारुन दाहू ॥३॥*
*। यह बडि बात राम कै नाहीं । जिमि घट कोटि एक रवि छाहीं ॥४॥*

*म.* *। आर्त लोक सब कळे सुजाणा । रामा करुणाकर भगवाना ॥१॥*
*। ज्या ज्या भावें जे अभिलाषिति । त्यांची रुची तशी तशि पुरविति ॥२॥*
*। सानुज सकलां पळांत भेटुन । दुःखद दाह दूर कृत दारुण ॥३॥*
*। हें महत्व रामा बहु नाहीं । रवि घटिं कोटि एक कीं राही ॥४॥*

**अर्थ** - सर्व लोक अति (दीन दुःखी) आहेत हें करुणाकर व सुजाण भगवान रामचंद्रांस कळले (त्यांनी जाणले) ॥१॥ ज्या ज्या भावनेने ज्याची ज्याची भेटण्याची जशी अभिलाषा होती; त्यांची त्यांची रुची-इच्छा तशा तशा रीतीनें पुरविली ॥२॥ एका पळात अनुजासह (किंवा अनुजांसह) सर्वांना भेटून त्यांचा दुःखद दारुणदाह दूर केला. (दूर केलेली वस्तु पुन्हा जवळ येऊ शकते!) ॥३॥ रामाचा हा काहीं विशेष मोठेपणा आहे असे नाही, कारण की एकच सूर्य (सुद्धा) कोटि घटांमधे एकाच वेळी राहतो (दिसतो) ॥४॥

**टीका चौ. १-२ - (१) आर्त लोक सब कळे सुजाणा** - सुजाण = सर्वज्ञ असल्याने सर्वांच्या जीवांचे आर्त त्यांनी जाणले. **'सब'** शब्द दोन्हीकडे घेणे जरुर आहे. सर्व लोक भेटीसाठीं दीन, आर्त बनले आहेत हे ही जाणले. करुणाकर = **करुणासागर** असल्याने त्यांची करुणा = दया आली. (२४३।२ दीनदयाळ पहा) **भगवान =** षड्गुणैश्वर्यसंपन्न असल्याने सर्वांची इच्छा पुरविणे त्यांस सहज शक्य झाले. **(क) ज्या ज्या भावे जे अभिलाषिती** - या अभिलाषांस प्रारंभ प्रथम भरतरामसखा भेटीपासून झाला. **'भरत तया सुप्रीति भेटती । प्रेमरीतिजन सेर्षा स्तविती'** (१९४।१) भरतांनी आपणांस असेच परमप्रीतीने भेटावे असे लोकांना

शृंगवेरपुरासच वाटू लागले (टीका पहा) नंतर आठव्या मुक्कामानंतर अभिलाषांना विशेष प्रारंभ झाला. 'जे ते विविध मनोरथ करती' (२२५।३) वनवासांतून परत आल्यावर असेच सर्वांना भेटले आहेत; पण लक्ष्मणासह भेटले नाहीत. (७।६। ४-७ पहा). तेथे लोक प्रेमार्त आहेत अणि येथे दुःखार्त आहेत.

**चौ ३-४ - (१) सानुज सकलां पळांत भेटुन - सानुज =** भरत लक्ष्मणांसह असा अर्थही घेता येईल. या अल्पमतीला हाच अधिक योग्य वाटतो; कारण भरताला भेटण्याची सर्वांचीच अभिलाषा आहे. निषादराज सुद्धा असाच अनंत रूपांनी प्रगट होऊन जर सर्वांना भेटत आहे (पुढील चौपाई) तर यावेळी रामचंद्रांबरोबर भरत व लक्ष्मण हे दोन अनुज आहेत. हा अर्थ मान्य नसेल त्यांनी सानुज = लक्ष्मणासह हा अर्थ घ्यावा. वसिष्ठ निषादास भेटल्याचे पाहिल्यामुळे, त्याला भेटण्याची इच्छा सर्वांना झाली. रामलक्ष्मण व भरत लक्षावधि रूपानी प्रगट झाले व ज्याच्या त्याच्या इच्छेप्रमाणे यथाधिकार सर्वांना भेटले. हे एका पळात म्हणजे अगदीं थोड्या वेळांत झाले. पण यांतील मर्म कोणाला कळले नाही 'उमे ! मर्म ना कळे कुणा पण' (७।६।७). जो तो आपल्याच आनंदात गर्क ! **(क)** पण दृष्टांताने सुचवितात की ही प्रगट केलेली रूपे म्हणजे पाण्याने भरलेल्या घड्यांत (घटांत) पडलेल्या सूर्याच्या प्रतिबिंबासारखीच ! **(ख) दुःखद दाह दूर कृत दारुण -** विझवून टाकला असे म्हटले नाही. याने सुचविले की दूर केलेला दाह पुन्हा जवळ येणार आहे. पाण्यावरील शेवाळ हाताने पाणी हालवून पुष्कळ दूर केली तरि ती पुन्हा कांहीवेळाने पाण्याला आच्छादतेच. **'शोकनाश होइल हरुष परि परिणामिं विषाद'** (२३४) असे जे शकुनांचे फळ निषादराजाने भरतास सांगितले तेच येथे 'दूर कृत' या शब्दांनी सुचविले आहे.

*हिं.* *। मिलि केवटहि उमगि अनुरागा । पुरजन सकल सराहहिं भागा ।।५।।*
*। देखीं राम दुखित महतारीं । जनु सुबेलि अवलीं हिम मारीं ।।६।।*
*। प्रथम राम भेंटी कैकेई । सरल सुभाएँ भगति मति ।।७।।*
*। पग परि कीन्ह प्रबोधु बहोरी । काल करम बिधि सिर धरिं खोरी ।।८।।*

*हिं. दो.* *। भेटीं रघुबर मातु सब करि प्रबोधु परितोषु ।।*
*।। अंब ईस आधीन जगु काहु न देइअ दोषु ।।२४४।।*

*म.* *। भेटुनि गुहा परम अनुरागां । पुरजन वानिति सर्व सु-भागा ।।५।।*
*। रामा माता दुःखी दिसल्या । जणुं सुबेलि - अवली हिमिं सुकल्या ।।६।।*

*। आधिं राम कैकईस भेटति । भावभक्ति - ऋजुतें भिजविति मति ॥७॥*
*। पाया पडुनी तिजला सांत्विति । दोष काल-विधि कर्मा लाविति ॥८॥*
*म.दो. । मातानां सब भेटले कृत सांत्वन परितोष ॥*
*॥ अंब ईश्वराधीन जग द्यावा कुणा न दोष ॥२४४॥*

**अर्थ** - पुरवासी गुहाला अत्यंत अनुरागाने भेटले; आणि त्याच्या व आपल्या सुभाग्याची प्रशंसा करू लागले. ॥५॥ रामचंद्रांस माता अशा दुःखी दिसल्या की जणू हिमाने सुंदर वेलींच्या पंक्ती सुकवून टाकल्या असाव्यात. ॥६॥ आधीं राम कैकयीला भेटले आणि भावभक्तीने व सरळपणानें तिची बुद्धी भिजवून चिंब केली. ॥७॥ पाया पडून व सर्व दोष काळ, कर्म व विधि यांच्या माथीं मारून तिचे सांत्वन केले ॥८॥ (मग राम) इतर सर्व मातांना भेटले व त्यांचे सांत्वन करून त्यांना परितुष्ट केल्या; (व म्हणाले की) मातांनो ! सर्व जग ईश्वराच्या आधीन आहे म्हणून कोणाला दोष देऊ नये. ॥दो. २४४॥

**टीका चौ. ५ - (१) भेटति गुहा परम अनुरागां, पुरजन** - सर्व लोकांची गुहाला भेटण्याची लालसा जाणून प्रभूंनीच ही लीला केली. जेवढे लोक होते तेवढी लाखो गुहाची रूपे प्रगट केली व लोक जसे रामलक्ष्मण भरत यांस परम प्रेमाने भेटले तसे गुहाला भेटले. सर्व लोकांना भेटण्यासाठी प्रभूंना सुद्धा लक्षावधि रूपे धारण करावी लागली. तेथे एकटा पांच भौतिक देह असलेला गुह लाखो लाकांना कसा भेटणार? कृष्णावतारांत गोपाल-कृष्णाने हजारो गोवत्स व गोपाल यांची रूपे जशी इच्छामात्रे प्रगट केली तशीच येथे गुहाची केली **(क) येथे एका महत्वाच्या गोष्टीचा अभाव** वरपासून खालपर्यंत दिसून आला तो हा की कोणी कोणास आशीर्वाद दिला नाही की कुशल क्षेम विचारले नाही. सीतेने फक्त आशीर्वाद दिला तो मनांतच दिला. याचे मुख्य कारण म्हणजे राम परमात्मा आहेत हे सर्वास कळले आहे. आणि शिवाय जशी रामभरतादि परस्परांस भेटत असता त्यांची दशा झाली तशीच सर्वांची झाली. निषादास भेटल्यानंतर सर्वांनी त्याच्या (व स्वतःच्या) भाग्याची प्रशंसा केली आहे; म्हणून त्यास कोणी आशीर्वाद दिला नाही.

**चौ. ६ (१) रामा माता दुःखी दिसल्या** - कशा दिसल्या पहा - **'म्लान मलिन वसना विकल कृशतनु सुदुःखभारिं ॥ कनक - कल्प वरलता वनि जाणों शुष्क तुषारिं (१६३)** अशी माता कौसल्या भरत अयोध्येत आल्यावर त्यांस दिसली. त्यानंतर ३०।३१

दिवस आणखी गेल्यावर आजची दशा येथे वर्णिली आहे. **'जणुं सुवेलि - अवली हिमिं सुकल्या.'** त्यावेळी कौसल्येची जशी दशा भरतास दिसली तशीच आज रघुनाथास सर्व मातांची दिसली. **सुवेली** = कनककल्पवरलता. दो. १६३ **हे या चौपाई कमलिनीचे फूल आहे.** तेथे टीकेत विस्तार पहावा. 'सुवेली-अवली' ने सुचविले की शेकडो माता आहेत व आता कैकयीची दशासुद्धा इतर मातांसारखीच झाली आहे.

**चौ. ७-८ - (१) आधिं कैकईस भेटति** - कैकई इतर सर्वांपेक्षा अधिक दुःखी व पश्चात्तापाने जळत असणार हे जाणून आधी तिला भेटले. ज्या गोष्टी घडल्या त्यांत तुझा किंवा इतर कोणाचा दोष नाही. काळाच्या ओघाने प्रारब्ध कर्मानुसार विधात्याच्या प्रेरणेने सर्व गोष्टी घडल्या म्हणून तुम्ही त्याबद्दल स्वतःस दोषी ठरवून दुःखी होण्याचे कारण नाही वगैरे सांगून कैकयीचे सांत्वन केले. **(क) भावभक्ति ऋजुते भिजविति मति'** - सद्भावना, मातृभक्ति व सरलता या आपल्या गुणांनी तिची बुद्धी, तिचे हृदय आर्द्र केले. भाव हा की तिचे हृदय अगदी शुष्क झाले होते. प्रेमाचा ओलावा कोणाकडून ही लेशमात्र मिळत नव्हता; कोणाशी बोलण्याची व कोणालाही आपले तोंड दाखविण्याची तिलाच अत्यंत लज्जा वाटत होती. तिचे जीवन शुष्क, नीरस व मरणाहून अधिक दुःखमय झाले होते. आज रामच तिच्याशी अगदी पूर्वी सारखेच प्रेमाने व कळकळीने बोलले; व तिच्या हृदयांत प्रेमाचा ओलावा भरला. वनवासापूर्वी सुद्धा राम कैकयीला आपली जननी समजत असत. **कवितावली** अयोध्याकांड **पद ३ रे पहावे.**

**दो. - (१) अंब ईश्वराधीन जग द्यावा कुणा न दोष - या मातांत सुमित्रा व कौसल्या नाहीत** हे पुढील (चौ. ३-४) उल्लेखावरून स्पष्ट आहे. इतर सर्व मातांना उद्देशून हे आहे. या माता कदाचित कैकयीला दोष देत असतील. असे लोकव्यवहारानुसार गृहीत धरून ही सूचना, विनंति केली आहे व ती कैकयीच्या देखत केली आहे असे दोन्हींचे वर्णन जवळजवळ करून दाखविले आहे. **सुमित्रा व कौसल्या** यांच्या अगदी जवळ नसून **थोड्या दूर आहेत** हे पुढील वर्णनावरून ठरते.

*हिं.* ***। गुरतिय पद बंदे दुहुँ भाई । सहित बिप्रतिय जे सँग आई ॥१॥***
***। गंग गौरि सम सब सनमानीं । देहिं असीस मुदित मृदु बानीं ॥२॥***
***। गहि पद लगे सुमित्रा अंका । जनु भेंटी संपति अति रंका ॥३॥***
***। पुनि जननी चरनन्हि दोउ भ्राता । परे पेम ब्याकुल सब गाता ॥४॥***
***। अति अनुराग अंब उर लाए । नयन सनेह सलिल अन्हवाए ॥५॥***

म. *। गुरुपत्नीपद बंधु वंदती । सहित सवें ज्या ब्राह्मणि असती ॥१॥*
*। गंगा-गौरीसम सन्मानति । मुदित वचनिं मृदु आशिस अर्पति ॥२॥*
*। बसले नमुनि सुमित्रे, अंका । जणुं भेटे संपद अति रंका ॥३॥*
*। पडति बंधु युग जननी - पाया । प्रेमे व्याकुळ त्यांच्या काया ॥४॥*
*। प्रेमें अति अंबा हृदिं धरते । चक्षु - स्नेहज - सलिलिं न्हाणते ॥५॥*

**अर्थ** - दोघां भावानीं गुरुपत्नीच्या पायांना व त्यांच्या बरोबर आलेल्या ब्राह्मणींच्या (विप्रस्त्रियांच्या) पायांना वंदन केले. ॥१॥ गंगा व गौरीप्रमाणे त्या सर्वांचा सन्मान केला व त्यांनी प्रसन्न होऊन गोड शब्दांनी आशीर्वाद दिले. ॥२॥ (मग) सुमित्रेला नमस्कार करून दोघे तिच्या मांडीवर बसले तेव्हा असे वाटले की जणू रंकाला संपत्तिच भेटली ॥३॥ मग दोघे भाऊ कौसल्या जननीच्या पाया पडले तेव्हा त्यांचे देह (काया) परम प्रेमाने व्याकुळ झाले. ॥४॥ कौसल्येने त्या दोघांस हृदयाशी धरले व नेत्रांतून (चक्षू) स्नेहाने निघणाऱ्या जलाच्या प्रवाहांत त्यांना स्नान घातले (न्हाणिले) ॥५॥

**टीका - चौ. १-२ (१) गंगा गौरीसम** - गंगाभागीरथी असा उल्लेख विधवा स्त्रियांच्या नांवापूर्वी करण्याचा प्रघात महाराष्ट्रांत तरी आहे. सधवा स्त्रियांच्या नावापूर्वी सौभाग्यवती असा उल्लेख करतात. गौरी - शिवपत्नी - पार्वती सौभाग्यवती, सती आहे. विधवा स्त्रियांचा व सौभाग्यवती स्त्रियांचा गंगेसमान व पार्वतीसमान मानून सन्मान केला. इतर सर्व राण्यांच्या पलीकडेच अरुंधती व सर्व विप्रस्त्रिया बसलेल्या आहेत हे सुचविले. त्यांच्या पलीकडे सुमित्रा व कौसल्या आहेत.

**चौ. ३. (१) जणुं भेटे संपद अति रंका - संपद् =** संपति (हिं) = संपत्ति, स्त्रीलिंगी आहे, 'रंक' पुल्लिंगी आहे; म्हणून संपत्ति कोणाला भेटली हे ठरविणे सोपे आहे. अंक = मांडी स्त्रीलिंगी आहे. सुमित्रेची मांडीरूपी संपत्ति जणू अति रंक असलेल्या रामचंद्रांस व लक्ष्मणास **भेटली** - सहज अचानक सापडली. सुमित्रा मांडी घालून बसलेली दिसतांच नमस्कार करून राम चटकन तिच्या एका मांडीवर बसले; व मग लक्ष्मण दुसऱ्या मांडीवर बसले. ॥भेटे परीस जणुं अति रंका ॥ असे म्हटले असते तर सुमित्रेला आनंद झाला असे ठरले असते. लहानपणी सुमित्रा रामचंद्रांना मांडीवर घेऊन त्यांचे लालन करीत असे. 'मोद भरे गोद लिए लालति सुमित्रा देखि' (गीता १।१०।२) यांत रामचंद्रांस मांडीवर घेऊन लालन करीत असलेल्या सुमित्रेला पाहून देवांनी तिची स्तुति केली आहे. रामचंद्रांना लहानपणी सुमित्रेचा लळा फार होता हे गीतावली बा. कां पद ९,१४ इत्यदिकांवरून

ठरते. (क) सुमित्रेची मांडी बसण्यास मिळाल्याचा परमानंद मुख्यतः रामचंद्रांसच झाला आहे. राम बसले म्हणून लक्ष्मण बसले. (ख) रामचंद्रास झालेला हा परमानंद एक मोठा सिद्धान्त सांगतो की जिने लक्ष्मणासारख्या रामसेवामूर्तीस जन्म दिला, जिने काही कारण नसता लक्ष्मणासारख्या अलौकिक ज्येष्ठ पुत्राचा वियोग सहन केला व त्यास रामसेवेचा उपदेश देऊन निर्मम करण्याचा प्रयत्न करून, रामरहस्य सांगून, 'रामसेवेसाठी वनांत जा' असे सांगितले व वनांत पाठविला, ती माता-जननी रामचंद्रांस किती प्रिय वाटते पहा. सुमित्रेला किती आनंद झाला हे सांगणे तर अशक्यच !

**चौ.** ४-५ (१) सुमित्रेला भेटल्यानंतर शेवटी राम आपल्या मातेला कौसल्येला भेटले त्यांच्या काया = रामलक्ष्मण व कौसल्या यांचे देह, प्रेमाने व्याकुळ झाले; म्हणजे रोमांच कंप अश्रू, गदगदवाणी इ सात्विक भाव प्रगट झाले. सलिल = वाहणारे जल; स्नेहामुळे कौसल्येच्या डोळ्यांतून अश्रूधारा वाहू लागल्या व ते अश्रू राम व लक्ष्मण यांच्या अंगावर गळत आहेत. सुंदर शब्दचित्र आहे. हे चित्रांत दाखविण्यासारखे आहे. पुढे दिसेल की चित्रकूटाहून भरत परत गेले त्यावेळी सुद्धा राम कैकयीला प्रथम भेटले व तिला प्रथम पालखीत बसविली व कौसल्येला शेवटी. तसेच वनवासांतून परत आल्यावर राम प्रथम कैकयीच्या महालांत गेले आहेत. पूर्वी जसा कैकयीला अधिक मान देत असत तसाच आता दिला व पुढेही दिला आहे. सुमित्रा-कौसल्यांनीसुद्धा आशीर्वाद दिले नाहीत !

*हिं.*　*। तेहि अवसर कर हरष बिषादू । किमि कबि कहै मूक जिनि स्वादू ।।६।।*
*। मिलि जननिहि सानुज रघुराऊ । गुर सन कहेउ कि धारिअ पाऊ ।।७।।*
*। पुरजन पाइ मुनीस नियोगू । जल थल तकि तकि उतरेउ लोगू ।।८।।*

*हिं. दो.*　*। महिसुर मंत्री मातु गुर गने लोग लिए साथ ।।*
*।। पावन आश्रम गवनु किय भरत लखन रघुनाथ ।।२४५।।*

*म.*　*। त्या - समयींचा हर्ष विषाद । वदवे कविसि किं मूका स्वाद ।।६।।*
*। जननिस सानुज भेटुनि रघुपति । 'करा पदार्पण' गुरुला विनवति ।।७।।*
*। पुरजन मुनीश-आज्ञा पावुनि । उतरु लागले स्थल जल पाहुनि ।।८।।*

*म. दो.*　*। विप्र सचिव माता गुरु निवडक जन, घेतात ।।*
*।। रघुपति लक्ष्मण भरत शुचि आश्रमास जातात ।।२४५।।*

**अर्थ** - त्यावेळेचा हर्ष व विषाद कवीला कसा सांगता येणार ! मुका स्वाद

सांगूं शकेल काय? ॥६॥ अनुजासह जननीला भेटून रघुपति (रघुराज) गुरुजींना विनवितात की (आश्रमास) पाय लावावे ॥७॥ मुनीशांची आज्ञा होतांच पुरवासी लोक जागा व पाणी (यांची सोय) पाहून जिथे तिथे उतरू लागले. ॥८॥ ब्राह्मण, मंत्री, माता गुरु व निवडक लोक यांना बरोबर घेऊन रघुपति (रघुनाथ) लक्ष्मण व भरत पावन (शुचि) आश्रमाकडे जाऊ लागले. ॥दो. १४५॥

**टीका चौ. ६ - (१) त्या समयीचा हर्ष विषाद** - रामलक्ष्मण आज ५२ व्या दिवशी भेटले व कुशल असलेले डोळ्यांनी पाहिले, यामुळे हर्ष - आनंद झाला. परंतु वनवासाने कृश, मलिन झालेले, डोक्यावर जटाभार इ. मुनिवेष, पाहून विषाद वाटला. त्याबरोबर स्मरणही झाले असेल की ज्यांच्या विरहाने महाराजांनी देहत्याग केला, त्यांची ही दशा पाहण्यास आम्ही जिवंत राहिलो ! आणि हे अति सुकुमार बालक ज्या मार्गाने अनवाणी चालत आले उन्हातान्हांतून, त्या मार्गाने आम्ही पालख्यांत बसून मिरवत आलो! इ. प्रकारे विषाद वाटत आहे. तो वर्णन करणे कवीला किती अशक्य आहे याला दृष्टान्त 'मुकास्वादन वत्' (ना.भ.) मुका खाल्लेल्या पदार्थाची चव सांगू शकत नाही, त्याप्रमाणे यांच्या हर्षविषादांचे वर्णन यांनासुद्धा करता येणार नाही, मग कवि कसें करणार !

**चौ. ८ म. दोहा (१) मुनीश - आज्ञा** - इतके सर्व सैन्य व लाखों पुरवासी यांना रामाश्रमांत जागा पुरणे शक्य नाही; शिखरावर पाणी नसल्याने सर्वांचीच गैरसोय होणार; हत्तीघोडे वगैरे आश्रमाची नासधूस करणार, हे जाणून वसिष्ठांनी सर्वांस नदीच्या आसपासच उतरण्यास सांगितले. निवडक पुरवासी लोक व विप्रादिकांना बरोबर घेऊन रामप्रमुख तिघे बंधू निघाले. आता तेथे पोचल्यावर सीता सर्वांचे दर्शन घेईल.

*हिं.* *। सीय आइ मुनिवर पग लागी । उचित असीस लही मन मागी ॥१॥*
*। गुरपतिनिहि मुनितियन्ह समेता । मिली पेमु कहि जाइ न जेता ॥२॥*
*। बंदि बंदि पग सिय सबही के । आसिरबचन लहे प्रिय जी के ॥३॥*
*। सासु सकल जब सीयँ निहारीं । मूदे नयन सहमि सुकुमारीं ॥४॥*
*। परीं बधिक बस मनहुँ मरालीं । काह कीन्ह करतार कुचालीं ॥५॥*
*। तिन्ह सिय निरखि निपट दुखु पावा । सो सबु सहिअ जो दैउ सहावा ॥६॥*

*म.* *। ये सीता नमि मुनिवर - चरणां । लभे उचित इष्टाशीर्वचना ॥१॥*
*। गुरुपत्निस मुनिनारीं सहिता । भेटे, प्रेम न येई वदतां ॥२॥*
*। पृथक् वंदि सीता सर्वांना । पावे प्रिय आशीर्वादांना ॥३॥*

*। बघे सासुंना सुकुमारी जैं । सीता भीता नेत्र मिटी तैं ॥४॥*
*। वधिक - करीं पडल्या किं मराली । काय दैव ही करी कुचाळी ॥५॥*
*। त्या अति दुःखि, बघुनि सीतेतें । सहणें दैव साहवी जें तें ॥६॥*

**अर्थ -** सीतेने पुढे येऊन मुनिवरांच्या पायांना नमस्कार केला, व पाहिजे होता तो समयोचित आशीर्वाद तिला मिळाला. ॥१॥ (नंतर) सीता मुनिस्त्रियांसहित गुरुपत्नीला अरुंधतीला भेटली; त्या वेळचे प्रेम सांगता येणे शक्य नाही. ॥२॥ सीतेने त्या सर्वांना पृथक् पृथक् (व्यक्तिशः) नमस्कार केला; आणि आवडीचे आशीर्वाद मिळाले ॥३॥ सीतेने जेव्हा सासवांना पाहिल्या तेव्हां ती सुकुमारी घाबरली व तिने आपले डोळे मिटले ॥४॥ (तिला वाटले की) जणू हंसिनी व्याधाच्याच हाती सापडल्या की काय! (व मनांत म्हणाली) दैवाने काय हा दुष्टपणा केला! ॥५॥ सीतेला पाहून त्या (सर्व सासवा) अति दुःखी झाल्या (व मनांत म्हणाल्या की) दैव जे सोसायला लावील ते सोसलेच पाहिजे ! ॥६॥

**टीका चौ. १ - (१) उचित** = समयोचित, हल्लीच्या परिस्थितीत योग्य असा. **'प्राणनाथ दीरासहित कुशल कोसले याल ॥ पुरतिल सब मनिं कामना सुयश जगीं पसराल'** (२।१०३) असा आशीर्वाद सीतेला पाहिजे होता. हा गंगेने सर्वज्ञ असल्यामुळे दिला. मुनिसुद्धा सर्वज्ञच आहेत.

**चौ. ४-६ - (१) सीता भीता नेत्र मिटी तैं -** मलीन जाडीं भरडीं वस्त्रे नेसलेल्या, उदासीन, सुकून गेलेल्या, विभूषणहीन अशा सर्व सासवा दिसल्या; पण वसिष्ठ जवळच असल्याने सर्वांनी कपाळाच्या खालपर्यंत पदर घेतलेला असल्याने कुंकमतिलक नाहीत अशी खात्री होईना; व अशी खात्री झाल्याशिवाय शोक करू लागणे मूर्खपणा ठरला असता कदाचित; पण तिला तो सासवांचा वेष व दुर्दशा पाहवेना; म्हणून सीतेने डोळे मिटून घेतले व कोमल मनाची आणि शरीराने अति कोमल असल्याने तिला भीतीच वाटूं लागली. **(क) वधिक करीं पडल्या किं मराली** - तेजस्वी, गौर वर्णाची निर्मळ सुंदर असणारी हंसिनी व्याधाच्या (वधिक) हातांत सापडली कीं सुटण्यासाठी जमिनीवर तडफडल्याने पंख मलिन होतात; मरणाच्या भयाने सुकून जाते, व अत्यंत दुःखी उदास दिसते तशाच सर्व सासवा दिसल्या. **(ख) त्या अति दुःखि बघुनि सीतेतें -** सीतेच्या माहेरच्या व सासरच्या पूर्व सुखाची व हल्लीच्या प्रत्यक्ष दिसणाऱ्या स्थितीची तुलना मन करणारच व मग कोणत्या सहृदय मानवास दुःख वाटणार नाही ! त्यांतून ज्या कौसल्येने सीतेला कधी जमिनीला

पाय लावू दिला नाही की समईची वात सारण्याचेसुद्धा कष्ट होऊ दिले नाहीत तिला किती दुःख झाले असेल याची कल्पना इतरांस कशी करता येईल? शेवटी ।। ठेविले दैवाने तैसेचि रहावें ।। दुःखही सोसावें जें जें देई' असे केल्याशिवाय मार्गच नाही, व नसतो अशा प्रसंगी.

*हिं.* ***। जनकसुता तब उर धरि धीरा । नील नलिन लोयन भरि नीरा ।।७।।***
***। मिली सकल सासुन्ह सिय जाई । तेहि अवसर करूना महि छाई ।।८।।***

*हिं. दो.* ***। लागि लागि पग सबन्हि सिय भेंटति अति अनुराग ।***
***।। हृदयँ असीसहिं पेम बस रहिअहु भरी सोहाग ।।२४६।।***

*म.* ***। जनकसुता मग धरते धीर । नील नलिन - नयनीं ये नीर ।।७।।***
***। जाउन भेटे सकल सासुंना । तैं पृथ्वीवर पसरे करुणा ।।८।।***

*म. दो.* ***। भेटे पाया पडुनि, अति प्रेमें प्रत्येकीस ।।***
***।। चिर सौभाग्या भोगसी, प्रेमें मनिं आशीस ।।२४६।।***

**अर्थ** - मग जनकसुतेने धीर धरिला (पण) तिच्या नीलकमलासारख्या नेत्रांत पाणी (नीर) आले ।।७।। (तरि) ती सगळ्या सासवांना जाऊन भेटली; त्यावेळी पृथ्वीवर करुणा पसरली ।।८।। प्रत्येकीच्या जवळ जाऊन पाया पडून सीता प्रत्येक सासूला भेटली. व अखंड सौभाग्य भोगशील असा आशीर्वाद त्यांनी प्रेमाने मनांत दिला ।।दो. २४६।।

**टीका चौ. ७-८ - (१) जनकसुता -** विदेही असून जनकराजा सदा धर्मपरायण व कर्तव्य तत्पर असतात. त्यांचीच कन्या ! तिने विचार केला की सर्व सासवा येऊन उभ्या असता त्यांना वंदन करून न भेटता स्वस्थ राहणे हा अधर्म होत आहे. अशा विचाराने धीर धरला. **(क) तैं पृथ्वीवर पसरे करुणा -** सर्व राण्या सीताप्रेमवश व शोकवश होऊन रडू लागल्या; सीता त्यांतून वाचणे शक्यच नाही. तिच्या डोळ्यांस तर आधीच अश्रू आले होते; तेच सर्वांच्या शोकाचे कारण आहे. हा रडण्याचा आवाज सर्व बाजूंस पसरला

**दोहा - (१) प्रेमें मनिं आशीस -** प्रेमाने व शोकाने हृदय भरले आहे व कंठ दाटून आले आहेत. त्यामुळे बोलवत नाही; म्हणून मनांतच आशीर्वाद दिले.

*हिं.* ***। बिकल सनेहँ सीय सब रानीं । बैठन सबहि कहेउ गुर ग्यानीं ।।१।।***
***। कहि जग गति मायिक मुनिनाथा । कहे कछुक परमारथ गाथा ।।२।।***
***। नृप कर सुरपुर गवनु सुनावा । सुनि रघुनाथ दुसह दुखु पावा ।।३।।***

*। मरन हेतु निज नेहु बिचारी । थे अति बिकल धीर धुर धारी ॥४॥*
*। कुलिस कठोर सुनत कटु बानी । बिलपत लखन सीय सब रानी ॥५॥*
*। सोक बिकल अति सकल समाजू । मानहुँ राजु अकाजेउ आजू ॥६॥*
म. ***। स्नेह - बिकल सीता सब राण्या । ज्ञानी गुरु त्यां सांगति बसण्या ॥१॥***
***। सांगुनि जगगति मायिक मुनिवर । कथिति काहिं परमार्थ-कथावर ॥२॥***
***। नृप-गमना सुरपुरास वदले । अति दुःखी रघुनाथ जाहले ॥३॥***
***। स्नेह निज हि मृतिकारण जाणति । धीर धुरंधर विकल होति अति ॥४॥***
***। परिसुनि कुलिशकठिण कटु भाषण । विलपति लक्ष्मण सिता राणिगण ॥५॥***
***। लोक शोक विव्हळ अति सगळे । भूपमरण जणुं आजच घडलें ॥६॥***

**अर्थ** - सीता आणि सर्व राण्या स्नेहाने व्याकुळ झाल्या आहेत (असे पाहून) ज्ञानी गुरुंनी त्या सर्वांना बसण्यास सांगितले. ॥१॥ जगाची गति (सर्व व्यवहार, घडामोडी) मायिक = मिथ्या - मोहमूलक आहे असे म्हणून मुनिश्रेष्ठांनी काही उत्तम (वर) परमार्थाच्या कथा सांगितल्या ॥२॥ नंतर दशरथराजांच्या अमरावतीस गमन करण्याची (मरणाची) हकीगत सांगितली; (ती ऐकून) रघुनाथांस अति दुःख झाले ॥३॥ मरणाचे कारण आपला स्नेहच आहे हे जाणून, धीरगंभीर असून अति व्याकुळ झाले. ॥४॥ ते अप्रिय (कटु) व वज्रासारखे कठीण (कठोर) भाषण ऐकून लक्ष्मण सीता व सर्व राण्या विलाप करू लागल्या ॥५॥ सगळे लोक शोकाने अति व्याकुळ झाले; (तेव्हा वाटले की) राजाचे मरण जणू आजच झाले आहे ॥६॥

**टीका चौ. २-(१) जगगति मायिक .... परमार्थकथा वर - जगगति =** जगाची गति, जगांतील व्यवहार, घडामोडी; म्हणजे योगवियोग, लाभहानि इत्यादींचे अनुभव, व असल्या सर्वच गोष्टी मायिक = मायाकृत आहेत. मोहाने सत्यशा वाटणाऱ्या आहेत; त्यांना पारमार्थिक अस्तित्व (= सत्ता) नाही. २।९२।५ - [illegible]२ पहा व दो. १५६ व १६९।८ पहा. **'यथा काष्ठंच काष्ठंच समेयातां महोदधौ । समेत्य च व्यपेयातां तद्वद्भूत समागमः ॥ एकवृक्षसमारूढा नानावर्णा विहंगमाः ॥ प्रभाते दिक्षु दशसु यान्ति का परिदेवना' (चा.नी. मा.पी.)**

**चौ. ३ (१) नृपगमना सुरपुरास वदले -** जगगति मायिक - मिथ्या आहे हे सांगून, परमार्थ कथा सांगताना एक परमात्माच परमार्थ सत्य आहे; आणि म्हणून **'सत् हरिभजन जगत् स्वप्नासम'** हा सिद्धान्त सांगून त्यांतूनच ओघाओघाने

दशरथमरणाचा दृष्टान्त दिला. यांत वाक्पटुता, व्यवहारचातुर्य व शास्त्रज्ञान यांची सांगड घातली गेली. **(क) अति दुःखी रघुनाथ जाहले** - रघुनाथ शब्दांत भाव आहे की आपण अनाथ झालो असे रघुनाथास वाटले. ही प्रभूची नरलीला पाहून वसिष्ठांना सुद्धा मोह उत्पन्न झाला हे उत्तर कांडांतील त्यांच्याच वचनाने सिद्ध होते. **'बघ बघुनी तुमच्या आचरणा । होत मोह मम हृदयिं पार ना'** (७।४८।४)

(२) **सावधान !** - ज्ञानी म्हणविणारांनी आईबापांच्या मेल्यावर असा शोक करून श्रीरामचंद्रांचे उदाहरण देणे म्हणजे **आपल्या अज्ञानावर दंभाचे पांघरूण घालणे असून आत्मघातकीपणा आहे.** अधःपतनाचे साधन आहे. **'न देव चरितं चरेत्'** हे पक्के ध्यानात असावे. जगातील कोणत्याही गोष्टीचा हानिवियोगादिकांनी शोकाचा, दुःखाचा लवलेश हृदयांतही उत्पन्न होत असेल तोपर्यंत मोह मेला नाही, जगत्सत्यत्व भ्रम आहे, असे समजावे.

**चौ. ४ - (१) स्नेह निज हि मृतिकारण जाणति - मृति** = मरण. दशरथांच्या मरणाचे कारण आपला स्नेह आहे असे म्हणून त्याचा सर्व दोष राम आपल्यावर घेत आहेत. भरताने हा दोष कैकयीच्या माथी मारला; **'स्वर्गि पाठवुनि पतिहित केले'** (१८०।३) **'मी शठ सकल अनर्था कारण'** (१७९।५) असे स्वतःसही कारण मानतात; कौसल्या केवळ स्वतःच्या प्रारब्धाला दोषी ठरविते. (१६५।७) यावरून दिसते **की कोणीही दुसऱ्यांस दोष देण्यास तयार नाहीत. जो तो स्वतःलाच दोषी मानीत आहे. आम्ही नेमके याच्या उलट करतो म्हणून तर कोणालाच समाधान लाभत नाही. 'कोणि कुणा सुखदुःख न दाता'** हेच खरे !

**चौ. ५ - (१) विलपति लक्ष्मण सिता राणिगण** - यांत **लक्ष्मणाचा प्रथम उल्लेख हेतुपूर्वक आहे.** राण्यांनी पूर्वी पुष्कळ विलाप केला आहे. दशरथ मेल्यास आज ४६ वा दिवस आहे . काळाच्या ओघात सुखदुःखांची तीव्रता हळुहळु कमी होतेच; कारण जागतिक सुखदुःखादिक **'आगमाऽपायिनोऽनित्याः'** (भ.गी.) अशाश्वत असतात. सीतेला आधीच कल्पना आली होती व राण्यांच्या बरोबर रडण्याने आधीच शोकभार थोडा हलका झाला होता. लक्ष्मणाला मात्र काही कल्पना नसता एकाएकी ही बातमी कानांवर आदळली. लक्ष्मणाचे दुःख पितृमरणापेक्षा राम फार दुःखी झालेले पाहण्याने आहे. **'बघु न शकसि मज दुःखी अंमळ । सदा स्वभाव बंधु तव कोमल'** (६।६१।३) या श्रीरामवचनाच्या सत्यतेची प्रचीती प्रथम लक्ष्मणक्रोध रूपाने एकदा चांगलीच दिसली. आता येथे शोकरूपाने दिसत आहे. लक्ष्मणाचा शोक

पितृमरणामुळे आहे असे पाहणारांस वाटत असले तरी **'प्रभु अंतर्यामी जाणति की। मम शोकें लक्ष्मण अति शोकी** ।। प्रज्ञा ।। **'तद्दुःखे दुःखित्वम्'** (ना.भ.) हे अनन्य एकान्त भक्तीचे - प्रेमाचे लक्षण आहे.

**चौ. ६ - (१) लोक शोक विव्हळ अति सगळे** - सचिव, विप्र, परिवार, सेवक इत्यादी जे कोणी आश्रमात आले आहेत ते सर्वच शोकाने अति व्याकुळ झाले. रामलक्ष्मण व सीता या तिघांना दशरथमरण आजच झाल्यासारखे दुःख होणे स्वाभाविक आहे. पण इतरांस तसे व्हावयास नको होते. परंतु **शोक व प्रेम यांचा स्वभाव व प्रभाव एखाद्या नदीला येणाऱ्या महापुरासारखा आहे; वाढत वाढत सर्वांना ग्रासतो.**

**(क) भूपमरण जणुं आजच घडलें** - दशरथमरण तर ४६ दिवसांपूर्वी ज्या रात्री राम प्रथम चित्रकूटास झोपले त्या रात्रीच घडले; त्या वेळी या तिघांना मुळीच दुःख झाले नाही. देवांनी बांधलेल्या सुंदर पर्णशाळेत प्रवेश करून आनंदाने गप्पा मारल्या त्या वेळी. आज दशरथ मेले नसता या तिघांस दुःख होत आहे. याने स्पष्टपणे दाखविले की मरण हे दुःखाचे कारण नाही. मरणाची वार्ता व मेलेल्या व्यक्तीशी ममत्वाचा संबंध जोडला गेला म्हणजे दुःख होते. सार हेच की **ममताच दुःखाचे किंवा सुखाचे कारण आहे.** श्रीरघुनाथाने निराळ्या भाषेत हेच सांगितले की दशरथांचे रामावरील ममत्वच त्यांच्या मरणाचे कारण आहे. इतर कोणीही नाहीत. बाकीच्यांनी स्वतःस कारण मानणे हे दीनता, ग्लानि व परदोष दर्शनाचा अभाव इत्यादींचे लक्षण आहे.

*हिं.* *। मुनिवर बहुरि राम समुझाए ।। सहित समाज सुसरित नहाए ।।७।।*
*। ब्रतु निरंबु तेहि दिन प्रभु कीन्हा । मुनिहु कहें जलु काहु न लीन्हा ।।८।।*

*हिं.दो.* *। भोरु भएँ रघुनंदनहि जो मुनि आयसु दीन्ह ।।*
*।। श्रद्धा भगति समेत प्रभु सो सबु सादरु कीन्ह ।।२४७।।*

*म.* *। नंतर रामा सांत्विति मुनिवर । स्नाति जनांसह सरिते सुंदर ।।७।।*
*। प्रभु दिनिं त्या व्रत निर्जल करती । मुनि वचनिंहि जल कुणि न सेवती ।।८।।*

*म.दो.* *। उदयीं रघुनंदना जशि आज्ञा देति मुनीश ।।*
*।। श्रद्धा भक्ती आदरें सकल करिति जगदीश ।।२४७।।*

**अर्थ** - नंतर मुनिवरांनी रामाचे सांत्वन केले, नंतर सर्व मंडळीसह रामचंद्रांनी सुंदर सरितेत (मंदाकिनीत) स्नान केले.।।७।। त्या दिवशी प्रभूंनी निर्जल व्रत

केले; (सर्वांनी असे व्रत करण्याची आवश्यकता नाही असे) मुनींनी सांगितले तरी सुद्धा कोणीही पाणी प्यायले नाहीत.॥८॥ उजाडल्यावर (दुसऱ्या दिवशी) मुनिश्रेष्ठांनी रघुनंदनास जशी आज्ञा दिली तसे जगदीशांनी (प्रभु) विश्वासयुक्त आदराने व प्रेमाने सर्व (क्रिया कर्मांतर) केले. ॥ दो.२४७ ॥

**टीका. चौ. ७ - (१) सांत्विति** - एकदा सांत्वन केले. पुनरपि = पुन्हा म्हटले. सांगितले असेल की आपणच अधीर होऊन असे शोक करीत बसलात तर लक्ष्मणादिकांनी कोणाच्या आधारावर व कोणाकडे पाहून आपला शोक आवरावा ? कौसल्येच्या वचनात किंचित फरक करून **'प्रजा सचिव सब माता परिजन । तुम्हिहि तात सकलां अवलंबन'** (१७६|४) 'बाळ !' च्या बद्दल तात' इतकाच फरक करावा लागला.

**चौ. ८ (१) मुनिबचनिं हि जल कुणि न सेवती** - रघुनाथांनी निर्जल व्रत केले तरी इतरांनी तसे करण्याची आवश्यकता नाही, असे वसिष्ठांनी सर्वांस सांगितले. तथापि कोणीही तोंडात पाणीसुद्धा घातले नाही. भूपमरण आजच घडले असे सर्वांना वाटत आहे हे कारण असले तरी गौण आहे. रामलक्ष्मण व सीता निर्जल व्रत करणार व मातांनी व इतरांनी पाणी प्यावे हे कसे शक्य आहे. पाणी प्या अशी आज्ञा मुनींनी दिलेली नाही. त्यांनी शास्त्रानुसार काय आवश्यक व काय अनावश्यक इतकेच सांगितले.

**दो. (१) रघुनंदन** - राम प्रभु, जगदीश असून दशरथांची उत्तरक्रिया करीत आहेत व रघुवंशांतील सर्व पूर्वजांना आनंद देणारे आहे हे या शब्दाने सुचविले. **(क) शास्त्रार्थ** - मातापितरांचे मरण परगांवी असणाऱ्या पुत्रास समजल्यावर दिवस असेल तर त्याच दिवशी व रात्री कळले तर दुसऱ्या दिवशी सकाळी त्याने क्षौर केले पाहिजे. कळल्याबरोबर सचैल स्नान केले पाहिजे. मुनिव्रत असल्याने क्षौर नाही; पण स्नान केलेच. मरणवार्ता समजेल त्या दिवसापासून १० दिवस मृताशौच धरावे. एक वर्षानंतर कळले तरीसुद्धा पुत्रांस १० दिवस सुतक असतेच. पूर्वी उत्तरक्रिया झाली असो वा नसो; त्या वेळी हजर नसणाऱ्या पुत्रांनी सर्व उत्तर क्रिया यथाविधि केली पाहिजे. लक्ष्मण आणखी दुसऱ्या गावी असते तर त्यांसही उत्तरक्रिया स्वतंत्रपणे करावी लागली असती. **(ख) प्रभु = जगदीश** - जरि सर्वेश्वर आहेत तरी मनुष्यरूप घेतले असल्याने विश्वास, श्रद्धा भक्तियुक्त अंतःकरणाने यथाविधि कर्माचरण करीत आहेत. 'धर्ममार्ग चरित्रेण' (श्रुति) दाखवीत आहेत. **(ग) श्रद्धा भक्ती आदरें** - श्रद्धा व आदर हे शब्द पुष्कळ वेळा पर्याय म्हणून वापरतात पण, श्रद्धा = आदर व विश्वास = आस्तिक्य बुद्धि असा

अर्थ आहे; म्हणून येथे श्रद्धा = विश्वास असा सामान्य अर्थ घेणे जरूर आहे; अन्यथा श्रद्धा व आदर या शब्दांनी पुनरुक्ति दोष निर्माण होईल.

*हिं.* ***। करि पितु क्रिया वेद जसि बरनी । भे पुनीत पातक तम तरनी ॥१॥***
***। जासु नाम पावक अघ तूला । सुमिरत सकल सुमंगल मूला ॥२॥***
***। सुद्ध सो भयउ साधु संमत अस । तीरथ आवाहन सुरसरि जस ॥३॥***

*म.* ***। क्रिया कृता जैशी श्रुतिसरणी । तैं पुनीत पातकतमतरणी ॥१॥***
***। यस्य नाम पावक अघतूला । तत्स्मृति सकल सुमंगल-भूला ॥२॥***
***। शुद्धि तयां सज्जन मत ऐसें । तीर्थावाहन गंगें जैसें ॥३॥***

**अर्थ** - (पित्याची उत्तर) क्रिया वेदविधीने (सरणी = पद्धती, विधि) केली तेव्हा पातकरूपी अंधाराला सूर्यासारखे (तरणि = सूर्य) असणारे (राम प्रभु) पुनीत ( = शुद्ध) झाले.॥१॥ ज्यांचे नाव पापरूपी कापसाला पावकाप्रमाणे आहे व त्याचे स्मरण सकल सुमंगलांचे मूळ आहे.॥२॥ ते शुद्ध झाले ! (या विषयी) सज्जनांचे मत असे आहे की शुद्ध होणे गंगेत तीर्थाचे आवाहन करण्यासारखे आहे. ॥३॥ (स्मृति = स्मरण, उच्चार).

**टीका. चौ. १ (१) तैं पुनीत** - राम पुनीत, शुद्ध झाले असे म्हटले. त्यावरून कोणास वाटेल की इतर माणसांसारखे ते अशुचि झाले होते. म्हणून सांगतात की राम पातक-अपवित्रता रूपी गडद अंधाराचा नाश करणारे तरणि = सूर्य आहेत. सूर्याला जर अंधाराचा स्पर्श होत असेल तर म्हणता येईल कदाचित की राम अशुचि झाले होते. ज्यांच्यासमोर आल्याने कोटिविप्र हत्येचे पातक नष्ट होते त्यांना शुद्धि व अशुद्धि दोन्ही नाहीत.

**चौ. २-३ (१) यस्य नाम पावक अघतूला... मूला** - रामचंद्रांची गोष्ट तर सोडा; पण कापसाचा पर्वत जाळण्यास जशी अग्नीची एक ठिणगी पुरते तसे त्यांचे नाम एकदा घेतले तरी सर्व पातकांचा नाश सहज करते. या चरणाने अमंगलाचा नाश आधी सुचविला व दुसऱ्या चरणाने मंगलकारकत्व सांगितले. अमंगलाचा नाश झाल्याशिवाय मंगल होत नाही. 'मंगलभवन अमंगलहारी' असा राम नामाचा द्विविध प्रभाव आहे. ज्यांच्या नावाला पाप व अपवित्रता यांचा स्पर्श होत नाही त्यांना अपवित्रता कोठली ? मग ते शुद्ध झाले असे का म्हटले ? **(क) 'सकलसुमंगलमूल जगिं प्रेम च रघुवर पायि'** (२।२०७) सुचविले की त्यांच्या नामस्मरणाने रामप्रेमाची प्राप्ती होते; व 'पातकतमतरणी' ने ज्ञानप्राप्ति, मोहविनाश

सुचविला आहे. **'येषां त्वन्तगतं पापं जनानां - पुण्यकर्मणाम् ॥ ते द्वंद्वमोह निर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः'** (भ.गी.) सर्व पापांचा नाश झाला की द्वंद्वांचा व मोहाचा नाश होतो व मगच भक्ति प्राप्त होते. हाच क्रम येथे सहज सुचविला आहे.

(२) **तीर्थावाहन गंगे जैसें** - गंगास्नानाच्या वेळी गंगेत तीर्थांचे आवाहन केल्याने गंगा पवित्र होते असे नसून ती तीर्थे गंगेच्या स्पर्शाने पुनीत होतात; तसेच हे समजावे असे साधूंचे मत आहे. रामचंद्रांनी जे अशौच धरले ते स्वतःच्या शुद्धिसाठी नसून इतरांचे अशुचित्व निवारण करण्यासाठी धरले. धर्ममार्गाचे स्वतः आचरण करून सर्वांस उदाहरण घालून दिले की कोणी कितीही मोठा, ज्ञानी, भक्त इ. असला तरी त्याने अशौचपालनादि शास्त्रनियमांचे विधिपूर्वक पालन केले पाहिजे. **'यद्यदाचरति श्रेष्ठः तत्तदेवेतरोजनः । स त्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते'** (भ.गी.)

*हिं.* *। सुद्ध भएँ दुइ बासर बीते । बोले गुर सन राम पिरीते ॥४॥*
*। नाथ लोग सब निपट दुखारी । कंद मूल फल अंबु अहारी ॥५॥*
*। सानुज भरतु सचिव सब माता । देखि मोहि पल जिमि जुग जाता ॥६॥*
*। सब समेत पुर धारिअ पाऊ । आपु इहाँ अमरावति राऊ ॥७॥*
*। बहुत कहेउँ सब कियउँ ढिटाई । उचित होइ तस करिअ गोसाँई ॥८॥*

*म.* ***। शुद्ध होउनी दिन दो क्रमले । राम गुरूंना प्रेमें वदले ॥४॥***
***। नाथ ! लोक सब दुःखी भारी । कंदमूलफल - नीराहारी ॥५॥***
***। सानुज भरत सचिव मातांतें । बघतां मज पळ युगसम जातें ॥६॥***
***। सह समाज पुरिं बरें पदार्पण । नृप अमरावतिं येथें आपण ॥७॥***
***। बहुत कथित हें करुनि धृष्टते । स्वामी करतिल गमे इष्ट तें ॥८॥***

**अर्थ -** शुद्ध होऊन दोन दिवस गेल्यावर राम गुरुजींना प्रेमाने म्हणाले की.॥४॥ नाथ ! सर्व लोक फार दुःखी होत आहेत (कारण येथे) ते कंदमूल फलाहारी किंवा (कोणी) जलाहारी झाले आहेत.॥५॥ अनुजासह भरत, सर्व सचिव आणि सर्व माता यांना पाहून मला एकेक पळ युगासारखे जात आहे.॥६॥ आपण इथे आहात व राजे अमरावतीत आहेत; (अयोध्येत कोणी जबाबदार पुरुष नाही) तरी आपण सर्व समाजासह अयोध्येत पदार्पण करावे हे बरे (असे मला वाटते) ॥७॥ उद्धटपणा करून मी फार बोललो, तरी स्वामींना जे योग्य वाटेल ते स्वामी करतीलच.॥८॥

**टीका. चौ. ४-५ (१) शुद्ध होउनी दिन दो क्रमले** - १० दिवस सुतक,

बाराव्या दिवशी सपिंडी, नंतर दोन दिवस गेले; म्हणजे १४ दिवस झाले. ५१+१४ = ६५. म्हणजे वनवासाच्या ६६ व्या दिवशी म्हणजेच आषाढ शुद्ध द्वादशीच्या दिवशी राम वसिष्ठांस ही विनंती करीत आहेत. **(क)** लोक आले त्या दिवशी कोणी पाणी सुद्धा प्यायले नाहीत. नंतर सगळेच लोक कंदमूलफळांवर राहू लागले; कोणी तर नुसत्या पाण्यावर राहू लागले. हे पाहून कोमल हृदयी रघुनाथास फार दुःख होऊ लागले. **भक्तदुःखाने भगवान कसे दुःखी होतात हे येथे दाखविले.**

**चौ. ७ - (१) सह समाज पुरिं बरें पदार्पण - (क)** आपण सर्व मंडळी कोणत्या इच्छेने आला आहात हे मी ओळखले आहे (तीर्थपात्रांवरून). निदान आपण तरी माझ्या प्रतिज्ञेच्या आड येऊ नये एवढी विनंती आहे. **(ख)** 'मुनिव्रत वेष आहार व विशेष उदासी' असे राहणे असल्याने आलेल्या मंडळींपैकी कोणीही आमच्या समीप राहणे प्रतिज्ञाभंग करणारे आहे. १४।१५ दिवस झाले हेच फार झाले. आपण जसे भरतादि सर्व मंडळीला घेऊन आलात तसेच सर्वांना बरोबर घेऊन परत जाणे चांगले. **(ग) नृप अमरावतिं येथें आपण** - अयोध्येत कोणी जबाबदार प्रशासक नाही हे बरे का ? आता आपणच महाराजांच्या स्थानी आहात. भरताला राज्याभिषेक करावा इ. सांगितले नाही. भरतासह जावे इतकेच सुचविले. याचा अर्थ हाच की भरत सिंहासनारूढ होत नसतील तर आग्रह न करणे बरे. मात्र आता आपल्याशिवाय अयोध्येचे संरक्षण करणारे कोणी नाही, आता ही जबाबदारी आपल्या शिरावरच येऊन पडणार. **(घ)** या भाषणांतील हेतु इतकाच आहे की 'मी अयोध्येत परत येणार नाही व आमच्या बरोबर भरतादिकांनी राहू नये' हा आपला निश्चय गुरुजींना कळवून ठेवावा.

**चौ. ८ (१) स्वामी करतिल गमे इष्ट तें** - वरील भाषण ऐकणाऱ्या श्रोत्यांनी एकदम निराश होऊ नये म्हणून मागल्या भाषणावर बोळा फिरविल्यासारखे केले. 'स्वामी' या शब्दाने सुचविले की मी सेवक आहे. आपण आज्ञा द्याल तसे मी करीन. 'जयति बचन रचना अति नागर' हे परशुरामवचन येथे यथार्थ आहे. आता वसिष्ठ दोन दिवसांची मुदत सुचवितील.

*हिं.दो.* *। धर्म सेतु करुनायतन कस न कहहु अस राम ॥*
*॥ लोग दुखित दिन दुइ दरस देखि लहहुँ बिश्राम ॥२४८॥*

*हिं.* *। राम बचन सुनि सभय समाजू । जनु जलनिधि महुँ बिकल जहाजू ॥१॥*
*। सुनि गुर गिरा सुमंगल मूला । भयउ मनहुँ मारुत अनुकूला ॥२॥*

*म.दो. । धर्मसेतु करुणायतन कां न वदां असं राम ॥*
*॥ घेति दुःखि जन दोन दिन मुखदर्शन विश्राम ॥२४८॥*
*म. । श्रवुनि रामबच समय समाज । जणुं जलनिधिमधिं बिकल जहाज ॥१॥*
*। श्रवुनि गुरुगिरा मंगलमूल । झाला जणुं मारुत अनुकूल ॥२॥*

**अर्थ** - (वसिष्ठ म्हणाले) राम ! तुम्ही धर्मसेतु व करुणेचे माहेरघर आहांत; तुम्ही असे का बरे [illegible]ारं नाही ? (म्हणालात ते तुम्हाला शोभेसेच आहे) पण सर्व लोक दुःखी आहेत. आपल्या मुखाच्या दर्शनाने त्यांनी दोन दिवस विश्राम घेउं द्या.॥ दो. २४८ ॥ रामवचन ऐकून सर्व समाज असा घाबरून गेला की जणू सागरात (बुडण्याच्या भीतीने) जहाजच व्याकुळ झाले.॥१॥ (पण) गुरुजींचे मंगलमूल भाषण ऐकताच असे वाटले की जो वारा प्राण घेणार होता (मारुत) तोच जणूं अनुकूल प्राणरक्षक झाला.॥२॥

**टीका. दो. (१) धर्मसेतु - 'श्रुतिसेतुपालक राम तुम्हिं जगदीश, माया जानकी'** (१२६। छंद टी.प.) **श्रुतिसेतुपालक = धर्मसेतु**; तुम्ही धर्ममर्यादांचे स्थापन व पालन करण्यासाठी, पितृवचन मानून वनात आलात; व ते वचन पूर्ण करण्याचा आपला निश्चय आहे व तेवढ्यासाठी वनवासाचे कष्ट आपण भोगीत आहात; पण राजधानी अनाथ राहू नये याची आपणांस चिंता आहे. असे असून **(क) करुणायतन** आहात. स्वतःच्या दुःखांचे तुम्हाला काहीच वाटत नाही; पण लोकांना वनवासाचे दुःख होत आहे असे वाटून तुम्हाला दुःख होत आहे; म्हणून तुम्ही म्हणालात ते योग्यच आहे; त्यांत धृष्टता वगैरे कोणताच दोष नाही. **(ख)** परंतु खरोखर पाहता येथे वनात कंदमूलफलादि आहार करून राहण्यात लोकांना दुःख तर नाहीच होत, पण त्यांच्या दुःखी हृदयाला विश्राम = परम सुख मिळत आहे, व ते आपल्या दर्शनानेच मिळत आहे. एवढे दिवस (१४) जसे हे सुख लोकांनी भोगले तसे आणखी दोन दिवस भोगतील, भोगू द्या दोन दिवस.

२. वसिष्ठांनी रामचंद्रांच्या म्हणण्यातील गूढभाव ओळखला व आपल्या या भाषणाने सुचविले की मी आपल्या इच्छेविरुद्ध आज्ञा देणार नाही. 'दोन दिवस राहतील' याने सुचविले की, आलेली सर्व मंडळी परत जातील व तुम्हाला अयोध्येत परत यावे लागणार नाही; पण आपण कृपायुक्त होऊन धीराधीराने हे साधावे इतकेच. रामचंद्रांच्या गूढ भाषणाला हे गूढ उत्तर आहे.

**चौ. १-२** (१) यांत रामवियोग हा सागर, सर्व समाज जहाज, रामवचन हा

जहाज बुडवू पाहणारा मारुत. गुरु-गिरा हा अनुकूल मारुत; व रामदर्शनानंद मंगलमूल आहे. (**क**) ११ वा १२ वा दिवस तर क्रियेतच गेला व नुकते दोनच दिवस दर्शनसुख मिळाले; पण ते सुद्धा चुपचाप, श्रवणाचा वगैरे काही लाभ झाला नाही. रामवन, रामगिरि इत्यादी तीर्थक्षेत्रे सुद्धा पाहिली नाहीत. तोच परत जाण्याचा प्रसंग ओढवला ! यामुळे लोक फार व्याकुळ झाले; पण बोलणार व सुचवणार तरी कोण ? अगदी निराश झाले. सोसाट्याचा तुफानी वारा सुटून जहाज गरगरा फिरू लागले, डोंगरासारख्या भयंकर लाटा जहाजावर आदळू लागून पाणी आंत शिरू लागले म्हणजे (ते जहाज =) जहाजातील लोक जसे भयभीत होतात तशीच लोकांच्या चित्ताची दशा झाली. (**ख**) **मारुत =** जो वाढला असता प्राण हरण करतो व ज्याच्या वाचून जगता येत नाही तो मारुत. (अ.व्या.सु.) पहिला अर्थ रामवचनाकडे लागतो व दुसरा वसिष्ठ वचनाकडे लागतो. वसिष्ठ जर बोलले नसते तर बोजे बांधून निघूनच जावे लागले असते. (**ग**) या राम-वसिष्ठ संवादाने **एक गोष्ट साधली** की २/४ दिवसांत येथून निघून जावे लागणार अशी भरतादि सर्व श्रोत्यांची खात्री झाली व आनंदही झाला. पण पुढे होणाऱ्या वियोगाला अनुकूल अशी मनोभूमिका तयार केली गेली. **अनपेक्षित वियोग जितका दुःखद होतो तितका अपेक्षित वियोग दुःखद होत नाही.**

*हिं.* *। पावन पयँ तिहुँ काल नहाहीं । जो बिलोकि अघ ओघ नसाहीं ॥३॥*
*। मंगलमूरति लोचन भरि भरि । निरखहिं हरषि दंडवत करि करि ॥४॥*
*। राम सैल बन देखन जाहीं । जहँ सुख सकल सकल दुख नाहीं ॥५॥*
*। झरना झरहिं सुधासम बारी । त्रिविधि तापहर - त्रिविध बयारी ॥६॥*
*। बिटप बेलि तृन अगनित जाती । फल प्रसून पल्लव बहु भाँती ॥७॥*
*। सुंदर सिला सुखद तरु छाहीं । जाइ बरनि बन छबि केहि पाहीं ॥८॥*

*म.* *। स्नाती त्रिकाळिं पयपावन-जळिं । जया बघत अघ संघ पळापळि ॥३॥*
*। मंगलमूर्ति नेत्रिं भर-भरुनी । निरखिति मुदित नमन कर - करुनी ॥४॥*
*। राम शैल वन बघण्या जाती । दुःख न जिथें सकल सुख हातीं ॥५॥*
*। निर्झर नीर सुधेसम वाहति । त्रिविध तापहा त्रिविध सदागति ॥६॥*
*। बिटप वेलि तृण अगणित जाती । पल्लव-पुष्प फळें विविधातीं ॥७॥*
*। सुंदर शिला सुखद तरुछाया । कोणा वन - छबि ये वर्णाया ॥८॥*

**अर्थ** - पयस्विनीच्या (मंदाकिनीच्या) ज्या जळाला पाहतांच पापसंघांची पळापळ

होते त्या जळांत लोक त्रिकाळ स्नान करतात.।।३।। मंगलमूर्ति रामचंद्रांना आपल्या नेत्रांत वारंवार भरून पुनः पुन्हा नमस्कार करून आनंदाने निरखून पाहतात.।।४।। मग जिथे कोणतेच दुःख नाही व सर्व सुखच हाती येते अशा रामशैलास व रामवनास पाहण्यास लोक जातात.।।५।। निर्झर वहात असून त्यांचे पाणी अमृतासारखे आहे. त्रिविध ताप हरणारा (तापहा) शीतल मंद सुगंधि वारा (= सदागति) वहात आहे.।।६।। वृक्ष, लता, तृण यांच्या अगणित जाती (प्रकार) असून नाना प्रकारची पत्र, पुष्प-फळे तेथे (वनात) आहेत.।।७।। सुंदर व सुखदायक शिला (विश्रांतीसाठी) असून सुखदायक तरु व छाया आहे. अशा या वनाचे सौंदर्य कोणाला वर्णन करता येईल ?।।८।।

**टीका.** (१) चित्रकूटला राहिल्यावर अयोध्यावासी लोकांची दिनचर्या साधारणपणे कशी होती हे या सहा चौपायांत सांगितले व सुचविले आहे की चित्रकूट यात्रा करणारांनी याप्रमाणे करावे. प्रत्यक्ष रामदर्शन होत नसेल त्यांनी प्रातःस्नानादि नित्य कर्म उरकून रामध्यान व जप करावा व मग रामशैल-वनयात्रेला जावे. (**क**) उन्हाळा असून शीतल, मंद, सुगंधि सुखदायक वारा असून घनदाट छाया असल्याने उन्हाळ्याचे दुःख नाही. सुगंध असल्याने **घ्राणेंद्रिय सुख**; डोंगरांतील जलप्रवाहांचा व विविध विहंगांचा मधुर ध्वनि **कानांना सुखद**; अमृतासारखे व निर्मल वाहते पाणी व विपुल फळे याने **स्वादसुख** व **क्षुधातृषा शान्ति**; वनाचे सौंदर्य व सुंदर विहंगांचा विहार **नेत्रसुखद**; पत्रे फुले **स्पर्शसुखद**; व **विश्रांती** साठी सुंदर वृक्षांच्या दाट छायेत सुंदर शिला आहेत. त्या अंगास खुपत असल्या तर वृक्षांची चित्रविचित्र कोवळी पालवी व फुले यांचे आसन त्या शिलांवर तयार करून सुखाने विश्रांति घ्यावी. पशुपक्षी आपसांतील वैर विसरले असल्याने भय नाही.

(२) **आज - हल्ली मात्र अशी परिस्थिती तिथे नाही.** त्यावेळी का होती याचे वर्णन 'जैं येउनि राहति रघुनायक' (१३७।५) पासून १३८।१ पर्यंत पहावे; तसेच २३६।२ पासून २३६।८ पर्यंत पाहणे. प्रवर्षण गिरीवर राम राहिल्यावर असेच झालेले दिसेल -

*हिं.दो.* ***। सरनि सरोरुह जल विहग कूजत गुंजत भृंग ।।***
***।। बैर बिगत बिहरत बिपिन मृग बिहंग बहुरंग ।।२४९।।***

*हिं.* ***। कोल किरात भिल्ल बनबासी । मधु सुचि सुंदर स्वादु सुधासी ।।१।।***
***। भरि भरि परन पुटीं रचि रूरी । कंद मूल फल अंकुर जूरी ।।२।।***
***। सबहि देहिं करि बिनय प्रनामा । कहि कहि स्वाद भेद गुन नामा ।।३।।***

*म.दो. । सरीं सरोरुह जलविहग कूजति गुंजति भृंग ॥*
*॥ विगत-वैर विहरति विपिनिं मृग बहुरंगि विहंग ॥२४९॥*
*म. । कोळि किरात भिल्ल वनवासी । मध शुचि सुंदर रुचिर सुधासी ॥१॥*
*। भरुनी पर्णपुटीं बहु संदर । कंद मूल फल, जुड्या हि अंकुर ॥२॥*
*। देति विनति नति सकलां करुनी । स्वाद-नाम-गुण-भेद सांगुनी ॥३॥*

**अर्थ** - तलावात कमळे (फुलली) आहेत; जलपक्षी कूजन करीत आहेत; भुंगे गुंजारव करीत आहेत; आणि पशु व बहुरंगी पक्षी वैरविरहित होऊन वनांत विहार करीत आहेत.॥दो.२४९॥ कोळी, कातोडी (-कातकरी) भिल्ल वगैरे वनवासी लोक पवित्र सुंदर व अमृतासारखा चविष्ट (रुचिर, स्वादु) मध पानांच्या सुंदर द्रोणांत पुष्कळ भरलेली; आणि कंदमूळ फळे व अंकुरांच्या जुड्या सर्वांना विनंती व नमस्कार करून देत आहेत; आणि स्वाद, नावे व गुण यांचे भेद सांगत आहेत.॥१-३॥

**टीका. दो.** (१) यांतील मृगांची व बहुरंगी विहंगांची नावे पूर्वी दिली आहेत. 'नीलकंठ कलकंठ शुक चातक चक्र चकोर ॥ बोलति बहुविध विहग बहु श्रवण सुखद मनचोर' (१३७) 'करि केसरि कपि किरी कुरंगें । विगतवैर विहरति सब संगें' (१३८।१) नृत्यगायनाची हौस असेल त्यांनी २३६।५-७ पाहणे.

**चौ. १-२** (१) यांत हिंदीतील **मधु शब्दाचा अर्थ मध असा आहे.** मानसांत मधु शब्द मधुर या अर्थाने कुठेच वापरलेला नाही व **कोषांतही मधु म्हणजे मधुर हा अर्थ नाही.** मानसांत इतर बारा ठिकाणीच मधु शब्द वापरला असून त्यांत ३ ठिकाणी **मधु =** मधुमास (चैत्र महिना) हा अर्थ आहे. (१।३४।५; १।१९१।१; २।१२३।३) दोन ठिकाणी मधु = मधु नावाचा राक्षस हा अर्थ आहे. (६।६।७; ६।४८ रा) बाकीच्या सात ठिकाणी मधु = मध किंवा मधाचे मोहोळ हाच अर्थ आहे. (२।११।४; २।२२।३; २।७६।४; ४।१३।१; ५।३।६; ५।२८।७; ७।२३।५; पहा) यांतील फक्त २।१३।४ मधे मधाचे मोहोळ हा अर्थ आहे. 'देति मनहुँ मधु माहुर ( = विष) घोरी' (२।२२।३) शिवाय मधु = मधुर असा अर्थ अज्ञानाने घेतल्यास व कंदमूल फलांकडे लावल्यास दूरान्वय दोष उत्पन्न होतो. असा भ्रम व घोटाळा होऊ नये म्हणून मराठीत 'मध' शब्द घालून अर्थ स्पष्ट केला गेला आहे. **(क)** कोळी, भिल्लादि, वनवासी मध काढतात, खातात पितात व विकतात; हा त्यांचा एक धंदा अजूनसुद्धा आहे. **शुचि =**

पवित्र, स्वच्छ; ज्यांत मेलेल्या माशा, त्यांची अंडी, मेण व इतर काही घाण व मिश्रण नाही असा शुद्ध मध. (हल्ली गुळाच्या पाकाचे किंवा काकवीचे मिश्रण करतात) **सुंदर =** दिसण्यांत सुंदर व अंबूस वास न येणारा, **रुचिर =** चविष्ट, स्वादिष्ट, 'मधु' हिंदीत स्त्रीलिंगी आहे. मराठीत 'मध' पुल्लिंगी किंवा स्त्री लिंगी.

(२) **अंकुर** - कारंदे, कोनफळ वगैरे अनेक कंदांना व मुळांना पावसाळा सुरू होण्यापूर्वीच, घरात ठेवलेले असले तरी, चांगले हात, दोन दोन हात लांब, वेलांसारखे कोंब = अंकुर, फुटतात; हा या लेखकाचा स्वानुभव आहे. ज्या वेळचे वर्णन आहे ते दिवस तर असे आहेत की घरातच हे कोंब वाव-वाव किंवा अधिक लांब आलेले असतात; तसेच ज्येष्ठाच्या महिन्यात बांबूनासुद्धा कोवळे कोंब फुटलेले असतात; तेही मऊ मऊ असतात व चविष्ट असतात. **(क) कोणी टीकाकार म्हणतात** की बदाम पिस्ते चारोळ्या वगैरे भिजत घालून त्यांना फुटलेले लांब लांब कोंब जुड्या बांधून आणले. पण या अंकुरांच्या, मोडांच्या, जुड्या बांधता येणार नाहीत. विंध्याद्रीत ही झाडे वगैरे नाहीत व जे लोक स्वतःच सांगत आहेत की कमरेला पुरते वस्त्र नाही व पोटाला कधी पुरेसे अन्न नाही त्यांच्या घरात बदाम पिस्ते चारोळ्या अक्रोड वगैरे कुठून असणार ? वनात कंदांना फुटलेले लांब लांब, मोळ्या बांधण्यासारखे, कोंब मात्र हवे तेवढे असतात. योग्य वाटेल तो अर्थ वाचकांना घेता यावा म्हणून या मताचा उल्लेख केला.

**चौ. ३ (१) देति विनति नति करुनी - नति =** नमस्कार, शहरांतले श्रीमंत विलासी लोक घेतील न घेतील, विश्वास बसेल न बसेल, म्हणून विनंती-प्रार्थना व नमस्कार करून देत आहेत. विनंत्या कशा करतात ते पुढे कळेलच. (क) **स्वाद नाम गुण -** भेद सांगुनी - या गोष्टी सांगण्याचे कारण इतके की वनातील कंदमूल फळांची नावे सुद्धा अयोध्येसारख्या राजधानीच्या शहरांत राहणाऱ्या, शहरी लोकांना माहीत असणे शक्य नाही, मग स्वाद (चव) व गुण कोठून माहीत असणार ? कधी न पाहिलेले न ऐकलेले पदार्थ खाण्यास माणूस कचरतो हे स्वाभाविक व हितावह आहे. नाहीतर कवंडळें, कुचल्याची फळे, कांगली, एरंडाची व जेपाळाची फळे दिसण्यास सुंदर असतात पण एक खाल्ले तरी प्राणांत होण्यास वेळ लागत नाही. स्वाद व गुण यांची प्रशंसा करून सांगण्यास हेतू हा आहे की लोकांनी त्यांचा स्वीकार करावा व रघुनाथाच्या पाहुण्यांची सेवा घडल्याचे समाधान मिळावे. हे सगळे लोक रामभक्त आहेत हे

पूर्वीच (१३५।१-१३७।३) दाखविले आहे. स्वादभेदादि सांगण्यावरून ठरते की हे लोक व्यवहारदक्ष, विचारवंत व स्वभावज्ञ आहेत. आता पुढे २५१ छंदापर्यंत या लोकांच्या सेवाभावाचे वर्णन आहे.

*हिं.* *। देहिं लोग बहु मोल न लेहीं । फेरत राम दोहाई देहीं ॥४॥*
*। कहहिं सनेह मगन मृदु बानी । मानत साधु पेम पहिचानी ॥५॥*
*। तुम्ह सुकृती हम नीच निषादा । पावा दरसनु राम प्रसादा ॥६॥*
*। हमहि अगम अति दरसु तुम्हारा । जस मरु धरनि देव धुनि धारा ॥७॥*
*। रामकृपाल निषाद नेवाजा । परिजन प्रजउ चहिअ जस राजा ॥८॥*

*हिं.दो.* *। यह जियँ जानि सँकोचु तजि करिअ छोहु लखिनेहु ॥*
*॥ हमहि कृतारथ करन लगि फल तृन अंकुर लेहु ॥२५०॥*

*म.* *। देति लोक बहु मोल न घेती । रामशपथ, परतवीत देती. ॥४॥*
*। स्नेह-मग्न मृदु वचनें म्हणती । प्रेम ओळखुनि साधु मानती ॥५॥*
*। आम्हिं नीच अति सुकृती आपण । रामकृपेने घडलें दर्शन ॥६॥*
*। अम्हां सुदुर्लभ अपलें दर्शन । जशि मरुधरणिं देवधुनि पावन ॥७॥*
*। राम कृपालु निषाद-दयाघन । प्रजा असावि राजसम, परिजन ॥८॥*

*म.दो.* *। म्हणुनी स्नेहा बघुनी व्हा विण संकोच कृपाल ॥*
*॥ आम्हां करण्या कृतार्थ किं फल तृण अंकुर घ्याल ॥२५०॥*

**अर्थ** - लोक त्यांना पुष्कळ मोल (किंमत) देऊ लागले, पण ते घेईनात; व दिलेले पदार्थ परत करू लागले की त्यांना रामाची शपथ घालू लागले.॥४॥ स्नेह मग्न होऊन (डोळ्यांत आसवे येऊन व सद्‌गदित होऊन) मृदु वाणीने म्हणाले की साधु प्रेम ओळखून (सेवा) मान्य करतात.॥५॥ आम्ही अति नीच व आपण अति पुण्यवान (सुकृती) आहांत; (पण) रामकृपेनेच आपले दर्शन आम्हाला झाले.॥६॥ (नाहीतर) जसा मरु देशात (मारवाडात) देवनदीचा पावन प्रवाह तसेच आपले दर्शन आम्हाला अति दुर्लभ (अशक्यच) ॥७॥ पण कृपाळु रामचंद्र निषादांचे दयाघन बनले. (निषादांवर दयेची वृष्टि केली). परिजन आणि प्रजा राजासारखीच असावी - असणे जरूर आहे.॥८॥ म्हणून ( = हे जाणून) आपण संकोच न करता आमच्या स्नेहाकडे पाहून कृपाळू व्हा व आम्हाला कृतार्थ करण्यासाठी तरी फल, अंकुर इत्यादी जी गवताची काडी देऊ ती घ्यावी (घ्यालच आपण) ॥ दो. २५० ॥

**टीका - चौ. ५-७ -(१) प्रेम ओळखुनि साधु मानती - 'सुर-साधु इच्छिति भाव, सिंधुस तोष देत जळांजली'** (१।३२६ छं.टी.प.) (क) **मरुधरणिं देवधुनि धुनी =** नदी (अमरे) देवधुनी = देवनदी, गंगा. भाव हा की ज्या मारवाड देशांत एक घागरभर पाणी काढण्यास १५०/२०० हात दोर ओढावा लागतो, जेथे पाण्याचे डबकेसुद्धा मिळणे दुर्लभ तेथे देवनदी गेली तर त्या लोकांच्या भाग्याची कोण व कशी स्तुती करील ! तेथे गंगेचा प्रवाह वाहू लागल्यावर जे कोणी तिचे सेवन - सेवा करणार नाहीत त्यांच्यासारखे अभागी तेच. आपल्या सर्वांचे, रामप्रिय लोकांचे, दर्शनसुद्धा आम्हाला अगदी तसेच हेत आहे. गंगेची **'पत्रंपुष्पं फलं तोयं'** यथाशक्ति पूजा केली तर ती नाही म्हणते का? आपण गंगेपेक्षाही अधिक पावन आहांत व आम्ही स्नेहानें ही वेडीवाकडी सेवा करीत आहोत; आणि आपण तिचा अव्हेर करता हे आमचे दुर्भाग्य !

**चौ. ८- (१) निषाद दयाघन -** याचा एक अर्थ वर दिलाच आहे. **दुसरा अर्थ** हा रामचंद्रांनी निषादराजावर किती दया केली! छायेचा स्पर्श झाला तरी स्नान करावे लागते अशाला राम कडकडून भेटले ! निषादराज आमचे राजा, आम्ही त्यांची प्रजा, तुम्ही रामाची प्रजा. आम्ही असे नाही म्हणत की आम्हाला मिठी मारा; पण तुमच्या राजाने आमच्यावर अपार दया केली तर तुम्हाला आमची थोडी तरी दया नको का वाटायला? नाहीतर असे ठरेल की राजा दीनदयाघन आहेत पण प्रजेला व परिवाराला दीनांची मुळीच दया येत नाही म्हणून त्यांनी निषादांवर कृपा केली नाही. 'यथा राजा तथा प्रजा;' असे शास्त्रसुद्धा म्हणते, मग शास्त्र खोटे की काय?

**दो. - (१) स्नेहा बघुनि कृपालु व्हा -** आमचा आपल्यावर व आपल्या राजांवर स्नेह नाही असे वाटत असेल तर गोष्ट निराळी. तुम्हांला मिळत नाही, तुमचे अडले आहे म्हणून नका घेऊ; पण आमच्या स्नेहाकडे पाहून आम्हाला कृतार्थ करण्यासाठी तरी आमच्यावर कृपा करण्यास काय हरकत आहे?

*हिं. । तुम्ह प्रिय पाहुने बन पगु धारे । सेवा जोगु न भाग हमारे ॥१॥*
*। देव काह हम तुम्हहि गोसाँई । ईंधनु, पात किरात मिताई ॥२॥*
*। यह हमारि अति वडि सेवकाई । लेहिं न बासन बसन चोराई ॥३॥*
*। हम जड जीव जीव गन घाती । कुटिल कुचाली कुमति कुजाती ॥४॥*
*म. । प्रिय पाहुणे तुम्हीं वनिं आला । सेवे योग्य न भाग्य अम्हांला ॥१॥*
*। द्यावें काय तुम्हां जी ! स्वामी ! । इंधन पत्र-मित्र तों आम्हीं ॥२॥*

*। ही अमची अति मोटी सेवा । वस्त्र पात्र कीं चोरुं न देवा ! ॥३॥*

*। आम्हिं जड जीव जीवगण-घाती । कुटिलकुचाली कुमति कुजाती ॥४॥*

**अर्थ** - तुम्ही प्रिय पाहुणे वनांत आलांत; पण तुमची सेवा करण्यास योग्य असे भाग्य-वैभव आमच्याजवळ कुठले? ॥१॥ स्वामी ! आम्ही आपल्याला काय देणार! (जे आमच्याजवळ असेल ते) आम्ही किरात सर्पण व पानांचे सोबती (मित्र) ॥२॥ आम्ही तुमची वस्त्रे व भांडी चोरीत नाही हीच देवा ! आमची (आम्ही केलेली) मोठी सेवा आहे. (असे समजा) ॥३॥ जीवगणांचा घात करणारे आम्ही जड-मूढ प्राणी; स्वभावाने कुटिल, वाईट चालीचे, दुर्बुद्धी व जातीने नीच. ॥४॥

**टीका - चौ. १ - (१) सेवे योग्य न भाग्य अम्हांला** - एकतर आम्ही नीच जातीचे असल्याने आपली वाटेल ती सेवा करण्याचा आम्हाला अधिकार नाही; त्यांतून काही करता येण्यासारखी असली तरी आमच्याजवळ काय आहे! आम्ही कफल्लक, काय सेवा करणार! सेवा केली भरद्वाजानी ! पण आलेल्या पाव्हण्यांची यथाशक्ति सेवा करणे जरूर आहे; म्हणून आमच्याजवळ असलेल्या संपत्तीनेच आम्ही आपली सेवा करू शकणार !

**चौ. ४ - (१) अम्हिं जड जीव जीवगण घाती** - जड = मूढ, हित अहित, सत्य असत्य, बरे वाईट हे आम्हाला काही कळत नाही. एक जीव मारला चुकून तरी मोठे पाप घडते असे म्हणतात; आम्ही तर नित्य नियमाने किती जीवांचा घात करतो. जाणून बुजून ठार मारतो. त्यांची गणती करणे कठीण! अशा पापसागरांना आपल्यासारख्या पुण्यसागरांचे दर्शन कां व कसे घडले हे कोडेच आहे. पूर्वपुण्याईने म्हणावे तर आम्ही **कुटिल कुचाली कुमति कुजाती** - आमचा स्वभाव गुण इ. नर्कातून आलेल्या प्राण्यांसारखे आहेत; व येथे काही पुण्य घडणेच शक्य नाही. आपण पुण्यसागर असून वनांत आलांत हे जसे आश्चर्य तसेच आपले दर्शन आम्हाला झाले हेही मोठे आश्चर्यच !

*हिं. । पाप करत निसि बासर जाहीं । नहिं पट कटिं नहिं पेट अघाहीं ॥५॥*

*। सपनेहुँ धरम बुद्धि कस काऊ । यह रघुनंदन दरस प्रभाऊ ॥६॥*

*। जब तें प्रभु पद पदुम निहारे । मिटे दुसह दुख दोष हमारे ॥७॥*

*। बचन सुनत पुरजन अनुरागे । तिन्ह के भाग सराहन लागे ॥८॥*

*म. । पाप करत रात्री दिन जात हि । नहिं कटिं पट नहि खाचा भरतहि ॥५॥*

*। स्वप्नीं कधिं कोणा रुचि धर्मा । हा रघुनंदन - दर्शन महिमा ॥६॥*

*। जिथुनी प्रभुपदपद्म पाहिले । दुःसह दुःख न दोष राहिले ॥७॥*
*। श्रवत वचन पुरजन अनुरागति । त्यांचे भाग्या वानूं लागति ॥८॥*

**अर्थ** - पाप करण्यांत रात्रीच जातात असे नाही; तर दिवससुद्धा त्यांतच जातात; (तरीसुद्धा महाल नाही बांधले काही.) कमरेला चांगले वस्त्र नाही की पोटाच्या खाचा भरत नाही. (पोटभर अन्न मिळत नाही).॥५॥ धर्माची आवड कधीं कोणाला स्वप्नांत नाही ! पण हा केवळ रघुनन्दनाच्या दर्शनाचा महिमा, प्रभाव आहे ॥६॥ जेव्हापासून प्रभूच्या चरण कमलांचे दर्शन झाले; तेव्हापासून दुःसह दुःखे दोष इ. काही शिल्लक राहिले नाही. ॥७॥ हे बोलणे (भाषण) ऐकतांच पुरवासी त्यांच्यावर अनुरक्त झाले व त्यांच्या भाग्याची प्रशंसा करू लागले. ॥८॥

**टीका. चौ. ५-६ - (१) पाप करत ... नहिं कटिं पट ... भरतहि - खाच** = पोटाची खळगी. भाव हा की रात्रंदिवस पाप व प्राणिहिंसा इ. करून काही माया साठवून बंगले बांधले आहेत असे नाही. अर्धनग्नांसारखे रहावे लागते व पोटभर जाडेभरडे अन्नसुद्धा मिळत नाही. जसे वाघांचे तसे चोरांचे वाडे वाढत नाहीत अशी म्हण आहे. पण जशा पुष्कळ म्हणी व वाक्प्रचार या विसाव्या शतकात अर्थशून्य झाले आहेत त्यांतलीच ही एक म्हण आहे. या शतकांत जाळपोळ, लुटालूट करणारे, चोर, दरोडेखोर श्रीमंत बनतात एवढेच नव्हे तर समाजांत प्रतिष्ठा व सत्ताही काबीज करतात ! कलीची विपरीत करणी ती अशीच! **(क) स्वप्नीं कधिं कोणा रुचि धर्मा** - आज ही अतिथिसेवा करण्याची, धर्माचरणाची जी इच्छा झाली आहे तशी कधी स्वप्नांतसुद्धा झाली नव्हती. आता झाली हा केवळ रघुनंदनाच्या दर्शनाचा प्रभाव आहे. रामदर्शन झाल्यापासून पाप करण्याची प्रवृत्ती नष्ट होऊन धर्माचरणाची प्रवृत्ती झाली.

**चौ. ७ - (१) दुःसह दुःख न दोष राहिले** - पाप व पापप्रवृत्ति नष्ट झाल्याबरोबर अज्ञान मोहरूपी दुःख नष्ट झाले. **'दारिद्र्यासम जगीं दुःख ना' 'निकट मोहदारिद्र्य येत ना' 'दुःसह दुःख जन्मतां मरतां'** (७।१०९।७) याने सुचविले की रामदर्शनाने व रामकृपेने हे सर्व वनवासी स्त्रीपुरुष जीवन्मुक्त व रामभक्तियुक्त झाले आहेत. **'नयनवंत रघुवरास पाहुनि । होति विशोक जन्मफल पावुनि** (१३९।१) हे चित्रकूट निवासानंतरचेच वचन आहे.

*हिं. छं.* *। लागे सराहन भाग्य सब अनुराग बचन सुनावहीं ।*
*॥ बोलनि मिलनि सिय राम चरन सनेहु लखि सुखु पावहीं ॥*

*। नर नारि निदरहिं नेह निज सुनि कोल भिल्लनि की गिरा ॥*
*॥ तुलसी कृपा रघुबंसमनि की लोह लै लौका तिरा ॥१॥*

*हिं. सो.* *। बिहरहिं बन चहु ओर प्रतिदिन प्रमुदित लोग सब ॥*
*॥ जल ज्यों दादुर मोर भए पीन पावस प्रथम ॥२५१॥*

*म. छं* *। स्तवुं भाग्य लागति सकल बचनें सानुरागें सांगती ।*
*। ती रीति सीतारामचरणीं स्नेह बघुनि सुखावती ॥*
*। स्नेहास निज नर नारि निंदिति ऐकुनी भिल्लिणि - गिरे ।*
*॥ तुलसी कृपा रघुवंशमणिची लोह घे पेट्या तरे ॥१॥*

*म.सो.* *। चहुदिशिं वनिं फिरतात प्रमुदित अनुदिन लोक सब ॥*
*॥ जसे पीन होतात प्रथम - पाउसीं शिखी प्लव ॥२५१॥*

**शब्दार्थ** - पेट्या = पेट्यास, पेटा = कडू भोपळ्यांची सांगड, पोहण्यासाठी वापरतात ती. शिखी = मोर, प्लव = बेडूक. पीन = लठ्ठ.

**अर्थ** — सगळे लोक त्या कोळी भिल्लांच्या भाग्याची प्रशंसा करू लागले व अनुरागाने परस्परांस सांगू लागले. त्यांची ती (बोलण्याची वगैरे) रीत व सीतारामचरणी स्नेह पाहून सर्वांना सुख झाले. (कोळी) भिल्लिणींची ती भाषा ऐकून स्त्रिया व पुरुष आपल्या स्नेहाची निंदा करू लागले. तुलसीदास म्हणतात - ही रघुवंशमणि रामाची कृपा की लोखंड भोपळ्यांच्या पेट्या (आपल्या पृष्ठभागावर) घेऊन तरत आहे ! ।।छंद।। पहिल्या पावसाने जसे मोर व बेडूक पुष्ट व तुष्ट होऊन विहार करतात तसेच याप्रमाणे सर्व लोक दररोज मोठ्या आनंदाने वनांत चोहोंकडे विहार करू लागले. ।।सोरठा।।

**टीका. छंद** - (१) अयोध्यानिवासी परम भाग्यवंत लोक कुठे व हे अतिनीच पापराशी, हिंसक, वनवासी लोक कुठे? पण त्यांच्या ठिकाणी असलेले रामप्रेम, दीनता, नम्रता, सेवाभाव इत्यादि पाहून पुरवासी लोकांना लाज वाटू लागली. व यांच्यापासून आपण रामस्नेहाचे धडे शिकावे, यांच्याजवळून आपण रामस्नेह घ्यावा असे स्त्रीपुरुषांना वाटू लागले. वास्तविक पाहता या पुरवासी लोकांपासून या वनवासी लोकांनी रामभक्तीचे धडे शिकावे अशी त्यांची योग्यता; पण येथे घडले मात्र अगदी उलटे! हे कां व कशाने घडले? तुलसीदास म्हणतात की ही रघुवंशमणीची कृपा! दृष्टान्त असाच अगदी विपरीत - करणीचा देतात - **(क) लोह घे पेट्या तरे** - लोखंड स्वतः बुडते व इतरांस बुडविते; तसे हे लोक स्वतः पतित पापी; यांच्या संगतीने व दर्शनानेसुद्धा पुण्यक्षय होऊन पतित होण्याची

गीत ! कडू भोपळा स्वतः पाण्यावर तरतो व दुसऱ्यांना तारण्यास उपयोगी पडतो, बुडू देत नाही. पण रामकृपेने असा चमत्कार झाला की लोखंडाच्या फळीवर ठेवलेले भोपळे घेऊन ती फळी पाण्यांत तरत आहे. **(ख) रघुवंशमणि -** या मण्याच्या प्रकाशांत राहून स्पर्शादिकांचा लाभ होऊन, कित्येक वर्षांत या पुरवासी लोकांना जो रामभक्ति, रामस्नेह रूपी प्रकाश मिळाला नाही तो अगदी अल्पावधीत या वनवासी लोकांना मिळाला.

**सोरठा - (१) जसे पीन होतात -** पहिला पाऊस पडण्यापूर्वी बेडकांच्या जगत्या निर्जीव दामट्या झालेल्या असतात; पहिला पाऊस पडल्याबरोबर ते सजीव होऊन भलेलठ्ठ होतात व डर्रांऽव डर्रांऽव करीत आनंदाने बागडू लागतात. मोर उन्हाळ्याच्या तापाने तप्त झालेले असतात; ते पिसारा पसरवून आनंदाने मधुर आवाज करीत नाचू लागतात. पुरवासी लोक रामविरहरूपी प्रचंड किरणाच्या तापाने अगदी कृश, मोरांसारखे उदासीन व बेडकांसारखे मृतवत् झाले होते. **'रामबियोग-कुरोगें मृतवत्'** ते पूर्ववत धष्टपुष्ट झाले व आनंदाने नाचत बागडत, रामगुणगान करीत वनात विहार करू लागले. रामजलधराच्या रूपदर्शनरूपी जलाच्या वृष्टीचा हा परिणाम आहे. **'रूपबिंदु जल मिळत सुखाकर'** (२।१२८।८) **'रघुपति विरह दिनेश'** (७।९).

***श्री मानस-गूढार्थचंद्रिका अयोध्याकांड अध्याय २३ वा समाप्त.***



## अध्याय २४ वा

हिं. *। पुरजन-नारि मगन अति प्रीती । बासर जाहिं पलक सम बीती ॥१॥*
*। सीय सासु प्रति बेष बनाई । सादर करइ सरिस सेवकाई ॥२॥*
*। लखा न मरमु राम बिनु काहूँ । माया सब सिय माया माहूँ ॥३॥*
*। सीयँ सासु सेवा बस कीन्हीं । तिन्ह लहि सुख सिख आसिष दीन्ही ॥४॥*

म. *। प्रेम मग्न अति पुर नारी नर । निमिषासम सरती ते वासर ॥१॥*
*। प्रतिसासू सीता घे वेषा । सादर सेवि तयां अविशेषां ॥२॥*
*। जाणति राम, कुणि न मर्मा या । सीतामायेमधिं सब माया ॥३॥*
*। सीतासेवे वश त्या सर्व हि । सुखी, देति शिकवण आशीसहि ॥४॥*

**अर्थ** - (या प्रमाणे) पुरवासी स्त्रिया व पुरुष अति प्रेममग्न झाले असून ते दिवस निमिषासारखे सरू लागले (जाऊ लागले) ॥१॥ सीतेने सासूगणिक रूप (वेष) घेतले व सर्व सासवांची सेवा आदराने अगदी सारखी (अविशेष) केली. ॥२॥ हे मर्म फक्त रामचंद्रांस कळले; इतर कोणालाही हे कळले नाही. (कारण) सगळ्या माया सीतेच्या मायेतच आहेत. ॥३॥ सीतेच्या सेवेला त्या सर्व वश होऊन सुखी झाल्या व सगळ्या सासवांनी तिला शिकवण व आशीर्वाद दिले. ॥४॥

**टीका. - चौ. १ - (१) निमिषासम सरती ते वासर** - वासर = दिवस. सुखाचे दिवस केव्हाच सरतात असे वाटते व दुःखाचे दिवस जाता जात नाहीत, असा थोडा बहुत अनुभव बहुधा प्रत्येकास असतोच; पण **कवींनी वर्णनातसुद्धा हा भेद दाखविला आहे. 'आर्तलोक सब, कळे सुजाणा'** (२४४।१) पासून **'श्रवुनि रामवच सभय समाज'** (२४९।१) पर्यंत दुःख शोकाचे वर्णन आहे. म्हणजे ५० ओळीत (पांच दोह्यांत) आहे. व सुखाने विहार करण्याचे वर्णन २४९।२ पासून २५१ पर्यंत = ३३ ओवीत आहे. व टीका अनुक्रमे १३ व ८ पृष्ठे झाली आहे.

**चौ. २ - (१) सादर सेवि तयां अविशेषां** - अविशेषां = काही विशेष कुठे न करता, अगदी सारखी. प्राणांपलीकडे जपणाऱ्या कौसल्येची जशी केली तशीच अगदी भेदभाव न बाळगता, कैकयीचीसुद्धा केली. दाखविले की **सीतेच्या मनांत कैकयीविषयी जरासुद्धा रोष वगैरे नाही** व सर्व सासवांवर तिचे सारखे प्रेम आहे. याचा परिणाम कैकयीवर काय झाला तो पुढे सांगतील. **प्रेमाने, सेवेने व समतेने**

**वैर कसे जिंकावे याचा आदर्श येथे दाखविला.** **(क)** गीतावलीप्रमाणे सातशे सासवा आहेत. तितकी रूपे सीतेने घेतली व पुन्हा रामसेवेत मूळ सीता आहेच. राम अनेक रूपे घेऊन सर्व लोकांस भेटले तर सीतेने अनेक रूपे इच्छामय घेऊन सातशे सासवांची सेवा केली. **सीतेलाही वाटतील तेवढी इच्छामय, सच्चिदानंदमय** देह **असलेली रूपे घेता येतात हे दाखविले.**

(२) सीतेने थोडेच दिवस असून अशी सेवा का केली? वनांत येण्यास निघताना सीता कौसल्येला म्हणाली आहे की **'सेवासमयिं दैव वनिं धाडी। करूनी भग्न मनोरथगाडी ॥'** (२।६९।४) यांत जे म्हणाली की सेवा करण्याचे माझे आता वय झाले असता दैवाने वनांत जावे लागत आहे त्यामुळे सेवेचे सर्व मनोरथ फुकट गेले; या म्हणण्याची काय किंमत राहिली असती? हे वर्णन जर कवींनी येथे केले नसते तर सीतेच्या चरित्राला कलंक लावल्यासारखे झाले असते. सीता तोंडदेखले बोलून, वेळ मारून नेऊन फुकटचा मोठेपणा मिरवणारी आहे असे सिद्ध झाले असते.

**चौ. ३ - (१) जाणति राम, कुणि न मर्मा या** - सीतेच्या प्रभावाचे मर्म रामाशिवाय इतर कोणीही जाणू शकत नाहीत याचे वर्णन पूर्वी व पुढेही आहे. १।३०७। २-३ व ३।२४। ४-५ पहा. **(क)** सीतेच्या प्रभावाचे मर्म कोणासही म्हणजे ब्रह्म विष्णु महेशादि कोणालाही कळले नाही. राम **'विधि हरि शंभुस नाचविणारे'** **असून रामाच्या प्रभावाचे 'मर्म न कळते त्यांसहि'** (२।१२७।१-२) यावरून ठरले की **'गिरा अर्थ जलवीचि सम म्हणती भिन्न न भिन्न ॥ वंदे सीताराम पद परम जयां प्रिय खिन्न'** (१।१८) सीता व राम दिसण्यांत दोन असली तरि सीता=राम=सीता. सीता सेवा कां करीत आहे हेहि आणखी सुचविले आहे. 'परम जयां प्रिय खिन्न' - सर्व सासवा परम खिन्न आहेत हे जाणून त्यांना सुखी करण्यासाठी ही अगम्य लीला केली. सर्व सासवा सुखी झाल्याचा उल्लेख पुढील चौपाईत आहेच - राम मातांना भेटले पण त्या सुखी झाल्याचा उल्लेख तेथे नाही ! **(ख) सीतामायेमधिं सब माया - 'जिचे अंश उपजति गुणखाणी। अगणित रमा उमा ब्रह्माणी ॥ .... राम वामदिशिं सीता हो ! ती ॥** (१। १४८।३-४) रमा उमा ब्रह्माणी (शारदा) या हरिहर विधि यांच्या माया आहेत. सीता रामाची माया आहे; म्हणून तिचे मर्म ते जाणू शकतात. ब्रह्मादि त्रिदेवांच्या मायासुद्धा सीतेच्या मायेचे अत्यल्प अंश असल्याने ते देवसुद्धा सीतेचे मर्म जाणू शकत नाहीत. मग सासवा बिचाऱ्या जीव! त्या कसे जाणणार व इतर

कोणास कळणार? सीता जाणू देईल त्यालाच कळते म्हणून मूळ मानस निर्माते शिव जाणू शकले व गुरुमुखपरंपरेने तुलसीदासांस कळले.

हिं. *। लखि सिय सहित सरल दोउ भाई । कुटिल रानि पछितानि अघाई ॥५॥*
*। अवनि जमहि जाचति कैकेई । महि न बीचु बिधि मीचु न देई ॥६॥*
*। लोकहुँ बेद बिदित कबि कहहीं । राम बिमुख थलु नरक न लहहीं ॥७॥*

म. *। बघुनि सरल सीते दो भावां । राणिस कुटिल पुरां पस्तावा ॥५॥*
*। अवनि-यमां मागत कैकेई । महि ठाव विधि मरण न देई ॥६॥*
*। लोकिं हि वेदिं विदित, कवि सांगति । रामविमुख थळ नर्किं न पावति ॥७॥*

**अर्थ** - सीता व दोघे भाऊ (रामलक्ष्मण) यांना अगदी सरळ (स्वभावाचे) पाहून कुटिलराणीला पुरा (पोटभर, पक्का) पश्चात्ताम झाला. ॥५॥ कैकेयी अवनीला व यमाला (प्रार्थना करून) मागूं लागली; पण मही (आपल्या उदरांत) ठाव देत नाही व विधि मरणही देत नाही. ॥६॥ लोकांत व वेदांत प्रसिद्ध आहे आणि – सांगतात की रामविरोध करणाराला नर्कातसुद्धा स्थळ (थळ) स्थान मिळत नाही. ॥७॥

**टीका. - चौ. ५ - (१) बघुनि सरल सीते दो भावां** - कैकयीला अनुभवास आले की वनवासाच्या पूर्वी रामलक्ष्मण व सीता यांचे माझ्यावर जितके व जसे निष्कपट प्रेम होते तसेच प्रेम व तशीच तिष्कपट वागणूक अजूनही आहे. मी अत्यंत निंद्य कपटी, दुष्ट असून पूर्वीप्रमाणे सर्वांच्या आधी मलाच भेटले; तेव्हा मीच कुबडीच्या नादी लागून यांच्याविषयी नाही नाही त्या कुकल्पना केल्या इ. प्रकारे मनांत खूप पश्चात्ताप करू लागली. **'मग पस्तावसि अंतिं अभागी'** असे जे दशरथ म्हणाले (३६।८) ते आज खरे झालेले दाखविले. इतके दिवस पश्चात्ताप झाला असला तरि तो यांच्या विषयी नव्हता.

**चौ. ६ - (१) अवनि यमां... महि न ठाव विधि मरण न देई - अवनि रक्षण करणारी,** पृथ्वी, मही. हे पृथ्वी ! तुझे उदर विशाल आहे व तू अवनि आहेस; तरी येथे जागच्या जागी तुझ्या उदरात ठाव देऊन माझे रक्षण=अवन करून तुझे अवनि हे नांव यथार्थ करून दाखव. आता मी आपले काळे तोंड कोणालाही दाखवू इच्छित नाही. **(क)** पण मही काही तिला पोटांत स्थळ देण्यास तयार होईना. येथे **अवनि व मही या शब्दांत पुनरुक्ती दिसते ती हेतुपूर्वक आहे.** मही = पूज्य, पूजार्ह. अवनि म्हणते तिला की मी अवनि असले तरि तुझ्यासारखी

स्वेच्छाचारी नाही. मला विधि निषेधांचे पालन करावे लागते. ते मी करते म्हणूनच मी मही = पूज्य आहे. मी जर तुला ठाव देऊन तुझे रक्षण केले तर तो अधर्म घडेल व माझ्या मही नावाला कलंक लागेल; म्हणून मी अवनि असले तरि माझा इलाज नाही. **(ख) यम** - यमराज. अवनि ठाव देत नाही असे पाहून यमाला विनविते की मला जिवंत ठेऊन रोज हजारो वेळा मरणाचे दुःखरूपी दण्ड देण्यापेक्षा या देहांतून सोडव; मृत्यु दे. **'शमनो यमराट् यमः । कालो दण्डधरः'** (अमरे) या देहाने या पश्चात्तापरूपी यमयातना भोगविण्यापेक्षा, मला मरण देऊन मग पाहिजे त्या यातना यातनादेहात दे. येथपर्यंत सर्व सरळ झाले पण पुढे 'विधि मरण न देई' असे का? **यम मरण न देई असे का म्हटले नाही?**

**(२) यम व विधि यांचा संबंध फाशी देणारा व फाशीची शिक्षा सुनावणारा यांच्या सारखा आहे.** ज्याप्रकारे जेव्हा, मरण विधीने जन्माबरोबरच लिहून ठेवले असेल तेव्हा त्या विधिलिखित वेळी त्या जीवाला देहांतून घेऊन जाण्याचे म्हणजे मरण देण्याचे काम माझे आहे असे यमाने सांगितले. यावेळी तुझे मरण विधीने ठरविलेले नसल्याने मी तुला सध्या मरण देऊ शकत नाही. **हा तात्विक सिद्धान्त सांगण्यासाठी येथे यम व विधि असा शब्दभेद केला.** 'हानिलाभजीवन मरण यश अपयश विधिहाति (१७९). या चौपाईने **दाखविले की कैकयीला पराकाष्ठेचा पश्चात्ताप झाला आहे व तो मरेपर्यंत नष्ट होणार नाही.**

**चौ. ७ - (१) रामविमुख थळ नर्कि न पावति - रामविमुख** = रामविरोधी, रामवैरी. हे पश्चात्तापाला व लोकनिंदेला भिऊन नर्कात लपू म्हणतील. तर नर्कसुद्धा यांना जागा देणार नाही. बाकीच्या सर्व पाप्यांना, महामहापाप्यांना नर्क घाबरत नाही; त्यांना खुशीने जागा देतो. **हे वचन अतिशयोक्ति नसून यांत एक सिद्धान्त गोवला आहे.** नर्कात राहून यातना भोगल्यावर पापांचा नाश होतो; पण रामवैर, **रामविरोध रूपी पापाची निष्कृति नर्क यातना भोगल्याने होण्यासारखी नाही.** रामाला शरण जाण्याने त्यांच्या कृपेनेच यांतून सुटता येते. जयन्ताचे उदाहरण अरण्यकाण्डारंभीच आहे ते पहावे.

*हिं. । यहु संसउ सब के मन माहीं । राम गवनु विधि अवध किं नाहीं ॥८॥*

*हिं. दो. । निसि न नींद नहिं भूख दिन भरतु बिकल सुचि सोच ॥*

*॥ नीच कीच बिच मगन जस मीनहि सलिल सँकोच ॥२५२॥*

*म. । हा संशय मनिं सर्वांना ही । राम येति विधि ! नगरिं किं नाहीं ॥८॥*

*म.दो. । निशिं न नीज ना भूक दिनिं भरत विकल शुचि शोचिं ॥*
*॥ नीच चिखलिं अडकत जसा मीन सलिल - संकोचिं ॥२५२॥*

**अर्थ** - सर्वांच्या मनांत हा संशय आहे व (मनात म्हणतात की) हे विधि ! राम अयोध्या नगरांत परत येतात की नाही? ॥८॥ भरत पवित्र (चिंतेने) । शोचिं व्याकुळ झाले असून त्यांना रात्री झोप नाही व दिवसा भूक नाही. नीच चिखलांत अडकणारा मासा पाणी आटत चालले म्हणजे जसा व्याकुळ होतो तशी भरताची दशा झाली आहे. म. दो. २५२॥

**टीका - चौ. ८ -** (१) लोकांना येत असलेल्या या संशयाचे मूळ मागल्या रामवसिष्ठ संवादांत आहे. सर्व लोकांसह अयोध्येत जावे असे प्रभूंनी सांगितले व वसिष्ठांनी रघुनाथांच्या परत जाण्याचा उल्लेखसुद्धा न करता दोन दिवस राहण्याचीच भाषा वापरली. ते दोन दिवस आज संपत आले. आता पुढे काय? राम परत येतात की नाही? आहे का नाही ते आमच्या दैवांत? का पुन्हा ये रे माझ्या मागल्या?

**दो. -** (१) **भरत विकल शुचि शोचिं -** भरताना एकच चिंता आहे की रघुनाथांच्या वनवासदुःखांचा अंत केव्हा होईल; रघुनाथ परमात्मा आहेत हे भरत विसरलेले नाहीत; म्हणून त्यांची चिंता अशुचि नसून शुचि = पवित्र आहे. भगवन्माहात्म्य ज्ञानपूर्वक 'तद्दुःखे दुःखित्वम्' या न्यायाने आहे. (ना.भ. २२,२४ पहा) **रामस्नेहाशिवाय इतर स्नेहाने, ममतेने उत्पन्न होणारे शोकचिंतादि विकार अशुचि आहेत हा सिद्धान्त येथे ध्वनित केला. 'रामस्नेहरसाळ मनाचा । साधुसभें अति आदर त्याचा'** (२७७।४)

(२) **नीच चिखलिं अडकत जसा मीन सलिल-संकोचिं** - सलिल संकोच = जल आटत जाणे. जलाशयांतिल पाणी जसजसे आटते तसतसा मासा चिंतातुर होतो. **'होति विकल जळ आटत मीन'** (४।१६।८) त्याला चिंता पडते की पाणी आटले म्हणजे नुसत्या घाणेरड्या चिखलांत अडकून रहावे लागणार. चिखलांत ओलावा असेपर्यंत प्राणही जाणार नाहीत. **(क)** चिखलांत अडकणे म्हणजे शोकांत दुःखात पडणे जसे माशाला वाटते तसे भरताला राज्य वाटत आहे. 'शोकसमाज राज्य का गणना' (१७८।३) असे भरतच म्हणाले आहेत. **'जलअवधी प्रिय परिजन मीन'** (२।५७।२) १४ वर्षांची अवधि हे पाणी आहे; ते आटत चालले आहे. चौदावर्षे रूपी जल आटून गेल्यावर राज्यरूपी चिखलांत अडकून तळमळत रहावे लागेल की काय? म्हणजे १४ वर्षानंतर तरी राम परत येतील की नाही ही

चिंता आहे. 'असे सकल रघुपतिसंपत्ती' म्हणून रामराज्याचे संरक्षण करणे हा ओलावा त्यांत राहणारच. (ख) परत जाऊन राज्य करण्यास सांगितले तर आज्ञा पालन करणे हा सेवक धर्म असल्याने ते करावे लागणार; व रामवनवास दुःखही संपणार नाही. प्रभु वनवास दुःख भोगीत राहतील आणि मी राज्य करू! त्यापेक्षा आताच प्राण गेलेले काय वाईट; पण 'मागुनि मरण न देइ विधाता.' अशी पाणी आटत चाललेल्या जलाशयांतील मोठ्या माशासारखी भरताची चिंताव्याकुळ दशा झाली आहे. काय करावे याचा विचार चालला आहे.

*हिं.* *कीन्हि मातु मिस काल कुचाली । ईति भीति जस पाकत साली ॥१॥*
*। केहि बिधि होइ राम अभिषेकू । मोहि अवकलत उपाउ न एकू ॥२॥*
*। अवसि फिरहिं गुर आयसु मानी । मुनि पुनि कहब राम रुचि जानी ॥३॥*
*। मातु कहेहूँ बहुरहिं रघुराऊ । राम जननि हठ करबि कि काऊ ॥४॥*
*। मोहि अनुचर कर केतिक बाता । तेहि महँ कुसमउ बाम बिधाता ॥५॥*
*। जौं हठ करउँ त निपट कुकरमू । हरगिरि तें गुरु सेवक धरमू ॥६॥*

*म.* *। जननिमिषें करि काळ कुचाळी । ईति भीति जशि पिकतां साळी ॥१॥*
*। होइ कसें रामा अभिषेचन । मजसि आकळे उपाय एक न ॥२॥*
*। गुरुवच मानुनि अवश्य फिरतिल । बघुनिं राम रुचि परि गुरु वदतिल ॥३॥*
*। मातृवचनिं रघुराज परतती । रामजननि कधिं करिल हट्ट ती ! ॥४॥*
*। मी अनुचर मम पाड काय ही । वाम विधी आणिक कुसमय ही ॥५॥*
*। हट्ट धरिन तर परम कुकर्महि । हरगिरिहुनि गुरु सेवक धर्महि ॥६॥*

**अर्थ** - साळीचे पीक पिकण्याच्या वेळी जे ईतींचे भय (एकाएकी) उपस्थित व्हावे त्याप्रमाणे जननीला निमित्त करून काळाने कुचेष्टा केली. ।।१।। रामाला अभिषेक कसा होईल या विषयांच्या एकाही उपायाचे आकलन मला होत नाही ।।२।। गुरुजींचे वचन (आज्ञा) मानून राम अवश्य परत येतील; पण गुरू रामाची रुचि जाणूनच बोलणार ! ।।३।। कौसल्या मातेच्या सांगण्याने राम परततील; पण रामजननीच ती ! ती कधी हट्ट करील काय? (शक्यच नाही) ।।४।। मी तर एक सेवक (अनुचर) माझा पाड तो काय? त्यांतही काळ प्रतिकूल (कुसमय) आणि दैव फिरलेले (वाम, प्रतिकूल) ।।५।। मी हट्ट धरून बसलो (तर येतील परत) तर त्याच्यासारखे अति कुकर्म नाही; (कारण) सेवकधर्म कैलासा (हरगिरी) हून अधिक भारी (जड,वजनदार = गुरू) आहे ।।६।।

**टीका. चौ. १ - (१) जननिमिषें करि काळ कुचाळी** - मातेनेच हा अनर्थ केला असता, तर कदाचित काही उपाय करता आला असता; पण मातेला पुढे करून काळानेच हा सर्व अनर्थ केला आहे. **'काळ सदा दुरतिक्रम भारी'** त्याच्यापुढे कोणाचे काही चालत नाही. बरे, काळ तरी कुठे स्वतंत्र आहे. **'काळ यस्य कोदंड' (६ मं.च.दो. १) 'भुकुटि विलासच काळ भयंकर'** (६।१५।२) काळ ईश्वरीप्रेरणेनेच कार्य करतो. (२।३५ दशरथवचन पहा) याला दृष्टान्त देतात **(क) ईतिभीति जशि पिकतां साळी** - सात ईतीचे स्पष्टीकरण २३५।३ च्या टीकेत पहावे. रामराज्य हे साळीचे भाताचे पीक अगदी पदरांत पडणार उद्या सकाळी, तो सात ईतीची धाड पडली. **पिकता** म्हणण्यात भाव हा की रोप तयार झाल्यावर किंवा आवणी झाल्यावर ईती कोसळल्या तरि पुन्हा पेरणी करून पीक पदरांत पाडून घेता येते; पण भात पिकून अगदी पिवळे झाल्यावर पीक खाऊन टाकले गेले तर पुन्हा पेरणीचा मोसम (काळ) रहात नाही व काही उपाय चालत नाही. तसेच रामराज्याभिषेकाचा विचार सुरू होताच काही विघ्न येऊन तो रद्द झाला असता तर मी आल्यावर पुन्हा प्रयत्न केला असता व काळाला अनर्थ करण्यास फटच सापडली नसती.

**चौ. ३. (१) 'गुरुवच मानुनि फिरतिल...'** गुरु रामाची रुचि पाहूनच बोलतील असे वाटण्यास राम वसिष्ठ संवादांतील दोघांचेही गूढभाव भरताच्या लक्षांत आले आहेत हे कारण आहे. राम परमात्मा आहेत हे वसिष्ठ ओळखतात हे भरतास माहीत आहे. भरताचा हा तर्क **'रामाज्ञा रुचि राखणे हितकर हे आम्हास'** (२५४) असे म्हणून वसिष्ठ लवकरच खरा करून दाखविणार आहेत.

**चौ. ४ - (१) रामजननि कधिं करिल हट्ट ती** - सापत्न मातेच्या इच्छापूर्तीसाठी ज्यांनी वनवास पत्करला ते आपल्या जननीची आज्ञा मोडणार नाहीत; कारण मातेच्या आज्ञेचे पालन करण्यात पित्राज्ञा भंग करावा लागल्यास तो दोष नाही. **'जर केवळ पित्राज्ञा - ताता । जाइ न अधिक जाणुनी माता'** (२।५६।१). असे कौसल्या त्याच वेळी म्हणाली असून पूर्वी तीच म्हणाली आहे की **'सर्व धर्मि पित्राज्ञा श्रेष्टचि'** (५५।८). ती रामाची जननी जर हट्ट करील तर रामजननी हे नावच निरर्थक ठरेल. तिनेच वनात जाण्याची परवानगी एकदा दिली असता ती आपल्या वचनाचा भंग करण्यास कधीही तयार होणार नाही.

**चौ. ५-६ (१) मी अनुचर मम पाड काय तो** - मी सेवक ! 'राम सदा

नाथ रुचि राखिति' (२१९।७) हे खरे असले तरी काळ प्रतिकूल आहे; व माझे दैव फिरलेले आहे हे स्पष्ट दिसत आहे; त्यामुळे त्या रामस्वभावाचा यावेळी उपयोग होणे फार कठीण आहे. तेवढ्यासाठी रघुवरास आपली प्रतिज्ञा मोडावी लागेल. रघुवर तर सत्यसंध व धर्मसेतुपालक आहेत; यामुळे ते सहजासहजी मोडणार नाही. तेवढ्यासाठी मला हट्ट धरावा लागेल. पण मी पडलो अनुचर - स्वामींची आज्ञा पालन करणेच काय, स्वामींची इच्छा जाणून तसे करणे हा माझा सेवकाचा धर्म, त्यामुळे हट्ट धरणे म्हणजे सेवकधर्माला काळिमा लावणे आहे; अगदी कुकर्म आहे.

(२) **हरगिरिहुनि गुरु सेवकधर्म** - हरगिरि = कैलास पर्वत; तो रावणाने शंकरांसह उचलला होता; म्हणून म्हणतात की त्याच्याहीपेक्षा भारी, जराही हलविता न येणारा सेवकधर्म आहे. (क) वा. रा. भरताने हट्ट म्हणजे प्रायोपवेशन सुरू केले होते. परंतु मानसांतील इतर चरित्रांप्रमाणे भरतचरित्र सेवाधर्माचे अनुकरणीय आदर्श चरित्र आहे हेच योग्य आहे. **'सेवक' म्हणेल** व **स्वामीच्या इच्छेविरुद्ध हट्ट धरील तो सेवक न ठरता कुसेवक ठरेल.** वा. रा. भरतास शेवटी आपला हट्ट सोडावा लागलाच आहे.

*हिं.* ***। एकउ जुगुति न मन ठहरानी । सोचत भरतहि रैनि बिहानी ॥७॥***
***। प्रात नहाइ प्रभुहि सिर नाई । बैठत पठए रिषयँ बोलाई ॥८॥***

*म.* ***। एकहि युक्ति न मनांत टिकली । चिंता करता रात्र संपली ॥७॥***
***। स्नान करोनी प्रभुला प्रणमति । बसतां, ऋषि बोलावूं धाडति ॥८॥***

**अर्थ** - एक सुद्धा युक्ति (उपाय) मनात टिकली नाही व (भरत) चिंता करीत असताच रात्र संपली (उजाडले).॥७॥ (नंतर) स्नान (वगैरे) करून प्रभूला प्रणाम केला; व भरत बसतात, तोच ऋषींनी बोलावणे पाठविले. (वसिष्ठांचे बोलावणे आले.)॥८॥

**टीका. (१) युक्ति** - कार्य साधण्यासाठी योजावयाचा उपाय. **टिकली नाही.** योग्य न वाटल्यामुळे निरूपयोगी ठरली. तीन युक्तींचा विचार वर दिला आहे. तशाच आणखी पुष्कळ उपायांचा विचार केला; पण उपयुक्त न वाटल्याने सोडून द्यावे लागले; असे रात्रभर चालले.

***''गेले भरत जिथें प्रभु सुखघन'' हे प्रकरण समाप्त झाले.***

●●●

## "कृत रघुपतिनीं बहुविध सांत्वन" प्रकरण (२५३-३१६।८)

## चित्रकूट येथील पहिली खाजगी सभा (२५३-२५७।४)

हिं.दो. *। गुर पद कमल प्रनामु करि बैठे आयसु पाइ ॥*
*॥ बिप्र महाजन सचिव सब जुरे सभासद आइ ॥२५३॥*
हिं. *। बोले मुनिबरु समय समाना । सुनहु सभासद भरत सुजाना ॥१॥*
*। धरम धुरीन भानुकुल भानू । राजा रामु स्वबस भगवानू ॥२॥*
*। सत्यसंध पालक श्रुति सेतू । राम जनमु जग मंगल हेतू ॥३॥*
*। गुर पितु मातु बचन अनुसारी । खल दलु दलन देव हितकारी ॥४॥*
*। नीति प्रीति परमारथ स्वारथु । कोउ न राम सम जान जयारथु ॥५॥*
म.दो. *। गुरुपद - कमलीं प्रणमुनी आज्ञेनें बसतात ॥*
*॥ विप्र महाजन सचिव सब सभासद हि जमतात ॥२५३॥*
म. *। वदले मुनिवर समय ओळखुनि । सभ्य, भरत घ्या सुजाण ऐकुनि ॥१॥*
*। धर्मधुरिण भानुकुल — भानू । राजा, स्ववश, राम, भगवानू ॥२॥*
*। सत्यसंध, पाते श्रुतिसेतू । राम जन्म जग-मंगल-हेतू ॥३॥*
*। गुरु-पितृ-मातृ-बचन-अनुसारी । खलदलदलन देवहितकारी ॥४॥*
*। नीति - प्रीति - परमार्था स्वार्था । कुणि न रामसम जाणि यथार्था ॥५॥*

**अर्थ** - श्रीगुरुपदकमलानां प्रणाम करून आज्ञा मिळाल्यावर भरत बसले; (इतक्यात) विप्र, महाजन, सचिव इत्यादी सर्व सभासद जमले.।।दो.२५३।। समय ओळखून मुनिश्रेष्ठ (वसिष्ठ) म्हणाले की सुजाण सभासद (सभ्य) हो ! सुजाणा भरत ! (मी म्हणतो ते) ऐकून घ्या ।।१।। राम धर्मधुरीण (धर्मधुरंधर), सूर्यकुळाचे सूर्य, राजा, स्वतंत्र (स्ववश) असून भगवान आहेत.।।२।। तो सत्यसंध, श्रुतिसेतुपालक (पाते = पालक) आहेत व रामजन्मच जगाचे मंगल करण्याच्या हेतूने झालेला आहे.।।३।। ते गुरु पिता व माता यांच्या वचनानुसार वागणारे आहेत. (खरे,) पण दुष्टांच्या समूहांचे संहारक (दलन) व देवांचे हित करणारे आहेत.।।४।। नीति, प्रीति, परमार्थ व स्वार्थ यांना यथार्थ जाणणारा रामासारखा कोणी नाही.।।५।।

**टीका. दो. (१) सभासद हि जमतात** - भरतांस बोलावणे पाठविल्याचे सांगून सुचविले आहे की वसिष्ठांनी विप्रादि सर्व सभासदांना बोलावणे पाठविले व त्याप्रमाणे ते वसिष्ठांच्या वसतिस्थानी जमले. प्रभुजवळ कबूल केल्याप्रमाणे दोन

दिवस संपले. प्रभूंनी पूर्वीप्रमाणेच सुचविल्यास काय सांगावयाचे याचा विचार करण्यासाठी वसिष्ठांनी ही सभा बोलावली आहे. **हा रामवनवासाचा ६८ वा दिवस आहे.**

**चौ. १ - (१) समय ओळखुनि वदले** - राम १४ वर्षे वनवासाची प्रतिज्ञा करून आले आहेत व ते भगवान परमात्मा आहेत, भरत व पुरवासी त्यांना परत घेऊन जाण्याच्या हेतूने आले आहेत. दोघांच्या ध्येयांत पूर्व-पश्चिमेसारखा विरोध आहे. रामाचे सर्वांवर प्रेम आहे सर्वांचे रामावर आहे; पावसाळा अगदी डोक्यावर आला आहे. या सर्व गोष्टींचा विचार करून, कोणाचेही मन दुखवले जाणार नाही व कोणालाही जड वाटणार नाही असा मार्ग - उपाय शोधून काढण्यासाठी ज्या प्रकारे बोलणे व सांगणे जरूर आहे त्याप्रमाणे वसिष्ठ बोलण्यास प्रारंभ करतात. सभ्य = सभासद.

(२) पुढील चार चौपायांत रामचंद्रांच्या प्रमुख गुणांचे वर्णन आहे. मुख्य बारा गोष्टींचे वर्णन केले आहे. त्या विशेषणांकडे वरवर पाहिले तरी राम भगवान आहेत; त्यांनी धर्मस्थापनेसाठी, दुष्टांचा विनाश करण्यासाठी, देवतांचे हित करण्यासाठी व जगाचे कल्याण करण्यासाठी अवतार घेतला आहे; या गोष्टी अगदी उघड उघड सांगितल्या आहेत. या विशेषणांसहित **इतर विशेषणांकडे पाहिले म्हणजे हे सर्व सांगण्यातील हेतु सहज कळतो** तो हा की रघुनाथाच्या खुषीच्या इच्छेने जे होईल तेच करणे योग्य ठरेल; ते मनुष्य आहेत असे समजून त्यांच्या उद्दिष्ट हेतूत अडथळा उत्पन्न करणे हितकारक होणार नाही. पुढील चौपायांतील बारा विशेषणांमधील भाव खाली क्रमाने दिले आहेत.

१. **धर्मधुरिण** - धर्माची धुरा (जूं) ज्यांनी आपल्या खांद्यावर घेतली आहे असे. हे विशेषण प्रथम देऊन सुचविले की धर्मपालन व धर्मसंरक्षण करणे हे आपले आद्य कर्तव्य आहे असे ते समजतात. म्हणूनच सर्वस्वाचा त्याग करून वनात आले आहेत. 'धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा' धर्माच्या पायावरच सर्व विश्व सुखाने नांदू शकते. या विशेषणाचा संबंध 'सत्यसंध' शी जोडावा म्हणजे बोलणाराचा हेतु कळेल.

२. **धर्मधुरीण भानुकुल - भानू** - भानुकुलच धर्मधुरीण आहे. धर्माचा प्रकाश जगात पाडणारे जे कुल, त्याला सुद्धा प्रकाशित करणारे राम आहेत. दशरथांसारख्या धर्मधुरिणांनी धर्माचा व सत्याचा त्याग केला नाही; मग राम धर्माचा त्याग करतील काय याचा विचार सभासदांनी करावा. सर्व सभासद व भरत सुजाण आहेत;

त्यांना सहज कळले असेल **की राम धर्माचा त्याग करणार नाहीत.**

३. **राजा** - याने सुचविले की भरताने राजा होण्याची आवश्यकता नाही. तसा आग्रह राम करणार नाहीत. रामच राजे आहेत. याने भरताची एक मोठी चिंता नष्ट केली.

४. **राम - 'जो आनंदसिंधु सुखराशी । त्रिजगी पावे लवें सुखासी ॥ तो सुखधाम राम तत्राम । दायक लोकां सब विश्राम** ॥ (१।१९७।५-६) असे राम आहेत; त्यांना वनवासामुळे दुःख, क्लेश होत आहेत असे मानणे योग्य आहे काय याचा विचार करावा.

५. **स्ववश** - स्व-तंत्र; निजतंत्र **'निजतंत्र अज रघुकुलमणी'** (१।५१ छंद) हे शिववचन आहे. ते इतर कोणाच्याही तंत्राने वागणारे, परवश होणारे नाहीत; म्हणून त्यांना कोणी संकटांत, बंधनांत व दुःखात पाडील की काय अशी काळजी करण्याचे कारण नाही.

६. **भगवान** - ते स्ववश, स्वतंत्र असण्याचे कारण ते षड्गुणैश्वर्य संपन्न = भगवान आहेत; परम समर्थ आहेत. त्यांच्यासारखे ऐश्वर्य, ज्ञान, वैराग्य, धर्म, यश, श्री ब्रह्मा विष्णु शिव यांच्या जवळ सुद्धा नाही. उत्पत्ति, प्रलय, भूतांची गति अगति इ. तेच जाणतात.

७. **सत्यसंध** - ते सत्यप्रतिज्ञ आहेत. धर्मधुरीण, स्वतंत्र व भगवान असून ते आपली प्रतिज्ञा मोडतील असे कोणाला तरी वाटते का ?

८. **पाते श्रुतिसेतू** - श्रुतिसेतुपालक; वेदधर्माच्या मर्यादांचे रक्षण करणारे. म्हणजेच धर्मसंस्थापक आहेत; व एवढ्यासाठीच त्यांनी वनवासाची प्रतिज्ञा केली आहे. धर्मसंस्थापकाने स्वतःच सत्यरूपी सर्वश्रेष्ठ धर्माचा त्याग करणे योग्य आहे काय ? व अशांना धर्मत्याग करण्यास सांगणे शोभेल काय याचा विचार करावा.

९. **रामजन्म-जग-मंगल-हेतू** - भगवान जेव्हा जन्म घेतात म्हणजे अवतरतात तेव्हा काही व्यक्तींचे, गावांचे किंवा नगराचेच कल्याण (मंगल) करावे इतकाच हेतु नसतो. सर्व जगाचे मंगल व्हावे हा हेतु असतो. जगाचे कल्याण धर्मसंस्थापनेत आहे. जे जगाच्या कल्याणासाठी अयोध्येत अवतरले - जन्मले, ते अयोध्येचे व अयोध्यावासी लोकांचे व रघुकुळाचे अकल्याण करतील असे तुम्हांस वाटते काय ?

१०. **गुरु पितृ मातृ वचन - अनुसारी** - ते भगवान असून मला गुरु मानतात व माझ्या आज्ञेचे पालन करतात व करतीलही; तुम्हाला वाटतही असेल की गुरु

आज्ञा देतील तर राम परततील. ते पित्याची व मातेची (कैकयीची) आज्ञा मानून वनात आले आहेत. कुलगुरुपेक्षा पिता श्रेष्ठ व पित्यापेक्षा माताश्रेष्ठ. त्या दोघांच्या आज्ञेचा भंग करून परत चला असे कोणता गुरु धर्मनिष्ठ सच्छिष्याला सांगेल ? व असे मी सांगणे धर्मानुसार योग्य आहे असे तुम्हाला वाटते का ? माझ्या जागी तुम्ही कोणी असता तर तुम्ही काय केले असतेत याचा विचार करा म्हणजे आले. (क) रामजननीने आज्ञा दिली तरीसुद्धा राम मानतील. पण पित्याच्या व दुसऱ्या मातेच्या आज्ञेचा भंग करा असे कौसल्या देवीने सांगणे रामजननीला शोभण्यासारखे आहे काय ? (ख) राम अयोध्येत नसले तरी माझ्या वज्र हृदयाला दुःख होत नाही असे आपण घटकाभर मानू या; पण राम जननीला काही दुःख होत नसेल का ? त्यांच्या दुःखाची कल्पना आपणांपैकी कोणाला करता येईल का ? अपार-असह्य दुःखाचे डोंगर सहन करून कौसल्या देवीनी अनुज्ञा का वर दिली ? त्यांनी तेव्हाच 'नको जाऊ' म्हटले असते तर राम वनात आले नसते. पण त्या चांगले जाणतात  सर्व. १४ वर्षांनी राम परत येतील अशी त्यांची सुद्धा खात्री आहे; कारण राम सत्यसंघ आहेत हे त्या चांगले जाणतात. (ग) मी रघुनाथांबरोबर वनांत गेलो तर ते किंवा कोणी मला नाही म्हणू शकत नाही; पण शिष्याच्या व्रताचा भंग गुरुनेच केल्याचे पातक माझ्या शिरावर बसेल. राम वनात आले ते त्यांच्या सुखासाठी किंवा तुम्हा आम्हाला दुःखात ढकलण्यासाठी आले नसून श्रुतिसेतु संरक्षणास व जगाचे मंगल करण्यास अत्यंत आवश्यक असलेले कार्य साधण्यासाठी आले आहेत. या गुह्य गोष्टी खरोखर समाजात प्रगटपणे सांगण्याच्या नाहीत. पण प्रसंगच असा आहे की सांगितल्याशिवाय गैरसमज दूर होणार नाही. कोणते कार्य ते ऐका;

**११. खल दल दलन देव हितकारी** - दुष्टांचा संहार केल्याशिवाय, अमंगलाचा संहार केल्याशिवाय जगाचे मंगल होत नाही. दुष्टांचा विनाश केल्याशिवाय देवांचे हित होत नाही. या गोष्टी अयोध्येत राहून साधता आल्या असत्या असे माझ्यासारख्या अल्पज्ञानां, जीवांना वाटणे स्वाभाविक आहे. परंतु जीव कितीही मोठा सर्वज्ञ झाला तरी त्याचे ज्ञान पूर्ण व यथार्थ असणे शक्य नाही.

**१२. नीति प्रीति परमार्था स्वार्था । कुणि न रामसम जाणि यथार्था** - जीव - माझ्या सारखा नीतिज्ञ परमार्थ ज्ञाता जरी झाला, मूल अविद्येचा जरी नाश झाला असला, तरी देहपाताबधि लेश - अविद्या शिल्लक राहतेच. जीव स्वतःचे

किंवा फार तर काही व्यक्तींचे पारमार्थिक कल्याण करू शकेल, पण **राजनीति, धर्मनीति, भक्तांची प्रीति, ज्ञान्यांचा परमार्थ व देवांचा स्वार्थ** इतक्या सगळ्या गोष्टी एकाच कार्याने कशा, केव्हा व कोठे साधाव्या हे एकटे भगवानच पूर्णपणे यथार्थ जाणू शकतात. या सर्व गोष्टींचे संपूर्ण निर्दोष ज्ञान भगवंताशिवाय इतर कोणाचेही असू शकत नाही. हे जर शक्य असते तर ईश्वर व जीव यांच्यात भेदच राहिला नसता. वाच्यार्थाने जीव व ईश्वर समान असू शकत नाहीत. लक्ष्यार्थाने एकरूप-ब्रह्मरूप आहेत हे खरे, पण ते ब्रह्म निष्क्रिय आहे. **(क)** खलांचा विनाश करून देवहित साधावयाचे असले तरी ते धर्मनीति व राजनीति यांचे उत्तम पालन करून साधावयाचे आहे, हे **'देवहितकारी' व 'नीति' हे शब्द जवळ जवळ घालून सुचविले आहे.** 'धर्मधुरीण' आरंभी व 'नीति' शेवटी उल्लेखून सुचविले की धर्मानुकूल राजनीतीचे पालन करावयाचे आहे; व तसे करण्याचा उपदेश स्वतःच्या आचरणाने देऊन जगाचे कल्याण करावयाचे आहे. **(ख)** भगवंतावर प्रीति करणारे आमच्यासारखे किंवा आमच्याहून श्रेष्ठ भक्त जगात आहेत हे निषादराज, या वनांतील वनवासी नरनारी, इत्यादींच्या उदाहरणांवरून आपल्याला दिसलेच आहे. निषादराजाची रामप्रीति पाहून आमच्या सारख्यांनासुद्धा लाज वाटते. देव सुद्धा त्यांच्या भाग्याची स्तुती करतात. असे अनेक गुप्त भक्त असतील त्यांच्यावर कृपा करावयाची आहे. **(ग)** ज्यांना परमार्थाची = मोक्षाचीच इच्छा आहे, व जे मोक्षाचेच अधिकारी आहेत अशांना मोक्ष द्यावयाचा असेल. वृत्रासुर पूर्व जन्मात जेव्हा शंकरांना हसला तेव्हाच तो जीवन्मुक्त होता. पण हे जगदंबा पार्वतीला सुद्धा कळले नाही. सहस्रार्जुन जीवन्मुक्त कर्मबंधातीत होता; हे मोठमोठ्या ऋषींना सुद्धा कळले नाही. असे जे बाहेरून आचरणाने दुष्ट व गोविप्रदेव परितापी आहेत त्यांना त्या त्या दुष्ट देहांतून सोडवून मोक्ष देणे हेही एक ध्येय आहे; व हे धर्मनीति व राजनीति यांचा त्याग न करता साधावयाचे आहे व हे सर्व करण्याने देवांचा स्वार्थ सहज साधावयाचा आहे. या सर्व गोष्टी कशा, केव्हा साधावयाच्या याचे यथार्थ शुद्ध, पूर्ण, ज्ञान फक्त एकट्या रामालाच आहे. **(घ)** त्यांना स्वतः परमार्थही साधावयाचा नाही व स्वार्थही नाही. आपण फक्त आपलेच सुख पाहतो, त्यांना जगाच्या सुखाची चिंता आहे. रामाच्या इतके शुद्ध सर्वांगिण ज्ञान ब्रह्माविष्णुमहेशांनासुद्धा नाही; म्हणून ते सुद्धा काय करतात ते सांगतो -

हिं. *। बिधि हरि हरु ससि रबि दिसिपाला । माया जीव करम कुलि काला ॥६॥*
*। अहिप महिप जहँ लगि प्रभुताई । जोग सिद्धि निगमागम गाई ॥७॥*
*। करि बिचार जियँ देखहु नीकें । राम रजाइ सीस सबही कें ॥८॥*
हिं.दो. *। राखें राम रजाइ रुख हम सब कर हित होइ ॥*
*॥ समुझि सयाने करहु अब सब मिलि संमत सोइ ॥२५४॥*
म. *। विधि हरि हर शशि रवि दिक्पाळां । माये जीवां कर्मा काळा - ॥६॥*
*। अहिपा महिपां प्रभुता जितकी । योगसिद्धि निगमादिगदित कीं ॥७॥*
*। पहा विचार करून मनासी । रामाज्ञाच शिरीं सर्वांसी ॥८॥*
म.दो. *। रामाज्ञा रुचि राखणें हितकर हें आम्हांस ॥*
*॥ अतां सुज्ञ समजुनि करा संमत जें सर्वांत ॥२५४॥*

**अर्थ** - ब्रह्मा, विष्णु, महेश, चंद्र सूर्य व सर्व दिक्पाल; माया, सर्व जीव, कर्म, काळ, शेष (अहिप) पृथ्वीचे पालन करणारे राजे, योग व योगापासून मिळणाऱ्या इतर ज्या सिद्धींचे वेदशास्त्रांनी वर्णन केले आहे त्या; या सर्वांच्या ठिकाणी असलेली प्रभुता = सामर्थ्य, सत्ता-शक्ती इत्यादींचा मनाशी नीट विचार करून पहा म्हणजे कळेल की रामाचीच आज्ञा सर्वांच्या शिरावर आहे. (सर्वांना मानावीच लागते).॥६-८॥ (म्हणून मला वाटते की) रामाची आज्ञा व रुचि (इच्छा) राखणे हेच आम्हा सर्वांना हितकर आहे. तरी आता आपण सर्व सुज्ञ मंडळींनी हे लक्षात घेऊन सर्वानुमते जे ठरेल ते करावे.॥दो.२५४॥

**टीका.** - (१) मागील चार चौपायांत रामगुणांचे ऐश्वर्य दृष्टीने व माधुर्य दृष्टीने जितके स्पष्ट वर्णन करणे जरूर होते तितके केले. या तीन चौपायांत केवळ ऐश्वर्यच वर्णिले आहे. हे सांगितल्याशिवाय भरत व प्रजा यांच्या मनावर पाहिजे तो परिणाम होणार नाही असे वाटल्यावरून सांगणे भाग पडत आहे. **(क)** उत्पत्ति स्थिति संहार करणाऱ्या विधिहरिहरांपासून तो पृथ्वीवरील एखाद्या साध्या राजापर्यंत जेथे ज्या कोणाच्या ठिकाणी सत्ता, सामर्थ्य, ज्ञान, शक्ति इत्यादी काही वैशिष्ट्य असेल ते सर्व रामाचेच व रामाच्याच इच्छेने त्यांना प्राप्त झाले आहे. व रामाच्या इच्छेप्रमाणे त्यांच्याकडून विशेष व्यवहार घडत असतात. यांत ध्वनित केले की रामवनवासाचे मूळ कारण, मूळ प्रेरणा, रामाची इच्छाच आहे. २१८/३ देवगुरुवचन सटीक पहावे. **(ख)** योगी ऋषि, मुनि इत्यादींच्या ठिकाणी योगसिद्धींचे किंवा इतर सामर्थ्य असते व त्याच्या बळावर

ते अचाट, अघटित घटना करू शकतात, करताना दिसतात. पण त्यांचे सामर्थ्य, प्रभाव, शापानुग्रहशक्ति, त्रिकाळ ज्ञान, प्रारब्ध बदलणे, मेलेल्यांना जिवंत करणे इ. सर्व करण्याची शक्ति त्यांना रामाच्या प्रेरणेने व इच्छेनेच मिळालेली असते. **'यद्यद् विभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा । तत्तदेवावगच्छ त्वं ममतेजोंशं संभवम्'** (भ.गी. १०।४) या श्लोकाचाच विस्तार वरील तीन चौपायांत आहे.

(२) **शेवटी सार सांगितले की** रामचंद्रांची सत्ता, प्रभाव, प्रतापादि सर्वांच्या पेक्षा श्रेष्ठ असल्याने त्यांच्या इच्छेला अनुकूल असलेल्या गोष्टीत त्यांनी दिलेल्या अति अल्पशा शक्तीचा उपयोग ब्रह्मादि कोणीही करू शकतात, पण त्या शक्तीचा उपयोग रामाच्या इच्छेविरुद्ध करता येत नाही; केल्यास सफल होत नाही. आता स्वतःचे मत सांगतात -

**दोहा.** - रामाच्या इच्छेप्रमाणे व आज्ञेप्रमाणे वागण्यातच आपले सर्वांचे हित आहे, हे स्वतःचे वैयक्तिक मत सांगितले. पण सुचविले की माझे मत तुम्ही मानलेच पाहिजे असे मी म्हणत नाही. तुम्ही सर्व सुज्ञ आहांत; मी सांगितले. त्याचा विचार करा व एकमताने जो निर्णय होईल त्याप्रमाणे आपण करू. (क) वसिष्ठांनी आपले मत सांगून त्याला जी पुरवणी जोडली ती जोडली नसती तर त्याचा अर्थ असा झाला असता की राम व वसिष्ठ यांनी एकमताने निश्चय केला व रघुनाथांनी वसिष्ठांस पुढे केले व आपण नामानिराळे राहिले. वसिष्ठ आणखी थोडे स्पष्टीकरण करतात :

*हिं.* *। सब कहुँ सुखद राम अभिषेकू । मंगल मोद मूल मग एकू ।।१।।*
*। केहि बिधि अवध चलहिं रघुराऊ । कहहु समुझि सोइ करिअ उपाऊ ।।२।।*
*। सब सादर सुनि मुनिबर बानी । नय परमारथ स्वारथ सानी ।।३।।*
*। उतरु न आव लोग भए भोरे । तब सिरु नाइ भरत कर जोरे ।।४।।*

*म.* *। सकलां सुखद राम - अभिषेक हि । मंगल - मोद - मूल पथ एक हि ।।१।।*
*। येतिल कसे नगरिं रघुराव हि । समजुनि सांगा करूं उपाव हि ।।२।।*
*। सादर परिसुनि मुनिवर-भाषित । नय - परमार्थे स्वार्थे मिश्रित ।।३।।*
*। उत्तर ये ना स्तंभित सगळे । भरतें शिर नमुनी कर जुळले ।।४।।*

**अर्थ** - श्रीरामास राज्याभिषेक करणे हा मंगल व मोद यांचे मूळ असलेला एक (मुख्य) च मार्ग आहे.।।१।। रघुराज अयोध्यानगरीत परत कसे येतील याचा (नीट) विचार करून सांगा म्हणजे तो उपाय आपण करू.।।२।। नीतीने

परमार्थाने व स्वार्थाने संयुक्त असे मुनिवरांचे भाषण (भाषित) सर्वांनी आदराने ऐकून घेतले. ॥३॥ पण कोणाकडून काही उत्तर येईना (उत्तर देता येई ना). सगळे स्तंभित झाले आहेत. (हे पाहून) मस्तक नमवून भरतानी हात जोडले.॥४॥

**टीका. चौ. १-२ (१) सकलां सुखद राम-अभिषेक** - राजा दशरथ, भरत जननी, जनकराजा इत्यादी सर्वांनाच रामराज्याभिषेक झाल्याने सुख होईल; त्याने आपले सर्वांचे मंगल कल्याण होईल व सर्वांनाच परमानंद होईल. त्या दिवशी रामाने जी विनंती केली तिच्यात भरताला राज्य द्या असा उल्लेख नव्हता. त्यावरून वाटते की राज्याभिषेक करून घेण्यास त्यांचा विरोध नाही; कारण की भरत राजा होणार नाहीत हे तेही जाणतात; पण राज्याभिषेक केव्हा कोठे करावयाचा व राम अयोध्येत आताच कसे येतील एवढाच प्रश्न शिल्लक आहे. अधर्म न घडता त्यांस अयोध्येत नेण्याचा उपाय सापडला तर राम नाकबूल होतील असे मला वाटत नाही. असा उपाय मला तर सुचत नाही; पण तुम्हा कोणाला सुचला तर विचार करून सांगा म्हणजे कार्य होईल - सर्व शहाणपणाचा मक्ता माझ्याकडेच दिलेला नाही. 'बालादपि सुभाषितं ग्राह्यम्' प्रल्हादादि परम भागवतात वसिष्ठांची गणना आहे हे विसरू नये.

**चौ. ३-४ (१) नयपरमार्थे स्वार्थे मिश्रित - 'धर्मधुरीण'** पासून **'कुणि न रामसम जाणि यथार्था'** (चौ.५) पर्यंत नय = नीति आहे; **'विधिहरिहर'** पासून **'रामाज्ञाच शिरीं सर्वांसी'** पर्यंत परमार्थवाणी आहे; व पुढे 'सकलां सुखद -' या दोन चौपायांत स्वार्थाचा विचार आहे. काय उत्तर द्यावे हे कोणालाच सुचेना. बुद्धि कुंठित झाली.

*हिं.* *। भानुबंस भए भूप घनेरे । सकल एक तें एक बड़ेरे ॥५॥*
*। जनम हेतु सब कहँ पितु माता । करम सुभासुभ देइ बिधाता ॥६॥*
*। दलि दुख सजइ सकल कल्याना । अस असीस राउरि जगु जाना ॥७॥*
*। सो गोसाइँ बिधि गति जेहिं छेंकी । सकइ को टारि टेक जो टेकी ॥८॥*

*हिं.दो.* *। बूझिअ मोहि उपाउ अब सो सब मोर अभागु ॥*
*॥ सुनि सनेहमय बचन गुर उर उमगा अनुरागु ॥२५५॥*

*म.* *। भूप भानुकुळिं झाले किति तरि । जे एकाहुनि थोर एक जरि ॥५॥*
*। जन्महेतु सकलां पितृ-माता । कर्म-शुभाशुभ देइ विधाता ॥६॥*
*। करि कल्याण दलुनि दुःखांला । असा अशीस विदित जगिं अपला ॥७॥*
*। स्वामि तेच जे विधिगति बाधिति । निश्चय केल्या कोण कि टाळिति ॥८॥*

*म.दो. । पुसतां अतां उपाय मज हें मम अभाग्य भूरी ॥*
*॥ परिसुनि वचनां स्नेहमय गुरु अनुराग-सुपूरिं ॥२५५॥*

**अर्थ** - भानुवंशांत असे कितीतरी भूप होऊन गेले की जे एकाहून एक मोठे होते;॥५॥ त्या सर्वांच्या जन्माचे निमित्त आईबाप होते; व कर्माचे शुभाशुभ फळ देणारा विधाताच होता.॥६॥ (पण) दुःखांचा विनाश करून (सर्व) कल्याण करणारा आपलाच आशीर्वाद होता हे सर्व जगाला माहीत आहे.॥७॥ ज्यांनी विधिगतीला बाध आणला ते स्वामी आपणच आहांत ! आपण जर निश्चय केला तर त्याला कोण टाळू शकतील ?॥८॥ (असे असून) आता आपणच मला उपाय विचारता, तेव्हा हे माझे मोठे अभाग्यच ! या स्नेहमय वचनाला ऐकून गुरु अनुरागाच्या मोठ्या पुरांत सापडले ! हृदय प्रेमाने भरून आले.॥दो.२५५॥

**टीका. चौ.** ५-७ (१) यांतील भाव हा आहे की भानुवंशात सर्वच राजे एकापेक्षा एक मोठे झाले. सर्वांची कीर्ति झाली. असे होण्यास सर्वांचे शुभग्रह एकापेक्षा एक अधिक चांगले होते असे मानावे लागेल; पण विधाता काही पुण्य-पाप (शुभ, अशुभ) देऊ शकत नाही; तो शुभ कर्माचे शुभ फळ सुख कीर्ति आदि देतो व अशुभ = पापकर्माचे अशुभ फळ दुःख अकीर्ति इत्यादी देतो. सर्वच राजे पुण्यवान व निष्पाप असणे अशक्य; कारण तसा दृष्टान्त इतर राजवंशांत सापडत नाही. हे वैशिष्ट्य भानुवंशांतच दिसते. याचे कारण भानुवंशाचे कुलगुरु आपण आहात हेच आहे. आपल्या आशीर्वादानेच या वंशांतील राजांच्या दुःखांचा विनाश होऊन ते सुखी व यशस्वी झाले आहेत; असे आपल्या आशीर्वादाचे सामर्थ्य आहे. हे मीच म्हणतो असे नाही तर सर्व जगात हे प्रसिद्ध आहे.

**चौ. ८ (१) स्वामि तेच जे विधिगति बाधिति** - ज्यानी आपल्या आशीर्वादाच्या बळाने ब्रह्मदेवाचे भाललेख सुद्धा फिरविले असे जे भानुवंशाचे स्वामी ते आपण आहातच. आपण पूर्वी समर्थ होतात व आता असमर्थ झालात असे थोडेच आहे ? रघुनाथ अयोध्येत आताच परत येतील असा आशीर्वाद दिलात की काम झालेच. हा उपाय आपल्याच हातात आहे. **(क) बिधिगति बाधिति** सूर्यवंशांतील राजांपैकी ज्यांच्या विधिलिखिताला वसिष्ठांच्या सामर्थ्याने बाध आणला अशी कथा भाग. ९।९ मध्ये आहे.

वैवस्वत मनूला पुत्र नव्हता म्हणून वसिष्ठांनी मित्रावरूण देवाचा यज्ञ करण्यास सांगितले. पण राजपत्नी श्रद्धा, हिने होत्याला विनंती केली की कन्या होईल असे करा.

त्याप्रमाणे होत्याने केल्यामुळे पुढे इला नावाची कन्या झाली. पुत्रासाठी यज्ञ केला असता कन्या का झाली असे राजाने वसिष्ठांस विचारले; तेव्हा त्यांनी ध्यानाने सर्व काही जाणले; व आपल्या सामर्थ्याने वसिष्ठांनी इलेला पुत्रत्व दिले. **इला होती तो सुद्युम्न झाला.** (मा.पी. मधे दिलेल्या कथा सुसंगत व विश्वसनीय वाटल्यास पहाव्या).

**दो. - (१) पुसतां अतां उपाय मज** - त्यावेळी कोणाला उपाय विचारला नाही. आणि आता माझा संबंध आला तेव्हा मात्र उपाय विचारता ! आपण पूर्वीसारखेच समर्थ असून हा सर्व अनर्थ घडला ! माझेच महान दुर्भाग्य दुसरे काय !

*हिं.* *। तात बात फुरि राम कृपाहीं । राम बिमुख सिधि सपनेहुँ नाहीं ॥१॥*
*। सकुचउँ तात कहत एक बाता । अरध तजहिं बुध सरबस जाता ॥२॥*
*। तुम्ह कानन गवनहु दोउ भाई । फेरिअहिं लखन सीय रघुराई ॥३॥*
*। सुनि सुबचन हरषे दोउ भ्राता । भे प्रमोद परिपूरन गाता ॥४॥*
*। मन प्रसन्न तन तेजु बिराजा । जनु जिय राउ राम भए राजां ॥५॥*
*। बहुत लाभ लोगन्ह लघु हानी । सम दुखु सुख सब रोवहिं रानी ॥६॥*

*म.* *। रामकृपें च तात तें सत्य हि । सिद्धि रामविमुखा स्वप्निंहि नहि ॥१॥*
*। एक वदत संकोच वाटतो । त्यजिति अर्ध बुध सर्व जात तों ॥२॥*
*। दोघे भ्राते तुम्हीं वना जा । फिरवु सिता-लक्ष्मण-रघुराजां ॥३॥*
*। श्रवुनि सुवच दो बंधू हर्षित । झाल्या काया प्रमोद पूरित ॥४॥*
*। प्रमुदित मन तन तेजें भ्राजे । नृप सजीव जणुं राम हि राजे ॥५॥*
*। लाभ जनां बहु हानि अल्प ती । सम सुख-दुःखी राण्या रडती ॥६॥*

**अर्थ** - तात ! तुम्ही म्हणता ते सत्यच आहे; पण ते रामकृपेनेच (घडले); रामविमुखाला सिद्धि स्वप्नांत सुद्धा मिळत नाही.॥१॥ एक (उपाय आहे, पण) सांगण्यास संकोच वाटतो. सर्व जात असता बुध अर्ध्याचा त्याग करतात.॥२॥ तुम्ही दोघे बंधु वनात जा म्हणजे सीता लक्ष्मण व रघुराज राम यांना परत फिरवू.॥३॥ हे सुंदर वचन ऐकून दोन्ही भावांना हर्ष झाला; व दोघांच्या काया (देह) अति आनंदाने (= प्रमोद) परिपूर्ण झाल्या.॥४॥ मन फार प्रसन्न झाले व देह तेजाने असे चमकू लागले की जणू दशरथ राजा सजीव झाले व राम राजे झाले.॥५॥ लोकांना फार लाभ झाला व ती हानि अल्प वाटली; राण्यांना सुख व दुःख सारखेच झाले व त्या रडू लागल्या.॥६॥

**टीका. चौ. १ - (१) रामकृपेंच तात तें सत्य हि** - 'तात ! तें सत्य हि (पण)

रामकृपेंच' **असा अन्वय आहे. 'योगसिद्धि निगमादिगदित कीं'** (२५४।७) हे वसिष्ठांनी ज्या भावाने सांगितले तो भाव भरताच्या आर्त हृदयांत उमटला नाही म्हणून त्यांनी वसिष्ठांच्या सामर्थ्याचे वर्णन केले. त्यांतील गूढ भावच येथे सांगतात की रामकृपा असली तरच, मला काय वा कोणाला काय, आरंभिलेल्या कार्यात सिद्धि मिळते. रामाची इच्छा प्रतिकूल असेल तर कोणी कितीही मोठा असो त्याला त्या कार्यात यश येणे अगदी अशक्य. त्यावेळी रामकृपा अनुकूल होती म्हणून ते घडले. आता रामाचीच इच्छा अयोध्येत येण्याची नाही व त्यामुळे माझ्या सामर्थ्याचा काही उपयोग नाही. 'सिद्धि रामविमुखा स्वप्निहि नहि' हा सर्वांस लागू असणारा सिद्धांत येथे सांगितला.

**चौ. २-३** (१) **'त्यजिति अर्ध बुध सर्व जाता तों - सर्वनाशे समुत्पन्ने अर्ध त्यजति पंडितः । अर्धेन कुरुते कार्यं सर्वनाशो हि दुःसह'** (प्र.रत्ना.) सर्वस्वाची हानि होत असेल तेव्हा थोडी हानि पत्करून शेष वाचविणे हा शहाणपणाचा मार्ग आहे. 'अर्ध' शब्दाचा अर्थ शब्दशः घेण्याची आवश्यकता नाही. सर्व घर जळून जाणार हे दिसत आहे; पण काही भाग पाडला तर बाकीचे वाचेल असे वाटतांच मनुष्य स्वतःच तो भाग पाडण्यास तयार होतो. 'जळत्या घराचा पळता वासा'.

(२) **दोघे भ्राते तुम्हीं वना जा फिरवुं... रघुराजां** - हे म्हणणे वसिष्ठांच्या मागल्या भाषणाशी अगदी विसंगत दिसते; कारण असे केल्याने धर्मधुरिण, सत्यसंध वगैरे गोष्टी साधणार नाहीत व राजाचे वचनही खरे ठरणार नाही. असे विसंगत बोलण्यात तीन पक्ष संभवतात. **I** भरताची परीक्षा पाहणे. **II** भरताच्या अनुरागात मग्न झाल्याने आर्त होऊन बोलणे. **III** भरताला जे दुःख होत आहे ते कशामुळे हे सर्वांस कळावे; भरताचे चरित्र अत्यंत निष्कलंक व अति उज्वल असल्याची सर्वांनी खात्री करून घ्यावी व भरताचा महिमा वाढावा हा हेतु आहे. **या अल्प मतीस हा तिसरा पक्षच योग्य वाटतो. (क)** परीक्षा पाहणाराच्या मनात संशय असावा लागतो. संशय असेल तेथे त्या व्यक्तिविषयी शुद्ध प्रेम असणे शक्य नाही. पण भरतानी दिलेले स्नेहमय उत्तर ऐकून मुनिराज त्यांच्या अनुरागात-प्रेमात मग्न झाले आहेत. 'विना प्रतीति न उपजे प्रीती' (७।८९।७) याप्रमाणे **पहिला पक्ष खोटा ठरतो. (ख)** आर्त झाल्यामुळे विसंगत बोलणे - वसिष्ठ अजून भरतप्रेमार्त झालेले नाहीत. या वसिष्ठांच्या सूचनेवर भरत जे उत्तर देणार आहेत ते ऐकल्यानंतरच वसिष्ठांची मति कुंठित होणार आहे व नंतर रामाकडे जाणार आहेत; तेथे ते सुचवितील की ते भरतप्रेमाने

आर्त झाले आहेत. याप्रमाणे **दुसरा पक्ष गळला.** (ग) वसिष्ठांच्या या प्रश्नाचे जे उत्तर भरत देणार आहेत त्यावरून स्पष्ट दिसते की मुनींनी ही सूचना मनःपूर्वक केलेली नसून विनोदाने केली आहे असे भरताचे मत झाले आहे.

**चौ. ४-५ (१) काया प्रमोद - पूरित** - दोघांच्याही सर्वांगावर रोमांच उभे राहिले. स्वेद व कंप सर्वांगात उत्पन्न झाला. **(क) नृप सजीव जणुं रामहि राजे** - या दोन्ही गोष्टी घडल्या असता जितका आनंद भरत शत्रुघ्नांस झाला असता तितकाच नुसते हे मुनिवचन ऐकताच झाला ! राम राजा होणे शक्य आहे पण दशरथांच्या देहाचे कधीच दहन झाले असल्याने ते सजीव होणे शक्य नाही; पण दशरथ जिवंत असता राम राजे झालेले पाहून भरतास जो आनंद झाला असता तसा झाला; व यामुळे स्वर्गात असलेल्या दशरथांना वाटेल की भरताने मला जणूं सजीव केला, जीवदान दिले कारण तेथेही त्यांना मरणप्राय दुःख पश्चातापाने होत आहे. 'तुझा कलंक नि **पस्तावा मम । मरून नष्ट कधिं होइ न उपशम**' (२।३६।५) असे दशरथ कैकयीला म्हणाले आहेत.

**चौ. ६ - (१) लाभ जनां बहु, हानि अल्प ती** - राम अयोध्येत येणार हा मोठा लाभ वाटला व भरत शत्रुघ्न वनात राहणार ही हानि वाटली; पण अल्प ! म्हणजेच लोकांना फार आनंद झाला; पण थोडे वाईट वाटलेच. मातांना जितका आनंद झाला तितकेच दुःख झाले. याने सुचविले की मातांना राम व भरत सारखेच वाटतात; पण लोकांना तसे वाटत नाहीत.

हिं. *। कहहिं भरतु मुनि कहा सो कीन्हे । फलु जग जीवन्ह अभिमत दीन्हे ॥७॥*
*। कानन करउँ जनम भरि बासू । एहि ते अधिक न मोर सुपासू ॥८॥*
हिं.दो. *। अंतरजामी रामु सिय तुम्ह सरबग्य सुजान ॥*
*॥ जौं फुर कहहु त नाथ निज कीजिअ बचनु प्रवान ॥२५६॥*
म. *। वदति भरत मुनिवचना करतां । जगजीवां फळ इष्ट समस्तां ॥७॥*
*। करिन काननीं वास जन्मभर । याहुन अधिक न मजला सुख पर ॥८॥*
म.दो. *। रामसिता हृदयस्थही तुम्हिं सर्वज्ञ सुजाण ॥*
*॥ नाथ ! कथित जर खरेंच किं निज वच करा प्रमाण ॥२५६॥*

**अर्थ** - भरत म्हणाले की मुनींच्या सांगण्याप्रमाणे केल्याने जगांतील समस्त (सगळ्या) जीवांना इच्छित (इष्ट) फळ मिळेल.॥७॥ (१४ वर्षेच काय) मी जन्मभर अरण्यांत राहीन (कारण) यापेक्षा अधिक सुख मला दुसरे नाही.॥८॥

राम व सीता माझ्या हृदयांतच वास करतात व आपण सर्वज्ञ व सुजाण आहात (माझ्या हृदयांतले जाणतांच) तरी नाथ ! आपण सांगितलेत ते खरेच सांगितले असेल तर आपण आपले वचन सत्य करावे.॥२५६॥

**टीका. चौ.** ७-८ (१) **जगजीवां फळ इष्ट समस्तां** - जगातील सर्वच जीवांना असे वाटत आहे की रघुनाथांनी वनात न राहता अयोध्येच्या सिंहासनावर बसावे; म्हणजे 'यथा राजा तथा प्रजाः' हे आपोआपच होईल. **(क) करिन काननीं वास जन्मभर** - १४ वर्षेच काय सर्व जन्मभर मी वनात रहावे या अटीवर राम अयोध्येत परत जाणे शक्य असेल तर मी ते ही करण्यास तयार आहे. सर्व जगातील जीवांची इच्छा पुरविण्यासाठी एकाने वनवास पत्कारणे हा परम श्रेष्ठ धर्म आहे. याच्यासारखा परोपकार करण्याची संधी कोणाला मिळणे अशक्य आहे. पण अधर्मी, रावणी, मदांध सत्ताधीशांचे सूत्र याच्या अगदी उलट असते. त्यांची स्वतःची लहर इच्छा पूर्ण करण्यासाठी सर्व जगाला दुःख द्यावे लागले तरी ते पर्वा करीत नाहीत. पक्षशाहीतसुद्धा असे घडते. **(ख) याहुन अधिक न मजला सुख पर** - पर = दुसरे भाव हा की मी जन्मभर वनवास अत्यंत आनंदाने पत्करीन. त्याने मला सर्व प्रकारचे उत्तम सुख होईल. तिळभरसुद्धा दुःख वाटणार नाही. या उत्तरानेच इतरांची रामभक्ति व भरताची रामभक्ति यांतील महदंतर दिसले. भरत जन्मभर वनात राहणार म्हणजे जन्मभर रामविरह स्वतःच्या इच्छेने अत्यंत आनंदाने पत्करणार, म्हणजे भरताचे दुःख रामविरहामुळे नसून रामवनवासदुःखामुळे आहे. १४ वर्षांचे रामाचे वनवासाचे हाल वाचविण्यासाठी भरत जन्मभर हालअपेष्टा सोसण्यातच नव्हे तर त्या दुःखानां परम सुख समजण्यास तयार आहेत. **'तत्सुखे सुखित्वम्' (ना.भ.) ज्याच्या योगाने रामाला सुख** होईल व दुःख होणार नाही ते भरताचे सुख असे या उत्तराने ठरले **(ग)** इतरांचे दुःख राम दुःखामुळे नसून रामविरहामुळे आहे. हा भेद पूर्वीहि दाखविला आहे. रामसंगतीत वनात राहण्याने इतरांना फार सुख होत आहे हे पूर्वीच दाखविले आहे. 'तद्दुःखे दुःखित्वम्' हे इतरांच्या ठिकाणी नाही. **(घ)** वसिष्ठांनी ही सूचना दिली नसती तर भरताच्या भक्तिप्रेमाचे अलौकिकत्व चातकाच्या नेमाला व मीनाच्या प्रेमाला सुद्धा लाजविणारे आहे हे प्रत्यक्ष प्रमाणाने जगाच्या दृष्टोपत्तीस आले नसते ! यावरून वसिष्ठांचा ती विसंगत वाटणारी सूचना देण्यातील हेतु उघड होतो.

**दो. (१) रामसिता हृदयस्थ** - भाव हा की मी जे म्हणालो ते खरे आहे की नाही, थट्टा आहे हे ते सहज जाणतातच शिवाय आपण सर्वज्ञ व सर्वदर्शी ( सुजाण) असल्याने आपणही जाणताच. **(क) नाथ ! कथित जर खरेंच** - या भरतांच्या वचनावरून ठरते की वसिष्ठांनी जे सांगितले ते मनापासून सांगितले नसून त्यांनी केवळ प्रेमाचा विनोद केला आहे, असे भरतांस खात्रीपूर्वक वाटत आहे. कारण वसिष्ठ परस्परविरोधी भाषण करणार नाहीत व खोटे बोलणार नाहीत अशी भरताचीच काय ब्रह्मादि देवांचीसुद्धा खात्री आहे. **खरेच सांगितले असेल तर** = आपण थट्टा, विनोद करीत नसाल तर '**निज वच करा प्रमाण** - म्हणजे रामचंद्रांस आज अयोध्येत पाठवावे; राम गेले की सीता व लक्ष्मण जाणारच. मी वनात आलोच आहे, तो परत जाणारच नाही.

*हिं.* ***। भरत बचन सुनि देखि सनेहू । सभा सहित मुनि भए बिदेहू ॥१॥***
***। भरत महा महिमा जलरासी । मुनि मति ठाढ़ि तीर अबला सी ॥२॥***
***। गा चह पार जतनु हियँ हेरा । पावति नाव न बोहितु बेरा ॥३॥***
***। औरु करिहि को भरत बड़ाई । सरसी सीपि कि सिंधु समाई ॥४॥***

*म.* ***। ऐकुनि वचना स्नेहा पाहुनि । होति विदेही सकल सभा मुनि ॥१॥***
***। भरत - महा - महिमा जलराशी । मुनि-मति उभी तटीं अबलाशी ॥२॥***
***। पार जावया उपाय पाही । नाव तराफा जहाज नाहीं ॥३॥***
***। वर्णि कोण पर भरत - महत्ता । सरशुक्तित ये सिंधु किं भरता ॥४॥***

**अर्थ** - (भरताचे) भाषण ऐकून व स्नेह पाहून सर्व सभा आणि मुनि (वसिष्ठ) विदेही झाले.॥१॥ भरताचा महा महिमा महासागर आहे; व वसिष्ठ मुनींची मति (बुद्धि) अबले (दुर्बल स्त्री) सारखी तीरावर उभी आहे.॥२॥ पार (पलीकडे) जाण्याचा उपाय शोधीत आहे; पण होडी, तराफा किंवा जहाज इ. काही (मिळत) नाही.॥३॥ भरताची महती (मोठेपणा) दुसरा (पर) कोण वर्णन करील ? (शक्यच नाही कोणाला); तलावातील शिंपीमध्ये सागर कधी साठवता (भरता) येईल काय ? (कधीही शक्य नाही).॥४॥

**टीका. चौ. १** - (१) मुनि आणि सर्व सभासद पूर्ण देहभानरहित, स्तंभित चकित झाले यांत काही नवल नाही; पण आमचे **परमपूज्य कवि राज-राजेश्वर सुद्धा आधी काय घडले व पाठीमागून काय घडले हे विसरले;** आणि आधी घडलेले नंतर, व नंतर घडलेले आधी लिहिले गेले. स्नेह दिसला आधी - श्रवुनि सुवच

दो बंधू हर्षित झाल्या काया प्रमोदपूरित ।। प्रमुदित मन, तन तेजे भ्राजे । नृप सजीव जणुं रामहि राजे' (२५६।४-५) व नंतर भरत म्हणाले की 'करिन काननी वास जन्मभर' इ. (२५६।८) पण कवि येथे म्हणतात ऐकुनि वचन स्नेहा पाहुनि !

**चौ. २ - (१) भरत महा महिमा जलराशी** - जलराशि = सागर, समुद्र, भरताचे अपार प्रेम पाहून त्या प्रेमसागराचा महिमा वर्णन करावा असे वसिष्ठांस वाटू लागले. पण महासागराच्या तीरापाशी येऊन उभ्या राहिलेल्या दुर्बल स्त्रीसारखी वसिष्ठांची बुद्धि त्या अपार, अगाध महासागराकडे गति स्तंभित, कुंठित होऊन निर्निमेष नेत्रांनी बघतच राहिली ! विसाव्या शतकात बलवान स्त्रिया सागर पोहून जाण्याचा प्रयत्न करतील हे श्रीगोस्वामींना आधीच कळले होते की काय कोणास ठाऊक ! पण **कळले असावे असे 'अबला' शब्दावरून वाटते;** नाहीतर 'प्रमदा' घालता आला असता ! सार हे की स्वतःच्या शब्दांत वर्णन करता येणे अशक्य आहे असे त्या सागराला पाहताच वाटले. वर्णन करण्याचे कार्य मुख्यतः बुद्धि व वाणी यांचे आहे.

**चौ. ३ - (१) पार जावया उपाय पाही** - स्वतः पोहून जातां न आले तरि पार जाण्याची प्रबल इच्छा आहे. अशा असामान्य शिष्याच्या गुणांचे वर्णन व कौतुक करावे असे फार वाटत आहे. म्हणून वाटले की नावेत होडीत बसावे, म्हणजेच **स्मृतिशास्त्रांच्या** साह्याने वर्णन करावे; पण पाहिले तो त्या सर्व **नावा** फुटक्या, निरुपयोगी; म्हणून वाटले की **पुराणे रूपी तराफे** पुष्कळ आहेत; त्यांच्या साह्याने वर्णन करता आले तर पहावे; पण या सागरांत चालण्यासारखा एकही तराफा आढळला नाही. शेवटी विचार केला की **वेदरूपी जहाजाचा** आधार काही मिळाला तर पहावा, पण तेसुद्धा 'नेति नेति' म्हणू लागले. **पार जाणे म्हणजे वर्णन करणे** हा अर्थ पुढील चौपाईत सुचविलेला आहे.

**(२) येथे हे दाखविले की शिष्याच्या पुढे गुरू हरले.** गुरूचा पराभव शिष्याने केला. पण त्यामुळे गुरूला अपमान, खेद, लाज, रोष इ. न वाटतां परमानंद झाला! यांत वसिष्ठांचे शिष्यवात्सल्य प्रेम, गुणग्राहकता, उदार, विशाल सागरासारखे हृदय, इत्यादि भारतीय संस्कृतीच्या गुरूची परमोच्च लक्षणे दिसून आली. **'शिष्यादिच्छेत् पराजयम्' हे** या बाबतीत **भारतीय संस्कृतीचे सूत्र आहे.** शिष्याच्या मोठेपणाने गुरुचाच मोठेपणा दिसून येतो. आडांत असेल तेच घड्यांत आल्यावर जास्त स्वच्छ दिसले व चमकले तरि असते आडांतलेच पाणी ! आणि लोक विचारणारच की कोणत्या आडाचे?

**चौ. ४ - (१) कोण वर्णि पर भरत - महत्ता** - वसिष्ठांसारख्या सर्वशास्त्रपुराणवेद पारंगत अलौकिक महासिद्ध पुरुषांना, जे ब्रह्मलिखित सुद्धा फिरवू शकतात अशांना, ज्या महासागराच्या पृष्ठभागावरसुद्धा जाता आले नाही; तेथे त्या सागराची महती, महिमा इतर कोण वर्णन करणार? वसिष्ठ स्वतः ज्ञानसागर असून त्यांची ही स्थिति! मग तलावांतील शिंपीत (शुक्तीत) तो कसा मावणार? तुलसीदास म्हणतात की माझी बुद्धी तलावांतील शिंपलीसारखी आहे; भरतमहामहिमा सागराचे वर्णन मला कसे करवेल?

ज्याला सागराच्या पार जाणे म्हटले त्यालाच येथे वर्णन करणे म्हटले व याणे करून नाव तराफा, जहाज म्हणजे काय हे सुचविले आहे; **म्हणून तर या मठ्ठ बुद्धीला कळले !**

**सूचना** - 'मुनिमति उभी तटीं अबलाशी' (२५७।२) या चरणांत **'आचारविरुद्ध'** नावाचा **काव्यदोष** आहे असे एक हिंदी साहित्य समालोचक म्हणतात. (मा.पि ११।८ पृ. २३६) या मिथ्या आरोपाचे निराकरण मानसमणीत या लेखकाच्या नावाने प्रसिद्ध झाले आहे. **मानसमणिं लेखसूची प्रस्तावनेत पहावी.** येथे देणे अनावश्यक वाटते. मूळ हस्तलिखित टीकेत **भाग २८ पृ. २३६** 'विशेष लक्षांत ठेवणे' या शीर्षकाने मराठीत आहे.

## – या सभेचा समारोप –

ही चित्रकूटावरील पहिली सभा म्हणजे कार्यकारी मंडळाची बैठक झाली. पुढील रामभरत चरित्रांचे चित्र सूक्ष्मरूपाने येथे दाखवून ठेवले आहे. स्वागताध्यक्ष वसिष्ठ व कार्यकारिणीचे प्रमुख चिटणीस भरत यांच्यातील चर्चा येथे झाली. चिटणिसांनी आपल्या अलौकिक अनुपम रामप्रेमाने व त्यागाने स्वागताध्यक्षांस असे भारून टाकले आहेत की आता भरणाऱ्या दरबाराच्या अध्यक्षांपुढे भरतचिटणिसांची बाजू स्वतः स्वागताध्यक्षच मांडतील, फार काय ते अध्यक्षांनांच घंटा वाजवून सावध करतील की मुख्य विषय बाजूस पडतो आहे, त्याचा विचार आधी करावा. स्वागताध्यक्ष इतके अधीर झाले आहेत की या सभेलाच ते अध्यक्षांच्या मंडपांत घेऊन जातील व तिचे रूपांतर दरबारांत होईल.

## चित्रकूटावरील पहिला दरबार (२५७।५ - २७०।३)

*हिं. । भरतु, मुनिहि मन भीतर भाए । सहित समाज राम पहिं आए ॥५॥*
*। प्रभु प्रनामु करि दीन्ह सुआसनु । बैठे सब सुनि मुनि अनुसासनु ॥६॥*
*। बोले मुनिबरु बचन बिचारी । देस काल अवसर अनुहारी ॥७॥*
*म. । प्रिय मुनिमना भरत अति झाले । सह समाज रामाप्रति आले ॥५॥*
*। प्रभुनीं प्रणमुनि दिलें शुभासन । बसति मिळत सब मुनि-अनुशासन ॥६॥*
*। वदले मुनिवर वचन विचारे । देश - काल - अवसर - अनुसारे ॥७॥*

**अर्थ** - मुनींच्या मनाला भरत अति प्रिय झाले. वसिष्ठ समाजासह रामाकडे आले ॥५॥ प्रभूंनी प्रणाम करून (वसिष्ठांस) शुभासन दिले व मुनींची आज्ञा मिळतांच सर्व मंडळी बसली. ॥६॥ देशकाल व परिस्थिति यांच्या अनुसार मुनिश्रेष्ठ विचारपूर्वक म्हणाले ॥७॥

**टीका. चौ. ५-६** - (१) वसिष्ठांना भरत प्रिय होतेच पण त्यांचा तो अद्‌भुत स्नेह पाहून व अलौकिक अद्‌भुत उत्तर ऐकून आता अति प्रिय झाले. याने सुचविले की मुनिवर भरताची बाजू चांगलीच मांडणार ! जी मंडळी सभेत होती ती सर्व रामाश्रमांत गेली. राम परमात्मा आहेत ही भावना जागृत असल्यामुळे गुरू स्वतः शिष्याकडे गेले; नाहीतर जसे भरतांस बोलावून घेतले तसे रघुनाथांस बोलावले असते. **(क)** शिष्य गुरूकडे गेला म्हणजे त्याने कसे वागावे हे भरताच्या निमित्ताने (२५३) पूर्वी दाखविले. गुरू शिष्याकडे आल्यावर शिष्य जरी सर्व समर्थ (प्रभु) असला तरी त्याने कसे वागावे हे उठून प्रभूंनी दंडवत प्रणाम केला, आसन दिले व आज्ञा मिळाल्यावर बसले, या गोष्टींनी दाखविले आहे.

**चौ. ७** - (१) **देशकाल अवसर - अवसर =** प्रसंग; 'प्रस्तावः **स्यादवसरः**' (अमरे; द्वे **प्रसंगस्य** अ.व्या. सु). **देशविचार** - चित्रकूटचे वन आहे; लोक वनांत राहिल्याने दुःखी आहेत असे राम म्हणाले आहेत. **काळविचार** - दोन दिवस लोक राहतील असे म्हटले होते ती कालमर्यादा संपली आहे; व त्यामुळे परत जाण्याचा विचार निश्चित करण्याचा काळ (वेळ) आहे. अवसर = **प्रसंग विचार** - प्रसंग फार बिकट आहे. राम प्रतिज्ञा करून वनवासास आलेले आहेत; 'रामाज्ञा रुचि राखणे हितकर हे आम्हास' असे सभेत सांगितले आहे; पण नंतर भरताचे अद्‌भुत प्रेमाला वश झाल्यामुळे भरताचे समाधान करणे आवश्यक वाटत आहे; व राम अयोध्येत आले तर सर्वांनाच सुख होणार आहे; असा हा प्रसंग आहे.

मुख्य हे ठरवावयाचे आहे की रघुनाथांस घेऊन अयोध्येस जावयाचे की त्यांस न घेताच जावयाचे व भरताचे समाधान कसे करावयाचे या सर्व गोष्टींचा विचार करून मुनि बोलतात -

हिं. *। सुनहु राम सरबग्य सुजाना । धरम नीति गुन ग्यान निधाना ॥८॥*

हिं. दो. *। सब के उर अंतर बसहु जानहु भाउ कुभाउ ॥*
*॥ पुरजन जननी भरत हित होइ सो कहिअ उपाउ ॥२५७॥*

हिं. *। आरत कहहिं बिचारि न काऊ । सूझ जुआरिहि आपन दाऊ ॥१॥*

म. *। पहा राम सर्वज्ञ सुजाण हि । धर्म-नीति-गुण-बोध - निधान हि ॥८॥*

म.दो. *। सकल हृदंतरिं वसतसां जाणां भाव कुभाव ॥*
*। पुरजन - जननीं - भरत - हित होण्या वदा उपाव ॥२५७॥*

म. *। आर्त कधीं न विचारें वदतो । डाव जुगाऱ्या अपला दिसतो ॥१॥*

**अर्थ** - हे पहा रामचंद्रा ! तुम्ही सर्वज्ञ व सुजाण (चतुर) आहांत; धर्म, नीति, गुण व ज्ञान (बोध) या सर्वांचे सागर आहांत ॥८॥ आपण सर्वांच्या हृदयांत निवास करता व सर्वांचे भाव कुभाव जाणता; (तरी आता) पुरवासी लोक, सर्वमाता व भरत यांचे हित होण्यास उपाय (उपाव) आपणच सांगावा. ॥दो. २५७॥ (कारण) आर्त कधी विचारपूर्वक बोलत नाही. व जुगाऱ्याला आपलाच डाव दिसत असतो. (तसे आमचे सर्वांचे आहे). ॥१॥

**टीका - चौ.** - ८ - (१) राम, धर्म व नीति या शब्दांतील भाव राम, धर्मधुरीण व नीति यांच्या विवरणांत (२५४।२-५) पाहणे. सुजाण = चतुर. धर्मनीति व गुण या सर्वांचे उत्तम संरक्षण करून अडचणीतून मार्ग काढण्याचे चातुर्य आपल्या ठिकाणी जसे आहे तसे इतर कोणाच्याही ठिकाणी नाही. आम्ही, ब्रह्मादि त्रिदेव व इतर सर्व देव यांची सर्वज्ञता व चातुर्य आपल्या मानाने मर्यादित आहेत.

**दो.** - (१) सकल हृदंतरिं जाणां भाव कुभाव - भाव = अभिप्राय (आवड) कुभाव = अनिच्छा, नावड. आम्ही सर्व आपल्याकडे कशासाठी आलो आहोत, आमच्या मनांतील अभिप्राय काय आहे हे आपण जाणतां. आम्हा सर्वांना प्रिय काय वाटते व अप्रिय, दुःखदायक काय वाटत आहे हे आपण सहज जाणता; कारण सर्वांच्या हृदयांत आपण आहांत; म्हणून सर्वांच्या दुःख निवारणाचा उपाय आपणच सांगावा. उपाय ठरविताना आपण धर्म नीति आणि पुरवासी, माता व भरत यांचे गुण वगैरेचा योग्य समन्वय करून उपाय सांगू शकाल. आम्ही

कोणी तसा सांगू शकणार नाही, कारण तसे सांगता येण्यासारखी आमच्या हृदयांची परिस्थिति राहिलेली नाही.

**चौ. १ (१) आर्त कधीं न विचारे वदतो** - माझ्या सकट सर्वच मंडळी अगदी आर्त आहोत. धर्मनीति, गुण, ज्ञान देशकाल परिस्थिति इत्यादि कशाचाही विचार आर्ताला सुचत नाही. आपली आर्ति दुःख, कष्ट, संकटे येन केन प्रकारेण दूर व्हावीत इतकेच तो पाहतो. मुनिराज भरतभक्तीने आर्त आहेत; भरत रामदुःखाने आर्त आहेत. व बाकी सर्व लोक रामविरहाने आर्त आहेत आणि माता रामविरह व भरतभक्ती यांनी आर्त आहेत, हे अगदी सत्य आहे. याला दृष्टान्त देतात - **(क) डाव जुगाऱ्या आपला दिसतो** - फाशांचे दान प्रत्येक वेळी मला अनुकूल असेच पडावे, माझेच पत्त्याचे पान मलाच सापडावे असे प्रत्येक जुगाऱ्याला वाटत असते. हे शक्य की अशक्य, आपलाच डाव नेहमी पडला तर आपल्या बरोबर खेळ खेळणारांचे काय होईल, त्यांनी काय करावे इत्यादि विचारही तो करीत नाही. जुगाऱ्याची इच्छा पूर्ण होणे न होणे जसे फासे ठरवितात तसे आपण ठरवावे.

*हिं.* ***। सुनि मुनि बचन कहत रघुराऊ । नाथ तुम्हरिहि हाथ उपाऊ ॥२।***
***। सब कर हित रुख राउरि राखें । आयसु किएँ मुदित फुर भाषें ॥३॥***
***। प्रथम जो आयसु मो कहुँ होई ॥ माथें मानि करौं सिख सोई ॥४॥***
***। पुनि जेहि कहँ जस कहब गोसाईं । सो सब भाँति घटिहि सेवकाईं ॥५॥***

*म.* ***। श्रुत मुनिवचन वदति रघुराव किं । नाथ आपले हातिं उपाव किं ॥२॥***
***। सर्वा हित तुमची रुचि रक्षण । आज्ञा करतां, मोदें पालन ॥३॥***
***। होइल आज्ञा प्रथम मला जी । शिरि धरुनी ती पाळिन राजी ॥४॥***
***। पुढे जया प्रभु जसे सांगतिल । तसे सर्वपरिं सर्व वागतिल ॥५॥***

**अर्थ** - मुनींचे वचन ऐकले व रघुराज म्हणाले की नाथ ! उपाय (तर) आपल्याच हातात आहे की ॥२॥ आपली रुचि (इच्छा, मत) रक्षण करणे व आज्ञा केली गेली की ती आनंदाने पालन करणे यांतच सर्वांचे हित आहे. ॥३॥ प्रथम मला जी आज्ञा होईल (दिली जाईल) ती मी शिरोधार्य मानून राजीखुषीने पाळीन ॥४॥ पुढे प्रभु (स्वामी) ज्यांना जसे सांगतील त्या प्रमाणे सर्व (लोक) सर्व प्रकारे वागतील ॥५॥

**टीका - सूचना** - येथे असे वाटण्याचा संभव आहे की जो तो आपली जबाबदारी दुसऱ्यावर ढकलण्याचा प्रयत्न करीत आहे. **पण हे वरवरचे पाहणे**

आहे. वसिष्ठ खरेच आर्त असल्याने त्यांनी स्वतःस आर्तात गणून रघुनाथांस
पाय विचारला. पण अशा परिस्थितीत उपाय सांगणे म्हणजे गुरू आर्त आहेत,
यांची विचारविवेकशक्ति नष्ट झाली आहे इत्यादि गोष्टी मान्य केल्यासारखे
आहे; आणि गुरुंना काही समजत नाहीसे झाले आहे म्हणून मी सांगतो हा
अहंकार धारण करण्यासारखे आहे. गुरू ऐश्वर्य भावाने बोलत असले तरी राम
माधुर्य भावाने शिष्य-धर्माचे पालन करून दाखवीत आहेत. गुरुंनी सर्वज्ञ व
सर्व हृदयस्थ म्हटले त्याच्या आधारे सांगतात -

**चौ. ३ - (१) सर्वा हित तुमची रुचि रक्षण** - आपण आपले मन (रुचि)
काय आहे हे स्पष्ट शब्दांनी सर्वांना सांगितलेच आहे. 'रामाज्ञा रुचि राखणे
हितकर हे आम्हांस' (२५४) असे जे वसिष्ठ म्हणाले त्याला उद्देशून हा चरण
आहे. त्या आपल्या मताचे रक्षण करण्यांत पुरजन जननी भरत हितच नव्हे तर
सर्वांचेच हित आहे. महाराज ! मी आपल्या मताविरुद्ध कसा जाऊ शकेन?
पुरजन - जननी- भरत हित कशात आहे हे आपण आधीच आपली रुचि
व्यक्त करून सांगितले आहे. माझे हित कशांत आहे याचा विचार आपण
केलाच असेल. त्याप्रमाणे मला आज्ञा द्यावयाची राहिली आहे तरी आनंदाने
पालन करण्यासाठी आनंदाने आज्ञा दिली जाताच -

**(१) होइल आज्ञा प्रथम मला जी** - जी काही आज्ञा होईल; मग ती मला
आवडणारी असो नसो, जी वाटेल ती आज्ञा द्याल ती मी राजीखुषीने पालन
करीन. 'प्रथम' शब्दांत विशेष भाव हा आहे की जी प्रथम द्याल ती करीन; ही
कठीण आहे; किंचित बदल करून, पुन्हा द्यावी असे सुद्धा म्हणणार नाही.
काहीही सबबी सांगणार नाही. **'आज्ञा गुरुणां परिपालनीया'**

हिं. ***। कह मुनि राम सत्य तुम्ह भाषा । भरत सनेहँ बिचारु न राखा ॥६॥***
***। तेहि तें कहउँ बहोरि बहोरि । भरत भगति बस भइ मति मोरी ॥७॥***
***। मोरे जान भरत रुचि राखीं । जो कीजिअ सो सुभ सिव साखी ॥८॥***

म.दो. ***। भरत बिनय सादर सुनिअ करिअ बिचार बहोरि ॥***
***॥ करब साधुमत लोकमत नृपनय निगम निचोरि ॥२५८॥***

म. ***। राम कथित तुम्हिं सत्य, वदति मुनि । भरतस्नेह विचार नुरवि मनिं ॥६॥***
***। यास्तव पुनःपुन्हां वदतो, अति । भरतभक्तिवश झाली मम मति ॥७॥***
***। मम मत राखुनि भरत रुचीला । जें कराल, शुभ, शिव साक्षीला ॥८॥***

*म. दो. । भरत विनति घ्या ऐकुनी सादर करा विचार ॥*
*॥ करा साधुमत - लोकमत - नृपनय - निगम - सुसार ॥२५८॥*

**अर्थ** - मुनि म्हणाले की राम ! तुम्ही खरेच सांगितलेत; पण भरताच्या स्नेहाने माझी विचारशक्ति (= विचार) च शिल्लक ठेवली नाही ॥६॥ एवढ्याचसाठी मी पुनःपुन्हा सांगतो की माझी बुद्धी भरताच्या भक्तीला अतिशय वश झाली आहे ॥७॥ (त्यामुळे) माझे मत तर असे आहे की भरताची रुचि रक्षण करून (करण्यास) जे काही कराल तुम्ही ते शुभच आहे; याला साक्षीला शिव आहेत. ॥८॥ म्हणून तुम्ही प्रथम भरताची विनंति आदराने ऐकून घ्या, (मग) त्यावर विचार करा आणि मग साधुमत, लोकमत, राजनीति आणि वेद यांचे जे उत्तम सार म्हणून वाटेल ते करा. ॥दो. २५८॥

**टीका. - चौ. ६ - (१) भरत स्नेह बिचार नुरवि मनिं** - माझ्या मनाची स्वतंत्रपणे, निःपक्षपाताने, विचार करण्याची शक्ति नष्ट झाली आहे. भरताच्या स्नेहामुळे भरताच्या इच्छेशिवाय कशाचाही माझ्या बुद्धीत प्रवेशच होत नाही. म्हणजेच **माझी बुद्धी पक्षाभिनिविष्ट झाली असल्याने माझे म्हणणे निर्दोष असणे शक्य नाही; म्हणून सध्यां मी तुम्हाला आज्ञा देण्यास पात्र नाही. किती सुंदर उपदेश आहे. राष्ट्रहिताचा वा प्रजाहिताचा विचार करण्यासाठी ज्या कमिट्या नेमल्या जातात त्या कमिटीचे सभासद व अध्यक्ष पक्षांतीत (अपक्ष) असावेत असे या उदाहरणाने उपदेशिले आहे.** पण हे तत्त्व मान्य केल्यास पक्षशाही जगेल कशी?

**चौ. ८ (१) मम मत, 'राखुनि भरत - रुचीला** - भाव हा की भरताच्या इच्छेप्रमाणे केल्यास शुभ च; कल्याणच, होईल असे मला वाटते. **(क) शिव साक्षीला** यांत **गूढभाव** आहे की भरत परम भागवत असल्याने ते शिवाप्रमाणेच भगवंताच्या इच्छेच्या विरुद्ध न जाता भगवदाज्ञा शिरसामान्य करतील असे मला वाटते. **'पालन आज्ञा धरुनी माथां । परम धर्म हा अमचा नाथा!'** (१।७७।२) **हा जो शिवाचा सिद्धान्त** आहे; **तोच** 'पालन आज्ञा धरुनी माथां । परम धर्म हा आमचा नाथा !' (२।२१३।३) सिद्धांत भरताचा आहे. **वाच्यार्थ आहे की** - मी शिवाला साक्ष ठेऊन सांगतो की कोणाचे काही अकल्याण होणार नाही. पूर्वी रघुनाथांच्या चिंतेचा नाश होऊन जे जाणल्याने समाधान झाले तेच वसिष्ठ येथे ध्वनित करीत आहेत. **'समाधान मनिं असे जाणतां । भरत वचनिं मम साधु जाणता'** (२२७।५). **(ख)** भरताची रुचि काय आहे हे मी सांगण्यापेक्षा भरतांनीच

सांगितलेले चांगले; कारण त्यांची रुचि काय आहे याचा निश्चित अंदाज माझ्या बुद्धीला करता येत नाही; आला नाही; **'भरत महा महिमा जलराशी । मुनि मति उभी तटीं अबलाशी'**; म्हणून म्हणतो की.

**दोहा - (१) भरत विनति घ्या सादर ऐकुनि** - असे न केल्यास मात्र कल्याण होईलसे मला वाटत नाही. **(क)** भरताची रुचि काय आहे ते ऐकून घेऊन साधुमत, लोकमत, राजनीति व वेदशास्त्र यांच्या समन्वयाने जे योग्य वाटेल ते करावे. या वचनाधारे असे म्हणता येत नाही की येथे लोकमतवाद = लोकसत्तावाद सुचविला आहे. कारण की हल्ली ज्याला लोकसत्तावाद म्हणतात त्यांत भारतीय राजनीति, साधुमत व वेदशास्त्र यांना थारा नाही.' तुलसीदासांना इष्ट वाटणारी मानसोपलब्ध शासनपद्धति कोणती हे **प्रस्तावनेत 'श्री तुलसी - शासन पद्धति' पृ. ४६९** या प्रकरणांत साधार दाखविले आहे. ज्यांना हल्ली लोकराज्य किंवा लोकसत्ता म्हणतात त्यांत पक्षराज्य व पक्षसत्ताच असतात. **पक्षातीत लोकांचे राज्य असेल तरच त्यास लोकराज्य म्हणता येईल.** साधुमत हा पाया, लोकमत इमारत, राजनीति घुमट व वेदमत हा कळस असे समजावे.

*हिं.* ***। गुर अनुराग भरत पर देखी । राम हृदयँ आनंदु बिसेषी ।।१।।***
***। भरतहि धरम धुरंधर जानी । निज सेवक तन मानस बानी ।।२।।***
***। बोले गुर आयसु अनुकूला । बचन मंजु मृदु मंगल-मूला ।।३।।***

*म.* ***। गुरु-अनुराग पाहुनी भरतीं । रामहृदयिं आनंदा भरती ।।१।।***
***। जाणुनि भरता धर्मधुरंधर । तन मन वच निजसेवक सुंदर ।।२।।***
***। वदले गुरुवचना अनुकूल हि । वचन मंजु मृदु मंगलमूल हि ।।३।।***

**अर्थ** - गुरुजींचा भरतावरील अनुराग पाहून रामहृदयांत आनंदाला भरती आली. ।।१।। भरत धर्मधुरंधर असून तनमन वाणीने आपला अंतरंग (निज) उत्तम सेवक आहे हे जाणून गुरुवचनाला अनुकूल आणि सुंदर, मृदु व मंगलमूल अशी वाणी (राम) बोलले ।।३।।

**टीका. चौ. २-३** - (१) गुरुवचनाला अनुकूल असे बोलणार आहेत त्याचे कारण येथे आधी सांगतात. भरत धर्मधुरंधर असल्याचा शिक्का पूर्वी देवांनीच मारला आहे. **'होता ना जगिं भरत जन्म जर । धरणि कोण धरि सकल धर्मधुर' (२३३।१)** नंतर शिव साक्षीला ठेऊन गुरुजींनी सांगितले की अकल्याण न होता कल्याणच होईल व स्वतःच्या अनुभवाने तेच ठरले आहे. (२३१।८ पासून

२३२।८ पर्यंत पहा) **धर्मधुरंधर** असल्याने धर्माचा त्याग करणार नाही व करण्यास सांगणार नाही. **उत्तम अंतरंग सेवक** असल्याने शब्दाच्या बाहेर जाणार नाही व हट्ट करणार नाही. **'समाधान मनिं असे जाणतां । भरत वचनिं मम साधु जाणता'** **(२२७।५) टी. पहावी.** धर्ममत, साधुमत, भरत साधु आहेच. जाणता = वेदमत व राजनीति, वचनि मम = तनमनवाणीने सेवक आहे त्यामुळे साधुमत, लोकमत, राजनीति व वेदमत यांच्या विरुद्ध करण्यास भरत सांगणार नाहीत अशी पक्की खात्री असल्यामुळेच गुरुवचनाला पोषक असेच बोलत आहेत -

***हिं.*** ***। नाथ सपथ पितु चरन दोहाई । भयउ न भुअन भरतसम भाई ॥४॥***
***। जे गुर पद अंबुज अनुरागी । ते लोकहुँ वेदहुँ बडभागी ॥५॥***
***। राउर जा पर अस अनुरागू । को कहि सकइ भरत कर भागू ॥६॥***
***। लखि लघु बंधु बुद्धि सकुचाई । करत बदन पर भरत बडाई ॥७॥***
***। भरतु कहहिं सोइ किएँ भलाई । अस कहि राम रहे अरगाई ॥८॥***

***म.*** ***। नाथ-शपथ आणहि पितृचरणीं । भ्राता भरत समान न भुवनीं ॥४॥***
***। जे गुरु - पद - अंबुज - अनुरागी । लोक - वेद - मतिं ते बहुभागी ॥५॥***
***। अपले इतकें प्रेम जयावर । कोण वदेल भरत भाग्या वर ॥६॥***
***। बघुनि बंधु लघु, मति संकुचते । वदत मुखावर भरत-महत्ते ॥७॥***
***। भरत म्हणति तें करत चांगलें । राम वदुनि हें स्तब्ध राहले ॥८॥***

**अर्थ** - नाथ ! आपली शपथ व पितृचरणांची आण घेऊन सांगतो की भरतासारखा भाऊ चौदा भुवनांत (झाला) नाही. ॥४॥ जे गुरुपदकमलांच्या ठिकाणी अनुरक्त असतात ते लोकमतानुसार व वेदमतानुसार महा भाग्यवान (बहुभागी) होत ॥५॥ (मग) आपले ज्यांच्यावर इतके (अपार) प्रेम आहे त्या भरतांच्या श्रेष्ठ भाग्याचे वर्णन कोण करूं शकेल? ॥६॥ धाकटा भाऊ आहे असे पाहून भरताची प्रशंसा त्यांच्या तोंडावर करण्यास बुद्धीला संकोच वाटतो. (मनाला फार आवड आहे) ॥७॥ भरत म्हणतील ते करणेच चांगले (कल्याणकारक) असे म्हणून राम स्तब्ध राहिले ॥८॥

**टीका - चौ. ४ -** (१) गुरुजींची शपथ घेण्याने भरतांस सुचविलें कीं ज्यांची शपथ मोडली तर सर्व पुण्याचा क्षय होतो त्यांच्या आज्ञेच्या वा इच्छेच्या विरुद्ध वागणे हा शिष्याचा धर्म नाही. पितृचरण आण घेण्याने सुचविले की ज्यांनी सत्यसंधता टिकविण्यासाठी देहत्याग केला त्यांचाच मी पुत्र आहे; आणि

त्या चरणांची प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी वनांत आलो आहे. **(क)** रामबुद्धि आनंद कल्लोळांत गुरफटल्यामुळे भरत समोर आहेत हे राम विसरले व लागले भरताची व भरताच्या भाग्याची प्रशंसा करण्यास.

**चौ. ५-६ (१) जे गुरुपद बहुभागी -** शिष्याचे गुरुचरणी शुद्ध प्रेम असले व गुरुचे शिष्यावर नसले तरि त्याला लोक (१४ भुवने) व वेद महा भाग्यवान समजतात. मग ज्याच्यावर गुरुचे अपार प्रेम असेल त्याच्या भाग्याचे मोजमाप कोण करणार! गुरुला अनेक शिष्य असल्याने त्यांचे प्रेम विभागलें जाण्याची शक्यता असते. शिष्याला एकच गुरु असल्याने त्याचे गुरुवर पूर्ण प्रेम असू शकेल तसे गुरुचे असेलच असे नाही. गुरुच्या ठिकाणी असलेल्या सर्व सद्गुणांचे अस्तित्व शिष्याच्या ठिकाणी असणें कठीण असते. पण येथे तर रामप्रेमात शिष्याने गुरुच्यावर ताण केली म्हणून गुरुचे भरतावर अपार प्रेम आहे. **गुरुचें शिष्यावर प्रेम बसण्यास शिष्याचे शुद्ध सरळ हृदय व भगवत्प्रेम ही मुख्य कारणे असतात. भगवत्प्रेम परम विरागाशिवाय असणे शक्य नाही. (क)** या वर्णनांतून एक ध्वनि निघतो की अशा अपार प्रेम करणाऱ्या गुरुजींच्या इच्छेच्या विरुद्ध वागून कसे चालेल. इतके सगळे वर्णन केले तेव्हा ध्यानांत आले की भरत समोरच आहेत व ते धाकटे भाऊ आहेत. गुरुप्रेमाचा व तत्संबंधी भरताच्या भाग्याचा असा परिणाम झाला की भरत समोर आहेत व ते लधुबंधु आहेत याचे विस्मरण झाले.

**चौ. ७ (१) वदत मुखावर मति संकुचते -** लहानांच्या मुखावर मोठ्यांनी त्यांची प्रशंसा करणे शिष्टाचार व नीतिविरुद्ध आहे. मनांत फार वाटत आहे की भरताची खूप प्रशंसा करावी पण मुखावर करण्यास बुद्धीला संकोच वाटू लागला. भरताच्या मागे जेथे कुठे संधि मिळाली तेथे रघुनाथाने भरताची भरपूर प्रशंसा केली आहे. सीतेजवळ, भरद्वाजांजवळ, लक्ष्मणांजवळ, सर्व मुनिमंडळींसमोर व लंकाकांडांत विभीषणाजवळ लक्ष्मण नेहमीच जवळ असल्याने असे करण्यास संधीच मिळाली नाही. त्याचा वचपा लक्ष्मण मूर्च्छित झाल्यावर लं. कां. ६१ मध्ये निघाला आहे; व सुग्रीवादि वानरगणांजवळ लक्ष्मणाच्या मुखावरच केली आहे प्रशंसा पण प्रसंगानुसार ती अगदी थोडी आहे.

**चौ. - ८ - (१) भरत म्हणति तें करत चांगले -** 'राखुनि भरत रुचीला जें कराल (तें) शुभ' या वसिष्ठ वचनाचा मान राखला. वसिष्ठांनी सांगितले की भरताचे म्हणणे ऐकून घ्या, विचार करा व मग काय करणे ते ठरवा. पण राम

म्हणतात की काय करावे ते भरतानीच सांगावे म्हणजे मी ते करीन, पण बोलण्याची, सांगण्याची प्रत्यक्ष आज्ञा मिळाली नसल्याने भरत बोलण्यास संकोच करीत आहेत हे पाहून गुरुजी सांगतात :

*हिं. दो. । तब मुनि बोले भरत सन सब सँकोचु तजि तात ॥*
*॥ कृपासिंधु प्रिय बंधु सन कहहु हृदय कै बात ॥२५९॥*

*म. दो. । वदले मुनि भरता तदा त्यज संकोचा तात ॥*
*॥ कृपांबुधी बंधुला प्रिय सांग किं जें हृदयांत ॥२५९॥*

**अर्थ** - (राम स्तब्ध झाले व भरत बोलत नाहीत असे पाहिले) तेव्हा मुनि भरतास म्हणाले की तात ! सर्व संकोच सोडून जे काही हृदयांत असेल ते आपल्या कृपासागर प्रिय बंधूला सांग की (एकदा). ।।दो २५९।।

**टीका. दो. (१) तदा वदले - 'निजवचन करा प्रमाण'** (२५६) असे भरताने म्हटल्यावर काही बोलता आले नाही. बोलू ते होईल अशी खात्री झाल्याशिवाय बोलून उपयोग काय ? आतां 'भरत म्हणति तें करत चांगलें' असे अभिवचन रामाकडून घेतले **तदा** = तेव्हां **वदले** कीं घे बाबा ! मी आपलें वचन सत्य करून दाखविले आहे; तू म्हणशील ते राम करणार आहेत. तुझ्या मनात काय असेल ते सांग आता. **(क)** या दोह्यांतील भाषा माउलीच्या हृदयास समजेल अशी वात्सल्यपूर्ण आहे. **(ख)** अरे बाळा संकट काळी बंधूजवळ सांगण्यास संकोच कशाला ? संकटकाळी साह्य करतो तोच बंधु, बरं ! व तो अगदी कृपेचा सागर आहे. तू त्याला प्रिय आहेस मग संकोच का ? सांग काय इच्छा असेल ती.

***श्रीमानस गूढार्थ चंद्रिका अयोध्याकांड अध्याय २४ वा समाप्त.***

●●●

## अध्याय २५ वा

हिं. *। सुनि मुनि बचन राम रुख पाई । गुरु साहिब अनुकूल अघाई ॥१॥*
*। लखि अपनें सिर सबु छरु भारू । कहि न सकहिं कछु करहिं बिचारू ॥२॥*
*। पुलकि सरीर सभाँ भए ठाढ़े । नीरज नयन नेह जल बाढ़े ॥३॥*

म. ***। परिसुनि मुनि वच बघुनि राममन । गुरु स्वामि अनुकूल पूर्ण, पण- ॥१॥***
***। अपल्या शिरिं सब जाणुनि भार हि । वदूं शकति ना करिति बिचार हि ॥२॥***
***। पुलकित वपू सभेमधिं उठले । स्नेहनीर नीरजाक्षिं भरलें ॥३।***

**अर्थ :** मुनींचे म्हणणे ऐकून व रामाच्या मनातील भाव जाणून (खात्री झाली की) गुरुजी व स्वामी पूर्ण अनुकूल आहेत; पण - ॥१॥ सर्व भार आपल्या (एकट्याच्या) च शिरावर येऊन पडला; हे जाणून काही सांगूं शकेनात (काय बोलावे हेच कळेना) म्हणून विचार करू लागले.॥२॥ (मग) शरीर रोमांचित होऊन सभेत उठून उभे राहिले व त्यांच्या कमळासारख्या नेत्रांत (नीरज = कमल, अक्षि = डोळा) स्नेहजल (नीर) भरले. (डोळे अश्रूंनी भरले).॥३॥

**टीका. चौ. १-३ (१) गुरु - स्वामि अनुकूल पूर्ण** - 'रामाज्ञा रुचि राखणें हितकर हें आम्हांस' वगैरे वसिष्ठांच्या भाषणावरून वाटत होते की त्यांची आपल्यावर विशेष कृपा दिसत नाही; आणि स्वामी राम वाटेल ते करण्यास म्हणजे प्रतिज्ञा सुद्धा मोडण्यास तयार होतील असे वाटत नव्हते; पण आता प्रत्यक्षच दिसले की दोघेही अगदी पूर्ण प्रसन्न आहेत. **(क)** पण आता सर्व भार माझ्या एकट्याच्याच शिरावर येऊन पडला. स्वामींनी काय करावे हे सांगण्याची पाळी माझ्यासारख्या सेवकावर आली ! आपली प्रतिज्ञा मोडा व अयोध्येत चला असे स्वामींना सांगणे योग्य आहे काय ? इत्यादी पुष्कळ विचार मनात केला. काय बोलावयाचे ते मनात ठरवले. **(ख) उठून उभे राहिले** तेच सात्विक भावांनी भरलेले. प्रभु माझ्यासाठी प्रतिज्ञा मोडण्याससुद्धा तयार झाले ! या विचाराने प्रेम व आनंद हृदयांत मावेनासे होऊन रोमांच व अश्रुरूपाने बाहेर प्रगट झाले.

हिं. ***। कहब मोर मुनिनाथ निबाहा । एहिं तें अधिक कहौं मैं काहा ॥४॥***
***। मैं जानउँ निज नाथ सुभाऊ । अपराधिहु पर कोह न काऊ ॥५॥***
***। मो पर कृपा सनेहु बिसेषी । खेलत खुनिस न कबहूँ देखी ॥६॥***
***। सिसुपन तें परिहरेउँ न संगू । कबहुँ न कीन्ह मोर मन भंगू ॥७॥***

*। मैं प्रभु कृपा रीति जियँ जोही । हारेहुँ खेल जितावहिं मोही ॥८॥*

म. *। मुनिनाथें वक्तव्य कथित मम । काय सांगु त्याहुनि अधिकोत्तम ॥४॥*

*। प्रभुचा स्वभाव मी जाणतसें । अपराध्याही कोप कधिं नसे ॥५॥*

*। कृपा स्नेह मजवरी विशेषही । खेळतही कधिं दिसे न रोषहि ॥६॥*

*। आशिशुपण मी त्यक्त न संगा । कधिं करिती ना मम मन-भंगा ॥७॥*

*। अनुभविली प्रभुकृपारीत कीं । खेळिं दिली मज हारिं जीत की ॥८॥*

**अर्थ** - मी जे सांगावयाचे (वक्तव्य) ते मुनिनाथांनी सांगून टाकले आहे, त्याहून अधिक चांगले (अधिक + उत्तम) मी काय सांगू !॥४॥ माझ्या प्रभूचा (नाथाचा) स्वभाव मी जाणतो. अपराध्यावरसुद्धा कोप करीत नाहीत.॥५॥ माझ्यावर तर विशेषच कृपा व स्नेह करतात, व खेळतानासुद्धा कधी क्रोधाचा लेश ही दिसला नाही.॥६॥ मी शिशुपणापासून त्यांचा संग कधी सोडला नाही व त्यांनी कधीही माझा मनोभंग केला नाही. (माझं मन मोडलं नाही).॥७॥ प्रभूची कृपा करण्याची रीत अनुभविली आहे की खेळात माझ्यावर हार आली असतानाही त्यांनी मला जीतच द्यावी.॥८॥

**टीका. चौ. ४-५ (१) वक्तव्य कथित मम - 'पुरजननीभरतहित होण्या वदा उपाव'** (२५७) हेच भरत सांगणार होते. **(क) प्रभुचा स्वभाव** - इतर प्रभु - स्वामी आपल्या अपराधी सेवकावरसुद्धा कोप करतात; पण माझे नाथ कधी कोणावरही कोप करीत नाहीत. ते माझ्यावर रागावले नाहीत यांत काहीच नवल विशेष नाही.

**चौ. ६-८ (१) कृपा स्नेह मजवरी विशेषहि** - माझ्यावर इतरांपेक्षा अधिक स्नेह करीत असत व त्यामुळे अधिक कृपा करीत असत. सार हे की लहानपणापासून मी त्यांचा विशेष लाडका होतो, आहे. **(क) खेळातही कधिं दिसे न रोष हि** - मुलेच काय, मोठी, वृद्ध माणसे सुद्धा एरव्ही रागावत नसली तरी खेळताना एकमेकांवर रागावतात, भांडतात. भांडणतंटा, आरडाओरडा याशिवाय तर मुलांचा खेळ पुरा झालेला सापडणे कठीण. पण प्रभूंच्या मुखावरसुद्धा कधी खेळतानाही क्रोध दिसला नाही. जे बाळपणी खेळात कधी मनाने सुद्धा माझ्यावर रागावले नाहीत ते आता मोठेपणी माझ्यावर रागावले असतील असे वाटणे हा महामूर्खपणा आहे. **(ख) आशिशुपण मी व्यक्त न संगा** - आ-शिशुपण = शिशुपणापासून - रामलक्ष्मण विश्वामित्रांबरोबर गेले तेव्हा भरत संगतीत नव्हते; पण त्यावेळी भरतानी रामसंगतीचा त्याग केला नाही. रामच दशरथांच्या

आज्ञेप्रमाणे इच्छानुसार विश्वामित्रांबरोबर गेले; म्हणून तो दोष भरतांचा नाही. विवाह झाल्यावर मामाकडे गेले या आपल्या चुकीबद्दल तेच पुढे सांगणार आहेत. **(ग) कधि करिती ना मम मन भंगा** - लहानपणीसुद्धा कधी त्यांनी माझे मन मोडले नाही; मग आता माझा मनोभंग ते कसा करतील. **(घ) खेळिं दिली मज हारिं जीत कीं** - या वेळी या खेळातसुद्धा हार माझ्यावरच आली होती व जीत प्रभूंचीच झाली होती; तरीसुद्धा शेवटी हार त्यांनी आपल्यावर घेतली व जीत मलाच दिली; म्हणूनच म्हणाले की **'भरत म्हणति ते करत चांगलें'**

*हिं.दो. । महूँ सनेह सकोच बस सनमुख कही न बैन ॥*
*॥ दरसन तृषित न आजु लगि पेम पिआसे नैन ॥२६०॥*

*हिं. । बिधि न सकेउ सहि मोर दुलारा । नीच बीचु जननी मिस पारा ॥१॥*
*। यहउ कहत मोहि आजु न सोभा । अपनी समुझि साधु सुचि को भा ॥२॥*
*। मातु मंदि मैं साधु सुचाली । उर अस आनत कोटि कुचाली ॥३॥*
*। फरइ कि कोदव बालि सुसाली । मुकता प्रसव कि संबुक काली ॥४॥*

*म.दो. । स्नेह - भीड - वश मीहि कधिं सम्मुख वदलो नाहिं ॥*
*॥ दर्शन-तृप्ति न अझुन ही प्रेम-तृषित नेत्रांहि ॥२६०॥*

*म.दो. । विधिस न बघवे प्रेमा सुंदर । पाडी नीच जननिमिषिं अंतर ॥१॥*
*। हें हि वदत मज बरें न दिसतें । कोण साधु शुचि झाला स्वमतें ॥२॥*
*। माय मंद मी साधु सुचाली । मनिं अस आणित कोटिं कुचाली ॥३॥*
*। कोद्रव कणिस सुशालि फळे कीं । कालव शुक्ति मोति मिळे कीं ॥४॥*

**अर्थ** - मी सुद्धा स्नेहाने व संकोचामुळे (भीड = संकोच) कधी तोंडावर शब्द ही (उलट) बोललो नाही व अजूनसुद्धा या प्रेमतृषार्त नेत्रांची दर्शनाने तृप्ति झालेली नाही.।।दो.२६०।। पण आमच्यातील हे प्रेम दैवाला पाहवले नाही व त्या नीचाने नीच जननीच्या निमित्ताने (प्रेमांत) अंतर पाडले.।।१।। (पण) हे बोलणेसुद्धा मला शोभत नाही; (कारण) आपल्या स्वतःच्याच मताने कोण साधु व पवित्र झाला ? (कोणी नाही)।।२।। माता नीच ( = मंद) आणि मी मात्र साधु सदाचारी (चांगल्या चालीचा) ? असे मनात आणताच ते दुराचाऱ्यांवर (कुचाळी) कोटीत (- वर्गात) आणते - घालते.।।३।। कोद्रवाचे कणीस कधी उत्तम साळी फळले आहे का ? व कालवाच्या शिंपीत कधी मोती (मुक्ताफळ) मिळाले आहे काय ? (शक्यच नाही.)।।४।।

**टीका. दो. (१) स्नेह-भीडवश मीहि..वदलो नाहिं** - स्नेहाने व संकोचामुळे लहानपणापासूनच मी कधी स्वामींच्या तोंडावर म्हणजे उलटून बोललो नाही. स्वामींचा स्नेह माझ्यावर पूर्वीसारखाच आहे व ते संकोचाला व प्रेमाला वश होऊन जरी म्हणाले, की भरत म्हणति ते करत चांगले तरी स्वामींच्या विरुद्ध, त्यांच्या मर्जीविरुद्ध मी आता उलट कसे व काय बोलू ? म्हणजेच अयोध्येत चला असे कसे म्हणू ? हा भरताच्या मनातील भाव आहे. लहानपणीसुद्धा कधी मर्जीविरुद्ध वागलो नाही; मग आता काही समजू लागल्यावर ते कसे घडेल **(क) दर्शन तृप्ति न अझुन ही** - लहानपणी रोज सतत दर्शन होत होते तरी नेत्रांना कधी तृप्ति वाटली नाही; मग आता या नेत्रांची काय दशा झाली असेल ! व पुढे काय दशा होईल !

**चौ. १ - (१) पाडी नीच जननिमिषिं अंतर** - तें आमच्यांतील प्रेम (दुलार = प्रेम, लाड) दैवाला बघवले नाही; त्यामुळे मी स्वामीसंग सोडून गेलो आहे अशी संधी साधून नीच दैवाने नीच जननीला पुढे केली व आमच्या प्रेमात अंतर पाडले; मला रामद्रोही बनवला. भाव हा की नेत्रांची तृप्ति दर्शनाने होत नसतानाही मी प्रभुसंगति सोडून गेलो व कितीक वर्षे राहिलो ही माझी मोठी चूक झाली. आणि त्या चुकीचा फायदा दैवाने घेतला. **(क)** येथे भरत स्नेहाच्या व दुःखाच्या ग्लानीच्या भरात मातेला 'नीच' म्हणून गेले. सर्व माता, राम, गुरु यांच्या देखत हा आपल्याकडून चुकीने मोठा प्रमाद घडला, असे वाटून जो पश्चात्ताप झाला त्याचा परिणाम पहा -

**चौ. २ - (१) कोण साधु शुचि झाला स्वमतें** - मातेला नीच कुचालीची ठरविली. यामुळे सहजच ठरले की ते स्वतःस साधु व चांगल्या चालीचे (सदाचारी) समजतात. **अमुक मूर्ख आहे असे जेव्हा कोणी म्हणतो तेव्हा मी शाहणा आहे अशी त्याची भावना असतेच.** म्हणून भरत म्हणतात की **स्वतःच स्वतःला साधु सदाचारी समजल्याने वा म्हटल्याने कोणी साधु किंवा सदाचारी होत नाही, ठरत नाही.** जेव्हा सज्जन, संत साधु तसे इतरांजवळ म्हणतील तेव्हाच ते खरे; तथापि तेव्हा सुद्धा मी साधु आहे वगैरे वाटणे सुद्धा हितावह नाही. **हा उपदेश** येथे भरताच्या निमित्ताने मिळत आहे. जर कोणी म्हणतील की तुम्हाला तर सर्वच साधु म्हणतात तर त्यावर वक्रोक्तीने दृष्टान्तद्वारा प्रश्न रूपाने उत्तर देतात -

**चौ. ३ - (१) माय मंद मी साधु सुचाली...कुचाली** - मातेला नीच म्हणणे

म्हणजे स्वतः नीच दुराचारी असल्याचे सिद्ध करण्यासारखे आहे. पुढे प्रभुच म्हणतात की 'दोष जननिवर जड ते ठेवित । जिहिं गुरु साधुसमा नहि सेवित' (२६३।८) **(क)** माता नीच असून पुत्र साधु कसा होऊ शकेल ? **जें विहिरींत असेल तेंच पोहऱ्यांत येणार** ! याला दोन दृष्टान्त देतात.

**चौ. ४ - (१) कोद्रव कणिस सुशालि फळे कीं ? कोद्रव** हे अगदी हलक्या प्रतीचे **अपवित्र धान्य** आहे. तांदुळांत पाकड असतात ती एक कोद्रवाचीच जात आहे. 'कोरदषस्तु कोद्रवः' (अमरे) कोरं रुधिरं दूषयति इति **कोरदूष** = कोद्रव = कोद्रू; हरीक. **रक्तदूषित करणारा असे याचे दुसरे नाव आहे.** या नावावरूनच ठरते की हे धान्य फार अपवित्र आहे. **हा दृष्टान्त शुचितेसाठी आहे.** कोद्रव - कोंद्रू - अशुचि आहेत; **सुशाली =** देवभात अत्यंत पवित्र आहे. बाली = कणीस. कोद्रवाच्या कणिसांतून देवभाताचे दाणे कसे पैदा होतील ? म्हणजेच अपवित्र-कुचली-दुराचारी मातेच्या पोटी पवित्र सदाचारी पुत्र कसा जन्मास येईल ? माता दुराचारी अपवित्र तर मी सात दुराचारी असलोच पाहिजे. **(क)** गूढ ध्वनि आहे की मला सदाचारी म्हणत असाल तर मातेला दुराचारी म्हणू नका; मातेला - दुराचारी म्हणत असतील त्यांनी मला सदाचारी म्हणणे चूक आहे. **ध्वनि सुंदर आहे.**

(२) **कालव शुक्तित मोतिं मिळे कीं ? हा दृष्टान्त साधुत्वासाठी आहे.** मोती, मुक्ताफळे मोत्यांच्या सुंदर शिंपांतूनच निघावयाची. **कालव** - हा शिंपल्यांत सापडणारा एक जलचर प्राणी आहे. १।३८।४ च्या टीकेत 'कालु' पहा. यांना कालू असेही म्हणतात. याच्या शिंपल्याला 'शंबुक, शम्बूक घोंघ' म्हणतात (अ.व्या.सु.) कालवाच्या शिंपींतून कालूच निघावयाचा, मुक्ताफळे - मोती - त्यांतून निघणे शक्य नाही. **'शुद्ध बीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं'** माता जर नीच तर मी शतपट नीच ! वाच्यार्थानें स्वतःस नीच व दुराचारी ठरवीत आहेत व गूढार्थाने मातेला साधु व सदाचारी ठरवीत आहेत. रामचंद्रांनी गूढार्थच घेतला आहे हे २६३।५-८ या चौपायांत दिसेल.

*हिं.* **।** ***सपनेहुँ दोसक लेसु न काहू । मोर अभाग उदधि अवगाहू ।।५।।***
***। बिनु समुझें निज अघ परिपाकू । जारिउँ जायँ जननि कहि काकू ।।६।।***
***। हृदयँ हेरि हारेउँ सब ओरा । एकहि भाँति भलेहिं भल मोरा ।।७।।***
***। गुर गोसाइँ साहिब सिय रामू । लागत मोहि नीक परिनामू ।।८।।***

*हिं.दो.* ***। साधु सभाँ गुर प्रभु निकट कहउँ सुथल सतिभाउ ।।***

*॥ प्रेम प्रपंचु कि झूठ फुर जानहिं मुनि रघुराउ ॥२६१॥*

म.　*। स्वप्निंहि कोणा दोष न लेशहि । मम अभाग्य-सिंधू च अगाध हि ॥५॥*

*। नेणुनि निज अघ-परिणामानां । जननिस दाह कुशब्दि दिला ना ! ॥६॥*

*। हरलो सोधुन हृदयिं सर्वपरिं । मम हितकर एकचि उरलें तरि ॥७॥*

*। सिताराम मत्स्वामी, प्रभु गुरु । गमे होइ परिणामीं हित पुरु ॥८॥*

म.दो.　*। साधुसभें प्रभु गुरु निकट तीर्थि वदें सद्भाव ॥*

*॥ प्रेमकपट सत्यानृता जाणति मुनि रघुराव ॥२६१॥*

**अर्थ** - कोणाचाच स्वप्नातसुद्धा दोषाचा लेशही नाही; माझ्या अभाग्याचा सागरच अगाध आहे.॥५॥ माझ्या स्वतःच्या पापांचा परिणाम न ओळखतां मी जननीला दुर्वचनानी (वृथा) जाळली ना ? (विनाकारण तिच्या हृदयात आग लावली) ॥६॥ सर्वपरींनी मी आपल्या हृदयांत सोधून पाहून हरलो; तरी पण माझे हित करणारे एकच (साधन, आधार) उरले आहे.॥७॥ सीताराम माझे स्वामी आहेत आणि गुरु सर्वसमर्थ (प्रभु) आहेत; म्हणूनच वाटते की शेवटी माझे पुष्कळ ( = पुरु) कल्याण होईल.॥८॥ मी साधूंच्या सभेत, गुरु व स्वामी यांच्या समीप या तीर्थात सद्भावाने सांगतो की माझ्यात प्रेम आहे की कपट आहे; सत्य आहे की खोटेपणा (अनृत) आहे हे मुनिराज व रघुराज जाणतात.॥दो.२६१॥

**टीका. चौ. ५-६** (१) गुरु व रघुनाथ पूर्ण प्रसन्न आहेत असे दिसतांच प्रथम प्रेमाचा उमाळा आला पण सर्व भार आपल्याच शिरावर आहे याचा विचार सुरू होताच पुन्हा आत्मग्लानीचा झटका आला आहे. अनेकांनी अनेक प्रकारे सांत्वन केल्यावर रामसीतादर्शनाने आत्मग्लानि बाजूस सारून वेळोवेळी आनंद व उत्साह वाटला पण ते क्षणिकच होते. 'अंतरींचें धावे स्वभावें बाहेरीं' म्हणून म्हणतात **'मम अभाग्य सिंधू च अगाध हि'** पूर्वी म्हटले आहे की - **'धिग् धिग् मी अघसिंधु अभागी । हे उत्पात सर्व ज्या लागीं ॥ कुलकलंक मज सृजी विधाता । स्वामी द्रोही करी कुमाता'** (२०१।५-६) हाच भाव येथे आहे; फक्त **'धिक् कैकयी अमंगल मूला । प्राण प्रियतमिं तूं प्रतिकूला'** (२०१।४) इतके गळले.

(२) **नेणुनि निज अघपरिणामांना - दिला ना !** - जननीचा स्वाभाविक दोष नसून, दैवाने माझ्या पापांची फळे योग्य वेळी माझ्या पदरांत टाकण्यासाठी तिला निमित्तमात्र केली. विधात्याचाही यांत दोष नाही. ज्याच्या त्याच्या कर्माचे शुभाशुभ फळ योग्य वेळी म्हणजे कर्मफळ परिपाकसमयी ज्याच्या त्याच्या पदरात

ाकणे त्याचे कर्तव्यच आहे. माझे पूर्वपापपर्वत नसते तर विधाता व जननी निमित्त होण्याचे काही कारणच नव्हते. अयोध्येत आल्यावर कैकयीला जे टाकून बोलले त्याविषयी हा पश्चात्ताप आहे. **'कोणि कुणा सुखदुःख न दाता । निजकृत कर्मभोग ते भ्राता'** (९२।४) या सिद्धान्तावर शेवटी आले.

**चौ. ७-८ (१) हरलो सोधुन...** या अभाग्य सागरांतून बाहेर पडण्याचे उपाय मी पुष्कळ शोधून शोधून हरलो. माझ्या हाती एकही उपाय राहिलेला नाही; पण माझ्या कल्याणाचा एकच मार्ग उरलेला दिसत आहे. तो म्हणजे सर्व समर्थ गुरु महाराजांची पूर्ण कृपा माझ्यावर आहे; व माझे स्वामी सीताराम पूर्ण अनुकूल आहेत. या एकाच आधारावर तरणोपाय वाटतो व शेवटी परम कल्याण होईल असा विश्वास वाटतो. **पुरु** = पुष्कळ, प्रभूतं...पुरु (अमरे)

**दो. (१)** वसिष्ठ शिवाला साक्षी ठेऊन बोलले (२५८।८) तसे भरत साधुसभा वगैरेंना साक्षी ठेऊन आपली सद्भावना सांगणार आहेत. **'अन्य उपाय न सुचे मला तर । जिविंचे विदित कुणा विण रघुवर'** (१८३।१) असे अयोध्येतील दरबारात म्हटले होते. त्या वेळी खरोखरच भरताच्या हृदयाचा ठाव मुनिवरांस लागला नव्हता; व वसिष्ठांच्या भरतावरील प्रेमाचा ठाव भरतासही लागला नव्हता. म्हणून त्या वेळी फक्त रघुवराचाच उल्लेख केला; पण आता वसिष्ठांस भरतहृदयाचा ठाव लागला आहे व त्यांच्या प्रेमाची अलौकिकता प्रगट झाली आहे म्हणून येथे **'जाणति मुनि रघुराव'** असे म्हटले.

*हिं.* *। भूपति मरन पेय पनु राखी । जननी कुमती जगतु सबु साखी ॥१॥*
*। देखि न जाहिं बिकल महतारीं । जरहिं दुसह जर पुर नर नारीं ॥२॥*
*। महीं सकल अनरथ कर मूला । सो सुनि समुझि सहिउँ सब सूला ॥३॥*
*। सुनि बन गवनु कीन्ह रघुनाथा । करि मुनि वेष लखन सिय साथा ॥४॥*
*। बिनु पानहिन्ह पयादेहि पाएँ । संकरु साखि रहेउँ एहि घाएँ ॥५॥*

*म.* *। भूपति मृत पाळुनी प्रेम-पण । जननि कुमति साक्षीस भुवनगण ॥१॥*
*। पाहवती ना व्याकुळ माता । पुरवासी ज्वरिं दुःसह जळतां ॥२॥*
*। मीच किं सकल-अनर्थ-मुळाशीं । श्रवुनि कळुनि हें सहुं शूलांसी ॥३॥*
*। ऐकुनि कीं रघुनाथ गत वना । मुनिवेषें सह सिता लक्ष्मणा ॥४॥*
*। पदत्राण-विण चालत पायीं । शंकर साक्षि जगें या घायीं ! ॥५॥*

**अर्थ** - प्रेमाचा पण व प्रतिज्ञा पालन करून भूपति मरण पावले (कारण)

जननीला कुमति उत्पन्न झाली; याला सर्व भुवने साक्षी आहेत.।।१।। व्याकुळ झालेल्या माता व दुःसह (विरह =) ज्वराने जळत असलेले पुरवासी, यांच्याकडे पाहवत नाही.।।२।। या सर्व अनर्थाच्या मुळाशी मीच आहे हे ऐकून व कळून (समजून, जाणून) मी शूळ (पीडा, कष्ट) सोसले.।।३।। रघुनाथ सीता व लक्ष्मणासहित मुनिवेष करून वनात गेले आणि काही पादत्राण न घालता पायी चालत गेले हे ऐकले व शंकर साक्षी आहेत की या घावाने (घायी) ही मी अद्याप जगलो आहे ? ।।४-५।।

**टीका. चौ. १ - (१) प्रेम-पण** याचे वर दिल्याप्रमाणे दोन अर्थ करणे जरूर आहे. **'ठेवुनि काय काय तो करणें । जेणें प्रेमपण न मम पुरणें'** (१५५।६) असे दशरथ म्हणाले आहेत. **'त्यक्त राम ज्या वचना लागीं । त्यक्त शरीर रामविरहागीं'** (१७४।४) या वसिष्ठ वचनाने, वचन = प्रतिज्ञा = पण असा अर्थ होतो. **(क)** जननीला कुमति होणे हे कारण असून त्याचा उल्लेख कार्यानंतर केला; कारण स्वतः सर्वांचे कारण आहेत हे पुढे सांगावयाचे आहे. शिवाय भूपमरण व मातांची व्याकुळता यांच्या मध्ये जननीच्या कुमतीचा उल्लेख करून दोन्हींचे सामान्य कारण ही सुचविले. नृपमरण रामवनवासाच्या साहव्या रात्री झाले असून त्याचा उल्लेख प्रथम केला, इत्यादी क्रमभंग दोषाने दाखविले की भरत आत्मग्लानीने आर्त झाले असल्याने अनर्थांची गणना जशी आठवेल तशी करीत आहेत.

**चौ. २-३ (१) पुरवासी ज्वरिं दुःसह जळतां** - येथे दुःसहज्वर म्हटले यालाच पूर्वी विषमज्वर म्हटले आहे. **'श्वास घेति जळती विषमज्वरिं । रामविण जीवन-आशा तरि ॥** (५१।५ टी.प.) या पुनरुक्तीने सुचविले की 'रामाबिण जीवन आशा तरि ?' असे पुरनरनारींस अजून वाटत आहे.

**चौ. ४-५ (१) रघुनाथ गत वना - 'लिंब लोण करुं, सुखें किं जाणें । जन परिजन पुर अनाथ करणें'** (५७।४) असे कौसल्या वनगमना विषयी म्हणाली. सर्व नगर पुरवासी व परिवार या सर्वांना अनाथ करून वनांत गेल्याचे ऐकले. **(क)** भूपतिमरण, जननीकुमति, मातांची व्याकुळता व पुरवासी लोकांचा दुःसह विरहज्वर यांनी भयंकर शूल झाले ते सोसले आणि वनवास व वनवासांतील व्रतनियम ऐकले तेव्हा तर मर्मी घावच हृदयावर बसला; तरीसुद्धा जिवंत राहिलो ! पण सर्व अनर्थाचे मूळ मीच असल्याने; कोणा जवळ ते दुःख सांगू व कोण विश्वास ठेवणार ! पण शंकर साक्षी आहेत.

हिं. *। बहुरि निहारि निषाद सनेहू । कुलिस कठिन उर भयउ न बेहू ॥६॥*
*। अब सब आँखिन्ह देखेउँ आई । जिअत जीव जड़ सबइ सहाई ॥७॥*
*। जिन्हहि निरखि मग साँपिनि बीछी । तजहिं बिषम बिषु तामस तीछी ॥८॥*
हिं.दो. *। तेइ रघुनंदनु लखनु सिय अनहित लागे जाहि ॥*
*॥ तासु तनय तजि दुःसह दुखु दैउ सहावइ काहि ॥२६२॥*
म. *। बघुनि निषादाचे सुस्नेहा । कुलिश-कठिण उर भग्न नव्हे हा ॥६॥*
*। अतां येत सब नेत्रिं दिसे धड । सर्व साहवी जीव जगुनि जड ॥७॥*
*। पथिं इंगळ्या सापिणि, ज्यां पाहुनि । देति रोष बिष विषयहि टाकुनि ॥८॥*
म.दो. *। दो रघुनन्दन ते सिता अहित जिचे चित्तास ॥*
*॥ त्यजुनि तिचा सुत बिधि कुणा दे दुःसह दुःखास ॥२६२॥*

**अर्थ** - (नंतर) निषादाचा सुंदर स्नेह पाहून सुद्धा ही वज्राहून कठीण छाती दुभंग झाली नाही.॥६॥ आता येथे आल्यावर या डोळ्यांनी सर्व चांगले (धड, नीट) पाहिले; पण हा जड जिवंतपणीच सर्व (यातना) सोसवीत आहे.॥७॥ ज्यांना पाहून रस्त्यांतील इंगळ्या व सापिण यांनी आपला रोष व दुःसह विष यांचासुद्धा त्याग केला.॥८॥ ते दोघे रघुनन्दन व सीता जिच्या चित्तास शत्रू वाटले तिच्या सुताला-सोडून दैवाने (तरी) दुःसह दुःख आणखी कोणास सोसावयास लावावे ?॥दो.२६२॥

**टीका. चौ. ६-७ (१) बघुनि निषादाचे सुस्नेहा - नव्हे हा** - रामवनवासाची हकीगत ऐकूनच हृदय दुभंग होणे योग्य होते पण तसे झाले नाही. नंतर निषादासारख्या कठोर हृदयी हिंसकाच्या ठिकाणी जो रामस्नेह दिसला तो पाहून लज्जेने तरी छाती दुभंग होणे जरूर होते पण तेव्हाही तसे झाले नाही; यावरून माझे हृदय कुलिशाहून कठोर बनविले असले पाहिजे हे ठरले. **(क) अतां येत सब नेत्रिं दिसे धड** - ऐकणे व प्रत्यक्ष पाहणे यांत फारच अंतर असते. जी गोष्ट ऐकून जितके दुःख होते त्यापेक्षा ती पाहिल्याने कितीतरी जास्त दुःख होते. येथे येऊन सीता लक्ष्मण व रघुनाथ यांस मुनिवेषांत, झोपडींत, जंगलांत, अनवाणी पायी हिंडताना प्रत्यक्ष पाहिल्यावर तरी प्राण जावयास पाहिजे होते; पण गेले नाहीत. खरोखर माझे हृदय इतके कठीण नव्हते. पण जिवंत असताच यमयातना भोगविण्यासाठी **जीव जड** बनला व तो प्राणांना जाऊ देत नाही आणि **सर्व साहवी** - सर्व यातना सोसावयास लावीत आहे असे वाटते; कारण -

**चौ. ८ (१) मी कैकयीसुत आहे** म्हणून ही यमलोकांतील शिक्षा इथेच दैव देत आहे. **(क) इंगळी व सापीण** असे पूर्वी कैकयीला म्हटले आहे. यांचा स्वभाव फार रोषी असतो प्रेमाने हात लावलात तरी दंश करतात; पाण्यात बुडून, आता मरणार अशा इंगळीला किंवा नागिणीला त्यांचा जीव वाचविण्यासाठी पाण्यातून बाहेर काढण्यास हात लावलात तरी दंश केल्याशिवाय सोडीत नाहीत; काशीस गंगेत अशाच प्रयत्नांत एका साधूला १५।१६ वेळा विंचू चावला ! अशा इंगळ्यांनी व नागिणींनीसुद्धा रामलक्ष्मणसीता दर्शन होताच दुष्ट, कृतघ्न स्वभाव व भयंकर विष यांचा त्याग केला.

**दोहा. (१) दो रघुनन्दन** - रघुकुळांतील प्रत्येक व्यक्तीस आनंद देणारे राम व लक्ष्मण. दो. १२९ - **'रहा युग रघुनन्दन...'** असे वाल्मीकींनी दोघांविषयी म्हटले आहे. असे असून कैकयीला ते **अहित** = शत्रू वाटले. राम राजे झाले की लक्ष्मण दिवाण होईल अशी भीती कैकयीला वाटलीच. म्हणजेच कित्येक वर्षे रोज दर्शन होत असूनसुद्धा कैकयीरूपी इंगळीचा व नागिणीचा स्वभाव बदलला नाही; इतकेच नव्हे तर माणसाळल्याचे सोंग घेऊन ऐन वेळी दंश केला. या विश्वासघातरूपी गुन्ह्याची शिक्षा तिलाच देणे जरूर होते; पण येथे दिल्या जाणाऱ्या यातनांनी तिला दुःख होणार नाही अशी दैवाची खात्री झाली. ज्या पुत्राच्या साठी तिने हे केले त्यालाच असह्य दुःख दिले की मग हिला दुःख व पश्चात्ताप होईल असे दैवाला वाटले म्हणून दैवाने भरताचे हे हृदय वज्रापेक्षा कठोर बनविले व हे सर्व दुःख सोसावयास लावीत आहे. हे असले दुःख इतर कोणास भोगावयास लाऊन कैकयीची हृदयशुद्धि कशी झाली असती ? कैकयीसुत नसतो तर येथे येण्यापूर्वीच हे हृदय दुभंग होऊन प्राण गेले असते ! या प्रमाणे भरत आत्मग्लानीच्या परम सीमेवर येऊन पोचले. **सुमंत्र व कौसल्या यांच्या आत्मग्लानीला येथे लाजविली आहे.** हे सर्व ऐकत असता बिचाऱ्या कैकयीची काय दुर्दशा झाली असेल याची कल्पना करावी !

*हिं. । सुनि अति बिकल भरत बरबानी । आरति प्रीति बिनय नय सानी ॥१॥*
*। सोक मगन सब सभाँ खभारु । मनहुँ कमल बन परेउ तुसारु ॥२॥*
*। कहि अनेक बिधि कथा पुरानी । भरत प्रबोधु कीन्ह मुनि ग्यानी ॥३॥*
*। बोले उचित बचन रघुनंदू । दिनकर कुल कौरव बन चंदू ॥४॥*
*म. । भरत-सुवाणि विकल अति ऐकत । आर्ती प्रीति विनय नय संयुत ॥१॥*

*। शोकमग्न तळमळे सभा ती । जणूं कमलवन कीं हिमपातीं ॥२॥*
*। बहुविध कथा पुरातन सांगुनि । भरता प्रबोधिती ज्ञानी मुनि ॥३॥*
*। वदले उचित वचन रघुनंद हि । दिनकर कुलकैरव-वन-चंद हि ॥४॥*

**अर्थ** - आर्ती, प्रीति, विनय व नीति (नय) यांनी युक्त असलेली अति व्याकुळ पण श्रेष्ठ अशी भरताची वाणी ऐकतांच - ॥१॥ ती सर्व सभा शोकमग्न होऊन अशी तळमळू लागली की जणू कमलाच्या वनात हिमपातच झाला.॥२॥ (तेव्हा) अनेक प्रकारच्या पुरातन कथा सांगून ज्ञानी मुनि वसिष्ठांनी भरताला प्रबोध केला (समजाऊन सांगितले).॥३॥ (मग) सूर्य कुळरूपी चंद्रविकासी कमलांच्या वनास चंद्राप्रमाणे (प्रसन्न करणारे) रघुनंदन रामचंद्र योग्य असे बोलले.॥४॥

**टीका. चौ. १ (१) भरत-सुबाणि बिकल अति** - भरताचे भाषण व्याकुळतेने परिपूर्ण असले तरी ती सु = सुन्दर, श्रेष्ठ वाणी आहे; कारण ती **'आर्ती प्रीति विनय नय संयुत आहे.'** चार रसांचे मिश्रण आहे. यांत आर्ति मुख्य आहे, खालोखाल प्रीति आहे, व आर्तीचे कारण प्रीति आहे. विनय = नम्रता व नय = नीति यांनी युक्त आहे. आर्तिप्रधान प्रीति असल्याने अति व्याकुळता आहे. (**क**) मधात कोणते रस आहेत हे चवीने चतुर मनुष्य कदाचित सांगू शकेल; पण त्याला जर सांगितले की तिच्यांतील मधुर, स्नेह (तुपट, तेलकट) क्षार व कडु हे रस निरनिराळे काढून दाखव; तर हे ज्याला साधेल त्याला या भरतभाषणांतील चार रसांचे पृथक्करण करून ते निरनिराळे दाखविता येतील; **पण अशी पृथक्करणशक्ति या मङ्ग मतीत नाही.** मध चाटून चाखत चाखत खाण्यात जी गोडी व तोष आहे तसे हे चार रस निरनिराळे चाखण्यात नाही. पुढे म्हटलेच आहे की **'निज मुख मुकुरिं मुकुर निज पाणीं (हातांत) घेववे न अशि अद्‌भुत वाणी'** (२९४।३) भरताच्या भाषणातील भाव जाणून सभासदांची कशी दशा झाली पहा :

**चौ. २ (१) शोकमग्न तळमळे सभा - हिमपातीं** - सगळी सभा शोकसागरात बुडाली. सर्वांची तोंडे सुकून माना खाली लवल्या आहेत; व अशी तळमळ चिंतेने, भयाने होऊ लागली की या ग्लानीने व व्याकुळतेने भरताचे प्राण येथे आताच जातात की काय ? हिम पडले म्हणजे सूर्यविकासी कमळे सुकून, म्लान, निस्तेज, खाली मुख केलेली अशी होतात.

**चौ. ३ - (१) भरता प्रबोधिती ज्ञानी मुनि** - भरताची व सभेची ही दशा

पाहून ज्ञानसूर्य वसिष्ठ मुनींची वचनेरूपी किरण बाहेर पडू लागले. त्यांनी भरताच्या व्याकुळतारूपी हिमाचा नाश झाला. शोक मोहजनित असतो व मोहाचा नाश ज्ञानाने होतो; म्हणून येथे जसा ज्ञानी 'शब्दाने' ज्ञानाचा उल्लेख केला तसाच जेथे शोकहरण करण्याचा उल्लेख आहे तेथे ज्ञानाचा (विवेकाचा) उल्लेख मानसांत सापडेल. ही कामगिरी वसिष्ठांना मानसात अनेक वेळा करावी लागली आहे; व विशेषतः या अयोध्याकांडांतच. उदा - १५६।८; १६९।८; १७१।८, २७६ व पुढील चौपाया पहा. मात्र हा शुचि शोक आहे (२५२ टी.प.) कुठे विवेक, कुठे ज्ञान-ज्ञानी कुठे परमार्थवचन असे शब्द सापडतील. **(क)** पूर्वी २५४।२ पासून बारा विशेषणांचा उपयोग करून जो कार्यभाग साधावयाचा होता तो अंशतः साधला असला तरी राम सुखदुःखातीत आहेत, त्यांना वनवासाचे दुःख मुळीच वाटत नाही व होत नाही म्हणून त्याबद्दल दुःख वाटण्याचे कारण नाही हे ठसविण्याचा हेतु मात्र अगदी निष्फळ झाला; म्हणून तेथे गूढार्थाने, ध्वनिने जे सांगितले तेच येथे पूर्वेतिहासांचा आधार घेऊन उघड करून सांगितले. याचा परिणाम यावेळी तरी इतका झाला की प्राण निघून जाण्याने होणारा महा अनर्थ टळला; व रामभाषण ऐकण्यास योग्य अशी संथ वृत्ति भरत व सभा यांच्यांत उत्पन्न झाली.

**चौ. ४ (१) दिनकरकुल-कैरववन-चंद रघुनंद वदले** - चंद्र उगवला म्हणजे ज्या प्रमाणे चंद्रविकासी कमलांच्या वनाला तो प्रफुल्लित, प्रसन्न करतो त्याप्रमाणेच आता रघुनंदनरूपी चंद्र सूर्यकुळाला प्रफुल्लित करणारे भाषण करतात. चंद म्हणजे रकाररहित चंद्र र = अग्नि, तापद असतो, तसे तापद आता काही शिल्लक राहणार नाही. भरत पूर्णपणे प्रसन्न होतील असे बोलणार :

हिं. *। तात जायँ जियँ करहु गलानी । ईस अधीन जीव गति जानी ॥५॥*
*। तीनिकाल तिभुअन मत मोरें । पुन्यसिलोक तात तर तोरें ॥६॥*
*। उर आनत तुम्ह पर कुटिलाई । जाइ लोकु परलोकु नसाई ॥७॥*
*। दोसु देहिं जननिहि जड़ तेई । तिन्ह गुर साधुसभा नहिं सेइ ॥८॥*

हिं.दो. *। मिटिहहिं पाप प्रपंच सब अखिल अमंगल भार ॥*
*॥ लोक सुजसु परलोक लुखु सुमिरत नाम तुम्हार ॥२६३॥*

म. *। ग्लानी तात वृथा करतां अति । जाणुनि ईशाधीन जीवगति ॥५॥*
*। मम मत कीं त्रिभुवनीं त्रिकाळीं । पुण्यश्लोक तात तव-खालीं ॥६॥*

*। मनिं आणिति कुटिलता तुम्हांवर । करिति लोक ते घाता इह पर ॥७॥*
*। दोष जननिवर जड़ ते ठेवित । जिहिं गुरु साधुसभा नहिं सेवित ॥८॥*
म.दो. *। मिटे पाप संसार सब, अखिल अमंगल नाश ॥*
*॥ लोकिं सुयश परलोकिं सुख स्मरतां तव नामास ॥२६३॥*

**अर्थ** - तात ! जीवांची गति (सुख-दुःखादीमय परिस्थिति, दशा) ईश्वराच्या आधीन आहे हे जाणून सुद्धा ग्लानि करता ती व्यर्थ आहे.॥५॥ माझे मत असे आहे की त्रिभुवनात व तिन्ही काळांत (सर्व) पुण्यश्लोक (पुण्यात्मा म्हणून प्रसिद्ध असलेल्या व्यक्ति) तुमच्या खालीच आहेत; (तर = खाली)॥६॥ जे कोणी तुमच्यावर कुटिलता मनात आणतील (मनाने लादतील) ते लोक आपल्या इहलोकाचा व परलोकाचा विनाश (घात) करतील.॥७॥ ज्यांनी गुरु व साधुसभा यांचे सेवन (व सेवा) केले नाही तेच लोक (तुमच्या) मातेवर दोष ठेवीत असणार; ते जड आहेत.॥८॥ जे कोणी तुमच्या नामाचे स्मरण करतील त्यांचे सर्व पाप, सर्व संसार समाप्त होईल; व सर्व अमंगलाचा नाश होऊन इहलोकी कीर्ति व परलोकी सुख मिळेल.॥दो.२६३॥

**टीका. चौ. ५ (१) जाणुनि ईशाधीन जीवगति** - मातांची व पुरवासी लोकांची दशा पाहवत नाही असे जे भरत म्हणाले त्यावर हे उत्तर आहे. भाव हा की माता, प्रिय पुरजन, परिजन इ. कोणी असोत, ज्या वेळी अकल्पित, अकस्मात दुःखसंकटे कोसळतात त्या वेळी ती ईश्वरप्रेरित दैवकृत घटना आहे असे समजावे. त्यांत बदल करणे कोणाच्याही हाती नसते. जी गोष्ट जीवांच्या हाती नसून ईश्वराच्याच अधीन आहे त्याबद्दल शोकविषाद मानणे निरर्थक आहे. **(क)** रघुनाथ भगवान ईश्वर आहेत हे भरत जाणतात हे राम जाणतात. म्हणजेच येथे सुचविले की हे सर्व माझ्याच इच्छेने घडले आहे; व ते बदलता येणार नाही, म्हणून ग्लानि करणे व्यर्थ आहे.

**चौ. ६ - (१) पुण्यश्लोक तात तव खाली** - भरत स्वतःस पापी, अभाग्यसिंधु इ. जे म्हणाले त्यावर हे उत्तर आहे. तुमच्यासारखा परमभाग्याचा सागर, पुण्याचा निधी व सर्व जगाचा हितकर्ता झाला नाही; आज नाही व पुढे होणार नाही. तिन्ही लोकांत नाही. पूर्वी जे नलराजासारखे पुण्यश्लोक पुरुष होऊन गेले; आज असतील व पुढे युधिष्ठिरासारखे होतील ते सर्व तुमच्यापेक्षा पुष्कळच कमी प्रतीचे पुण्यश्लोक होत. हिंदीतील 'तर' = तळ, खाली, तळाला **'प्रभु**

**तरुतर कपि डार पर'** (१।२९ रा. पहा.)

**चौ. ७ (१) 'मीच किं सफल अनर्थ मुळाशीं'** इ. (२६२।३) जे भरत म्हणाले त्यावर हे उत्तर आहे की असे जे कोणी तुमच्या विषयी बोलत असतील त्यांना काय शिक्षा होईल कोणास ठाऊक ? पण **'मनिं आणिति कुटिलता तुम्हांवर** - जे मनानेसुद्धा तुमच्यावर कुटिलतेचा आरोप करतील त्यांचा इहलोक म्हणजे इहलोकी जन्म व्यर्थ जाणार व परलोकाची प्राप्ती त्यांना होणार नाही; ते अधोगतीला जातील. **(क)** काही विवेकी पुरवासी, कौसल्या व वसिष्ठ यांनी अशाच प्रकारे शाप दिलेले आहेत. २।४८।६-८; १६९।४; व १८४।६-७ क्रमशः पाहणे. या तिघांनी मानसिक दोषारोप करणारांना काय फळ भोगावे लागेल ते सांगितलेले नाही ते येथे सांगितले. त्या तिघांपैकी कोणी शापानुग्रह केलेला नाही तो राम दोह्यांत करतील.

**चौ. ८ - (१) दोष जननिवर जड ते ठेवित - सेवित - 'पथिं इंगळ्या सापिणि - ज्यांपाहुनि...अहित जिचे चित्तास** (२६२) वगैरे भरताच्या भाषणात हा ध्वनि स्पष्ट आहे की कैकयीसुत म्हणून मी दोषी ठरलो आहे; त्याप्रमाणेच **'माय मंद मी साधु सुचाली'** इ. (२६१।३-४) पाहणे. त्यावर हे रामवचन आहे. शिवाय हे सुभाषितही आहे. **(क) गुरु साधुसभा नहिं सेवित -** गुरुसेवा, गुरुसंगति व गुरुमुखाने सच्छास्त्र श्रवण; तसेच साधुसंतसेवा, समागम व श्रवण, ज्यांनी केले नाही ते जड मूढ पशूंसारखे राहतात; व जे गुरु-साधुसभा सेवितात ते शीलसंपन्न होतात. **शीलसंपन्न व्यक्ति दुसऱ्यांस दोष देत नाहीत. २३१।७** मध्ये सांगितले आहे की साधुसभा सेवकांस राजमदसुद्धा होत नाही. **'बुध सेवेविण शील किं मिळतें'** (७।१।६) बुध = ज्ञानीभक्त.

**दो. - (१)** भरतावर कुटिलतेचा आरोप कांही लोकानी केलाच आहे. निषाद राज व रामसेवामूर्ति लक्ष्मण यांनीही केला. शिवाय अनेकांनी मनांत केला असेल. कैकयीला दोष न देणारी फक्त रामजननीच ! या सर्वांची दया सर्वज्ञ सर्वान्तर्यामी रामास आली व या दोह्यांत शापानुग्रह केला आहे. भरताच्या नामस्मरणाने नामोच्चाराने सर्व पाप, सर्व ताप, सर्व दुःखदारिद्र्यादैन्य व जन्ममरण परंपरा यांतून सुटण्याचे सुलभ स्वतंत्र साधन सांगितले आहे. **(क) या निमित्ताने कवींनी रामनाम आणि भरतनाम यांची समानता सिद्ध केली. (ख)** मागील चौपायांत कवींनी श्री राममुखाने कैकयीची पूर्ण निर्दोषता स्पष्ट करून सांगितली. रामचंद्रांनी केलेली ही तिच्या पुत्राची प्रशंसा व तिच्याविषयी भरसभेत उघड करून सांगितलेले मत ऐकून

कैकयीच्या हृदयांत काय विचार आले असतील त्यांची कल्पना करता येण्यासारखी आहे. त्या विचारांत भरतासारखा पुत्र झाल्याबद्दल धन्यता, पण त्याची जननी होण्याची स्वतःची अपात्रता. रामाच्या सौजन्याविषयी व भरताच्या रामप्रेमाविषयी आश्चर्य व स्वतःच्या मूर्खपणाबद्दल पश्चाताप या गोष्टी प्रामुख्याने असणार!

*हिं.* *। कहउँ सुभाउ सत्य सिव साखी । भरत भूमि रह राउरि राखी ॥१॥*
*। तात कुतरक करहु जनि जाएँ । बैर पेम नहिं दुरइ दुराएँ ॥२॥*
*। मुनि गन निकट बिहग मृग जाहीं । बाधक बधिक बिलोकि पराहिं ॥३॥*
*। हित अनहित पसु पच्छिउ जाना । मानुष तनु गुन ग्यान निधाना ॥४॥*

*म.* *। सहज सत्य वदुं साक्षी शंकर । भरत राहि महि तुम्हिं राखां तर ॥१॥*
*। व्यर्थ कुतर्क नका करुं ताता । प्रेम वैर ना लपति लपवतां ॥२॥*
*। मुनिगण निकट विहगमृग जमती । बाधक वधिक विलोकुनि पळती ॥३॥*
*। कळे हिताहित पशुपक्ष्यां तंव । ज्ञानगुणागर तर तनु मानव ॥४॥*

**अर्थ** - शंकरास साक्षी ठेऊन सहज (स्वभावतःच) सत्य आहे ते सांगतो. भरत! ही मही - भूमी (पृथ्वी) तुम्हीं राखलीत तरच राहील नाहीतर नष्ट होईल ॥१॥ तात ! निष्कारण (व्यर्थ) कुतर्क करू नका. प्रेम व वैर लपवून लपत नाहीत ॥२॥ पशुपक्षी मुनिगणांच्या जवळ जमतात (जातात); पण बाधा देणारा (बाधक, घातक) व्याध (वधिक) पाहिला म्हणजे पळून जातात ॥३॥ मित्र शत्रू (हित + अहित) पशुपक्ष्यांना सुद्धा कळतात; मग मनुष्य देह तर ज्ञान व गुण यांचे आगरच आहे. ॥४॥

**टीका - चौ. (१) सहज सत्य** - जी खरी वस्तुस्थिति आहे ती. **साक्षी शंकर** - भरत व वसिष्ठ यांनीसुद्धा शंकर - शिव साक्षीला ठेवले आहेत. राम शिवोपासक आहेत हे पार्थिव पूजनादि गोष्टींवरून पूर्वीच सिद्ध झाले आहे. वसिष्ठ व भरतही शिवोपासक आहेत. **(ख) भरत राहि महि तुम्हि राखां तर** - भाव हा की गुरुजींच्या सूचनेप्रमाणे मी तुम्हाला वचन देऊन चुकलो आहे (२५९।८) मी वनांत आलो तो धर्माचे पालन करून पृथ्वीचे रक्षण करण्यासाठी आलो. पिता भूपाल-पृथ्वीपति होते. म्हणून त्यांनी प्रतिज्ञा सत्य करण्यासाठी मला वनवास देऊन देहत्याग केला पण अधर्मापासून पृथ्वीचे रक्षण केले. **'धर्मो रक्षति रक्षिताः'** धर्मरक्षणानेंच पृथ्वीचे रक्षण होते. तेव्हा मी वचनबद्ध झाल्यामुळे धर्मरक्षण करून पृथ्वीचे रक्षण करण्याची जबाबदारी तुमच्यावर पडली आहे. धर्मरक्षण होईल

असे केलेत तर पृथ्वीचे रक्षण होईल. धर्मरक्षण होणार नाही असे केलेत तर पृथ्वी राहणार नाही. गूढभाव हा आहे की तुम्ही सर्वांच्या सह घरी जाऊन राज्याचा सांभाळ केलात तरच भूमीचे रक्षण होईल.

**चौ. २-४ - (१) प्रेम वैर ना लपति लपवती** - हा चरण पूर्वी (१९३।१) **'प्रीति वैर ना लपति लपवतांहि** असा आला आहे. या पुनरुक्तीने सुचविले की तेथील **'स्नेह सुशीले ये आकळातां'** हा चरण येथे अध्याहृत घ्यावयाचा आहे. तेथे उदाहरणे दिली नव्हती ती येथे देतात. **(क)** मुनींच्या हृदयांतील वैराचा अभाव व प्रेमाचे प्रीतीचे अस्तित्व पशुपक्ष्यांना कळते ते मुनींच्या सुशीलावरूनच. व्याधाच्या हृदयांतील हिंसक वृत्ति व प्रेमाचा अभाव पशुपक्ष्यांना कळतात. म्हणून ते त्यांना दुरून पाहिल्याबरोबर पळतात. याचे कारण व्याधांचे दुःशील हेंच साधन असते. **(ख) ज्ञान गुणागर तर तनु मांनव** - मित्र कोण व शत्रू कोण हे पशुपक्ष्यांनासुद्धा जर कळते तर मग मनुष्याला अगदी सहज कळेल यात नवल काय? मनुष्य त्यांच्या मानाने ज्ञानाचे व गुणांचे निधानच आहे. मीसुद्धा मनुष्यच आहे. तुम्ही माझे व प्रजेचे वैरी आहांत की माझ्यावर व प्रजेवर अत्यंत प्रेम करता हे काय आम्हांला कळणार नाही? ज्या तर्कांना जरा स्वप्नांतसुद्धा जागा नाही असे तर्क करून विनाकारणच तुम्ही खेद करीत आहांत; तसे करू नका.

*हिं.* *। तात तुम्हहि मैं जानउँ नीकें । करौं काह असमंजस जीकें ॥५॥*
*। राखेउ रायँ सत्य मोहि त्यागी । तनु परिहरेउ पेम पन लागी ॥६॥*
*। तासु बचन मेटत मन सोचू । तेहि तें अधिक तुम्हार सँकोचू ॥७॥*
*। ता पर गुर मोहि आयसु दीन्हा । अवसि जो कहहु चहउँ सोइ कीन्हा ॥८॥*

*हिं. दो.* *। मनु प्रसन्न करि सकुच तजि कहहु करौं सोइ आजु ॥*
*॥ सत्यसंध रघुबर बचन सुनि आ सुखी समाजु ॥२६४॥*

*म.* *। तात तुम्हां मी नीट जाणतो । काय करूं पडले संकट तों ॥५॥*
*। नृपें त्यजुनि मज सत्य पाळिलें । प्रेम-पणास्तव तनुला त्यजिलें ॥६॥*
*। कष्ट मना तद्वचन भंगतां । त्याहुनि तव संकोच - अधिकता ॥७॥*
*। त्यांत दिली गुरुनीं आज्ञाही । करूं अवश्य जें म्हणाल काहीं ॥८॥*

*म.दो.* *। भीड सोडुनी मुदित मन सांगा करूं तें आज ॥*
*॥ सत्यसंध रघुवर - वचन परिसुनि सुखी समाज ॥२६४॥*

**अर्थ** - तात ! मी तुम्हांला चांगले जाणतो; पण काय करू! मी तर (धर्म)

संकटांत अडचणीत पडलो आहे ॥५॥ राजांनी माझा त्याग करून सत्य (वचन) पाळले व प्रेमाचा पण पूर्ण करण्यासाठी शरिराचा त्याग केला. ॥६॥ त्यांचे (तें) वचन मोडण्यास मनाला फार कष्ट होतात व त्याहीपेक्षा तुमचा संकोच अधिक वाटत आहे. ॥७॥ त्यांत गुरुजींनीही आज्ञा दिली आहे; तरी तुम्हीं जें काहीं म्हणाल तें अवश्य करीन ॥८॥ तरि आनंदित - प्रसन्न - मनाने भीड संकोच सोडून सांगा; (म्हणजे) तें मी आज करतो. सत्यप्रतिज्ञ रघुवराचें वचन ऐकून सर्व समाज सुखी झाला. ॥दो. २६४ ॥

**टीका चौ. ५ - (१) तुम्हा मी नीट जाणतो** - तुमचे शुद्ध प्रेम व माझ्या वनवासामुळे तुम्हांला होत असलेले दु:सह दु:ख मी पूर्णपणे जाणतो; पण काय करू ! मी मोठ्या अडचणीत पेचांत पडलो आहे. इकडे आड तिकडे विहीर; खाल्ले तर बाधेल, टाकले तर श्रापेल अशा परिस्थितीत पडलो आहे. तुमच्या व सर्वांच्या दु:खांचा परिहार करण्यासाठी परत येणे जरूर आहे हे मला कळते पण मी तरि काय करू ! आता पाच चरणांनी धर्म संकटाचे स्वरूप सांगतात.

**चौ. ६ - ७ - (१) नृपें त्यजुनि मज सत्य पाळिलें - त्यजिलें** - ज्या सत्य पालनासाठी राजांनी प्राणांपेक्षा प्रिय पुत्राचा त्याग केला; पुत्र वियोग झाला म्हणजे प्राण जाणार हे पक्कें जाणत असून जें वचन पाळले; त्या त्यांच्या वचनाचा भंग त्यांच्याच त्या आवडत्या पुत्राने राजपुत्राने केला की रसा रसातळी जाईल व पित्याच्या वचनाची व देहत्यागाची काही किंमत नाही असे ठरेल ! सुमंत्राने आग्रह केला तेव्हाच गेलो असतो तर निदान राजांना मरण तरी आले नसते ! ही वचनभंगाची, सत्यहानीची अडचण एका बाजूने! पितृवचन व सत्य पाळण्यासाठी तुमच्या इच्छेला धुडकावून तुमच्या प्रेमाचा अनादर करण्यास तर त्याहूनही अधिक संकोच वाटत आहे; भाव हा की एक वेळ पित्याच्या आज्ञेचा भंग करवेल पण तुमच्या प्रेमाचा व इच्छेचा अनादर करवणार नाही. पित्यापेक्षा भावाचे महत्व अधिक का याविषयी टीकाकार व साहित्यसमालोचक तर्कवितर्क कुतर्क करतील हे जाणून याचे कारण स्पष्टपणे सांगतात-

**चौ. - ८ - (१) त्यांत दिली गुरुंनी आज्ञा ही** - पित्याच्या वचनापेक्षा गुरूच्या आज्ञेची किंमत अधिक. भरताची रुचि राखण्यांत कल्याण आहे असे सांगून शिवाला साक्षी ठेऊन गुरुंनी ही आज्ञा दिली आहे; म्हणून तुम्हीं जे काही सांगाल ते अवश्य करण्याचे ठरविले आहे. **(क)** शब्दांनी प्रतिज्ञाभंग केल्यासारखे दिसत आहे ते

सुद्धा गुरुच्या आज्ञेमुळे हे कवींनी येथे स्पष्टपणे दार्शविले आहे. रघुनाथाने प्रतिज्ञाभंग केला नसून गुरुजींनी भरताची वकिली करून आपल्या गुरुत्वाचे दडपण घालून हे करविले आहे. **(ख)** रामाची प्रतिज्ञा मोडली नाहीच; पण त्याचे श्रेय भरताला देणे जरूर आहे व प्रतिज्ञा भंगाची जबाबदारी रामावर राहिली नसून ती वसिष्ठांसारख्या परमसमर्थांवर, ज्यांची छाटी सूर्याचे काम करू शकते, ज्यांच्या ब्रह्मदंडांत विश्वामित्रांसारख्या परमतपस्वी क्षत्रिय राजाची सर्व शस्त्रात्रे लुप्त होतात अशा, विधिलिखिताला हरताळ फासू शकणाऱ्या गुरूंच्या शिरावर गेली आहे. **वसिष्टांचे अनुकरण करून इतर गुरूंनी मात्र आपल्या सत्यसंध शिष्यांस धर्माधिष्ठित प्रतिज्ञेचा भंग करण्यास लावू नये.** राम, वसिष्ठ व भरत अशी त्रयी असेल तेथे गोष्ट निराळी. **(ग)** राम व वसिष्ठ यांची बालंबाल खात्री होती की भरत प्रतिज्ञाभंग करण्यास सांगणार नाहीत. परंतु वसिष्ठांनी किंवा रामचंद्रांनी नाही म्हणून भरताचे समाधान झाले नसते. म्हणून मानसशास्त्राच्या रहस्यानुसार भरताला वचन देऊन, सर्व परिस्थिति त्यांच्यापुढे स्पष्ट मांडून त्यांनाच उपाय विचारणे **हेच प्रीति, धर्म, व राजनीति या तिन्हींचा मधुर समन्वय करण्याचे एकमात्र साधन होते.** त्याचाच प्रीति, धर्म व नीति सुविशारद सर्व समर्थ सिद्धसंकल्प वसिष्ठ रघुनाथ या गुरुशिष्य जोडीने अवलंब केला.

(२) **शंका** - पण त्यांचा अंदाज चुकला असता तर अवतार कार्याची पूर्ति वसिष्ठांनी कशी केली असती? **समाधान** - याचे पहिले उत्तर हे की अशा परमविशुद्ध, निःस्वार्थ, परमधर्मनिष्ठ, परोपकारी, सर्वसमर्थ, सिद्धसंकल्प गुरुशिष्यांचे अंदाज चुकणे शक्यच नसते. तथापि **वळचणीचे पाणी आढ्याला गेले असते तर** वसिष्ठांनी काय केले असते ते पाहूः- रावणाला रामापराध व बिभीषणभक्तापराध करण्यास राममायेने जसे प्रवृत्त केले तसेच वसिष्ठांनी आपल्या संकल्पशक्तीने व आत्मतेजाने खरदूषणादिकास अयोध्येवर स्वारी करण्याची स्फूर्ति दिली असती व मग रघुवीरानेच त्यांचा विनाश केला असता. कृष्णावतारांत जसा जरासंधाला दर वेळी सुटा सोडून पुनःपुन्हा त्याने आक्रमण करावे अशी बुद्धी दिली तशी या राक्षसांस वसिष्ठांनी दिली असती व मुख्य अवतार कार्य साधून धर्म संस्थापना झाली असती.

**दो. (१) करू अवश्य जे म्हणाल काही** - असे मागल्या चौपाईत म्हटले; पण हे वाक्य पाहिजे तितके निश्चयबोधक नाही. 'पण' हा शब्द जोडून 'मी

काय करणार!' किंवा 'पण सध्यां नाही' असे म्हणण्यास वाव होता; ती फटसुद्धा राहू नये म्हणून निश्चितपणे सांगतात की **तुम्ही म्हणाल ते आज करतो,** उशीर लावणार नाही.' **(क) भीड सोडूनी =** निःसंकोचपणे सांगा असे म्हणण्याचे कारण हे की भरताचा स्वभाव फार भिडस्त आहे; साधा प्रश्न विचारण्यास सुद्धा संकोच वाटतो हे 'कृपासिंधु बंधु प्रिय' चांगले जाणतात. **(ख) परिसुनि सुखी समाज** - या एका वाक्याने कवींनी सुचविले की भरताच्या स्वभावाचे मर्म व रघुवीराच्या भाषणांतील मर्म सभेतील कोणाही धर्मशील व्यक्तीस कळले नाही. वामदेव, कात्यायन, मार्कंडेय, जाबाली इ. ऋषींनासुद्धा असेच वाटले की काम झाले. अयोध्येत परत चला असे भरत म्हणणार व **रघुवर सत्यसंघ** असल्याने परत चलणार आपल्या बरोबर ! पण याने भरताला मात्र आनंद किंवा समाधान होणे शक्य नाही. पुन्हा सर्व जबाबदारी पूर्णपणे माझ्याच शिरावर आली ! प्रभूला काय सांगावे? या एकाच विचाराने त्यांच्या चित्तात खळबळ उडवून दिली असेल. सर्व सभा सुखात मग्न आहे; भरत काय सांगतात याची वाट बघत गुरुशिष्य स्वस्थ आहेत; भरत विचारांत मग्न आहेत, तोपर्यंत मध्यंतरीच्या वाग्विश्रांतीच्या काळात कुठे काय घडले ते कवि सांगतात -

*हिं.* ***। सुर गन सहित सभय सुर राजू । सोचहि चाहत होन अकाजू ॥१॥***
***। बनत उपाउ करत कछु नाहीं । राम सरन सब गे मन माहीं ॥२॥***
***। बहुरि बिचारि परस्पर कहहीं । रघुपति भगत भगति बस अहहीं ॥३॥***
***। सुधि करि अंबरीष दुरवासा । भे सुर सुरपति निपट निरासा ॥४॥***
***। सहे सुरन्ह बहु काल बिषादा । नरहरि किए प्रगट प्रहलादा ॥५॥***

*म.* ***। सुरगण - सहित सभय सुरराजहि । शोचति होउं बघे किं अकाज हि ॥१॥***
***। परी न करवे उपाय काहीं । मनें शरण गत सब रामाहि ॥२॥***
***। चिंतुनि पुन्हां परस्पर म्हणती । भक्त - भक्तिवश रघुपति असती ॥३॥***
***। स्मरतां अंबरिषा दुर्वासा । सुर - सुरपतिची परम निराशा ॥४॥***
***। सहती सुर बहुकाळ दुःख जंव । प्रल्हादें प्रगटित नरहरि तंव ॥५॥***

**अर्थ** - देवगणांसहित देवराज इंद्र भयभीत झाले व चिंता करू लागले की आता अकाज अकार्य (कार्यनाश) होऊ पहात आहे. ॥१॥ पण उपाय तर काही करता येण्यासारखा नाही ! (तेव्हा) सर्व देव मनाने रामाला शरण गेले. ॥२॥ पुन्हा विचार करून म्हणतात की (रामाला शरण जाऊन काय उपयोग) रघुपति

तर भक्ताच्या भक्तीला वश (भक्ताधीन) झाले आहेत ॥३॥ अंबरीष व दुर्वास ऋषि यांचे स्मरण होतांच देव व देवराज इंद्र यांची फारच निराशा झाली ॥४॥ (तेव्हा कोणी म्हणाले की) देवांनी (भगवंताला शरण जाऊनसुद्धा) पुष्कळ काळपर्यंत पुष्कळ दुःख - संकटे जेव्हा सोसली तेव्हा शेवटी प्रल्हादानेच भगवान नृसिंहांस प्रगट केले. (आता भक्तालाच शरण गेले पाहिजे.) ॥५॥

**टीका. चौ. १-२ - (१) समय सुरराजहि -** रघुवर अयोध्येत परत येणार या कल्पनेने सर्व अयोध्यावासी समाज सुखानंद - समाधानांत मग्न आहे तर देव व देवराज इंद्रसुद्धा भय, चिंता असंतोष यांनी व्याकुळ झाले. आता सुख-आनंद, समाधान व दुःख, विषाद असंतोष या दोन पक्षांना (वर्गांना) कोठे एके ठिकाणी थारा नाही. अयोध्यावासी व अमरावतिनिवासी यांच्यात या दोन चेंडुंची फेकाफेक सुरू झाली आहे. पहिला (सुखद, मृदु) चांगला चेंडू प्रथम अयोध्यावासी लोकांना सापडला. तोच कठीण दुःखद चेंडू देवदेवराज यांच्या छातीवर आदळला. ते तो अयोध्यावासी लोकांच्या छातीत मारण्याचा प्रयत्न करतीलच असा हा खेळ चालेल. **(क)** राष्ट्रांत, लोकशाहींत, स्वराज्यांत, सर्व जगांत असेच घडत नाही काय? देवांच्यासारखे भोगात लोळणारे धनाढ्य, व्यापारी कारखानदार सत्ताधीश इ. जगांत कुठेही युद्ध सुरू झाले की परम प्रसन्न ! व मध्यम वर्ग परम खिन्न ! स्वस्ताई होऊ लागली की मध्यम वर्ग प्रसन्न ! व माणसांतील देववर्ग खिन्न ! दुष्काळ पडला, आयात बंद केली गेली, पदार्थांवर नियंत्रणे बसली तरी तसेच; **नरदेववर्ग सुखी व माणसे दुःखी !** याचेच सुंदर व आकर्षक चित्र मानसांत जागोजागी रेखाटले आहे. **(ख) मनें शरणगत रामहि -** मनानेच शरण गेले ! चित्रकूटास जाऊन उघड विनंती केली असती तर काय झाले असते? वसिष्ठांनी भरतासाठी रामाला भीड घातली, त्या भरताच्या विरुद्ध विनंति आणि वसिष्ठांच्या देखत ! नुसते रोषदृष्टीने पाहिले असते तरि घोर अनर्थ ओढवला असता हे स्वार्थीसुर जाणतात.

**चौ. ३-४ - (१) भक्तभक्तिवश रघुपति असती -** राम भक्ताधीन होऊन वचनबद्ध झाले असल्याने त्यांना शरण जाऊन काय उपयोग? असे कोणी देव म्हणाले. दुर्वास प्रत्यक्ष भगवंताला शरण गेले त्याचा काय उपयोग झाला? दुर्वासांनी केले तसेच करणे चांगले.

**चौ. ५ - (१) सहती सुर बहुकाळ दुःख -** हिरण्यकश्यपूच्या त्रासाने अगदी

भरत होऊन आपण भगवंताला काय थोड्यावेळा शरण गेलो? पण एकच ठराविक उत्तर ! तो जेव्हा भक्तापराध करील तेव्हा भक्त संरक्षणासाठी प्रगट होऊन तुमचे कार्य करीन. तोपर्यंत सोसा विपत्ती आणि बसा मेरु पर्वतांत लपून ! भगवान भक्तांसाठी, भक्तांच्या प्रार्थनेनेच प्रगट होतात. **'संत समान तुम्हां प्रिय माते । प्रार्थुनि इतरिं न धरुं देहाते'** (५।४८।८) असे प्रभु बिभीषणास म्हणाले आहेत. येथे काही देवांनी सुचविले आहे की भरतासच शरण गेले पाहिजे. **'सेवक सेवें राम सुखावति । सेवकवैर वैर करिति अति'** हे आपल्या गुरुजींचे वचन (२१९।२) आपण इतका वेळ विसरलोच !

*हिं.* *। लगि लगि कान कहहिं धुनि माथा । अब सुरकाज भरत के हाथा ॥६॥*
*। आन उपाउ न देखिअ देवा । मानत रामु सुसेवक सेवा ॥७॥*
*। हियँ सपेम सुमिरहु सब भरतहि । निज गुन सील राम बस करतहि ॥८॥*

*हिं. दो.* *। सुनि सुर मत सुरगुर कहेउ भल तुम्हार बड भागु ॥*
*॥ सकल सुमंगल मूल जग भरत चरन अनुरागु ॥२६५॥*

*म.* *। वदति पिटुनि शिर लागति कानां । सुरगति अतां भरतकरिं जाणां ॥६॥*
*। आन उपाय न दिसतो देवां । मानिति राम सुसेवक - सेवा ॥७॥*
*। प्रेमें स्मरा हृदयिं भरता तरि । जो गुणशीलें वश रामा करि ॥८॥*

*म. दो.* *। परिसुनि सुरमत सुरगुरु वदति तुम्हीं बहुभाग ॥*
*॥ सकल सुमंगल - मूल जगिं भरतचरणिं अनुराग ॥२६५॥*

**अर्थ** - कपाळ पिटून (एकमेकांच्या) कानाशी लागून सांगतात की आता देवांची गति भरताच्याच हाती आहे. ॥६॥ देवांना (आता) अन्य (आन) उपायच नाही (कारण) राम आपल्या सुसेवकाच्या सेवेचा मान राखतात. ॥७॥ तेव्हां आतां प्रेमाने भरताचे हृदयांत स्मरण करा; (कारण) त्यांनी आपल्या गुणांनी व शीलाने रामचंद्रांस वश केले आहेत ॥८॥ देवांचे हे मत ऐकून देवगुरु बृहस्पति म्हणाले देव हो ! तुम्ही महा भाग्यवान आहांत; (कारण) जगांत सकल सुमंगलाचे मूळ म्हणजे भरतचरणीं अनुराग करणेच आहे. ॥दो. २६५॥

**टीका - चौ. ६ - (१) पिटुनि शिर** - कपाळ पिटणे हे निराश, असहाय झाल्याचे चिन्ह आहे. येथे हा करुणा व भयजनित संचारी भाव आहे. **लागति कानां** - कानांत सांगण्याचे कारण इतकेच की देव आपल्या गुरुंच्या उपदेशाच्या विरुद्ध वागले. भरताच्या विरुद्ध वागण्याचा विचार केला व त्यांनी मागे

सांगितलेलेच आता करण्यास सांगावयाचे आहे; त्यामुळे लाज वाटत आहे. 'प्रीति भरतपदिं करा सुशोभन' व **'भक्तशिरोमणि भरत तों त्यां न भिणे सुरपाल'** (२१९) असे बृहस्पतींनी इंद्रास केलेल्या मागील उपदेशांत सांगितले होते. आता भरताला घाबरले व त्यांच्यावर प्रेम केले नाही. आता एकमेकांस सांगत आहेत की भरताशिवाय आता दुसरा तारक नाही.

**चौ. ७ - (१) मानिति राम सुसेवक - सेवा** - 'सेवक सेवे राम सुखावति' (२१९।२) हे सुरगुरुवचन देवांना आता नाइलाज म्हणून आठवले. देव असून मनुष्याची सेवा, मनुष्यावर प्रेम करणे जिवावर आले आहे पण काय करतात! **स्वार्थाचा मुद्दा असतो तेवढा स्वार्थी बड्यांच्या केव्हा केव्हा ध्यानांत राहतो.**

**दो. (१) खरे मोटे कोण** हे देवगुरुंच्या वागण्यावरून व पुढे प्रभुंच्या संकोचावरून दिसते. देवांनी जरि अगदी कानांत हितगुज केले, तरि देवगुरुंना सर्व काही कळले. पण देवांना इतर कशाचीही ओळख न देता, ते जे सत्कर्म करीत आहेत त्याबद्दल त्यांची प्रशंसा केली व रागावले नाहीत मुळीसुद्धा; याचे नाव मोठे ! **याचे नाव गुरु ! (क)** येथे **'सकल सुमंगल मूल जगिं भरत चरणिं अनुराग'** असे देवगुरु बृहस्पतींनी सांगितले. पूर्वी भरद्वाजांनी सांगितले आहे की सकल सुमंगल मूल जगिं प्रेमच रघुवरपायिं' (२०७) अनुराग = प्रेम, प्रीति, स्नेह, भक्ति. याने दाखविले की रामचरणी प्रेम = भरतचरणी प्रेम; म्हणजेच **रामभक्ती = भरतभक्ती. रामनाम = भरतनाम दो.** २६३ मधे दाखविले आहे.

*हिं. । सीतापति सेवक सेवकाई कामधेनु सय सरिस सुहाई ॥१॥*
*। भरतभगति तुम्हरें मन आई । तजहु सोचु बिधि बात बनाई ॥२॥*
*। देखु देवपति भरत प्रभाऊ । सहज सुभायँ बिबस रघुराऊ ॥३॥*
*। मन थिर करहु देव डरु नाहीं । भरतहि जानि राम परिछाहीं ॥४॥*
*। सुनि सुरगुर सुर संमत सोचू । अंतरजामी प्रभुहि सँकोचू ॥५॥*

*म. । सीतापति - सेवक - पदसेवन । कामधेनुशत समान शोभन ॥१॥*
*। भरत - भक्ति तुमचे मनिं आली । साधि कार्य विधि, चिंता कसली ॥२॥*
*। पहा भरत - महिमा सुरराजा । स्वभावतांच विवश रघुराजा ॥३॥*
*। देव न भीति मना स्थिर करणें । भरत राम - पडछाया गणणे ॥४॥*
*। सुरचिंता सुरगुरु मत ऐकति । अंतर्यामी प्रभु संकोचति ॥५॥*

**अर्थ** - सीतापति सेवकाच्या चरणांची सेवा शंभर कामधेनूंसारखी सुंदर

आहे. ।।१।। भरत भक्ति तुमच्या मनांस आली. (त्या अर्थी); विधीने तुमचे कार्य साधले. (समजा); आता कसली चिंता (करता) ।।२।। सुरराजा ! भरताचा महिमा (प्रभाव) पहा की त्यांना रघुराजा स्वभावताच विशेष वश (विवश) आहेत. ।।३।। तरीपण देवांनो ! भीति मुळीच नाही; मन अगदी स्थिर करा; (कारण) भरत रामाची पडछाया आहेत असे समजा (गणणे) ।।४।। देवांची चिंता व सुरगुरुचे मत अंतर्यामी प्रभूंनी ऐकले व त्यांना संकोच उत्पन्न झाला.।।५।।

**टीका - चौ. १-२ - (१) सीतापति - सेवक पदसेवन ... शोभन** - भरत चरणिं अनुराग सकल सुमंगल दायक कसा होतो हे येथे सुचविले **'सीतापति'** २४३ च्या टीकेत पहा. स्वर्गातील कामधेनू अर्थ व कामच पुरवू शकतात पण सीतापतिसेवक सेवारूपी कामधेनू अर्थ, धर्म, काम, मोक्ष व रामभक्ति - रामकृपा या सर्व गोष्टी देऊ शकते; म्हणून **कामधेनु शतसमान** म्हटले. **'सेवक - सेवे राम सुखावति'** (२१९।२) आणि रामकृपेने सर्व काही मिळते. देवांना तर अर्थ व काम या दोनच गोष्टी पाहिजे आहेत. स्वर्गातील कामधेनु या देते पण त्यांचे रक्षण त्या करू शकत नाहीत; ते या कामधेनुमुळे सहज होईल. **(क) भरतभक्ति मनिं आली** - आणली असे म्हटले नाही. आली म्हणण्यांत भाव हा आहे की अशी इच्छा उत्पन्न होणे परमभाग्याशिवाय घडत नाही. भगवंताची भक्ति करावयाची सोडून भगवंताच्या भक्ताची भक्ति करणारे खरोखरच अतिशय विरळा ! खरे गुरुभक्त यांतलेच !

**चौ. ३ - (१) पहा भरतमहिमा सुरराजा ! पूर्वी 'गणिति अलोचन सहस्त्रनयना'** (२१८।१) त्यावेळी सहस्राक्ष स्वार्थांध झाले होते म्हणून 'पहा' असे म्हटले नाही. आंधळ्याला 'अमुक पहा' असे सांगणारा मूर्खच! आतां भरताचा महिमा दिसू लागला आहे; पण घाबरले आहेत सहस्त्राक्ष ! सुरराज ! म्हणून सांगतात की नीट पहा ! **रामभक्तांचा महिमा ज्यांस कळत नाही ते नेत्र असून आंधळे समजावे हे येथे दाखविले (क) स्वभावताच विवश रघुराजा** - असे बाह्यतः दिसते हे खरे आणि असे वरवर दिसण्याने तुम्ही घाबरलांत सुरराजा ! पण जे दिसते ते तसे तत्वतः असतेच असे नाही. भरताच्या स्वभावाचे मर्म न जाणणारास असे वाटणे साहजिक आहे; पण 'भरतस्वभाव निगमां सुगम न' (३०४।१) म्हणून मर्म ऐका -

**चौ. ४ - (१) भरत रामपडछाया गणणे** - पडछाया देहाच्या अधीन असते; तिला स्वतंत्र अस्तित्वच नाही; स्वतःच्या इच्छेने काही करू शकत नाही. देवांना

मात्र वाटले की रामच भरताच्या पडछायेसारखे आहेत. देवांनाच काय त्या स्तब्ध, सुखमग्न झालेल्या सर्व सभासदांनासुद्धा असेच वाटले. पण देवगुरु सांगतात की भरताचा स्वभाव स्व-तंत्र वागण्याचा नसून रामतंत्राने वागणे हा भरताचा सहज स्वभाव आहे; म्हणून जे वरवर दिसते ते सत्य मानून घाबरण्याचे काहीच कारण नाही. निर्भय रहा व स्थिर मनाने भरताचे स्मरण करा म्हणजे झाले. **(क) देव ! न भीति मना स्थिर करणे** - याने सुचविले की देवगुरुंचे 'स्वभावतांच विवश रघुराजा' हे मागल्या चौपाईतील शब्द ऐकले व देवांच्या उरांत धडकीच भरली ! भरतांस रघुराज विशेष वश आहेत असे गुरु महाराजांनासुद्धा वाटते. ही देवांच्या चित्ताची अस्थिरता, धांदल, पाहिली म्हणून या चौपाईत अगदी स्पष्ट सांगितले. असे न मानल्यास या दोन चौपाया परस्पर विरोधी ठरतात. कारण, देह पडछायेला विवश कधीच असत नाही. राम भरताला विवश आहेत असे (चौ. ३) आधी सांगितले व भरत रामाच्या पूर्ण अधीन आहेत असे येथे सांगितले ! या विरोधाभासाचे निरसन वर टीकेत दाखविले तसेच होऊ शकते.

**चौ. ५ - (१) सुरचिंता** - २६५।१ पासून २६५।८ पर्यंत; व **सुरगुरुमत** - २६५-२६६।४ पर्यंत. हे सर्व प्रभु, सर्वांच्या हृदयांत राहून सर्व जाणणारे = अंतर्यामी असल्याने ऐश्वर्य भावाने त्यांस ऐकू आले; पण माधुर्य भावाने संकोच वाटला की सुरगुरु वचन खरे करणे आता भरतांच्या इच्छेवर अवलंबून आहे, व ते असत्य ठरणेहि इष्ट नाही. देवदशावर्णन येथे संपले.

हिं. *। निज सिर भारु भरत जियँ जाना । करत कोटि बिधि उर अनुमाना ॥६॥*
*। करि बिचारु मन दीन्ही ठीका । राम रजायस आपन नीका ॥७॥*
*। निज पन तजि राखेउ पन मोरा । छोहु सनेहु कीन्ह नहिं थोरा ॥८॥*
हिं. दो.*। कीन्ह अनुग्रह अमित अति सब बिधि सीतानाथ ॥*
*॥ करि प्रनामु बोले भरतु जोरि जलज जुग हाथ ॥२६६॥*
म. *। निज शिरिं भार भरत मनिं जाणति । हदिं अनुमानें बहु करुं लागति ॥६॥*
*। निश्चय केला मनीं विचारें । रामाज्ञेतचि मम हित सारे ॥७॥*
*। निजपण मोडुनि मम पण राखति । स्नेह कृपा मजवरी अहा ! अति ॥८॥*
म. दो.*। करिति अनुग्रह अमित अति बहुविध सीतानाथ ॥*
*॥ प्रणमुनि मग वदले भरत जुळुनि जलज युग हात ॥२६६॥*

**अर्थ** - आपल्या शिरावर सर्व भार आहे हे भरतानी जाणले व नानाविध

अनुमाने तर्क, हृदयांत करूं लागले. ॥६॥ शेवटी विचारपूर्वक निश्चय केला की रामाज्ञा पालन करण्यातच माझे सारे हित आहे. ॥७॥ स्वतःचा पण मोडून माझा पण राखला ! माझ्यावर अहा! अति स्नेह आहे व अति कृपा (छोह) केली. ॥८॥ सीतानाथांनी (माझ्यावर) नाना प्रकारे अति अमित अनुग्रह (प्रसादकृपा) केला ! (असे मनांत ठरवून) मग प्रणाम करून कमलासारखे दोन्ही हात जोडून भरत म्हणाले ॥दो. २६६॥

**टीका - चौ. ६-७ (१) निज शिरिं भार - 'भरत राहि महि तुम्हिं राखां तर'** हा भूमिरक्षणाचा **भार पाहिला. 'काय करू पडले संकट ...'** या प्रभुच्या संकटनिवारणाचा **भार दुसरा. 'कष्ट मना तद्वचन भंगतां'** प्रभूंच्या कष्टांचे निवारण करण्याचा **भार तिसरा. 'याहुनि तव संकोच अधिकता'** हा संकोच दूर करण्याचा **भार चौथा 'त्यात दिली गुरुंनी आज्ञा ही'** गुरुच्या आज्ञेची अवज्ञा होऊं न देण्याचा **भार पाचवा. 'सत्यसंघ रघुवर'** या प्रजेच्या विश्वासाचा भंग होऊ न देण्याचा **भार सहावा.** व प्रजेला ज्या आशेने घेऊन आलो तिची निराशा होऊ न देण्याचा **भार सातवा.** अशा या सप्तविध भारांचा भारा माझ्याच डोक्यावर येऊन बसण्यास कारण मीच झालो. **(क) बहु अनुमाने करु लागति** - आतां काय करावे म्हणून सांगू प्रभूला? राजांची आज्ञा मोडायला सांगू नी धर्मनाश करूं? की सेवक म्हणवून स्वामींना प्रतिज्ञाभ्रष्ट करू? स्वामींना सेवकामुळे संकट नी संकोच? हा काय सेवक धर्म! अशाप्रकारे सर्वबाजूंनी तर्क करता करता शेवटी निश्चय केला की सेवकधर्माला शोभेल तेच केले पाहिजे. **'आज्ञापालनं सेवकानां धर्मः' 'करी स्वामिहित सेवक तोहि'** असे मीच म्हणालो ना? स्वामींना संकोचांत पाडणे, प्रतिज्ञाभ्रष्ट करणे म्हणजे काय स्वामींचे हित करणे आहे? बोलण्यासारखी कृति न केली तर रघुवंशात जन्मून, दशरथतनय व रामलघुबंधु होऊन काय उपयोग ! प्रेमाच्या भरांत मी काय केले हें ! ते काही नाही, वाटेल ते होवो, प्राण गेले तरि चालेल; पण रामाची आज्ञा पालन करण्यांतच माझे सेवकाचे हित आहे. रामस्वामी आणि भरत सेवक हाच संबंध टिकला व टिकविला पाहिजे.

**चौ. ८ - (१) 'निज पण मोडुनि मम पण राखति** - कैकयी, पिता, माता कौसल्या, प्रजा, गुरु, सचिव, निषादराज, भरद्वाज, वाल्मीकी इ. सर्वांना स्वामी सांगत आले की १४ वर्षे वनवासांत काढीन. असे असून माझे दुःख न पाहवल्याने व माझ्यावरील अनुपम अपार स्नेहामुळे मी म्हणेन ते करण्यास प्रभु तयार

झाले, वचनबद्ध झाले. व या वचनानेच त्यांनी आपला पण मोडला ! माझ्यासाठी केवढा हा त्याग ! केवढी ही कृपा ! इतका स्नेह व इतकी कृपा माझ्यावर असल्यावर मला काय कमी व कसली चिंता ? (क) **सीतानाथ** - साधेसुधे स्वामी नाहीत ! 'उद्‌भवस्थिति संहारकारिणी क्लेशहारिणी सर्वश्रेयस्करी' अशा सीतेचे नाथ आहेत ! मग माझे कोणते क्लेश शिल्लक राहतील ? कोणते श्रेय होणार नाही ? याप्रमाणे हृदयसागराचे मंथन विचार मंदराने करून, 'आज्ञापालनं सर्वश्रेयस्करं' हे अमृत काढून आता बोलू लागतील. **ल.टे.** आकाशात देव चिंता करीत होते त्याच वेळी भरत या सभेत हृदयमंथन करीत होते.

*हिं.* ***। कहौं कहावौं का अब स्वामी । कृपा अंबुनिधि अंतरजामी ॥१॥***
***। गुर प्रसन्न साहिब अनुकूला । मिटि मलिन मन कलपित सूला ॥२॥***
***। अपडर डरेउँ न सोच समूलें । रबिहि न दोसु देव दिसि भूलें ॥३॥***
***। मोर अभागु मातु कुटिलाई । बिधिगति बिषम काल कठिनाई ॥४॥***
***। पाउ रोपि सब मिलि मोहि घाला । प्रनतपाल पन आपन पाला ॥५॥***

*म.* ***। अतां काय वदुं वदवूं स्वामी । कृपा - अंबुनिधि अंतर्यामी ॥१॥***
***। गुरु प्रसन्न नाथ अनुकूल हि । नुरति मलिन मन-कल्पित शूल हि ॥***
***। स्वभयें भीत, नसुनि चिंता मुळिं । दिनकर दोष न देव ! दिशाभुलिं ॥३॥***
***। मम अभाग्य नी जननिकुटिलता । विधिगति विषम हि काल कठिणता ॥४॥***
***। सकल करुनि पण घाला घालति । प्रणतपाल पण प्रभु निज पाळिति ॥५।***

**अर्थ** - कृपासिंधु (अंबुनिधि = सागर) ! अंतर्यामी ! स्वामी ! मी अतां सांगू काय नी सांगवू काय ?॥१॥ गुरुजी माझ्यावर प्रसन्न आहेत व नाथ (स्वामी-साहिब) मला (पूर्ण) अनुकूल आहेत (हे पाहून) माझ्याच मनात निर्माण केलेले काल्पनिक सर्व शूळ नष्ट झाले (एकही उरला नाही)॥२॥ मी स्वतःच मानलेल्या भयाने घाबरलो होतो; (खरे पाहता)चिंता मुळीच नव्हती. कोणाची दिशाभूल होते तेव्हा तो सूर्याचा दोष नसतो.॥३॥ माझे अभाग्य, जननीचा कुटिलपणा दैवाची विषमगति, (प्रतिकूलता) आणि काळाचा कठोरपणा या सर्वांनी मिळून प्रतिज्ञेने (पण करून) माझ्यावर घाला घातला (माझा नाश केला) पण प्रभूंनी आपला प्रणतपाल हा पण (ब्रीद) पाळला (म्हणून वाचलो).॥५॥

**टीका. चौ. १ - (१) अतां काय वदुं... अंतर्यामी** - आपण स्वामी आहात व मी सेवक आहे. अमुक करा असे मी आपल्याला सांगणे किंवा कोणाकडून

मागविणे उचित नाही. आपण कृपारूपी जलाचे (अंबु = जल) सागर असल्याने मी सांगेन ते करण्यास तयार झालात; पण सेवकाने स्वामींना काय सांगावे व कसे सांगावे ? आपण अंतर्यामी असल्याने हृदयांतील सर्व जाणताच, सांगण्याची काय आवश्यकता आहे ?

**चौ. २-३ (१) गुरु प्रसन्न... शूल हि'** शूल कोणते याचा उल्लेख (२६२।१ - दो.२६२) पूर्वी केला आहे. **'श्रवुनि कळुनि हे सहुं शूलांसी'** असे त्यांत म्हटले आहे. **(क) मनकल्पित -** काही खरा आधार नसता मनाने केवळ कल्पनेने निर्माण केलेले. **'रामसिता लक्ष्मण मम नांवा । श्रवुनि न जाती त्यजुनि किं ठावा ॥ मातृमतिं मज मानुनी थोडे जे करतील'** (२३३) **त्यागिति जरि मन मलिन समजुनी'** इत्यादि निराधार कुकल्पनांच्या पायावर रचलेली सर्व इमारत हे सर्व शूल होते पण ते सर्व कृपा सागरात बुडून गेले, नष्ट झाले. **(ख) स्वभयें भीत** - स्वामी अप्रसन्न झाले असतील, माझा त्याग करतील असे या मनाने निष्कारणच मानले व भयाचे भूत उभे केले व झाले शोक चिंता-व्याकुळ ! पण यात माझाच दोष होता. स्वामीकृपारूपीं दिनकर नेहमीप्रमाणे पूर्वेसच उगवला होता; पण माझ्या बुद्धीत भ्रम उत्पन्न झाला व मला वाटू लागले होते की कृपा दिनकर पश्चिमेस उगवला व माझ्याकडे पाठ वळविली. **'ज्या जैं दिग्भ्रम होई खगेश्वर । म्हणे पश्चिमे उदित दिनेश्वर ॥'** (७।७३।४)

चौपाई ४ - 'मम अभाग्य... काल कठिणता... या चार गोष्टींचा उल्लेख पूर्वी भरतानेच केलेला आहे. **'मम अभाग्यसिंधूच अगाधहि'** (२६१।५) **'जननिकुमति साक्षीस भुवनगण'** (२६२।१) **'विधिस न बघवे प्रेमा सुंदर । पाडी नीच जननि मिषिं अंतर' 'जननिमिषिं करि काळ कुचाळी'** (२५३।१) अभाग्यामुळे भ्रम झाला. विधिलिखित असेल तेच घडते हेच खरे. प्रणतपाल हे आपले ब्रीद प्रभूंनी राखले म्हणून बचलो.

*हिं.* *। यह नइ रीति न राउरि होई । लोकहुँ बेद बिदित नहिं गोई ॥६॥*
*। जगु अनभल भल एकु गोसाई । कहिअ होइ भल कासु भलाई ॥७॥*
*। देउ देवतरु सरिस सुभाऊ । सनमुख बिमुख न काहुहि काऊ ॥८॥*
*हिं.दो.* *। जाइ निकट पहिचानि तरु छाहँ समनि सब सोच ।*
*। मागत अभिमत पाव जग राउ रंकु भल पोच ॥२६७॥*
*म.* *। ही नव रीति न अपली काहीं । वेदिं विदित जनिं गुप्त हि नाहीं ॥६॥*

*। जगत अहित, हित स्वामिच साचे । भले भलेपणिं होइ कुणाचे ? ॥७॥*
*। देव तरुसा स्वभाव देवा ! । संमुख विमुख न कधिं कोणा वा ॥८॥*
म.दो. *। निकट जाति जाणून तरु छाया शुख शमवीच ।*
*। मागत अभिमत लभत जगीं रावरंक शुचि नीच ॥२६७॥*

**अर्थ** - ही काही आपली नवी रीत नाही; वेदांत व लोकांत प्रसिद्ध असून गुप्त नाही.॥६॥ सर्व जग अहित (शत्रू, वाईट) असो; स्वामीच काय ते खरे हित (मित्र) हितकर्ते आहेत म्हणून भले-चांगले (कल्याण) व्हावयाचे ते कोणाच्या भलेपणामुळे होणार ? ॥७॥ (स्वामींच्याच भलेपणाने) आपला स्वभाव देवतरू (कल्पवृक्षा) सारखा आहे. कधी कोणाला संमुख (अनुकूल) नाहीं किंवा विमुख (प्रतिकूल) नाही.॥८॥ तरु ओळखून जे कोणी जवळ जातील - जातात त्यांचा शोक, चिंता, छाया शमवितेच; व मागतांच जे पाहिजे असेल ते सर्वांना जगातील राजा, रंक, चांगला (शुचि = पवित्र) वाईट (नीच) कोणी कसा ही असो पावतो (त्याला मिळते).॥२६७॥

**टीका. - चौ. ६-७ (१) ही नव रीति न** - प्रणताचे पालन करणे हा आपला सहज स्वभाव आहे. ही काही माझ्या निमित्ताने चालू केलेली नवीन रीत - प्रथा नाही. **(क) जगत अहित हित स्वामिच साचे** - जगत - सर्व दृश्य वा अदृश्य, अष्टधा प्रकृति निर्मित विश्व. जे स्वतः विनाशशील व गुणदोषमय आहे ते कोणाचे हित न करता मोह उत्पन्न करून दुःखदायकच होते. 'अनित्यम् असुखम् लोकम् इमम् प्राप्य भजस्व माम्' (भ. गी.) हे दुःखद अनित्य आहे. फक्त एक भगवान, परमात्मा सुखमय आहेत.

'सुहृदं (मित्र) सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति' (भ.गी.) सुहृद = मित्र, हित. भरत हेच म्हणतात की एकटे स्वामीच हित = मित्र आहेत. **(ख) भलें भलेपणिं होइ कुणाचे ?** - कोणाचेही जे भले = कल्याण, हित होणार ते कोणाच्या भलेपणामुळे - चांगुलपणामुळे होणार ? ज्यांच्यात चांगुलपणा असेल त्याच्यानेच होणार. असे फक्त एकटे स्वामी रामच आहेत. 'राम ! भलेंपण आपले असे भलें सकलांस' (१।२९ म) भाव हा की अभाग्य, जननीकुटिलता, वामविधि व कठिणकाळ यांनी कितीही वाईट करण्याचा प्रयत्न केला तरी आपली कृपा जर संपादन करता आली - आपल्याला शरण आला तर त्याचे कल्याणच होणार; इतर कोणी त्याचे अकल्याण करू शकत नाहीत. **(ग)** शरण जाणे ही जीवाच्या

स्वाधीन असलेली गोष्ट आहे. म्हणजेच स्वतःचे कल्याण करून घेणे जीवाच्या हातातील गोष्ट आहे. कोणीही ते करू शकेल. आता दृष्टान्त देतात.

**चौ. ८ - (१) देवतरुसा स्वभाव देवा** - देवतरु = कल्पवृक्ष. त्याला कोणी शत्रू वाटत नाही; कोणी मित्र वाटत नाही; तो सर्वांना सारखा, तसे आपण आहात. कल्पवृक्षाजवळ जाऊन जशी कल्पना करावी तसे फळ मिळते. माझा डोळा फुटावा असा संकल्प केला तर डोळा फुटेल. मला डोळ्यांनी चांगले दिसावे असा संकल्प केला तर तसे होईल. यांत चांगले वाईट होणे हा त्याचा गुणदोष नाही. येथे भाव हा आहे की मी कुकल्पना केल्या त्याचे फळ मला दुःख झाले; त्यांत प्रभूचा दोष नाही. शरण आल्याबरोबर दुःखसंताप रहित केला हा आपला सहज स्वभाव.

**दो. - (१) निकट जाति जाणून तरु** - कल्पवृक्ष ओळखता मात्र आला पाहिजे. त्याप्रमाणे प्रभूच्या स्वभावाचे ज्ञान पाहिजे. ओळखून त्याच्या सावलीत जाऊन बसताच सर्व चिंता, संताप, (शुच, सोच हिं.) सहज नष्ट करतो. त्या प्रमाणे प्रभु स्वभाव ओळखून जो प्रभूचा आश्रय करील त्याचे सर्व दुःख, संताप, शोक, प्रताप, काही साधन न करता, काही न मागताच नष्ट होतात. (क) मग जे मागावे ते जसे कल्पवृक्ष देतो त्याप्रमाणे प्रभु देतात. राजा, रंक, उच्च नीच इत्यादी ते काही पहात नाहीत. युद्ध करून प्रभूच्या बाणाने मरावे अशी इच्छा असल्यास ती पुरी करतात. ज्ञान, भक्तिवैराग्य, दास्य, सख्य इत्यादी जे पाहिजे ते देतात व कल्याण करतात. २।२१९।५-७ टी.पहा. तसेच ३।३२, छं. ४ पहा. देवतरुच्या दृष्टांतातील भावच तेथे आहेत.

*हिं.* *। लखि सब बिधि गुर स्वामि सनेहू । मिटेउ छोभु नहिं मन संदेहू ॥१॥*
*। अब करुनाकर कीजिअ सोई । जन हित प्रभु चित छोभु न होई ॥२॥*
*। जो सेवक साहिबहि सँकोची । निज हित चहइ तासु मति पोची ॥३॥*
*। सेवक हित साहिब सेवकाई । करै सकल सुख लोभ बिहाई ॥४॥*

*म.* *। बघुनि नाथ-गुरु-अति सुस्नेहा । गत तळमळ थळ नहिं संदेहा ॥१॥*
*। तें चि करा करुणाकर आता । क्षोभ न हो प्रभुचित्तिं जनहिता ॥२॥*
*। जो स्वामिस संकोचिं पाडतो । स्वहित इच्छि, मति नीच दास तो ॥३॥*
*। सेवक हित तों स्वामी-सेवा । करणें, त्यजुनि सकल सुख-हेवा ॥४॥*

**अर्थ** - नाथ व गुरु यांच्या अति उत्तम स्नेहास पाहून माझी सर्व तळमळ गेली व संदेहाला स्थळ (थळ, स्थान) राहिले नाही.॥१॥ करुणासागर ! आता

तेच करावे की ज्याच्या योगाने दासाच्या हितासाठी (जन-हिता) प्रभूच्या मनात क्षोभ (चिंता) होणार नाही.॥२॥ स्वामीला संकोचात पाडून आपले हित इच्छितो तो सेवक नीच बुद्धि होय.॥३॥ सकल सुख व लोभ सोडून स्वामींची सेवा करणे हेच सेवकाचे हित होय.॥४॥

**टीका. चौ. १-२ (१) बघुनि नाथ-गुरु अति-सुस्नेहा - 'निज पण मोडुनि मम पण राखति'** यांत नाथस्नेहाची पराकाष्ठा दिसून आली; व **'राखुनि भरत रुचीला जें कराल शुभ, शिव साक्षीला'** या वचनाने व प्रत्यक्ष अनुभवाने गुरु स्नेहाची पराकाष्ठा दिसली. यामुळे सर्व प्रकारची ग्लानि - तळमळ व तिचे कारण नाना प्रकारचे संशय समूळ गेले. **(क) तेंचि करा करुणाकर आतां** - आपण **करुणाकर** - करुणासागर, असल्यामुळे **जनहित =** माझे दासाचे हित व अयोध्यावासीजनांचे हित आमच्या इच्छेप्रमाणे व्हावे म्हणून आपण धर्मसंकटांत पडूनसुद्धा मी म्हणेन ते करण्याचे कबूल केलेत. पण आमच्या इच्छेसाठी आपण संकटांत पडावे व आपल्या मनाला कष्ट व्हावेत हे मला बरे वाटत नाही. म्हणून कोणत्याही प्रकारच्या पेचांत, अडचणीत पडावे न लागता, मनाला कोणतेही कष्ट न पडता जे करणे योग्य वाटेल ते करावे. **'काय करुं ! पडलें संकट तों'** आणि **'कष्ट मना तद्वचन भंगतां** (२६४।५,७) या प्रभुवचनांना उद्देशून हे म्हटले.

**चौ. ३-४ (१) जो स्वामिस संकोचिं पाडतो - नीच दास तो - ही चौपाई सेवाधर्माचा ध्रुवतारा आहे.** मनापासून करावयाचे असून सुद्धा जे करण्यात स्वामीस संकोच वाटेल, उलट-सुलट देशकालपरिस्थितीमुळे कठीण वाटेल; करणे जिवावर आल्यासारखे वाटेल; ते करण्याची गळ सेवकाने घालणे, ते करावयास लावणे हे सेवकाच्या नीच बुद्धीचे निदर्शक आहे. माझ्यासाठी स्वामींनी अमुक केले तरच माझे हित होईल असे वाटणेच नीचता आहे. ही बाजारी सेवा होय, याने सेवकाचे हित होत नाही. सेवकाचे हित कशात आहे ? **(क) सेवकहित तों स्वामी सेवा** - स्वामीची सेवा करणे हेच सेवकाचे हित. **सेवा हेंच साधन व सेवा हेंच साध्य ।** सेवेचा काही मोबदला मिळावा असे मुळीच वाटता नये. याला पथ्य सांगतात. इतर कोणत्याही सुखाची, मोक्षसुखाची सुद्धा अपेक्षा व हेवा = लोभ, मत्सर इत्यादी विकार सोडून केवळ सेवेसाठीच सेवा करणे हाच सेवकाचा धर्म आहे; व हेच सेवकाचे हित = कल्याण आहे. आदर्श जीवजननी सुमित्रा देवीने केलेल्या उपदेशाचेच सार येथे सांगितले आहे. **'लोभ मोह मद ईर्षा -**

**रोषां । स्वप्निहि होउं नका वश दोषां ॥ दूर सर्वपरिं विकार ठेवा । मनतनवचनी करणें सेवा'** (७५।५-६) **(ख) सेवकाच्या या लक्षणाप्रमाणे मानसांतील लक्ष्मण उत्कृष्ट आदर्श सेवक ठरतात की भरत याचा विचार करावा.** लक्ष्मणाने रामसेवा करण्याशिवाय इतर कोणत्याही आपल्या हिताचा उच्चार राहोच पण विचार तरी केला आहे काय ? मानसांत असल्यास एखादे तरी उदाहरण दाखवावे; म्हणूनच हा लेखक लक्ष्मणांस **'रामसेवामूर्ति'** समजतो. स्वतःच्या सुखासाठी व दुःख निवारण्यासाठी रामास संकोचांत पाडल्याचे एक तरी उदाहरण मानसांत आहे काय ? **(ग) येथे ध्वनित केले आहे** की काहीतरी सेवेचा लाभ या दासाला मिळेल अशी कृपा करावी. **'द्या काही अवलंबन देवा । लंघिन अवधि करुनि यत्सेवा'** (३०७।८) याचे बीज येथे पेरले गेले आहे.

*हिं.* ***। स्वारथु नाथ फिरें सबही का । किएँ रजाइ कोटि बिधि नीका ॥५॥***
***। यह स्वारथ परमारथ सारु । सकल सुकृत फल सुगति सिंगारू ॥६॥***
***। देव एक बिनती सुनि मोरी । उचित होइ तस करब बहोरी ॥७॥***
***। तिलक समाजु साजि सब आना । करिअ सुफल प्रभु जौं मनु माना ॥८॥***

*म.* ***। स्वार्थ नाथ फिरतां सर्वांचे । आज्ञा-पालन कोटि हिताचें ॥५॥***
***। हें स्वार्थ नि परमार्थ हि - सार । फल सब सुकृत सुगति-शृंगार ॥६॥***
***। देव एक मम विनति ऐकणें । उचित गमे ते नंतर करणें ॥७॥***
***। तिलक-साज आणिला सकल ही । प्रभो ! मान्य तर करा सुफल ही ॥८॥***

**अर्थ** - नाथ परत फिरण्यात सर्वांचे स्वार्थ साधतील; पण आज्ञापालन करणे कोटिपट हिताचे आहे.॥५॥ हेच स्वार्थ आणि परमार्थाचेही सार आहे; हे सकल सुकृताचे फळ आहे, आणि सुगति (मुक्ति) रूपी स्त्रीचा शृंगार आहे.॥६॥ देव ! माझी एक विनंती ऐकून घ्यावी व नंतर योग्य वाटेल ते करावे.॥७॥ राज्यतिलक (अभिषेक) करण्याची सर्व तयारी आणली आहे; मान्य असेल तरच हे प्रभो ! ती सुफल करावी ॥८॥

**टीका. - चौ. ५ (१) स्वार्थ नाथ फिरतां सर्वांचे** - आपण सर्वांचे नाथ सर्वांना सोडून वनात आलांत व त्यामुळे अयोध्या नगरी, मी, प्रजा, परिवार माता व फार काय पशुपक्षी वृक्ष लतादि सर्वच अनाथ झालो आहोत. नाथ परत फिरले तर सर्व सनाथ होतील व सर्वांचे स्वार्थ साधतील. **(क)** पण याने परमार्थ साधेल असे वाटत नाही. परमार्थ तर स्वार्थाच्या कोटिपट - अनंतपट

हिताचा आहे. याचे कारण मागील चौपायांत सेवक धर्माचे विवरण करून सांगितले आहे. **(ख) कोटिहिताचे =** कोट्यवधि जीवांच्या हिताचे असा दुसरा अर्थ होऊ शकेल; पण हा भाव भरतांच्या मनातला न ठरता कवींच्या मनातला ठरेल.

**चौ. ६ - (१) हे स्वार्थ नि परमार्थ हि सार -** हे म्हणजे आज्ञापालन. भाव हा आहे की आज्ञापालनाने स्वार्थ आणि परमार्थ हे दोन्ही साधतील; पण केवळ स्वार्थ साधनाने परमार्थ साधणार नाही. **'सेवक तो प्रियतम मम तोही । मम अनुशासन मानी जोही'** (७।४३।५) असे भक्तिगीतेत प्रभूंनी प्रस्तावनेतच सांगितले आहे. **(क) फल सब सुकृत =** सब सुकृत फल; **'सकलसुकृतफल हेंच महान हि । स्नेह रामसीतापदिं सहज हि'** (७५।४) असे आधी सांगून सुमित्रेने लक्ष्मणांस सीताराम सेवाच करण्यास सांगितले आहे. यावरून ठरले की रामाज्ञापालन हेच रामस्नेहाचे मुख्य लक्षण आहे; कारण, रामाज्ञा पालन करणाराच रामाला प्रिय होतो, व सर्व काही प्राप्त होते. वरील ७।४३।५ अवतरण पहावे. **(ख) सुगति-शृंगार - सुगति =** स्वर्गादि मोक्षापर्यंतची गति. रामाज्ञापालन न करता जरी मुक्ति सुद्धा मिळाली तरी ती शृंगार = सौभाग्य शृंगारहीन, विधवेसारखी आहे; कारण रामाज्ञा पालन करणारा रामाला प्रियतम वाटतो, जो रामप्रियतम झाला त्याला भक्ति मिळते; पण भक्तिविहीन सुगति विधवा स्त्रीसारखी आहे. **'भक्ति सुस्त्रि कलकर्णविभूषण'** (१।२०।६) असे रामनाम आहे. म्हणून ठरले की रामाज्ञापालन = रामनाम, भजन जपादि. रामनाम असून रामाज्ञापालन होत नसेल तर ते दूषण आहे. **निष्कर्ष - रामाज्ञापालन = रामनाम, रामस्नेह, रामभक्ति, रामप्रियतम होणे व्यवहारात सुद्धा हेच दिसते :** जो आईबापांची आज्ञा पालन करील, त्यांच्या मनातील जाणून त्याप्रमाणे वागेल तो पुत्र आईबापांना प्रियतम होतो. आणि त्यांची आज्ञा न मानता त्यांच्या नावाचा जप दिवसभर करीत बसला व मातृपितृभक्त म्हणवू लागला तर आईबापांना प्रिय वाटणार नाहीच पण जग व संत दांभिक ठरवितील त्याला.

**चौ. ७-८ (१) सूचना -** वरील सहा चौपायांनी स्पष्ट केले की अयोध्येत येण्याचा आग्रह मी करीत नाही; मात्र काहीतरी आज्ञा देऊन सेवा सांगावी म्हणजे त्या आज्ञेचे पालन करण्याने आम्हा सर्वांचा स्वार्थ व उत्तम परमार्थ विनाश्रम सहज साधेल. राम अयोध्येत परत येण्याचा प्रश्नच उरला नाही. रघुनाथांनी येथेच राज्याभिषेक करून घेतला तर सोन्याहून पिवळे ! असे वाटून आता त्या दृष्टीने सेवकभावाने - भक्तिप्रेमाचे

दडपण न घालता, प्रयत्न करून बघतात. (**क**) भरत आता जवळ जवळ वसिष्ठांच्या मतावर आले आहेत हे वाचकांच्या लक्षात आलेच असेल. **'रामाज्ञा रुचि राखणें हितकर हें आम्हांस'** (२५४) हे वसिष्ठ मत आहे. **'आज्ञापालन कोटिहिताचे'** असे भरत म्हणाले. **'सकलां सुखद राम अभिषेकहीं'** **'येतिल कसे नगरिं रघुरावही !'** हा स्वार्थ वसिष्ठांनी सुचविला होता. **'स्वार्थ नाथ फिरतां सर्वांचे'** असे भरत म्हणाले; पण हा स्वार्थ सोडला. पण **'येतिल कसे नगरिं रघुरावहि'** (२५५।२) यांतील गूढ भाव मान्य केला व त्याचे बीज पेरून ठेवल्याचे चौ. ४ च्या टीकेत दाखविले आहे. राहिला प्रश्न रामअभिषेकाचा. तोच येथे विनंती रूपाने नुसता कानांवर घालीत आहेत. रामरुचि त्या विषयी काय आहे हे जाणू इच्छितात इतकेच. **'रामरुचि राखणें हितकर हे आम्हांस'** (२५४) असे वसिष्ठ म्हणाले. त्याची पूर्ति करीत आहेत. (**ख**) **मग भरताने वसिष्ठांवर विजय मिळवून काय साधले ? समाधान - वसिष्ठांची पूर्णकृपा संपादन केली व विजयमदाने धुंद झाले नाहीत हे मुख्य साधले. भावनाप्रधान शुद्ध निरतिशय भक्तीला भगवान कसे वश होतात** व पूर्ण गुरुकृपेने भावनाप्रधान भक्त आपल्या भावनेला विवेकाची जोड देऊन सेवकधर्माचे पालन कसे करतात हे सहज दाखविले. वसिष्ठांच्या संकल्पशक्तीचा प्रभाव कवींनी दाखविला.

*हिं.दो.* ***। सानुज पठइअ मोहि बन कीजिअ सबहि सनाथ ॥***
***॥ न तरु फेरिअहिं बंधु दोउ नाथ चलउँ मैं साथ ॥२६८॥***
*हिं.* ***। नतरु जाहिं बन तीनिउ भाई । बहुरिअ सीय सहित रघुराई ॥१॥***
***। जेहि बिधि प्रभु प्रसन्न मन होई । करुना सागर कीजिअ सोई ॥२॥***
*म.दो.* ***। सानुज धाडुनि बिपिनिं मज करणें सकल सनाथ ॥***
***॥ नातर फिरवा बंधु युग चलतो मी प्रभुसाथ ॥२६८॥***
*म.* ***। नातर बंधु तिघे वनिं जातील । सीतेसह रघुराजा फिरतिल ॥१॥***
***। प्रभुमन जेणें प्रसन्न व्हावें । करुणासागर तेंच करावें ॥२॥***

**अर्थ** - अनुजासह मला वनांत पाठवून आपण सर्वांना सनाथ करावे (अयोध्येत परत जावे); अथवा दोघा भावांना (लक्ष्मण शत्रुघ्न) परत पाठवावेच मी प्रभूंच्या बरोबर चलतो.॥ दो. २६८॥ किंवा तिघे भाऊ वनांत जातील आणि सीतेसह रघुराज परत जातील.॥१॥ जेणे करून प्रभूंचे मन प्रसन्न होईल तेच करुणासागर (प्रभु) ! आपण करावे.॥२॥

**टीका. दो. (१) सकलां सुखद रामअभिषेकहि** (२५५।१) हा वसिष्ठवचनांतील

कार्यकारिणीत मान्य झालेला ठराव मागल्या दोन चौपायात अध्यक्षांच्या मतासाठी मांडला. आता राहिली वसिष्ठांची उपसूचना; तिला स्वतः सानंद सहर्ष अनुमोदन दिले असल्याने व कोणी विरोध केला नसल्याने अध्यक्षांच्या मतासाठी मांडतात. **'दोघे भ्राते तुम्हीं वना जा। फिरवुं सिता लक्ष्मण रघुराजा'** (२५६।३) ही वसिष्ठांची उपसूचना होती. ज्या अर्थी वसिष्ठांनी ही सूचना मांडली त्या अर्थी भावाभावांत अशी अदलाबदल करण्यास शास्त्रविरोध नसला पाहिजे हे निश्चित. याने रामप्रतिज्ञेचा व पित्राज्ञेचा भंग होत नाही हे ठरले; इतर परिणाम गौण आहेत. दोह्यात पूर्वार्धात वसिष्ठांचीच उपसूचना ठराव रूपाने मांडली आहे. पण त्या सूचनेवरून आणखी दोन पर्याय सुचले ते दोह्याच्या उत्तरार्धात व पुढील चौपाईत मांडले आहेत. **पण तिन्ही सूचनांत भरतांनी वनांत जाण्याचा उल्लेख आहेच.**

(२) **ल.टे.** - वा. रा. (२।८८।२७) रामशय्या निरीक्षणाच्या वेळी भरत म्हणाले आहेत की **'तस्यार्थमुत्तरं कालं निवत्स्यामि सुखं वने। तं प्रतिश्रवमामुच्य नास्य मिथ्या भविष्यति'** या वरील **संस्कृत टीकेचा अर्थ** - ती रामाने केलेली प्रतिज्ञा मी स्वतः ग्रहण करून रामाच्या साठी, प्रतिज्ञेतील शेष राहिलेल्या काळात मी स्वतः सुखाने वनांत राहीन; त्यामुळे रामाने केलेली प्रतिज्ञा मिथ्या ठरणार नाही. हे. वा.रा. वचन असल्यामुळे संशयाला जागा नाही.

(३) पसंत पडेल तो स्वीकारावा म्हणून तीन पर्याय सुचविले. पण दुसऱ्या चौपाईत स्पष्ट सांगितले की असे कराच असा माझा आग्रह नाही. मन प्रसन्न ठेऊन वाटल्यास करावे किंवा करू नये.

*हिं.* ***। देवँ दीन्ह सबु मोहि अभारु। मोरें नीति न धरम बिचारू ॥३॥***
***। कहउँ बचन सब स्वारथ हेतू। रहत न आरत के चित चेतू ॥४॥***
***। उतरु देइ सुनि स्वामि रजाई। सो सेवकु लखि लाज लजाई ॥५॥***
***। अस मैं अवगुन उदधि अगाधू। स्वामि सनेहँ सराहत साधू ॥६॥***

*म.* ***। देव दिला मम शिरिं अति भारहि। मजला नीति न धर्म विचार हि ॥३॥***
***। स्वार्थास्तव सगळे मी वदतो। आर्ताचे मनिं विवेक नसतो ॥४॥***
***। दे उत्तर ऐकुन आज्ञेला। तो सेवक लाजवि लाजेला ॥५॥***
***। तो मी अवगुण - उदधि - अगाधू। स्वामी स्नेहें वानिति साधू ॥६॥***

**अर्थ** - देव ! आपण माझ्या शिरावर अतिभार (बोजा) दिला आहे; पण मला नीति विचार नाही की धर्मविचारही माहीत नाही. ॥३॥ मी जे बोलत

आहे ते स्वार्थासाठी बोलत आहे; व आर्ताच्या मनांत विवेक नसतो. ।।४।। स्वामींची आज्ञा ऐकून जो उत्तर देतो तो सेवक लाजेला लाजवतो ।।५।। (असा जो) तो मीच अवगुणांचा अगाध सागर (उदधि) असून स्वामी स्नेहामुळे मला चांगला साधु म्हणतात (साधु म्हणून प्रशंसा करतात इतकेच) ।।६।।

**टीका - चौ. ३ - (१) देव दिला मम शिरिं अति भार हि** - (हिंदीतील) अभारू = अभार = अति भार; जसा 'अचपळ मन माझें' यांतील अचपळ = अति चपळ. पूर्वी असंका' शब्द असाच वापरलेला आहे १।१२।८ व १।११३।१ पहा. 'निज शिरिं भार भरत मनिं जाणति' (२६६।६) यांतील अर्थच येथे 'शिर' शब्द, घालून मराठीत स्पष्ट केला आहे. **(क) 'भरत हंस रविवंश तडागां । जन्मुनि कृत गुणदोष विभागां'** (२३२।६) असे प्रभूंनीच म्हटले आहे. आणि अशा हंसाच्या शिरावर त्यानीच अति भार घातला आहे. भरत सुचवितात की हा अतिभार मला झेपण्यासारखा नाही. अगदी आरंभी लक्ष्मण असेच म्हणाले आहेत. **'नरवर धीर धर्मधुरधारी । निगम नीतिचे ते अधिकारी ॥ प्रभूस्नेहिं शिशु मी प्रतिपालित । मंदर मेरु कि मराल उचलित'** (७२।२-३) भरत हेच म्हणतात की मला धर्म व नीति काही कळत नाही.

**चौ. ४ (१) स्वार्थास्तव वदतो - आर्ताचे मनिं विवेक नसतो. 'आर्त कधीं न विचारें वदतो । डाव जुगाऱ्या अपला दिसतो'** (२५८।१) असे वसिष्ठ रामचंद्राजवळच म्हणाले आहेत. या चौपाईचाच अर्थ तेथे अधिक स्पष्ट केलेला आहे. टी. पहावी.

**चौ. ५-६ (१) दे उत्तर ऐकुनि आज्ञेला.. लाजेला.** 'सांगा करुं ते आज' अशी आज्ञा रघुनाथांनी दिली असता तिचे पालन करण्याचे सोडून; पालन न करण्याचे कारण 'देव दिला मम शिरिं अति भारहि' इत्यादि म्हणून देत सुटले त्याला लक्षून ही चौपाई आहे; पण हे सेवकधर्मातील निषेधबोधक एक महत्त्वाचे सूत्र आहे. विधि व निषेध मिळून धर्मशास्त्र होते. **'आज्ञापालन कोटिहिताचे । 'करि स्वामिहित सेवक तोही' 'सेवकहित तों स्वामीसेवा'** ही विधिवाक्ये आहेत. **हीं असली विधिनिषेधबोधक वचने संकलित केल्यास तुलसी सेवकधर्म - शास्त्र तयार होईल. (क) स्वामी स्नेहें वानिति साधू'** हिंदी 'सनेहँ हें तृतीयेचे रूप आहे. या चरणाचे तीन अर्थ होतात : I स्वामींचा माझ्यावर स्नेह असल्यामुळे ते माझी साधु म्हणून प्रशंसा करतात. ज्याच्यावर निःसीम प्रेम असते त्याचे दोष दिसतच नाहीत; व दिसले तरि गुणरूपाने दिसतात. II माझा स्वामींवर जो

स्नेह आहे त्याच्यामुळे स्वामी माझी प्रशंसा करतात. ।।। स्वामींचा स्नेह माझ्यावर असल्यामुळे साधू - सज्जन माझी प्रशंसा करतात; "समर्थांच्या घरचे श्वान । तया सर्वही देती मान" हे तिन्ही अर्थ ग्राह्य आहेत. **सार हे की** जी प्रशंसा केली जाते त्याचे कारण माझे गुण नसून रामस्नेह कारण आहे. भरत आता आपल्या भाषणाचा समारोप करतात.

***हिं.*** ***। अब कृपाल मोहि सो मत भावा । सकुच स्वामि मन जाईं न पावा ।।७।।***
***। प्रभु पद सपथ कहउँ सति भाऊ । जग मंगल हित एक उपाऊ ।।८।।***

***हिं. दो.*** ***। प्रभु प्रसन्न मन सकुच तजि जो जेहि आयसु देब ।।***
***।। सो सिर धरि करिहि सबु मिटिहि अनट अवरेब ।।२६९।।***

***म.*** ***। अतां कृपालु मला तें रुचतें । ज्यांत नाथमन नहिं संकुचतें ।।७।।***
***। प्रभुपद - शपथ वदें सद्भावे । विश्व - सुमंगल एक उपावे ।।८।।***

***म. दो.*** ***। सुप्रसन्न संकोचविण प्रभु जें ज्यां कथितील ।।***
***।। तें करितिल शिरिं धरुनि सब विघ्न पेच सुटतील ।।***

**अर्थ -** अतां कृपालु ! ज्यांत नाथांच्या - स्वामींच्या मनाला संकोच वाटणार नाही ते करणे मला आवडते. ।।७।। प्रभूंच्या पायांची शपथ घेऊन सद्भावनेने सांगतो की विश्वाचे जगाचे सुमंगल या एकाच उपायाने (उपावें) होईल ।।८।। संकोच रहित सुप्रसन्न (मनाने) होऊन प्रभु ज्यांना जे सांगतील ते सर्वजण शिरसा मान्य करतील व (अशानेच) सर्व विघ्ने (अनट) व पेच - अडचणी (अवरेब) टळतील.।।दो. २६९।।

**टीका. चौ. ७ - (१) 'ज्यांत नाथमन नहिं संकुचतें - 'क्षोभ न हो प्रभुचित्तिं - जनहिता' 'जो स्वामिंस संकोचि पाडतो'** (२६८।२-३) यांत जे सांगितले तेच निराळ्या प्रकारे येथे समारोपांत सांगितले. आपल्यामुळे स्वामींना संकोच उत्पन्न झाला याबद्दल भरतास वाईट वाटून पश्चात्ताप होत आहे; पश्चात्तापाने आर्त आहेत. म्हणून तेच तेच पुनःपुन्हा सांगत आहेत.

**दो. - (१) सुप्रसन्न संकोचविण - 'प्रभुमन जेणे प्रसन्न व्हावे । करुणासागर तेच करावे** (चौ. २) असे नुकतेच सांगितले; पण त्या पूर्वी राज्याभिषेकाविषयी विनंती आणि वनांत कोणी जावे या विषयी तीन पर्याय सुचविले होते. येथे तेच सांगितले पण कोणतीही सूचना न करता सांगितले. म्हणजेच पूर्वी मांडलेले सर्व ठराव मागे घेऊन अध्यक्षांच्या मनाला वाटेल तो ठराव त्यांनी लिहून द्यावा

म्हणून कोऱ्या कागदावर सर्वांच्या वतीने मान्यतेची सही आधीच करून देत आहेत. आपल्या सर्व मतांचा संपूर्ण त्याग करून **ज्यांत स्वामींना बरे वाटेल ते आपले मत असे स्पष्ट सांगून टाकले,** एकट्याच्या वतीने नव्हे तर सर्व सभेच्या वतीने **(क) सूचना** - कार्यकारिणीच्या सभेत, ज्याला जो उपाय सुचेल तो त्याने सांगावा असे वसिष्ठांनी सांगितल्यावर कोणीच बोलेनात; तेव्हापासून स्वतःचे मत मांडताना सर्वांच्या वतीने बोलण्याची जबाबदारी भरतांवर येऊन पडली.

**चित्रकूट प्रथम दरबारांतील भरताचे दुसरे भाषण येथे समाप्त झाले.** या दरबारांत आतापर्यंत निर्णय झाला तो : **संकोच सोडून प्रसन्न मनाने जे तुम्ही सांगाल ते मी आज करतो'** (२६४) असे प्रभूंनी भरतांस सांगितले. त्यावर विचार करून भरतांनी भाषणाच्या शेवटी सांगितले की संकोच सोडून सुप्रसन्न मनाने प्रभु ज्यांना जे सांगतील ते केले जाईल. **सारांश : काय करावयाचे याचा निर्णय झाला नाही.** हा दरबार कार्य निर्णय न होतांच बरखास्त होणार आहे. पुढे जनकराज आल्यावर परस्परांच्या येथे, बऱ्याच खाजगी बैठकी होऊन मग दुसरा दरबार भरेल व त्यांत निश्चित स्वरूपाचा निर्णय होईल.

## सिंहावलोकन - श्रीराम भरत संवाद - प्रथम दरबार.

१. या संवादांत शुद्ध मानवी मनाच्या स्वभावाचे चित्र अति मार्मिक रीतीने रेखाटले आहे. **भगवान** दाखवितात की मी भक्त पराधीन आहे; प्रतिज्ञा मोडण्याचेसुद्धा कबूल केले. **भक्त** पुन्हःपुन्हा सांगत आहे की मी पूर्णपणे भगवंताच्या अधीन आहे, मला स्वतःचे मतच नाही. **गुरु** शिष्यप्रेमाधीन होऊन शिष्यासाठी रामाजवळ वकिली करून शेवटी रामेच्छेवरच सोडतात. **(क)** सुरपुरवासी व अयोध्यापुरवासी लोकांत सुखदुःखांची अदलाबदल क्षणोक्षणी होत आहे. **(ख)** धर्मत्याग करण्यास दुसऱ्यास सांगण्याचे धैर्य व साहस कोणालाच करवत नाही. **(ग)** स्वार्थी सुर अति मलिन मन हे दाखविले गेले आहे. उलट रामभक्ति संपन्न वसिष्ठ, माता, भरत व प्रजाजन इत्यादि सर्वच आपल्या परम स्वार्थाची पूर्तता करू इच्छीत असले तरि **रामाज्ञा पालनाला परम स्वार्थयुक्त परमपरमार्थ समजत आहेत. हा आहे भारतीय संस्कृतीच्या व्यवहाराचा परमोच्च आदर्श.**

(२) या आदर्शाचे चित्रण गोस्वामींनी अति कोमल, परम रमणीय, मधुर, चित्ताकर्षक, भक्तिरसार्द्र निर्दोष भाषेत जसे केले आहे तसे व इतक्या अल्प

शब्दांत जगांतील कोणत्याही भाषेत केलेले आढळणार नाही.

(३) धर्म व नीति यांचा त्याग न करता भक्ताच्या व सेवकाच्या धर्माचा परमोच्च आदर्श कसा बनू शकतो याचे निदर्शन या दरबारांत केले आहे व पुढेही आहे. हा आदर्श पाहण्याचे एकमेवाद्वितीय स्थान म्हणजे तुलसी मानसातील अयोध्याकाण्ड व भरतचरित्र. या विभागाची प्रशंसा करणे म्हणजे ।। 'नीरांजनें भानु दाखविणे' (प्रज्ञा) आहे.

(४) भरतानी प्रथम जी विनंति केली व पर्याय सुचविले त्यांत धर्मनीति व भक्ति निपुणता भरली आहे. नंतर सर्व ठराव मागे घेतले त्यांत सेवकधर्माची पराकाष्ठा आहे व हे सर्व अति कोमल, परम विनीत प्रेमपरिप्लुत हृदयाने साधले आहे.

(५) भरताचे पहिले भाषण भक्तिभाव प्रधान आत्मग्लानीने भरलेले आहे, तर दुसरे भाषण कृतज्ञता प्रधान सेवकभावाने अत्यंत सुशोभित झालेले आहे.

(६) भरताच्या दुसऱ्या भाषणांत रामसेवामूर्ति सुमित्रानंदनाच्या गांभीर्याचा भंग होण्यासारखा एक प्रसंग उपस्थित झाला असता लक्ष्मणाच्या भिवया चढल्या नाहीत की प्राण कासावीस झाले नाहीत हे वैशिष्ट्य लक्षांत घेण्यासारखे आहे. **'लक्ष्मण शत्रुघ्नांना परत पाठवा मी चलतो प्रभुसाथ'** ही सूचना व तिघे भाऊ वनांत जातील व सीता रघुराज परत जातील ही सूचना कानी पडल्यावर लक्ष्मणाच्या हृदयाची काय दशा झाली असेल याची कल्पना राम वनगमनाच्या वेळी झालेल्या दशेवरून करता येण्यासारखी आहे व हा दरबार अनिर्णीत अवस्थेतच बरखास्त होत असल्याने तर फारच दुःसह क्लेश झाले असतील. प्रभु मला टाकून अयोध्येत जाणार नाहीत किंवा वनांतही राहणार नाहीत हा आत्मविश्वास परम दृढ असला पाहिजे असे वाटते. आता पुन्हा दोन चेंडूंची अदलाबदल झालेली दिसेल -

हिं. *। भरत वचन सुचि सुनि सुर हरषे । साधु सराहि सुमन सुर बरषे ।।१।।*
*। असमंजस बस अवध नेवासी । प्रमुदित मन तापस बनवासी ।।२।।*
*। चुपहिं रहे रघुनाथ सँकोची । प्रभु गति देखि सभा सब सोची ।।३।।*

म. *। भरतवचन शुचि परिसुनि हर्षति । 'साधु साधु' सुर सुमनें वर्षति ।।१।।*
*। अडचणींत कोसलपुरवासी । प्रमुदित मन तापस वनवासी ।।२।।*
*। चुप रघुनाथ बसति संकोची । प्रभुगति बघुनि सभा सब शोचीं ।।३।।*

**अर्थ** - भरताचे पवित्र भाषण ऐकून देवांना हर्ष झाला व 'साधु साधु'

(शाबास शाबास) म्हणून त्यांनी पुष्पवृष्टी केली ।।१।। सगळे अयोध्यावासी लोक अडचणीत पडले; तपस्वी व वनवासी ! (कोळी भिल्ल इ.) यांना फार आनंद झाला. ।।२।। संकोची स्वभावाचे रघुनाथ चुप बसले - राहिले व ही प्रभूंची दशा पाहून सर्व सभा चिंता शोक-मग्न झाली. (शोचीं = चिंतेत, शोकांत) ।।३।।

**टीका. चौ. १-२** - (१) भरताच्या प्रेमाला वश होऊन रघुनाथ परत जाणार अशी जी धास्ती पडली होती ती नष्ट झाली. रघुनाथांनी अयोध्येत परत जाण्याविषयी आग्रह भरत करीत नाहीत इतके नक्की; हे देवांनी जाणले. त्यामुळे मधेच येऊ पाहणारे मोठे संकट टळले व आता आपले कार्य होणार असे वाटून देवांना हर्ष झाला. देवांच्या छातीत जो चिंतेचा चेंडू आदळत होता तो आता अयोध्यावासी लोकांत आला व येथे जो सुखाचा चेंडू सर्वांच्या हृदयांत उड्या मारीत होता तो देवांच्या हृदयांत उड्या मारू लागला. तपस्वी मुनि वगैरे आणि कोळीभिल्ल भिल्लिणी इत्यादि वनवासी यांना वाटले की आता रघुनाथ चित्रकूटाहून जात नाहीत.

**चौ. ३ - (१) चुप रघुनाथ बसति संकोची - रघुनाथ** शब्दाने सुचविले की पायापाशी आलेल्या या सर्वांना अनाथ करून कसे पाठवावे? परत पाठविणे तर भाग आहे; पण स्वतः या मुखाने शरणागतांना कसे दूर लोटू? सनाथ करून पाठविणे जरूर आहे. पण रघुनाथ असून, भरताने मागितल्या नसता, वसिष्ठ गुरूंच्या देखत चरण पादुका देणेही शक्य नाही. सध्या गप्प बसणेच चांगले. आता जनक महाराज येत आहेतच; त्यामुळे यांना आज जाता येत नाहीच; मग आजच घाई का करा! जनकराज, वसिष्ठ गुरु व भरत यांच्या विचारविनिमयांत काय निष्पन्न होते ते पाहू. दुसरी ही चिंता नवी उत्पन्न झाली की जनकराजानीच अयोध्येत जाण्याची आज्ञा दिली तर? इत्यादि विचार करीत मौन राहिले. **(क) प्रभुगति बघुनि सभा सब शोची** - रघुनाथांची ही चिंतातुर मनःस्थिति त्यांच्या मुखावर उमटल्याशिवाय राहिली नाही. ती दशा पाहून सर्व सभा चिंतामग्न झाली. त्यांना वाटले की राम परत येत नाहीत **(ख)** पुरवासी लोकांचा एकदा उल्लेख केला व सभेचा निराळा केला व सुचविले की नदी किनाऱ्याला जे पुष्कळ लोक उतरले आहेत तेसुद्धा सभोवती गोळा झाले आहेत. त्यांना राममुख न दिसल्याने चिंता शोक नाही. पण काहीच निर्णय झाला नाही त्यामुळे ते अडचणीत, घोटाळ्यात पडले की काय होणार कोणास ठाऊक !

## जनकदूतांचे आगमन

हिं. *। जनक दूत तेहि अवसर आए । मुनि बसिष्ठँ सुनि बगि बोलाए ॥४॥*
*। करि प्रनामु तिन्ह रामु निहारे । बेषु देखि भए निपट दुखारे ॥५॥*
*। दूतन्ह मुनिबर बूझी बाता । कहहु बिदेह भूप कुसलाता ॥६॥*
*। सुनि सकुचाइ नाइ महि माथा । बोले चर बर जोरें हाथा ॥७॥*
*। बूझब राउर सादर साईं । कुसल हेतु सो भयउ गोसाईं ॥८॥*

म. *। जनकदूत ते अवसरिं ठाकति । श्रवुनि वसिष्ठ शीघ्र बोलावति ॥४॥*
*। प्रणमुनि जेव्हां रामा पाहति । दिसतां वेष दुःख अति पावति ॥५॥*
*। दूतां मुनिवर झाले पुसते । वदा विदेह - भूप - कुशलातें ॥६॥*
*। तैं संकोचुनि महिं शिर नमवुनि । वदले चर - वर करांस जुळवुनि ॥७॥*
*। स्वामी सादर पुसतां आपण । नाथ! होय तें कुशला कारण ॥८॥*

**अर्थ** - (सर्व सभा चिंतातुर झाली आहे) त्या समयी जनकराजांचे दूत येऊन ठेपले (आले); हे ऐकतांच वसिष्ठांनी त्यांस लवकर बोलावून घेतले. ॥४॥ त्यांनी मुनिवरांस प्रणाम केला व रामाकडे पाहिले तेव्हा तो (मुनि) वेष दिसतांच त्यांना फार दुःख झाले ॥५॥ मुनिश्रेष्ठ दूतांना म्हणाले की विदेहराजांचे कुशल सांगा (पाहू) ॥६॥ त्यांनी लाजेने जमिनीकडे मस्तक (मान) लवविले व ते चतुर दूत हात जोडून म्हणाले की ॥७॥ स्वामी ! आपण आदराने विचारतां हेच नाथ? कुशलाला कारण झाले. होत आहे. ॥८॥

**टीका. चौ. ४ - (१) जनकदूत** - असे म्हटले; विदेहदूत असे म्हटले नाही. विदेह या नावाप्रमाणे जर स्थिति असती तर दूत पाठविले असते कशाला? राहिले असते ब्रह्मानंदांत मग्न होऊन ! जनक शब्दाने सुचविले की आपल्या मुलीच्या व जावयांच्या वनवासाचा समाचार कळल्यामुळे मिथिलापति सुद्धा कन्येच्या पित्याप्रमाणे दुःखी झाले आहेत. जेव्हा मिथिलापति कन्येच्या जनका (पित्या) प्रमाणे वागतात तेव्हाच बहुधा जनक शब्द वापरला आहे; हे बालकांडांत जागोजागी टीकेत दाखविले आहे. **प्रस्तावना पृष्ट ३०४ - 'जनक - विदेह'** पहा. **(क) शीघ्र बोलावति** - चित्रकूटच्या वनातील रामाश्रमात वटवृक्षाखाली हा दरबार भरलेला असता सुद्धा दूत आल्याची वर्दी सेवकांनी पोचविणे व आज्ञेप्रमाणे त्यांस घेऊन येणे **हे राजदरबाराचे नियम येथेही पाळले जात आहेत हे सहज १।२ शब्दांनी सुचवून ठेवले आहे. I** शीघ्र बोलावण्याचे कारण हे वाटते की

रामवनवासाचा आजचा ६८ वा दिवस असता, अयोध्या अधिक जवळ असून सुद्धा, इतक्या दिवसांत दूत वगैरे आले नाहीत व आज एकाएकी चित्रकूटला वनात दूत आले तेव्हा आहे तरी काय ? अशी चिंता उत्पन्न झाली.

**चौ. ५ (१) प्रणमुनि जेव्हां रामा पाहति** - प्रथम वसिष्ठांस प्रणाम केला तोच राम दृष्टीस पडले. मुनिवेषाने वनात गेले आहेत हे ऐकल्यापासून हे दूत सुद्धा दुःखी होतेच पण आता **प्रत्यक्ष पाहिल्यावर अति दुःख झाले**. सीतेचा उल्लेख नाही; यावरून सीता रामाजवळ नसून कौसल्यादी सासवांच्या जवळ बसली आहे असे ठरते.

**चौ. ६ (१) वदा विदेह भूप - कुशलातें** - वसिष्ठांना शंका आली की रामविरहाने जशी दशरथांची गति झाली तशीच विदेहराजांची सुद्धा झाली की त्यांच्या **विदेहतेने त्यांना जिवंत ठेवले आहेत** ? येथे वक्रोक्ति नाही. ही वेळही वक्रोक्तिची नाही.

**चौ. ७-८ (१) संकोचुनि** - संकोच वाटण्याचे कारण : सर्व सभा चिंतातुर दिसत आहे; सर्व अयोध्यावासी शोकांत आहेत; रामसीता मुनिवेषांत आहेत आणि दशरथ मरण पावले आहेत. हे जनकराजांस कळलेले असता हे कुशल आहेत (खुशालीत आहेत) असे सांगणे हा मूर्खपणा; न सांगावे तर मुनींचा अपमान केला जातो. **(क) चरवर - चर** = गुप्त दूत (हेर) त्यांत हे श्रेष्ठ चतुर; त्यांनी वसिष्ठांचा भाव जाणला. **(ख) स्वामी सादर पुसतां... कुशला कारण** - आपल्या सारख्या समर्थाच्या मुखांतून 'विदेशभूप कुशल' हे शब्द ज्या अर्थी निघाले त्या अर्थी आता आमच्या राजांचे कुशल होणार, अकुशल होत नाही, अशी खात्री वाटते. नाहीतर वि-देह, विगत देह झालेच असते.

*हिं.दो. । नाहिं त कोसलनाथ कें साथ कुसल गइ नाथ ॥*
*॥ मिथिला अवध बिसेष तें जगु सब भयउ अनाथ ॥२७०॥*
*हिं. । कोसलपति गति सुनि जनकौरा । भे सब लोक सोक बस बौरा ॥१॥*
*। जेहि देखे तेहि समय बिदेहू । नामु सत्य अस लाग न केहू ॥२॥*
*म.दो. । ना तर कोसलनाथसह गता कुशलता नाथ ! ॥*
*॥ मिथिलाऽयोध्या फार, जग झालें सकल अनाथ ॥२७०॥*
*म. । कोसलपतिगति जनकजनिं कळे । लोक शोकवश होति बावळे ॥१॥*
*। दिसले तदा विदेह जयांसी । नाम सत्य वाटे न तयांसी ॥२॥*

**अर्थ** - नाथ ! नाही तर कोशलनाथांच्या बरोबर कुशलता (अमरावतींत)

गेली होती ! मिथिला व अयोध्या फारच (विशेष) अनाथ झाल्या असून सर्व जगच अनाथ झाले आहे.।।दो.२७०।। कोसलपति दशरथ राजांची गति (मरण) जनकांच्या लोकांत कळली तेव्हा सगळे लोक शोकाकुल होऊन (अगदी) बावळे (भ्रमिष्ठांसारखे) झाले.।।१।। त्या वेळी विदेह ज्यांना दिसले (ज्यांनी पाहिले) त्यांना विदेह हे नाव सत्य आहे असे वाटले नाही.।।२।।

**टीका. दो. (१) ना तर** - नाही तर; आपण आस्थेने विचारपूस करता म्हणून ठीक आहे; नाहीतर सर्वांचेच अकुशल झाले असते. कुशलता तर कोशलनाथांच्या बरोबरच गेली होती स्वर्गात ! पण आता कुशल होण्याची आशा वाटते. **(क) मिथिलायोध्या फार अनाथ** - मिथिला + अयोध्या = मिथिलायोध्या. भाव हा की मिथिला काही कमी दुःखी नाही झाली. मिथिलापति जनक असे म्हणतात हे खरे, पण कोशलनाथच मिथिलानाथ होते; व ते सम्राट होते म्हणून जग = पृथ्वी पण अनाथ झालीच. आपला आशीर्वाद आहे म्हणून; नाहीतर या दोन नगरीसुद्धा कुशलतेबरोबरच गेल्या असत्या.

**चौ. २ (१) नाम सत्य न वाटे** - विदेह हे नाव कोणालाच सत्य वाटले नाही. नावासारखी कृति - स्थिति दिसली नाही; म्हणजेच जनकराजा दशरथ मरणाच्या बातमीनेच साध्या माणसासारखे शोकाने व्याकुळ झाले. रामवनवासाचा उल्लेख अजून केलेला नाही. नुसत्या दशरथ मरणाचा हा परिणाम दाखविला व **तेच आधी कळले हे सुचविले.**

*हिं. । रानि कुचालि सुनत नरपालहि । सूझ न कछु जस मनि बिनु-ब्यालहि ॥३॥*
*। भरत राज रघुबर बनबासू । भा मिथिलेसहि हृदयँ हराँसू ॥४॥*
*। नृप बूझे बुध सचिव समाजू । कहहु बिचारि उचित का आजू ॥५॥*
*। समुझि अवध असमंजस दोऊ । चलिअ कि रहिअ न कह कछु कोऊ ॥६॥*

*म. । राणि-कुचालि कळत नरपाला । सुचे न मणिविण जेवीं ब्याला ॥३॥*
*। भरत राज्य रघुवर - वनवासहि । मिथिलेश्वर-हृदिं भीति विषादही ॥४॥*
*। नृपति पुसति बुध सचिव समाजीं । सांगा उचित काय तें आजीं ॥५॥*
*। पेच उभयपरिं बघत कोशले । चला रहा वा कुणि न बोलले ॥६॥*

**अर्थ** - राणीने केलेली दुष्टता राजांना कळतांच, मणि गेला म्हणजे सर्पाला असे काही सुचत नाहीसे होते तसे राजांना सुचत नाहीसे झाले.।।३।। भरताला राज्य व रघुवरांस वनवास (हे कळताच) मिथिलेश्वरांच्या हृदयांत सुद्धा भय व

विषाद उत्पन्न झाले.।।४।। (तेव्हा) नृपतींनी बुध व सचिव यांच्या समाजात (सभेत) विचारले की आज (अशा परिस्थितीत) काय करणे योग्य आहे ते सांगा.।।५।। अयोध्येकडे बघतां (विचार करता) दोन्ही प्रकारे पेच पडल्याने चला (अयोध्येला) का रहा (नका जाऊ) असे कोणीच म्हणाले नाहीत.।।६।।

**टीका. - १. ल.टे. - येथील वर्णनाचा क्रम सांगतो की** प्रथम दशरथ मरणाची बातमी कळली. मरणाचे कारण विचारले तेव्हा कैकयीची कुटिल करणी हे कारण कळले; व त्यांत दोन वर मागितल्याची हकीगत समजली. भरताला सुद्धा कैकयीमुखाने याच क्रमाने कळले. **(क) राणि कुचालि** - कैकयी शब्द न वापरता 'राणि' वापरला. तिचे नाव उच्चारणे हे पातक आहे असे सर्वांना वाटले हे सुचविले. **(ख) मणिव्याळ** दृष्टान्ताने सुचविले की मणि पळविणारांवर सर्प जसा रुष्ट होतो तशी नरपालाची दशा झाली. दशरथ मरण्यापूर्वी सहा दिवस त्यांची जशी दशा होती तशीच विदेहांची झाली हे कवींनी सुचविले. दशरथांची दशा मणिविहीन व्याला सारखीच होती ६ दिवस.

**चौ. ४-५ (१) मिथिलेश्वरहर्दिं भीती विषाद हि** - हराँसू = हरास = भय, संशय शोक (हि.म.कोष) भरत कुशध्वजांचे मोठे जावई; कुशध्वज मिथिलापतीचे धाकटे भाऊ. या विचित्र घटनेने भावाभावांत वितुष्ट पडते की काय ही भीती; त्याच कारणामुळे अन्याय, विश्वासघात, धर्मविनाश झाला असून काही न बोलणेसुद्धा वाईटच; कारण रामपक्षीय लोक म्हणतील की जनकराज भरताच्याच बाजूचे आहेत म्हणून मूग गिळून स्वस्थ बसले. मिथिलाप्रजा रामप्रेमी आहे व त्यामुळे प्रजाविरोध उत्पन्न होण्याची भीती. विषाद रामसीता वनवासाबद्दल. अयोध्येस जावे तरी भीती, न जावे तरी भीती ! स्वतः काही निश्चय करता येईना ! हे विदेह ! कोणास खरे वाटेल ? स्वतः ठरविता येईना म्हणून सभेतील बुध = ज्ञानीभक्त व सचिव यांचे मत विचारले.

**चौ. ६ - (१) पेच उभयपरिं बघत कोशले** - अयोध्येतील राजकीय व सामाजिक परिस्थिती लक्षात घेऊन बुध व सचिव विचार करू लागले तो दोन्ही बाजूंनी पेचच पडलेला दिसू लागला. मिथिलापति अयोध्येस गेले (जाणे तर जरुरीचे आहे) तर भरतास व कैकयीस चार गोष्टी सांगणे कर्तव्य आहे. व्याही या नात्याने कौसल्येचे सांत्वन करण्यासाठी जाणे कर्तव्य आहे. राणीने ज्या हेतूने अनर्थ केला त्याचा विचार केला म्हणजे दिसते की कौसल्येशी प्रेमाने

बोलणारे तिला शत्रू वाटणार. कैकयीची समजूत घालावी तर कुशध्वजास वाटणार की माझ्या जावयांना राज्य मिळाले हे भावाला पाहवले नाही; ती भीती पत्करत भरताची व कैकयीची समजूत घालण्याचा प्रयत्न केला व त्यांनी ऐकले नाही व उलटच अर्थ घेतला तर जाणे निरुपयोगी. अशा प्रकारे दोन्ही बाजूंनी अडचणच दिसू लागली; म्हणून बुध व सचिव मौनी झाले.

*हिं.* *। नृपहिं धीर धरि हृदयँ बिचारी । पठए अवध चतुर चर चारी ॥७॥*
*। बूझि भरत सति भाउ कुभाऊ । आएहु बेगि न होइ लखाऊ ॥८॥*

*हिं.दो.* *। गए अवध चर भरत गति बूझि देखि करतूति ॥*
*॥ चले चित्रकूटहि भरतु चार चलें तेरहूति ॥२७१॥*

*म.* *। धरुनि धीर नृपती सुविचारी । धाडिति चार चतुर चर नगरीं ॥७॥*
*॥ भरत सुभाव कुभाव पहावे । न कळों देतां सत्वर यावें ॥८॥*

*म.दो.* *। गत नगरीं चर भरतगति कृति जाणून बघून ॥*
*॥ चित्रकूटिं निघतां भरत हेर जाति परतून ॥२७१॥*

**अर्थ** - धीर धरून सुविचारी नृपतींनी अयोध्या नगरांत चार चतुर हेर (चर) पाठविले.॥७॥ (त्यांना सांगितले की) भरताची भावना चांगली आहे की दुष्ट आहे याचा छडा लाऊन कोणाला कळू न देतां, त्वेरेने परत या.॥८॥ (तेव्हा) हेर अयोध्या नगरांत गेले; भरताच्या दशेवरून त्याची भावना जाणली, त्याची कृति पाहिली आणि भरत चित्रकूटास जाण्यास निघाले तेव्हा हेर (गुप्तदूत, चर) परत निघाले (मिथिलेला)॥२॥

**टीका. चौ.** ७-८- (१) **येथे चतुर चर** म्हटले व जे ही हकीगत सांगत आहेत त्यांना 'चर वर' म्हटले. याने सुचविले की जे गुप्त हेर म्हणून पाठविले होते तेच हे. **(क) नृपतीं सुविचारी** असल्याने त्यांनी विचार केला की राणीने अनर्थ केला त्या वेळी भरत अयोध्येत नव्हते व त्यापूर्वी चार वर्षे ते अयोध्येत नव्हतेच; भरत व राम यांचे फार प्रेम होते; तेव्हा भरत व त्यांची माता यांचे एकमत असेलच असे नाही; म्हणून तपास करणे जरूर आहे. **(ख) 'सुभाव कुभाव'** यांत प्रथम 'सुभाव' (सति भाऊ, सद्‌भाव) आहे. यावरून राजांस वाटत आहे की बहुधा भरत दुष्ट नसतील; ते मातेला सामील नसतील हेच अधिक शक्य दिसते. ते रामविरोधी नसतील तर दूत आले म्हणजे अयोध्येस आपण जावे. हे राजकारण असल्याने अत्यंत गुप्तपणे करणे कर्तव्यच आहे.

**दोहा.** - (१) या दोह्यांतील उल्लेखावरून स्पष्ट आहे की अयोध्येतील दरबारात हे हेर हजर होते, तेथेच यांना भरताची खरी दशा पाहण्यास व जाणण्यास सापडली. दरबाराच्या आधी किती दिवस आले हे नक्की सांगता येणार नाही; तरी 'करतूति कृति; देखि = बघून, याने म्हणता येईल की दशरथांची क्रिया संपून दानधर्म केला तेव्हा हे हजर असावेत; कारण संपत्ती वगैरे संरक्षणाची व्यवस्था लावली, तशी राज्यलोभी राजपुत्रानेही लावली असती. अफाट, अपरंपार, अनुपम दानधर्म केला; त्यावरून द्रव्यलोभ नाही हे प्रत्यक्ष कृतीने दिसले. चित्रकूटास निघाले ते साध्या वेषांत; अनवाणी चालत, सर्वांच्या मागे ही कृती दिसली. शिवाय आणखी कितीक गोष्टी ७/८ दिवसांत गुप्तपणे पाहिल्या असतील. भरत रामवनवासाच्या ४३ व्या दिवशी निघाले आहेत. दूतांस परत जाण्यास ५ दिवस लागतील; म्हणजे हे हेर ४८ व्या दिवशी जनकपुरीत पोचले असतील.

*हिं.* ***। दूतन्ह आइ भरत कइ करनी । जनक समाज जथामति बरनी ॥१॥***
***। सुनि गुर परिजन सचिव महीपति । भे सब सोच सनेहँ बिकल अति ॥२॥***
***। धरि धीरजु करि भरत बड़ाई । लिए सुभट साहनी बोलाई ॥३॥***
***। घर पुर देस राखि रखवारे । हय गय रथ बहु जान सँवारे ॥४॥***

*म.* ***। दूत येउनी भरत-कृती-गति । जनक-समाजिं यथामति वर्णिति ॥१॥***
***। तैं गुरु परिजन सचिव महीपति । स्नेहशोकवश बिकल सकल अति ॥२॥***
***। धीर धरुनि भरता वाखाणिति । सुभटां दरोग्यांस बोलाविति ॥३॥***
***। घर-पुर-देशिं सुरक्षक राखुनि । हय गज रथ बहु यानें साजुनि ॥४॥***

**अर्थ** - दूतांनी परत येऊन भरताची कृति व दशा जनकांच्या समाजात यथामति वर्णन करून सांगितली.॥१॥ तेव्हा (ते ऐकून) गुरु (शतानंद) राजपरिवार, सचिव, महीपति व इतर सगळे लोक (सकल) स्नेहाने व शोकाने अति व्याकुळ झाले.॥२॥ धीर धरून जनकराजांनी भरताची प्रशंसा केली आणि चांगले वीर व दरोगे यांना बोलावून घेतले.॥३॥ घर, नगर व देश यांच्या संरक्षणासाठी चांगले रक्षक ठेऊन हत्ती, घोडे, रथ व इतर वाहने सज्ज करविली.॥४॥

**टीका.** - (१) **यथामति** - भरताची कृति व दशा यांचे यथार्थ वर्णन आम्हालाच काय जगात कोणालाच करता येणार नाही; तथापि आम्ही आमच्या अल्पमतिप्रमाणे यथाशक्ति सांगतो असा उपक्रम करून दूतांनी सर्व हकीगत सांगितली. **(क)**

भरताच्या **स्नेहाने** व रामवनवासाच्या अटी वगैरे ऐकून **शोकाने** सर्वच व्याकुळ झाले. **(ख) सुभटांना** बोलावून घरपुरदेश यांच्या संरक्षणाविषयी आज्ञा सेनापति वगैरेंना पाठविल्या व **दरोग्यांना** बोलावून हत्ती, घोडे वगैरे वाहने सज्ज करण्याविषयी आज्ञा दिल्या. **'भरत दरोगे आणवि सगळे'** (१।२९८।३) टी.पहावी. जनकराजांना निघण्याची फार घाई असल्याने कवींनी हे वर्णन थोडक्यात केले.

*हिं.* ***। दुघरी साधि चले ततकाला । किए बिश्रामु न मग महिपाला ॥५॥***
***। भोरहिं आज नहाइ प्रयागा । चले जमुन उतरन सबु लागा ॥६॥***
***। खबरि लेन हम पठए नाथा । तिन्ह कहि अस महि नाथउ माथा ॥७॥***
***। साथ किरात छ सातक दीन्हे । मुनिबर तुरत बिदा चर कीन्हे ॥८॥***

*म.* ***। द्विघटि साधुनी शीघ्र निघाले । कृत विश्राम न पथिं महिपालें ॥५॥***
***। स्नान पहाटे प्रयागिं उरकति । निघुनि उतरुं यमुना सब लागति ॥६॥***
***। आम्हां सबरिस धाडिति नाथा । असें म्हणुनि महिं नमिती माथा ॥७॥***
***। सहा सात सह किरात धाडिति । चरां परत मुनिनाथ पाठविति ॥८॥***

**अर्थ** - मुहूर्त (द्विघटि) साधून महिपाल शीघ्र (तत्काळ) निघाले व त्यांनी मार्गात (विश्राम =) झोप, विश्रांति घेतली नाही.॥५॥ (आज) पाहटेस प्रयागांत स्नान करून निघाले व सर्व यमुना उतरूं लागले - ॥६॥ तेव्हां नाथ ! आम्हाला खबरीसाठी पाठविले; असे म्हणून दूतांनी जमिनीवर मस्तक नमवून नमस्कार केला.॥५॥ मुनिनाथांनी सहा सात किरातांना त्यांच्याबरोबर दिले (धाडले) व दूतांना (निरोप दिला) परत पाठविले.॥८॥

**टीका. चौ. ५-६ (१) द्विघटि साधुनी - द्विघटी =** दोन घटका; दोन घटकांचा एक मुहूर्त होतो; म्हणून येथे द्विघटि (दुधरी) = मुहूर्त, साधून निघाले इतकाच अर्थ आहे. दिवसाच्या १५ मुहूर्तांच्या नावात द्विघटि हे विशेष नाव नाही. **(क) कृत विश्राम न -** झोप व विश्रांती घेतली नाही इतकाच अर्थ आहे. **विश्राम =** मुक्काम, वस्ती हा अर्थ मानसांत प्रवासवर्णनात नाही. 'वांस' करणे, वसणे हे शब्द त्या अर्थाने वापरले आहेत. विश्रामगृह = शयनगृह (१।३५५) विश्राम करणे = झोप, विश्रांति घेणे (२।२०) जनकपुरीपासून प्रयाग सोडून यमुना नदीपर्यंतच्या प्रवासांस कुठेच (मुक्काम) वस्ती केली नाही, असे मानणे अव्यवहार्य व हास्यास्पद ठरेल. येथे विश्राम न करण्यात फक्त महिपालाचाच उल्लेख आहे; व यमुना उतरू लागण्यात 'सब' आहे. याने सुचविले की राजांना रात्री निद्रा

नाही, दिवसा विश्रांति नाही. सारांश हा की **'भूक न दिनिं निशिं निद्रा नाहीं'** अशी दशा ज्यांना विदेह म्हणतात त्यांची झाली आहे, असे दूतांनी सुचविले.

**चौ.** ७-८ (१) **आम्हां खबरिस धाडिति** - रघुनाथ कुठे राहतात, भरत वगैरे कुठे उतरले आहेत वगैरे माहिती मिळविण्यासाठी आम्हाला पुढे पाठविले. **(क) असें म्हणुनि महिं नमिती माथा** - सुचविले की आता आम्हाला खबर देण्यास परत गेले पाहिजे, तरी आम्हाला निरोप द्यावा. आल्यावर व परत निघताना प्रणाम करणे हा शिष्टाचार आहे. **(ख) सहा सात सह किरात धाडिति** - जनकराजा मंदाकिनीजवळ आले की या किरातानी चटकन पुढे येऊन खबर द्यावी या हेतूने तशी सूचना देऊन पाठविले; हे **'श्रवुनि येति मिथिलेश'** (२७४) मिथिलेश येत आहेत असे ऐकून यापुढील उल्लेखाने स्पष्ट आहे. शिवाय जवळचा रस्ता हे दाखवू शकतील या दूतांना व त्यांना लवकर जाता येईल. **वि. ल. टे.** ज्या दिवशी हे जनकदूत परत गेले त्याच दिवशी जनकराजा आले नाहीत हे पुढे स्पष्ट दाखविले आहे; म्हणजेच यमुनापार आल्यावर मधे एक रात्र वस्ती करून आले हे अगदी साधार ठरते. प्रयागात पाहटेस स्नान केले व निघाले यावरून एक मुक्काम प्रयागांत केला हेही ठरतेच.

*हिं.दो.* ***। सुनत जनक आगवनु सबु हरषेउ अवध समाजु ॥***
***॥ रघुनंदनहि सकोच बड़ सोच बिबस सुरराजु ॥२७२॥***

*हिं* ***। गरइ गलानि कुटिल कैकेई । काहि कहइ केहि दूषन देई ॥१॥***
***। अस मन आनि मुदित नर नारी । भयउ बहोरि रहब दिन चारी ॥२॥***
***। एहि प्रकार गत बासर सोऊ । प्रात नहान लाग सब कोऊ ॥३॥***

*म.दो.* ***। जनकागमना ऐकुनी हर्षित अवध समाज ॥***
***॥ रघुनंदन संकोचती अति सचिंत सुरराज ॥२७२॥***

*म.* ***। ग्लानिगलित कुटिला कैकेई । सांगे कोणा दूषण देई ? ॥१॥***
***। असें गणुनि मनिं मुदित नारी नर । राहुं चार दिन होइ फार बरं ॥२॥***
***। अशापरीं तो वासर सरला । प्रातःस्नाना समाज वळला ॥३॥***

**अर्थ** - जनकांच्या आगमनाची बातमी ऐकून सर्व अयोध्या समाजाला हर्ष झाला. रघुनंदनास अति संकोच वाटू लागला; व सुरराजाला अति चिंता पडली. ॥ दो. २७२ ॥ कुटिल कैकई ग्लानीनें गळून गेली (हातपाय गळले); पण सांगणार कोणाला व दोष कोणाला देणार ! ॥१॥ स्त्रीपुरुषांनी असा विचार

केला की फार बरं झालं; (या निमित्ताने) आणखी चार (काही) दिवस राहू तरी (राहण्यास सापडेल) म्हणून त्यांना आनंद झाला.।।२।। अशा प्रकारे तो दिवस गेला; व प्रातःकाळ होतांच सर्व लोक स्नानाला जाऊ लागले.।।३।।

**टीका. दो. (१)** एकाच कारणामुळे निरनिराळ्या व्यक्ती व समाज यांच्यावर कसे भिन्न भिन्न परिणाम होतात हे येथे पुन्हा दाखविले. **(क) अयोध्यावासी** लोकांना वाटले की आता कदाचित सासऱ्यांच्या सांगण्याने तरी परत येतील अयोध्येत. निदान या निमित्ताने आणखी चार आठ दिवस राहता तरी येईलच ! यामुळे आनंद झाला. **(ख) रघुनन्दन** - हे नाव यथार्थ करावयाचे म्हटले तर जनकराजांनी सांगितल्यावर काही बोलतासुद्धा येणार नाही. गुरुमहाराज भरताच्या स्नेहाला वश झालेच आहेत; तसेच हेही होणारच ! भरताचे भाषण ऐकून संकोच वाटून स्तब्ध झालेच होते. आता अति संकोच वाटू लागला हे स्वाभाविक आहे. उपाधि जास्त दिवस राहणार हाही संकोच. रडारड, शोक, विलाप यांचे पूर वाहणार ! **(ग) देवराज इंद्राला अति चिंता** - भीती जी - भरताविषयी प्रथम वाटली तशीच पण अति वाटू लागली. वसिष्ठसुद्धा जनकांपुढे काही बोलू शकणार नाहीत; काय होते कोणास ठाऊक !

**चौ. १ (१) ग्लानि गलित कुटिला कैकेई** - आपल्या कुटिल करणीचा तिला फारच पश्चात्ताप होऊ लागला. आता विहिणी आल्या की मी कर्मचांडाळीण त्यांना तोंड तरी कसे दाखवू ? पुन्हा कुटिल, कठोर इत्यादी शब्दांचा पाऊस पडणार ! माझ्या कुटिल करणीच्या दोषांचे खापर कोणाच्या माथी फोडीन म्हटले तर कोणाचे नाव पुढे करू ? त्या कुबडीचे ? छे छे ? लोक माझ्याच तोंडावर थुंकतील की त्यानीच, कुलहीन दासीवर विश्वास ठेवलाच कसा ? कोणाला दोष द्यायला जागा नाही; कोणाजवळ हृदय मोकळे करण्यास स्थान नाही असे झाले आहे.

**चौ. ३ (१) तो वासर सरला** - हे मुद्दाम येथे सांगून **सुचविले की जनकराज आज आले नाहीत; कुठेतरी वाटेत वस्ती केली.** नदीवर स्नानाला गेले. दुसऱ्या दिवशी सकाळीच; पण तेथेसुद्धा जवळपास जनकराजा उतरलेले दिसले नाहीत. **सूचना** - आता जनकराज येईपर्यंत मुख्य विषयाची चर्चा बंद पडली; म्हणून या लोकांच्या दिनचर्येतील जो भाग पूर्वी वर्णन करण्यास सवड मिळाली नाही त्याचे वर्णन आता करतात -

हिं. ***। करि मज्जन पूजहिं नर नारी । गनप गौरि तिपुरारि तमारी ॥४॥***
***। रमा रमन पद बंदि बहोरी । बिनवहिं अंजुलि अंचल जोरी ॥५॥***
***। राजा रामु जानकी रानी । आनँद अवधि अवध रजधानी ॥६॥***
***। सुबस बसउ फिरि सहित समाजा । भरतहि रामु करहुँ जुवराजा ॥७॥***
म. ***। स्नान करुनि पूजिति नर नारी । गणपति गौरि पुरारि तमारी - ॥४॥***
***। रमारमण, चरणां मग वंदुनि । विनविति सांजलि, पदरां पसरुनि ॥५॥***
***। राजा राम जानकी राणी । अवध मोद अवधी नृपधानी ॥६॥***
***। स्ववश वसो सुखिं सहित समाजा । राम करोत भरत युवराजा ॥७॥***

**अर्थ** - स्त्रिया व पुरुष स्नान करून गणपति गौरी (देवी) पुरारी (त्रिपुरारि-शिव) सूर्य (तमारि) व रमारमण (विष्णु) यांची पूजा करू लागले; मग चरणांस वंदन करून पुरुष हात जोडून व स्त्रिया पदर पसरून विनवितात (प्रार्थना करून मागतात) की - ॥४-५॥ राम राजे होवोत; जानकी राणी होवो, व आनंदाची सीमा अशी राजधानी (नृपधानी) अयोध्या (अवध) समाजासहित स्वतंत्रतेत व सुखात (पहिल्यासारखी) वसो; आणि राम भरतांस युवराज करोत.॥६-७॥

**टीका. चौ.** ४-५ (१) पाचव्या चौपाईतील 'रमारमण' शब्द मागल्या 'तमारी'ला जोडून घ्यावा, म्हणजे अर्थसंगति नीट लागते. अन्यथा एका देवाची पूजा व कोणातरी दुसऱ्याला वंदन व प्रार्थना अशी विसंगति निर्माण होते. ज्या मुख्य देवाची पूजा केली त्याच्या चरणांना वंदन करून प्रार्थना करू लागले. **(क) गणपति गौरि पुरारि तमारी व रमारमण** - या पंचायतन पूजेतल्या पाच देवता आहेत. जो ज्याचा मुख्य देव असेल त्याला मधे मांडतात व तदनुसार इतर चार देव कुठे कोणत्या क्रमाने मांडावयाचे हे शास्त्राने ठरविलेले आहे. त्याप्रमाणे पाहता येथील क्रम कोणत्याही एका पंचायतनाचा ठरत नाही. शेवटी विष्णूचा उल्लेख असला तरी विष्णुप्रमुख पंचायतनाचा क्रमही येथे जमत नाही. पंचायतनांचा क्रम पहा :

पूर्व

| | | | | |
|---|---|---|---|---|
| शिव ग<br>विष्णु<br>देवी सू | वि. सू.<br>शिव<br>देवी ग | शिव ग.<br>सूर्य<br>दे. वि. | वि. शि<br>देवी<br>सू. ग | वि. शिव<br>गणपति<br>दे. सू |

कोणी क्रम ईशान्येकडून घेतात (धर्मसिंधु) तर कोणी आग्नेयीकडून घेतात (रा.चं.) पण दोन्ही पद्धतींत देवांची स्थाने वर दाखविलेलीच आहे. कोणत्याही एका पंचायतनाचा क्रम येथे जुळत नाही. शिवाय स्त्रियांना पंचायतन पूजेचा अधिकार नाही; कारण त्यांत शालिग्राम व बाण असतात. म्हणून असे मानावे लागते की कोणी एकाच कोणत्या तरी देवाची पूजा करतात, कोणी आपल्या कुळातील पद्धतीने जे पंचायतन असेल त्याची पूजा करतात व स्त्रीशूद्रादि या देवतांच्या मूर्तीपैकी आपल्या नित्याच्या पद्धतीप्रमाणे करीत आहेत.

**ल.टे.** - हे सर्व पुरवासी रामभक्त आहेत; राम परमात्मा आहेत हे वसिष्ठांच्या भाषणाने सर्वांना चांगले कळले आहे; तरी कुलपरंपरेप्रमाणे देवपूजा करीत आहेत. देवपूजा हा गृहस्थांचा व्यक्तिधर्म आहे. प्रत्येकाने देवपूजा केली पाहिजे हे दाखविले. **या पूजेने यांच्या अनन्य रामभक्तीत व्यत्यय आला नाही हे नीट लक्षात ठेवावे.** सर्वांनी वनात येतानासुद्धा देव बरोबर आणले आहेत. भक्तीत व्यभिचार न होण्याचे कारण एकच की या पूजेतील देवांजवळ कोणी इतर काही मागत नसून रामभक्तीच मागत आहेत.

**चौ. ६-७ (१) अवध मोद-अवधी** - अवध = अयोध्या. मोदअवधी = आनंदाची सीमा. **(क) स्ववश वसो सुखिं** - हिंदीतील 'सुबस' शब्द क्लिष्ट आहे. सुवस व स्ववश असे दोन अर्थ आहेत. सुवस = उत्तम प्रकारे वसलेली, सुखांत वसलेली. दशरथराजांनी जे भाकीत केले आहे तेच लोक मागत आहेत. **'स्ववश वसेल पुन्हां पुरि शोभन । राम सकलगुणनिधिचें शासन.'** (२।३६।३) **(ख) राम करोत भरत युवराजा** - हे मात्र दशरथांनी म्हटले नाही; व चित्रकूटास येण्यापूर्वी हे लोकही म्हणाले नसते. या प्रार्थनेवरून लोकांच्या भरतप्रेमाची परमवृद्धी झाल्याचे दाखविले.

*हिं.* *। एहि सुख सुधाँ सींचि सब काहू । देव देहु जग जीवन लाहू ॥८॥*

*हिं.दो.* *। गुर समाज भाइन्ह सहित राम राजु पुर होउ ॥*
*॥ अछत राम राजा अवध मरिअ माग सब कोउ ॥२७३॥*

*म.* *। सकलां या सुखसुधें सिंचणे जीवन-लाभ देव जगीं देणें ॥८॥*

*म.दो.* *। गुरु समाज बंधू सहित रामराज्य नगरांत - ॥*
*॥ होवो असतां राम नृप अयोध्येंत देहान्त ॥२७३॥*

**अर्थ** - देवा ! या सुखरूपी सुधेचे सर्वांवर सिंचन करावे व जगात जन्म

घेतल्याचा लाभ द्यावा.॥८॥ गुरु, सर्व समाज व रामबंधू यांच्या सहित अयोध्या नगरीत रामराज्य होवो; व राम राजे असता अयोध्येतच मरण येवो. (देहान्त होवो) (अशी प्रार्थना) सर्व करीत आहेत).॥दो.२७३॥

**टीका. चौ. ८ (१) या सुखसुधें** - मागल्या दोन चौपायांत वर्णन केल्याप्रमाणे घडणे म्हणजे सुखरूपी अमृतच सर्वांच्यावर शिंपडणे आहे; व हाच जन्माला येऊन मिळवावयाचा मुख्य लाभ आहे असे लोकांस वाटत आहे. धर्मविरोधी कलिराज्यांत (कलि = कलह) राहण्याची इच्छा कोणालाही नाही. रामवियोगाने अयोध्येची दशा कशी झाली आहे याचे वर्णन पूर्वी (८३।५-८) केले आहे ते पहावे.

**दोहा. (१) राम नृप असतां अयोध्येत मरण मागतात.** एक भाव हा आहे की आमच्या सर्वांपेक्षा रामचंद्रांना आयुष्य अधिक द्यावे. अयोध्येत मरण आल्याने पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही व रामधामाची प्राप्ति होते. 'मम धामदा पुरीं सुखराशी' (७।४।७।) असे रामच म्हणतात. 'त्यजि तनु अवधिं, न ये संसारां' (१।३५।४).

***श्रीमानस गूढार्थ चंद्रिका अयोध्याकाण्ड अध्याय २५ वा समाप्त.***



## अध्याव २६ वा.

हिं. *। सुनि सनेहमय पुरजन बानी । निंदहि जोग बिरति मुनि ग्यानी ॥१॥*
*। एहि बिधि नित्य करम करि पुरजन । रामहि करहिं प्रनाम पुलकि तन ॥२॥*
*। उँच नीच मध्यम नर नारी । लहहिं दरसु निज निज अनुहारी ॥३॥*
*। सावधान सबहीं सनमानहिं । सकल सराहत कृपानिधानहि ॥४॥*
*। लरिकाइहि तें रघुबर बानी । पालत नीति प्रीति पहिचानी ॥५॥*

म. *। श्रवुनी स्नेहल पुरजन-वाणी । निंदिति योग-विरागां ज्ञानी ॥१॥*
*। नित्यकर्म यापरीं करुनि जन । रामाला प्रणमति पुलकित तन ॥२॥*
*। उच्च नीच मध्यम नर नारी । घेती दर्शन यथाधिकारीं ॥३॥*
*। सावधान सकलां सन्मानिति । सकलहि कृपानिधाना वानिति ॥४॥*
*। रघुवर - बाणा आबालकपण । प्रीति ओळखुनि नीति सुरक्षण ॥५॥*

**अर्थ** - अयोध्यावासी लोकांची ती स्नेहपूर्ण (स्नेहल, स्नेहमय) वाणी ऐकून ज्ञानी (मुनि) आपल्या योगाची व वैराग्याची निंदा करू लागले.॥१॥ याप्रमाणे पुरवासी लोक (प्रातः काळाचे) नित्यकर्म करून पुलकित शरीराने रामचंद्रांस प्रणाम करतात.॥२॥ उच्च नीच व मध्यम (वर्गाचे) स्त्रीपुरुष आपापल्या अधिकाराप्रमाणे रामाचे दर्शन घेतात.॥३॥ प्रभु सावधानपणे सर्वांचा (यथायोग्य) सन्मान करतात; व सर्वच कृपानिधानाची प्रशंसा करतात.॥४॥ बालपणापासूनच रघुवराचा हा बाणा आहे की प्रीति ओळखून नीतीचे उत्तम रक्षण करावयाचे.॥५॥

**टीका. चौ. १-४ (१) निंदिति योग विरागां ज्ञानी - भक्तिविहीन ज्ञानवैराग्यापेक्षां प्रेमभक्तीचे श्रेष्ठत्व येथे दाखविले.** २२०।५ मध्ये भरताची प्रेमदशा पाहून मुनिसिद्ध त्यांची प्रशंसा व स्वतःची निंदा करू लागले आहेत. (२२०।५ टी.प.) येथे पुरवासी लोकांच्या प्रेमदशेला पाहून ज्ञानीमुनि, तपस्वी, विरागी आपली निंदा करू लागले. **(क) नित्यकर्म करुनि** - येथे सकाळी उठल्यापासूनचा या लोकांचा नित्यक्रम सांगत आहेत. स्नानसंध्यापूजादि प्रातःकाळचे ज्याचे त्याचे वर्णाश्रमोचित कर्म समाप्त करून मग रामदर्शनाला जातात. आपापल्या अधिकाराप्रमाणे प्रेमाने वंदन करतात. प्रभूला नमन करताना अंगावर रोमांचादी सात्विक भाव प्रगट न होतील तर जन्म व्यर्थ होय (दोहा. ४२) हे वारंवार टीकेत दाखविले आहे. येथे नमन करताना लोकांच्या देहावर रोमांच उठत आहेत. **(ख) उच्च नीच**

**मध्यम** - वयाने वा नात्याने, अधिकाराने रामापेक्षा मोठे, लहान व बरोबरीचे हा एक अर्थ होतो आणि ब्राह्मण क्षत्रिय वैश्यादि अधिकारानुसार उत्तम, मध्यम, कनिष्ठ हा दुसरा अर्थ आहे. स्त्रिया त्यांच्या अधिकाराप्रमाणे वंदन करून दर्शन घेतात. सार हे की सर्व लोक रामापेक्षा मोठे, ब्राह्मण इ. सुद्धा दर्शन घेतल्याशिवाय रहात नाहीत. **(ग) सावधान सकलां सन्मानिति – कृपानिधाना** सन्मान देणे व कृपानिधान यांचा संबंध जोडला व सुचविले की ज्याच्या त्याच्या पात्रतेप्रमाणे कृपा करतात व ज्याच्या त्याच्या अधिकाराप्रमाणे आदर सत्कार करतात; ब्राह्मणांस वंदन करतात. लहानांस कुशल विचारतात. बरोबरीच्यांस भेटतात इ. यांत कधी प्रमाद करीत नाहीत.

**चौ. ५ (१) प्रीति ओळखुनि नीति सुरक्षण** - या चरणाचा संबंध मागल्या चौपाईतील 'सन्मानिति'शी आहे. प्रीती पुष्कळ असली किंवा कमी असली तरी व्यावहारिक नीतीचे पालन उत्तम प्रकारे करतात. १।२८।६-११ मध्ये टीकेत विस्तार पहावा.

*हिं.* *। सील सकोच सिंधु रघुराऊ । सुमुख सुलोचन सरल सुभाऊ ॥६॥*
*। कहत राम गुन गन अनुरागे । सब निज भाग सराहन लागे ॥७॥*
*। हम सम पुन्य पुंज जग थोरे । जिन्हहि राम जानत करि मोरे ॥८॥*

*हिं.दो.* *। प्रेम मगन तेहि समय सब सुनि आवत मिथिलेसु ॥*
*॥ सहित सभा संभ्रम उठेऊ रबिकुल कमल दिनेसु ॥२७४॥*

*म.* *। राम शील-संकोच-सागरहि । सुमुख सुलोचन ऋजू स्वभावहि ॥६॥*
*। वदत राम गुण गण अनुरागति । निज भाग्या सगळे स्तवुं लागति ॥७॥*
*। पुण्य-पुंज आम्हांसम थोडे । ज्यांस राम मानिति 'मम' कोडें ॥८॥*

*म.दो.* *। प्रेम मग्न त्या समयिं सब; श्रवुनि येत मिथिलेश ॥*
*॥ सभेसहित सत्वर उठति रविकुल कमल दिनेश ॥२७४॥*

**अर्थ** - राम (रघुराऊ) शील व संकोच याचे सागर आहेत, सुंदर मुखांचे व सुंदर नेत्रांचे आहेत व स्वभावही सरळ आहे.॥६॥ (याप्रमाणे) रामचंद्रांच्या गुण समूहांचे वर्णन करता करता अनुरागयुक्त झाले व सर्वच (लोक) आपल्या भाग्याची प्रशंसा करू लागले की - ॥७॥ ज्यांस राम प्रेमाने 'माझे' म्हणून मानतात असे आमच्यासारखे पुण्यराशी (जगात) थोडेच असणार ! ॥८॥ सर्व लोक असे प्रेममग्न झाले आहेत अशा त्या समयीं; मिथिलेश येत आहेत असे

ऐकून रवि कुळरूपी कमलांचे सूर्य (राम) त्वरेनें (गडबडीनें) सभेसहित उठले.॥२७४॥

**टीका. चौ. ६ (१) शीलसागर** - सर्वांचा मान राखतात, कोणाचाही अपमान, तिरस्कार करीत नाहीत. **संकोच सागर** - भक्तांवर कितीही कृपा केली तरी थोडीच वाटते. आपल्या गुणांची स्तुती ऐकून संकोच वाटतो, धर्मनीतिविरुद्ध वागण्यास संकोच वाटतो; स्वतःमुळे कोणास दुःख होईल याबद्दल संकोच वाटतो. **सुमुख** - मुख सुन्दर आहे; स्वतःच्या दुःखानी अप्रसन्न होत नाही. मृदु, मधुर, सत्य, प्रिय बोलतात व मन चोरून घेतात. **सुलोचन** - ज्याच्याकडे हसत पाहतील त्याच्या हृदयांतील सर्व दुःख, संताप, चिंता नष्ट होतात. (२३९।८५)

**चौ. ७-८ (१) वदत रामगुणगण अनुरागति - रामानुराग प्राप्तीचे एक साधन रामगुणगणगान करणे आहे** हे येथे दाखविले. नमुना ७।३०।१ पासून पुढे पहावा. **(क) पुण्यपुंज आम्हांसम थोडे** - भाव हा की विरळाच कोणी सापडतील. यांच्यासारखे जिथे थोडे थोडे तिथे यांच्यापेक्षा अधिक कुठे असणार ! याचे कारण राम यांना 'माझे' समजतात. **'प्रभु ममता थोडि न ज्यांवरती'** (१।१६।२) असे ग्रंथारंभी म्हटले. **'प्रिय अति मज येथले निवासी'** (७।४।७) असे अयोध्यावासी लोकांविषयी राम म्हणाले. **'रामाचे म्हणविति सकल राम आस सकलांस ॥ राम म्हणति ज्या आपला त्या भज तुलसीदास'** (दोहा. १४१). अशा रीतीने स्वतःच्या भाग्याची स्तुती करणे हे प्रभुस्तुति करणेच आहे. कोडे = प्रेमाने.

**दो. (१)** जे किरात दूतांच्या बरोबर पाठविले होते त्यांनी येऊन वर्दी दिली की **'येत मिथिलेश'** इतके ऐकताच राम गडबडीने उठले; तेव्हा सभाही उठली. सूर्य उगवला म्हणजे कमले प्रसन्न होतात तसे राम उठून उभे राहिल्याबरोबर रविकुल प्रसन्न झाले. सामोरे जाऊन आणण्यासाठी उठले.

## जनकराजागमन (२७५।१-२८१।१)

*हिं.* *। भाइ सचिव गुर पुरजनन साथा । आगें गवनु कीन्ह रघुनाथा ॥१॥*
*। गिरिबरु दीख जनकपति जबहीं । करि प्रनामु रथ त्यागेउ तबहीं ॥२॥*
*। राम दरस लालसा उछाहू । पथ श्रम लेसु कलेसु न काहू ॥३॥*
*। मन तहँ जहँ रघुबर बैदेही । बिनु मन तन दुख सुख सुधि केही ॥४॥*
*। आवत जनकु चले एहि भाँती । सहित समाज प्रेम मति माती ॥५॥*

म. *। बंधु सचिव गुरु पुरजन साथ । पुढें गमन करिती रघुनाथ ॥१॥*
*। गिरिवर बघती जनकपती जेव्हां । नमन करुनि सोडिति रथ तेव्हां ॥२॥*
*। राम - दर्शनोत्साह लालसें । कुणा पथश्रम कष्ट लव नसे ॥३॥*
*। मन तिथ जिथ रघुवर वैदेही । विण मन तन सुखदुःख कसें ही ॥४॥*
*। येताहेत असे मिथिलापति । सहित समाजा प्रेममस्त मति ॥५॥*

**अर्थ** - बंधु, सचिव, गुरु वसिष्ठ व पुरवासी लोक यांना बरोबर घेऊन रघुनाथांनी पुढे गमन केले. ॥१॥ जनकपतींनी (कामद) गिरिवर पाहिला तेव्हां नमस्कार करून रथांतून खाली उतरले (रथाचा त्याग केला.) ॥२॥ रामदर्शनाच्या लालसेने व उत्साहाने (पायी) प्रवासाचे श्रम किंवा कष्ट कोणालाच होत नाहीत. ॥३॥ जिथे रघुवर वैदेही आहेत तिथें (सर्वांचे) मन आहे; (मग) मना शिवाय तनूचे सुखदुःख कसे होणार? ॥४॥ असे समाजा सहित मिथिलापति चालत येत आहेत व त्यांची बुद्धी प्रेम (मदाने) मस्त झालेली आहे. ॥५॥

**टीका चौ. १-३ - (१) बंधु** बरोबर कोण घेतले व सीतेच्या संरक्षणाची काय व्यवस्था केली याचा विशेष उल्लेख नाही म्हणून पूर्वी प्रमाणेच शत्रुघ्नास ठेऊन भरत व लक्ष्मणांस बरोबर घेतले असे समजावे; किंवा सीता कौसल्येच्याजवळ असल्याने तिच्या संरक्षणाची निराळी व्यवस्था करण्याची आवश्यकता नसल्याने **सर्वांनाच घेतले बरोबर असे समजणे अधिक चांगले** कारण सीता कौसल्येजवळ असल्याचा उल्लेख पुढे आहे. **(क) जनकपति** - राम जसे रघुकुळाचे स्वामी व पालनकर्ते म्हणून रघुपति, तसे जनक कुळाचे स्वामी व पालन कर्ते म्हणून सीरध्वज जनकपति. **(ख) गिरिवर** कामदगिरि, (२२५।६ टी. पहा.) व दो. २२४ पासून पुढे पहा. भरतादिकांची जशी दशा झाली आहे तशीच येथे जनकपति व त्यांचा समाज यांची झाली आहे. जनकराज रथांतून उतरून चालू लागल्यावर सर्वच लोक चालू लागले. 'भूक न दिनिं निशिं निद्रा नाहीं' हे भरतजनक साम्य दूत मुखाने आधीच कळले आहे.

**चौ. ४ (१) रघुवर वैदेही** - रघुवर असल्याने राम आपली प्रतिज्ञा मोडून परत येतील हे शक्य वाटत नाही असा निराशामय विचार मन करीत आहे. त्या वनवासाच्या अतिकष्टांनी अति सुकुमारी व परम ऐश्वर्यभोगांत वाढलेली सीता आता इतकी कृश व अशक्त झाली असेल की देह-विरहित (वैदेही) होण्यास फारसा काळ लागणार नाही. असेही विचार जनकपतींचे मन करीत

आहे. जनककुळांतील सुंदर कोमल मुलीचे काय होणार? **(क) विण मन तनसुखदुःख कसें ही ?** - मन जर एखाद्या विषयांत पक्के गुंग - मग्न झाले असेल तर इंद्रियांनी होणारे देहाच्या सुखदुःखाचे ज्ञान (भान) जीवाला होत नाही. दाखविले की **जागतिक सुखदुःखांपासून मुक्तता-सुटका व्हावी असे वाटत असेल तर मन रघुवर वैदेहींच्या चिंतनांत मग्न ठेवण्याची सवय केली पाहिजे. ॥ मन एव मनुष्याणां कारणं सुखदुःखयोः** ॥ हा सिद्धान्त पुन्हा सुचविला.

*हिं.* ***। आए निकट देखि अनुरागे । सादर मिलन परसपर लागे ॥६॥***
***। लगे जनक मुनिजन पद बंदन । रिषिन्ह प्रनाम कीन्ह रघुनंदन ॥७॥***
***। भाइन्ह सहित रामु मिलि राजहि । चले लवाइ समेत समाजहि ॥८॥***

*हिं. दो.* ***। आश्रम सागर सांत रस पूरन पावन पाथु ॥***
***॥ सेन मनहुँ करुना सरित लिएँ जाहिं रघुनाथु ॥२७५॥***

*म.* ***। आले जवळ बघुनि अनुरागति । सादर भेटुं परस्पर लागति ॥६॥***
***। करिति जनक मुनिजनपदिं वंदन । प्रणमन करिति ऋषिंस रघुनंदन ॥७॥***
***। राम बंधुंसह भेटुनि राजा । घेउनि जाति समेत समाजा ॥८॥***

*म. दा.* ***। आश्रम - सागर शान्तरस पूरित पावन पाथ ॥***
***॥ सेना जणुं करुणासरित नेति सवें रघुनाथ ॥२७५॥***

**अर्थ** - जवळ आले तेव्हा (एकमेकांस) पाहून अनुरागाचे भरते सर्वांनाच आले व आदराने एकमेकास भेटू लागले. ॥६॥ जनकराजांनी वसिष्ठादि मुनिजनांच्या पायांना वंदन केले व रघुनंदनाने (बंधूंसह) विश्वामित्रादि ऋषींना प्रणाम केला. ॥७॥ भावासह राम जनकराजांना भेटले व त्यांच्या समाजासह त्यांना घेऊन (आश्रमाकडे) चालले ॥८॥ श्री रामाश्रम हा सागर आहे; तो शान्तरसरूपी पवित्र जलाने (पाथ, सं. पाथस्) परिपूर्ण भरलेला आहे; जनकांचा समाजरूपी सेना जणू करुणानदी आहे व रघुनाथ तिला बरोबर घेऊन जात आहेत ॥दो. २७५॥

**टीका - चौ. ७-८ - (१) मुनिजन** - सामोरे जाण्यास निघाले तेव्हा फक्त 'गुरु'चाच उल्लेख केला आहे. येथे मुनिजन - मुनिसमुदाय असा उल्लेख करून सुचविले की वसिष्ठांबरोबर अयोध्येतून आलेला व चित्रकूटचा असा सर्व मुनि समुदाय आला. **(क) प्रणमन करिति ऋषिंस रघुनंदन** - शतानंद, विश्वामित्रादि जे ऋषि, मुनि जनकांबरोबर आले आहेत त्यांना प्रणाम राम व बंधु यांनी

केला. **(ख) राम बंधुसह भेटुनि राजा** - भाव हा आहे की राम व बंधू यांनी जनकराजांस प्रणाम केला व जनकराजा चौघांना क्रमाने भेटले. कारण लहानांनी मोठ्यांस प्रणाम केल्यावर मोठे लहानांस भेटतात, असे पूर्वी अनेक वेळा दाखविले आहे; म्हणून येथे अति संक्षेप केला आहे. **(ग)** कोणीकोणासच आशीर्वाद दिला नाही की कुशल विचारले नाही; हा प्रेममग्न झाल्याचा परिणाम आहे.

## आश्रमसागर शान्तरस..... नेति सवें रघुनाथ. (दो. २७५)

(१) येथून पुढे दो. २७६ पर्यंत हे रूपक आहे. यांत करुणानदीचे वर्णन आहे. राजा भगीरथ जसे गंगेला येऊन सागरापर्यंत गेले तसे रघुनाथ करुणानदीला घेऊन आश्रमरूपी सागरापर्यंत जाण्यास निघाले आहेत. **(क) शान्तरस -** आश्रमरूपी सागर शान्तरस रूपी, **'पावन पाथ पूरित'** - पाथ, जल (संकृत पाथस्) आहे, पवित्र जलाने भरलेला आहे. या आश्रमांत निवास करणाऱ्या सीतारामलक्ष्मणांना प्रपंचापासून पूर्ण निर्वेद उत्पन्न झाला आहे. दया क्षमा शांती इत्यादींचा सतत निवास असून, कामक्रोधादि, खळबळ उडविणाऱ्या आठरसांच्या नद्या यांत येऊन मिळत नसून अनेक दिशांनी जशा अनेक नद्या सागरास येऊन मिळतात तसेच शान्तरसाचे नदनदीस्वरूप असणारे ऋषिमुनि येथे जमत असतात. ज्ञानवैराग्य, शमादि षट्क संपत्ति, मुमुक्षुता, मोक्ष, परमार्थ यांचीच चर्चा येथे चालते. **(ख) पावन पाथ पूरित** - सागराचे पाणी खारे असून त्याला जे पावित्र्य आले आहे ते पुण्यपाथसरितां–मुळेच, पृथ्वीवरील सर्व तीर्थे जशीं सागरांत आहेत तसे 'भुवि पुरुपुण्यतीर्थ सदनानि ऋषयोविमदाः' (भा. १०, ८७।३५) निरहंकार झालेले ऋषी हे पृथ्वीवरील पुष्कळ पुण्यतीर्थांची सदने आहेत. व 'सर्वदेवमयोहरिः' भगवान नारायण महालक्ष्मी व शेष क्षीरसागराला सोडून या आश्रमसागराच्या मध्यभागी राहिले आहेत. (१३९।५ पहा). याप्रमाणे हा आश्रमसागर क्षीरसागरापेक्षा व क्षारसागरापेक्षा फार पवित्र आहे.

**(२) सेना जणुं करुणासरित** - जनकराजांच्या सर्वसमाजाला येथे सेना म्हटले; व दाखविले की मोठ्या मोठ्या सेनेच्यासारखा फार मोठा समाज आहे; शिवाय सरिता स्त्रीलिंगी आहे पण समाज पुल्लिंगी म्हणून समाज शब्द न वापरता सेना हा स्त्रीलिंगी शब्द वापरला. करुणारस खरोखर पावन नाही पण ही करुणानदी मात्र फार पवित्र आहे. कारण रामस्नेहांतून उगम पावलेली आहे. परम पावन

नदी भगीरथाने आणली व कपिल ऋषींच्या क्रोधाने दग्ध झालेल्या साठहजार सगरपुत्रांचा उद्धार करण्यासाठी भगीरथ तिला सागरापर्यंत घेऊन गेले.

(३) **नेति सवें रघुनाथ** - भगीरथासारखेच राम 'रघुनाथ' आहेत. कैकयीच्या क्रोधांतून निर्माण झालेल्या रामविरहरूपी अग्नीने अयोध्यावासी प्रजा दग्ध झालेली आहे; म्हणूनच जणू काय ही परमपावन करुणानदी - गंगा, रामभगीरथ त्या सागराकडे घेऊन जात आहेत. भाव हा की जनकराज वगैरे मंडळी आली म्हणजे अनिर्णीत राहिलेला प्रश्न सुटेल व सगरपुत्र जसे निजधामाला गेले तसे सर्व लोक निजधामाला (आपल्या घरी) समाधानपूर्वक जातील. ही करुणानदी अशी अद्‌भुत आहे की शान्तसागराला शोकसिंधु करून टाकील !

*हिं.* ***। बोरति ग्यान बिराग करारे । बचन ससोक मिलत नद नारे ॥१॥***
***। सोच उसास समीर तरंगा । धीरज तट तरुबर कर भंगा ॥२॥***
***। बिषम बिषाद तोरावति धारा । भय भ्रम भवँर अबर्त अपारा ॥३॥***
***। केवट बुध बिद्या बडि नावा । सकहिं न खेइ ऐक नहिं आवा ॥४॥***
***। बनचर कोल किरात बिचारे । थके बिलोकि पथिक हियँ हारे ॥५॥***
***। आश्रम ठदधि मिलीं जब जाई । मनहुँ उठेउ अंबुधि अकुलाई ॥६॥***

*म.* ***। ज्ञान-विराग तटां बुडवी ती । शोकवचन नद नाले मिळती ॥१॥***
***। शोक-उसासे समीर - लाटा । पाडिति धैर्य विटपवर काठां ॥२॥***
***। विषम बिषाद धार फोंफावत । भ्रम भय भवरे चक्र न गणवत ॥३॥***
***। नाविक बुध विद्या बडि नावहि । नाहिं लोटवत अटकळ मुळिं नहिं ॥४॥***
***। वनचर कोळि किरात बिचारे । थकित पथिक हरुनी मनिं सारे ॥५॥***
***। आश्रम - उदधिं मिळे जैं पोचुनि । व्याकुळ उठे सिंधु कीं क्षोभुनि ॥६॥***

**अर्थ** - ज्ञान व वैराग्यरूपी उंच उंच तटांना ती बुडवीत आहे व शोक व विलापरूपी नद व नाले तिला मिळत आहेत. ॥१॥ शोकाने सोडले जाणारे दीर्घ उसासे याच जणूं जोराच्या वाऱ्याने (समीराने) उठणाऱ्या लाटा आहेत. व त्या किनाऱ्यावरील धैर्यरूपी मोठ्या वृक्षांना उलथून पाडीत आहेत. ॥२॥ दुःसह विषादरूपी धार फोफावत आहे आणि भय व भ्रम हे जणू अगणित भोवरे व चक्रे आहेत. ॥३॥ विद्वान - पंडित (बुध) हे जणु नावाडी असून ब्रह्मविद्या ही मोठी नाव आहे; पण ही नौका (या नदींत) लोटवत - घालवत नाही व कशी घालावी चालवावी याची मुळीच अटकळ नाही. ॥४॥ वनवासी कोळी भिल्ल

बिचारे थकित (तटस्थ - चकित) होऊन मनांत हरून गेलेले सगळे, प्रवासी - पांथिक (पार जाऊ पाहणारे) आहेत. ।।५।। आश्रमरूपी उदधीपर्यंत पोचून त्याला मिळतांच (भेटताच) जणू समुद्र क्षुब्ध होऊन व्याकुळ होऊन गेला आहे. ।।६।।

**टीका - चौ. १ - (१) ज्ञान बिराग तटा बुडवी ती - ती =** करुणानदी. नदीला महापूर आला म्हणजे तिचे उंच उंच तट सुद्धा त्या नदीच्या पाण्यांत बुडतात. या करुणानदीत सीतारामस्नेह जल भरले आहे. हे पुढे छंदांत स्पष्ट होईल. कविता शरयू नदीत सीताराम यश जल आहे. (१।३०।११) रोष तरंगिणीत क्रोधजळ सांगितले आहे. (२।३४।१-२ पहा). ज्ञानवैराग्यरूपी दोन तटांत वाहणारे स्नेहजळ शोकाच्या महापुराने त्या दोन्ही तटांना बुडवून वहात आहे. जनक राजा व त्यांची प्रजा ज्ञानी म्हणून प्रसिद्ध आहे आणि वैराग्याशिवाय ज्ञान होऊच शकत नाही. **'ज्ञान किं होइ बिरागविण'** (७।८९।२।) सार हे की ज्ञान व वैराग्य त्या स्नेहजळांत बुडून गेले, दिसत नाहीसे झाले. **(क) शोकवचन नद नाले** मिळती नदी पुढे पुढे वहात चालली म्हणजे नदी, नद नाले तिला मिळतात, पाणी व पाण्याचा जोर वाढत जातात. शोकाने व्याकुळ होऊन जो विलाप केला जात आहे; तेच नद नाले मिळत आहेत; त्यामुळे शोक वाढत आहे.

**चौ. २ - (१) शोक - उसासे समीर लाटा** - समीर = जोराचा वारा. याने जशा मोठमोठ्या लाटा उसळतात तसेच शोकाने सोडले जाणारे उसासे या लाटा आहेत. **(क) पाडिति धैर्य विटपवर काठां - काठां =** काठावर, किनाऱ्यावर असलेले, विटप = मोठे वृक्ष पुराच्या लाटांच्या तडाक्याने उलथून पडतात. धैर्यरूपी वृक्ष ज्ञानवैराग्यरूपी किनाऱ्यांवर वाढलेले भराभर उन्मळून पडू लागले. ते शोक उसासे कानी पडताच कोणाच्याही ठिकाणी धैर्य राहिले नाही.

**चौ. ३ - (१) विषम विषाद धार फोंफावत - विषम** = कठीण, दुःसह. धीर असता विषाद = दुःख सोसतां आले असतें पण तो आधीच वहात गेला आहे. त्यामुळे दुःख दुःसह झाले आहे. महापुरांत नदीची धार फोंफो सोसो, ध्वनि करीत असते. तसे विलाप करताना हाय दैवा इत्यादि उमटणारे शब्द व उसासे सोडताना निघणारा सो सो ध्वनि हा त्या धारेचा ध्वनि आहे. **(क) भ्रम भय भवर चक्र** महापुराच्या प्रवाहांत अनेक भोवरे उत्पन्न होतात व त्यांत मधल्या भागी पाणी चक्राकार फिरत असते. तसेच सर्वांच्या हृदयांत भय उत्पन्न झाले आहे की रामसीता लक्ष्मण यांचे वनवासांत काय होईल कोणास ठाऊक? या

भयाने भ्रम उत्पन्न झाला व राम मनुष्य समजून मिथ्या कल्पनांची अगणित चक्रे गरगरा फिरू लागली. अतिस्नेहः पापशंकी'

**चौ. ४ - (१) नाविक बुध विद्या बडि नावहि - बुध** = पंडित, ज्ञानी, यांच्या जवळ ब्रह्मविद्यारूपी मोठी नाव असते, व तिच्या आश्रयाने महाशोकसागर - भवसागर सुद्धा तरता येतो. जनकपुरींतील सर्वलोक **'ज्ञानी धर्मशील गुणवन्तहि'** आहेत पण त्यांनी ब्रह्मविद्यारूपी नौका वैराग्यतटावर जी नांगरून व खुटवून ठेवली आहे ती पुराच्या पाण्यांत तरंगत आहे; व लाटांच्या थपडांनी अशी हेलकावे खात आहे की हातीच सापडत नाही. पाण्यांतून जवळ जाऊन पकडावी तर प्रवाहाने किनारा कुठे वाहून गेला असला तर धारेने वाहून जाऊ की काय अशी भीति वाटते. ती कशी हाती घ्यावी याची काही अटकळ, (ऐक - हिंदी) अंदाजच करतां येत नाही. मग नौका पाण्यांत सोडणार कशी व पार जाणार कसे? जनकांसारख्या भवसागर नावाड्यांची बुद्धिसुद्धा कुंठित झाली आहे. पाणी त्यांच्या सुद्धा गळ्यांपर्यंत आले आहे. ज्ञानवैराग्य व धैर्य (धृति) बुडाल्यावर ब्रह्मविद्या निरुपयोगीच !

**चौ. ५ - (१) वनचर कोणि किरात .... सारे** - हे लोक गंगा यमुनांच्या महापुरांत उड्या टाकून सहज पार जाणारे; पण या करुणानदीच्या जवळ येऊन पाहतात तोच अगदी दीन, स्तंभित दिसू लागले. जनक शतानंदांसारख्या प्रख्यात नाविकांची दशा पाहिली नी हे आऽऽ करून त्यावर हात देऊन बघतच राहिले चित्रांसारखे ! या नदीचे स्वरूप पाहतांच धीर खचला. सार हे की आश्चर्याने स्तंभित झाले.

**चौ. ६ - (१) आश्रम - उदधिं मिळे ....** ' अशा रीतीने ही करुणानदी (जनकराज समाज) आश्रम सागरापर्यंत आली. त्याला मिळाल्या बरोबर ज्या डोंगरासारख्या लाटा उठू लागल्या तेच तेथे बसलेले मुनि, राण्या, परिवार, पुरजन इत्यादि ताडकन उठून उभे राहिले व त्या प्रवाहांत सापडले. ते लोकही शोकाने व्याकुळ झाले. रडणे, विलाप, उसासे इ. सर्व सुरू झाले. हलकल्लोळ माजला. सागर खवळला म्हणजे जसा दिसतो; तसा जो शान्तरसाचा सागर होता तो या नदीच्या प्रवाहाच्या जोराने व्याकुळ झाला. शान्तरस सागर नाव राहिले; झाला शोकसागर. सुनयनादि राण्यांना पाहिल्याबरोबर कौसल्यादि राण्यांनी टाहो फोडला. त्यांची वैधव्य दशा पाहून सुनयनादि मोठ्याने आक्रोश करू लागल्या. हे पाहून व ऐकून तेथे जमलेले ज्ञानी मुनिसुद्धा या पुरांत सापडले.

हिं. *। सोक बिकल दोउ राज समाजा । रहा न ग्यानु न धीरज लाजा ॥७॥*
*। भूप रूप गुन सील सराहि । रोवहिं सोकसिंधु अवगाही ॥८॥*

हिं. छं. *। अवगाहि सोक समुद्र सोचहि नारि नर ब्याकुल महा ।*
*॥ दै दोष सकल सरोष बोलहिं बाम बिधि कीन्हो कहा ॥*
*। सुर सिद्ध तापस जोगिजन मुनि देखि दसा विदेह की ।*
*॥ तुलसी न समरथु कोउ जो तरि सकै सरित सनेह की ॥१॥*

म. *। शोकाकुल युग राजसमाज हि । ज्ञान न राही धीर न लाजहि ॥७॥*
*। नृपगुणरूप - शील वाखाणति । रडति शोकसागरिं अवगाहति ॥८॥*

म. छं. *। बुडतात शोक समुद्रिं शोचति नारि नर विव्हळ महा ।*
*॥ बहु दोष देत सरोष बोलति वाम विधि करि काय हा ! ॥*
*। सुर सिद्ध तापस योगि मुनि गति विदेहाची बघुनिया ।*
*॥ तुलसी न कोणि समर्थ जो तरुं शके स्नेह नदीस या ॥१॥*

**अर्थ** - दोन्ही राजसमाज शोकाकुल झाले आहेत; ज्ञान राहिले नाही की धीर राहिला नाही की लाज उरली नाही ।।७।। दशरथ राजांचे गुण रूप शील इत्यादि वाखाणीत असे रडत आहेत की जणू शोकसागरांत बुड्याच मारीत आहेत.।।८।। स्त्रिया व पुरुष शोकसागरात बुड्या मारीत शोक करीत फार व्याकुळ झाले आहेत; (विधात्यास) दोष देत सर्वच रोषाने बोलत आहेत की या दुष्ट विधीने हाय ! हाय ! काय केले हे ! देव सिद्ध, तापस योगी मुनि इत्यादि सर्व लोक विदेहाची ती दशा (गति) पाहून असे झाले की तुलसीदास म्हणतात या स्नेहनदीतून तरू शकेल असा कोणीच समर्थ (उरला) नाही. (सर्वच त्या शोक समुद्रांत मग्न झाले.) ।।छंद।।

**टीका चौ. ७-८ - (१) ज्ञान न राही धीर न लाजहि** - सर्वच लोक ज्ञानी होते पण कोणाचेही ज्ञान राहिले नाही यांत नवल नाही; पण जनकासारख्या सदा ब्रह्मानंदांत लीन असणारांचे ज्ञान राहिले नाही की धीर राहिला नाही. कौसल्या सुनयनादि स्त्रियांच्या ठिकाणी धीर उरला नाही व लाजही राहिली नाही. व्याही, वसिष्ठ विश्वामित्रांसारखे गुरू, ऋषि, मुनि समोर आहेत यांचे भान न राहून आक्रोश करतां करतां कोणाच्या डोक्यावरील पदर गळून पडले, केस सुटले इ.

**(क) रडति शोकसागरिं अवगाहति** - रडताना वाहणाऱ्या अश्रुंनी वस्त्रे चिंब झाली; म्हणजेच शोक समुद्रांत बुड्या मारल्या.

**छंद** - विदेहराज जनक सुद्धा या शोकसागरांतील स्नेहजलांत गटांगळ्या खात आहेत, हे पाहता पाहता देव सिद्ध तापस इ. सर्वांचीसुद्धा तीच दशा झाली. सागराला मोठी भरती आली की त्याचे पाणी त्याला मिळणाऱ्या नद्यामध्ये उलटे वाहू लागतेच. मग हे सर्व ज्ञानी मुनि यांतून कसे वाचणार. (क) या स्नेहनदीतून पोहून पार जाऊ शकेल असा समर्थ कोण असू शकणार? सर्व ज्ञान्यांचे व शोकातीत झालेल्या सर्व समर्थांचे समर्थ विदेहराजसुद्धा या स्नेहजनित शोकसागरांत बुड्या मारीत आहेत; मग इतरांची कथा काय?

*हिं. सो.* *। किए अमित उपदेस जहँ तहँ लोगन्ह मुनिबरन्ह ॥*
*॥ धीरजु धरिअ नरेस कहेउ बसिष्ठ बिदेह सन ॥२७६॥*

*हिं.* *। जासु ग्यान रबि भव निसि नासा । बचन किरन मुनि कमल बिकासा ॥१॥*
*। तेहि कि मोह ममता निअराई । यह सिय राम सनेह बडाई ॥२॥*
*। बिषई साधक सिद्ध सयाने । त्रिविध जीव जग बेद बखाने ॥३॥*
*। राम सनेह सरस मन जासू । साधु सभाँ बड आदर तासू ॥४॥*

*म.सो.* *। करिति अमित उपदेश मुनिवर लोकां जिथ तिथें ॥*
*॥ धरणें धीर नरेश वदति विदेहा रामगुरु ॥२७६॥*

*म.* *। यज्ज्ञानार्के भवनिशि नासत । वचन - किरणिं मुनि-कमल विकासत ॥१॥*
*। तयां समीप किं मोह नि ममता । हि सियरामस्नेह - महत्ता ॥२॥*
*। विषयी साधक सिद्धज्ञानी । त्रिविध जीव जगतीं श्रुति वानी ॥३॥*
*। रामस्नेह - रसाळ मनाचा । साधुसभें अति आदर त्याचा ॥४॥*

**अर्थ** - जिथे तिथे अनेक मुनिवर लोकांना अमित उपदेश करू लागले; व रामगुरु वसिष्ठ विदेहांस म्हणाले की नरेश ! आपण धीर धरावा. ॥दो. २७६॥ ज्यांच्या ज्ञानसूर्याने भवनिशा नष्ट होते व ज्यांच्या वचनरूपी किरणांनी मुनिरूपी कमले फुलतात. ॥१॥ त्यांच्या समीप का मोह आणि ममता येणार आहेत? ही केवळ सीतारामस्नेहाची महती आहे. ॥२॥ विषयी, साधक व दृढज्ञानी (सिद्ध झाले आहे ज्ञान ज्यांचे असे) असे तीन प्रकारचे जीव जगांत आहेत असे वेद (श्रुति) वर्णन करतात. ॥३॥ पण ज्यांचे मन रामस्नेह (सीतारामस्नेह) रूपी रसाने भरलेले असेल त्यांचा साधुसभेत आदर होतो (त्याला विशेष मान देतात) ॥४॥

**टीका सोरठा - (१) मुनिवर लोकां अमित उपदेश करिति** - तापस मुनि वगैरे या शोकसागरात सापडले होते पण बुडले नव्हते; त्यांनी आपला शोक आवरला

व मार्कंडेय, कात्यायन, जाबाली, शतानंद इत्यादि मुनिश्रेष्ठांनी ठिकठिकाणी लोकांना खाली बसवून उपदेश केला. मात्र थोड्या उपदेशाने भागले नाही. अमित - पुष्कळ उपदेश करावा लागला.

**(क) विदेहांच्या बाबतीत उपदेश शब्द वापरला नाही** ही सावधगिरी लक्षांत ठेवण्यासारखी आहे. रामगुरु वसिष्ठांनी त्यांचे सांत्वन केले. **(ख) नरेश !** आपण नरेश आहांत; आपणच जर धीर सोडलात तर इतरांनी, नर नारींनी धीर कसा धरावा! दोन्ही समाजांची कशी दुर्दशा झाली आहे ती पाहून आपण धीर धरलात तरच हा शोकसागर हळुहळु शान्त होईल इत्यादि सांगितले.

**चौ. १-२ - (१) यज्ज्ञानार्के भवनिशि नासत** - यत् + ज्ञान + अर्क = यज्ज्ञानार्क; अर्क = सूर्य, यत् ज्यांचा. यांचे ज्ञान हा सूर्य आहे. सूर्याच्या जवळ रात्र व अंधार येऊ शकत नाहीत. मोहरूपी रात्र व ममतारूपी तम यांच्या जवळ येणेसुद्धा शक्य नाही. यांच्या ज्ञान सूर्याच्या तेजाने भवरूपी रात्र सुद्धा नष्ट होते. म्हणजेच यांच्या कृपेने ज्ञान होऊन मोठमोठे योगी भवसागरांतून मुक्त होतात. यांच्या वचनरूपी किरणांनी म्हणजे उपदेशाने मोठेमोठे मुनि संशयमुक्त होऊन प्रसन्न होतात कमलांसारखे. अशा विदेहांना मोह होणे अशक्य आहे व मोह नाही तेथे शोक असणे शक्य नाही. पण यांच्या ठिकाणी जो हा अपार शोक दिसला तो अप्राकृत, पवित्र शोक असल्याने स्पृहणीय आहे; कारण तो रामाच्या संबंधाने आहे. 'तत्सुखे सुखित्वम् तद्दुःखे दुःखित्वम्' हे तर ज्ञानोत्तर प्रेमभक्तीचे दुर्लभ लक्षण आहे. यांत ज्ञानाचा विनाश झालेला नसतो. कर्तृत्व - भोक्तृत्वाहंकार यांत नसतो; म्हणून म्हटले की हा शोक म्हणजे **सीतारामस्नेहाची महती आहे.** सिय = सीता. भरताचा शोक असाच शुचि होता.

**चौ. ३ - (१) विषयी साधक सिद्धज्ञानी - विषयी** - जगांतील विषयांतच रमणारे व त्यातून सुटावे असे सुद्धा न वाटणारे. **साधक** - विवेकवैराग्यादि साधनांची प्राप्ति करून ज्ञानी होण्याचा प्रयत्न करणारे व अपरिपक्व ज्ञानी. देहबुद्धिवत आत्मबुद्धि ज्यांची दृढ झाली नाही ते साधकासारखेच असतात. **सिद्ध ज्ञानी** - दृढ, परिपक्वज्ञानी. ज्यांची आत्मबुद्धी देहबुद्धी इतकी दृढ झाली आहे असे जीवन्मुक्त. **(क)** बद्ध, मुमुक्षु, साधक व सिद्ध अशी वर्गवारी काही ग्रंथात सापडते. परंतु जो मुक्त नाही तो बद्ध या दृष्टीने पाहिल्यास बद्ध, मुमुक्षु व साधक हे तिघेही बद्धच असतात. फरक इतकाच की आपण बद्ध आहोत हे बद्धाला माहीतच नसते.

बंधनाची कळ लागू लागली व ते सुटावे असे वाटू लागले तो मुमुक्षु पण बद्धच असतो; व सुटण्याचा यथाविधि प्रयत्न करणारा तो साधक; हाही बद्ध असतोच. जो पूर्णपणे सुटला तो सिद्ध = मुक्त.

**चौ. ४ - (१) रामस्नेहरसाळ मनाचा... त्याचा** - साधुसभेत अनादर कोणाचाच होत नाही. ज्ञानी, जीवन्मुक्त, यांनासुद्धा आदर मिळतो; पण ज्याचे हृदय रामस्नेहाने भरलेले आहे, तो जरी ज्ञानी नसला तरि त्याचा साधुसभेत अति आदर होतो. लोमशमुनींकडे गेलेला विप्र ज्ञानी नव्हता; पण त्याची असाधारण रामभक्ति पाहून लोमश ऋषी त्यांच्यावर परम प्रसन्न झाले आहेत. स्वतःप्रभूच म्हणतात :- **'भक्तिहीन जरि विरिंचि असला । तो प्रिय सब जीवांसम मजला ॥ जीवभक्तिमान् नीच जरि महा । प्राणप्रिय मज बाणा मम हा ॥'** (७।८६।९-१०) जो भगवंताला प्राणप्रिय वाटतो त्याला साधुसभेत = ज्ञानीभक्तांच्या सभेत विशेष आदर मिळाला तर नवल नाही. **'भक्तिहीन तो प्रिय नहिं मजला'** (७।४५।५) असे राम म्हणतात; पण साधु **'मानद सकलां स्वये अमानी'** (७।३८।४) असे असल्यामुळे साधुसभेत मान सगळ्यांनाच मिळतो पण रामप्रेमी भक्ताला विशेष मान मिळतो.

*हिं.* *। सोह न राम पेम बिनु ग्यानू । करनधार बिनु जिमि जलजानू ॥५॥*
*। मुनि बहुबिधि बिदेहु समुझाए । राम घाट सब लोग नहाए ॥६॥*
*। सकल सोक संकुल नर नारी । सो बासरु बीतेउ बिनु बारी ॥७॥*
*। पसु खग मृगन्ह न कीन्ह अहारू । प्रिय परिजन कर कौन बिचारू ॥८॥*

*हिं. दो.* *। दोउ समाज निमिराजु रघुराजु नहाने प्रात ॥*
*॥ बैठे सब बट बिटप तर मन मलीन कृस गात ॥२७७॥*

*म.* *। राम-प्रेम विण शोभे ज्ञान न । कर्णधारविण जस जलवाहन ॥५॥*
*। विदेहास मुनि बहु समजावति । रामघाटिं सर्वहि अवगाहति ॥६॥*
*। सकल शोक - संकुल नर नारी । तो वासर सरला विण वारी ॥७॥*
*। करिति न पशु खग मृग आहारा । प्रिय परिवारा काय विचारा ॥८॥*

*म. दो.* *। निमिनृप रघुनृप संघ युग करिती प्रातः स्नान ॥*
*॥ बसले सब वट - विटप - तळिं कृशतनु चित्तें म्लान ॥२७७॥*

**अर्थ** - कर्णधाराशिवाय (सुकाणदाराशिवाय) नौका वगैरे जलवाहन शोभत नाही, (निरुपयोगी) तसेच रामप्रेमाशिवाय ज्ञान शोभत नाही (त्याचा उपयोग नाही) ।।५।। वसिष्ठ मुनींनी विदेहांस पुष्कळ समजाविले. (मग) सर्व लोकांनी

रामघाटावर स्नान केले. ॥६॥ सर्व स्त्रिया व पुरुष शोकाने अगदी व्यापले आहेत. व तो सगळा दिवस (रात्रसुद्धा) पाणीसुद्धा न पिता गेला (शोक करण्यांत दिवस व रात्र सुद्धा गेली). ॥७॥ पशु पक्षी व हरिणे यांनीसुद्धा काही आहार केला नाही; मग प्रिय परिवाराचे काय विचारता? ॥८॥ निमिराजांचा व रघुराजांचा असे दोन्ही समाज प्रातःकाळ होताच स्नान करू लागले; व नंतर शरीराने कृश व चित्ताने उदास - खिन्न झालेले ते सर्व लोक (रामपर्णकुटीजवळील) वडाच्या झाडाखाली येऊन बसले. ॥दो. २७७॥

**टीका - चौ. ५ - (१) कर्णधार विण जस जलवाहन - येथे जलवाहन =** नौका, जहाज. सुकाणदार नसेल तर **अशा जलयानाची जी शोभा होते तीच रामप्रेम नसलेल्या ज्ञानाची!** मायानदीच्या धारेत सापडून, विषयांच्या तुफान वाऱ्याने ज्ञानरूपी जलयान अहंकार खडकावर आपटून केव्हा फुटेल याचा नेम नाही. कामक्रोधादि नक्र व सुसरी, मोठे देवमासे त्या नौकेला केव्हा गिळतील याचाही नेम नाही. रामप्रेमरूपी सुकाणदार, कुशल नावाडी, संरक्षक व तारक असला तरच ज्ञानरूपी नौका परतीराला लागावयाची ! **जे ज्ञान मान- बिमत्त तव भवहरणि भक्ति न आद्रिती । ते प्राप्त सुरदुर्लभ पदादपि पडत आम्हां आढळती'** (७।१३छं ३) असे वेद म्हणाले आहेत. ७।७१ म, ७।१२२ रा पहा.

**चौ. ६-८ (१) रामघाट** - राम जेथे मंदाकिनीत रोज स्नान करतात ते स्थान. ज्या प्रमाणे निषादराजाने गंगेच्या किनाऱ्यावरील त्या स्थानाला 'रामघाट' हे नांव दिले तसेच येथील मुनिगणांनी या जागेला 'रामघाट' नांव ही मंडळी येण्याच्या आधीच दिले आहे. **(क) तो वासर सरला विण वारी - येथे वासर** = वार. सूर्योदयापासून सूर्योदयापर्यंतचा दिवस व रात्र मिळून होणारा काळ. (सामान्य अर्थ दिवस असा आहे.) उदा. 'भानुवासरे = रविवारी २४७।६ - २४७।८ पर्यंत पाहून तुलना करावी. **'भूपमरण जणुं आजच घडले'** असे झाले. **(ख) पशु खग मृग** - पशुंचा उल्लेख असून मृगांचा आहे म्हणून मृग = हरीण. भरत आल्यावर दशरथमरणवार्ता सांगितली गेल्यावर जे शोक साम्राज्य पसरले त्यापेक्षा यावेळी शोकाची तीव्रता व व्याप्ति अधिक आहे हे या चरणाने सुचविले आहे. कारण तेथे पशुखग = मृगांनी आहार न केल्याचा उल्लेख नाही; व त्याबरोबरच शोकनदीचे व शोकसागराचे वर्णन नाही. खगमृगांनी आहार न घेतल्याचे वर्णन तेथे असते तर काय झाले असते याचा विचार करावा. या शोकनदीचे काहीच

वैशिष्ट्य राहिले नसते. ! पक्षी व हरिणे काही या लोकांनी बरोबर आणलेली नाहीत; म्हणून त्या चित्रकूटवनांतील खगमृगांवरसुद्धा या शोकाचा इतका परिणाम झाला हे दाखविले. हे खगमृग आपसांतील वैर विसरलेले व मुक्त झालेले आहेत हे वाचक विसरले नसतीलच.

**दो. - (१) निमिनृप - रघुनृप - संघ** - निमीच्या नांवाचा मुद्दाम उल्लेख करून सुचविले आहे की हे दोन वंश जरि आज भिन्नपणे ओळखले जात असले तरी दोन्ही समाज ईक्ष्वाकु वंशातलेच आहेत. निमि राजा इक्ष्वाकुचा बारावा मुलगा. (१।२३०।४ टी. पहा) यामुळे दशरथमरणाचे दुःख निमिराजालासुद्धा झाले. कोणीच झोपले नाहीत.

*हिं.* ***। जे महिसुर दशरथ पुर बासी । जे मिथिलापति नगर निवासी ।।१।।***
***। हंस बंस गुर जनक पुरोधा । जिन्ह जग मगु परमारथु सोधा ।।२।।***
***। लगे कहन उपदेस अनेका । सहित धरम नय बिरति बिबेका ।।३।।***
***। कौसिक कहि कहि कथा पुरानीं । समुझाई सब सभा सुबानीं ।।४।।***
***। तब रघुनाथ कौसिकहि कहेऊ । नाथ कालि जल बिनु सबु रहेऊ ।।५।।***

*म.* ***। जे महिसुर दशरथ पुर - वासी । जे मिथिलापति - नगर - निवासी ।।१।।***
***। हंसवंशगुरु, जनक - पुरोहित । जिहिं जगपथ - परमार्थ हि शोधित ।।२।।***
***। करुं लागति उपदेश अनेक हि । सहित धर्म नय विरति विवेक हि ।।३।।***
***। कौशिक कथा पुरातन सांगति । बहु, मृदुवचनें सभे समजावती ।।४।।***
***। मग रघुनाथ कौशिका सांगति । नाथ काल निर्जल सब राहति ।।५।।***

**अर्थ** - दशरथपुरीत राहणारे जे ब्राह्मण (व मुनि) व मिथिलापतींच्या नगरांत राहणारे जे ब्राह्मण (व मुनि) - ।।१।। आणि सूर्यवंशाचे गुरु वसिष्ठ व जनकांचे पुरोहित शतानंद; ज्यांनी जगाचा मार्ग व परमार्थाचा मार्गहि शोधून काढला आहे ते - सर्व धर्म, नीति, वैराग्य व ज्ञान यांनी युक्त असलेला उपदेश अनेक प्रकारे (ठिकठिकाणी) करू लागले. ।।३।। कौशिक मुनींनी (विश्वामित्रांनी) पुष्कळ पुरातन (पौराणिक व ऐतिहासिक) कथा सांगून मृदु वाणीने सर्व सभेचे सांत्वन केले. ।।४।। मग रघुनाथ कौशिकांस म्हणाले की नाथ! काल (हि) सर्वलोक पाणीसुद्धा न पिताच राहिले ! ।।५।।

**टीका - चौ. १-२ - (१) महिसुर** = मुनि व ब्राह्मण, मुनि ब्राह्मण असतातच. दशरथ पुरवासी म्हटले तसे जनकपुरवासी न म्हणतां मिथिलापति नगरनिवासी

म्हटले. भाव हा आहे की दशरथपुर हे नाव राहिले आहे; पालन करणारे स्वामी = पति त्या नगरीला सध्या कोणी नाहीत ते अनाथ - नगरीतले रहिवासी आहेत. अनाथ मुलांना दुःख झाले तरी त्यांच्या रडण्याचा काही उपयोग होत नाही; तसे सनाथ (आईबाप) असलेल्या मुलांचे नसते. त्यांना माहीत असते की आपण पुष्कळ रडलो की आईबाप आपला हट्ट पुरवितीलच. पण पोरक्या पोरांची समजूत कोण घालणार = लाड कोण पुरवणार! म्हणूनच दशरथ पुरवासी महिसुरानी आपला शोक लवकर आवरला; म्हणून त्यांचा उल्लेख प्रथम केला. **(क) हंसवंश गुरु व जनक पुरोहित.** यांतील गुरु व पुरोहित हा शब्दभेद लक्षांत ठेवण्यासारखा आहे. मानसांतील वसिष्ठ गुरु असून पुरोहित नाहीत, पण शतानंद केवळ पुरोहितच आहेत. श्री रघुवीर विवाह प्रकरणांत साधार सिद्ध झाले आहे. **(ख) जगपक्ष =** जगाचा मार्ग, प्रपंचमार्ग, प्रवृत्तिमार्ग; **पथपरमार्थ =** परमार्थमार्ग. निवृत्ति मार्ग. या दोन्ही मार्गात हे सर्व पारंगत आहेत. प्रपंच साधून परमार्थ कसा साधावा हे उत्तम प्रकारे सक्रिय जाणणारे हे सर्व आहेत. यामुळे प्रपंचांत राहून परमार्थ साधण्याचा उपदेश या दोन्ही समाजांस करण्यास ते योग्य अधिकारी आहेत.

**चौ. ३ - (१) करुं लागति उपदेश अनेक** - वसिष्ठांनी कौसल्यादि राण्या वगैरेंना व शतानंदांनी सुनयनादि जनकराण्या वगैरेंना, अयोध्येतील मुनींनी व विप्रांनी अयोध्येंतील लोकास व जनकपुरीतील मुनींनी व विप्रांनी जनकपुरीतील लोकांस ठिकठिकाणी गटागटाने विभागून अनेक प्रकारे केला. **(क) सहित धर्म नय विरति विवेक** - विवेक = ज्ञान. धर्म सर्वाचा पाया आहे. **'विरतिस धर्म योग दे ज्ञाना'** (३।१६।१) धर्माने वैराग्य, वैराग्याने योग व योगाने ज्ञान प्राप्त होते. या नैसर्गिक क्रमानेच येथे उल्लेख आहे. फक्त राजनीति मधे शिरली आहे; ती सहेतुक आहे. भरताला राज्य व रामाला वनवास देण्यात अनीति झाली आहे असा लोकांचा समज आहे. पण या उपदेशांत ठसविण्यात आले की राजनीति मुख्य कारण नसून धर्मच मुख्य कारण आहे. **(ख)** चित्रकूटच्या पहिल्या सभेस वसिष्ठांच्या भाषणात धर्म - (धुरीण) नीति, प्रीति परमार्थ व स्वार्थ असा क्रम (२५४।२-५ पहा) ज्या हेतूने ठेवला त्याच हेतूने येथे धर्म नीति व विरतिविवेक (परमार्थ) हा क्रम ठेवला आहे. यावरून ठरते की या उपदेशांतच कार्याकार्याची जाणीव सर्वास करून दिली. हा उपदेश वसिष्ठ, शतानंद व शेकडो महिसुरांनी केला.

**चौ. ४ - (१)** कथा मात्र एकट्या विश्वामित्रांनी सर्वांना सांगितल्या. आधी

लाखो लोक शोकव्याकुळ होऊन विलाप-प्रलाप करीत होते; म्हणून प्रथम गटागटांनी उपदेश करून सर्वांचे सांत्वन शेकडो वक्त्यांनी मिळून केले; तेव्हा सर्व शान्त झाले. प्रत्येक वक्त्याने शेवटी सूचना दिली असेल की तुम्ही सर्व शान्त राहिलात तर महामुनी विश्वामित्र कथा सांगणार आहेत. विश्वामित्र पुराण कथा सांगण्यात फार प्रवीण आहेत व भक्तिप्रधान कथा सांगण्याची त्यांस आवड आहे हे पूर्वी बालकांडांत दाखविले आहे. (२१०।८-९, २२६।२-३; २३७।५ टी.प.)

**चौ. ५ - (१) रघुनाथ कौशिका सांगति** - कालचा सगळा दिवस व रात्र व आज दोन प्रहर उलटून गेले तरी कोणी पाणी सुद्धा प्यायले नाहीत हे वसिष्ठ शतानंद, जनकराजा व शेकडो महिसुर इत्यादि कोमल हृदयीं कृपाशील पुरुषांना कळले असून त्यांना जी कळ लागली नाही ती रामचंद्रांस लागली ! म्हणून तर रघुनाथ हे नाव यथार्थ ठरते. सर्व लोक दीन, अनाथांसारखे अन्नपाण्यावाचून राहिलेले, प्रवासाने दमून भागून आलेले; अजून गाठोडी सुद्धा सोडली नाहीत ! रात्रभर जागरण, शोकविलाप करीत वस्त्रे भिजवीत होते; त्यांची ही दशा पाहून रघुनाथांचे हृदय कळवळले. **(क) कौशिक** - हे राज्याचा संबंध सूचक नाव आहे. सुचविले रघुनाथांनी की सर्वलोक व प्रजा जवळ जवळ दोन दिवस अन्नपाण्यावाचून राहिलेली पाहिल्यावर आपल्या हृदयाला किती कळा लागल्या असत्या याची कल्पना आपण करू शकाल म्हणून आपण काय ते पहा आता. विश्वामित्रांनी सांगितले म्हणजे जनकराजा मानतील हे ठाऊक असल्याने त्यांच्या कानी घातले.

*हिं. । मुनि कह उचित कहत रघुराई । गयउ बीति दिन पहर अढाई ॥६॥*
*। रिषि रुख लखि कह तेरहुति राजू । इहाँ उचित नहिं असन अनाजू ॥७॥*
*। कहा भूप भल सबहि सोहाना । पाइ रजायसु चले नहाना ॥८॥*

*हिं.दो.। तेहि अवसर फल फूल दल मूल अनेक प्रकार ॥*
*॥ लइ आए बनचर बिपुल भरि भरि काँवरि भार ॥२७८॥*

*म. । रघुपति उचित वदति मुनि वदले । प्रहर आजही अडीच टळले ॥६॥*
*। ऋषि - रुचि बघुनि वदति मिथिलापति । इथें अन्न खाणें अनुचित अति ॥७॥*
*। भलें भूप-वच सकलां रुचलें । आज्ञेने स्नानास चालले ॥८॥*

*म. दो.। त्या समयीं फल - फूल - दल - मूलां किती प्रकार - ॥*
*॥ वनचर पुष्कळ आणिती भरुनि कावडीभार ॥२७८॥*

**अर्थ** - मुनि विश्वामित्र म्हणाले की रघुपति (रघुराज) म्हणाले ते योग्यच

आहे; आजसुद्धा अडीच प्रहर उलटून गेले. ॥६॥ ऋषींची इच्छा जाणून मिथिलापति जनक म्हणाले की येथे अन्न खाणे (भोजन करणे) अति अनुचित आहे ॥७॥ हे भूपाचे चांगले वचन सर्वांना आवडले; व आज्ञा घेऊन लोक स्नानास चालले ॥८॥ त्याच वेळी वनवासी लोक अनेक प्रकारची कंदमूलफळे फुले, पानें (दल) यांच्या पुष्कळ कावडीच्या कावडी भारेच्या भारे घेऊन येऊ लागले. ॥दो. २७८॥

**टीका** - (१) **इथें अन्न खाणे अनुचित अति** - राम कंदमूलफलाहारी असता आम्ही येथे सुद्धा भोजन करणे अत्यंत अनुचित अयोग्य आहे. **(क)** मध्यान्ह उलटून अर्धाप्रहर होऊन गेला आहे. लोक मध्यान्ह स्नानाला चालले. त्रिकाळ स्नान करू लागल्याचा उल्लेख २४९।३ मध्ये केला. २७७।६ मध्ये सायंस्नान सुचविले आहे; व दो. २७७ मध्ये प्रातः स्नान स्पष्ट सांगितले आहे. याप्रमाणे त्रिकाल स्नान करीत असल्याचे प्रत्यक्ष दाखविले. **(ख)** एवढ्या मोठ्या जनसमूहाला फलाहाराचे जिन्नस कसे पुरणार व एवढे मिळाले कसे याचे उत्तर पुढे देतील. मध्यान्ह उलटून गेल्यावर ही मंडळी फलाहार करतात हे या वनवासी लोकांना माहीत झाले आहे. दो. २५० व त्यापूर्वीचा संदर्भ पहा.

***हिं.*** ***। कामद भे गिरि राम प्रसादा । अवलोकत अपहरत बिषादा ॥१॥***
***। सर सरिता बन भूमि बिभागा । जनु उमगत आनँद अनुरागा ॥२॥***
***। बेलिबिटप सब सफल सफूला । बोलत खग मृग अलि अनुकूला ॥३॥***
***। तेहि अवसर बन अधिक उछाहू । त्रिविध समीर सुखद सब काहू ॥४॥***

***म.*** ***। रामकृपें गिरि कागद बनती । अवलोकत खेदा अपहरती ॥१॥***
***। सर - सरिता - वन - भूमि - विभागां । जणूं पूर मोदा अनुरागा ॥२॥***
***। वेलि विटप सब फुलती फळती । खग मृग अलि अनुकूल बोलती ॥३॥***
***। तदा अधिक उत्साह वनाला । त्रिविध समीर सुखद सर्वांला ॥४॥***

**अर्थ** - रामकृपेने सगळे पर्वत मनोवांछित पुरविणारे झाले व पाहतांच खेदाचा अपहार करू लागले. ॥१॥ तलाव, नद्या, वन व सर्व भूमिविभाग यांत जणू आनंदाला व प्रेमाला भरती - पूर - येत आहे. ॥२॥ सर्व लता व सर्व वृक्ष फुलले व फळले; पशुपक्षी व भुंगे सुखदायक (अनुकूल) बोलूं लागले. ॥३॥ त्यावेळी वनाला अधिक उत्साह वाटू लागला; आणि त्रिविध वायु सर्वांना सुखदायक असा वाहू लागला.॥४॥

**टीका - चौ. १-२ - (१) गिरि कामद बनती** - कामदागिरि हे एका पर्वताचे नांव असले तरी यावेळी आजूबाजूचे सर्वच पर्वत कामधेनूप्रमाणे सर्व इच्छा पुरविणारे झाले आहेत याचे कारण फक्त रामकृपा ! **'ऋतुविण तरुवर फळति, शिला जल - ओघा द्रवतात ॥ सितारामलक्ष्मण यदा ज्यास कृपें बघतात.'** (दोहा १७३) **'तरुवर फळले रामालागुनि । कालगती ऋतु अऋतू त्यागुनि'** (६।५।५).

**चौ. ३-४ - (१) खगमृग अलि अनुकूल बोलती** - कावळे, घारी इत्यादि खगांचा आवाज मनुष्यांना प्रतिकूल वाटणारा असतो; व सिंह व्याघ्र इत्यादींचा आवाज भयंकर असतो, पण आता या सर्वांचाच आवाज मनुष्यांना अनुकूल वाटेल असाच निघू लागला.

वाघीण किंवा सिंहीण आपल्या पिलांस प्रेमाने बोलावीत असते तेव्हा त्यांचा आवाज सुखद असतो. **(क) त्रिविध समीर सुखद सर्वांला' पूर्वी 'त्रिविध वायु वाहे सुखदायक** (१३७।८) व **'त्रिविध तापही त्रिविध सदागति (= वायु)'** (२४९।६) इतकेच म्हटले आहे. सर्वांना सुखद असे तेथे म्हटले नाही. पण **'भिन्न रुचिर्हि लोकः'** असे असल्यामुळे आता ज्याला जेवढा शीतल, जेवढा मंद व जितका सुगंधी पाहिजे तसा प्रत्येकाच्या रुचीप्रमाणे वाहू लागला. गिरि कामद कसे झाले हे या उदाहरणाने सुचविले व पूर्वीपेक्षा अधिक उत्साह कसा हेही दाखविले. आता आणखी एक कारण सुचवितात.

*हिं.* *। जाइ न बरनि मनोहरताई । जनु महि करति जनक पहुनाई ॥५॥*
*। तब सब लोग नहाइ नहाई । राम जनक मुनि आयसु पाई ॥६॥*
*। देखि देखि तरुबर अनुरागे । जहँ तहँ पुरजन उतरन लागे ॥७॥*
*। दल फल मूल कंद बिधि नाना । पावन सुंदर सुधा समाना ॥८॥*

*हिं. दो.* *। सादर सब कहँ रामगुर पठए भरि भरि भार ॥*
*॥ पूजि पितर सुर अतिथि गुर लगे करन फरहार ॥२७९॥*

*म.* *। वदवत मुळिं च मनोहरता नहिं । जनका पाहुणचार किं करि महि ॥५॥*
*। तैं स्नाना कर करुनि सर्व जण । घेउनि राम-जनक- मुनि-शासन ॥६॥*
*। बघ बघुनी तरुवर अनुरागति । पुरजन तरुतळिं उतरूं लागति ॥७॥*
*। दल फल विविध मूल-कंदानां । पावन सुंदर 'सुधा-समानां - ॥८॥*

*म.दो.* *। सादर सर्वां रामगुरु धाडिति बहु तात्काळ ॥*
*॥ पुजुनि पितर सुर अतिथि गुरु करुं लागले फराळ ॥२८९॥*

**अर्थ** - वनाची मनोहरता मुळीच वर्णन करवत नाही; पण असे वाटले कीं जणू मही (भूमि) जनकराजांना पाहुणचारच करीत आहे ॥५॥ इतक्यात लोक स्नान करून क्रमाने येऊ लागले आणि राम, जनकराजा व वसिष्ठ मुनि यांची आज्ञा घेऊन - ॥६॥ सुंदर सुंदर वृक्ष बघून अनुरागयुक्त झाले व (त्या त्या) झाडाखाली उतरू लागले. ॥७॥ तत्काळ श्रीरामगुरु वसिष्ठांनी नाना प्रकारची सुंदर व पावन दले (पत्रे, पाने) व नाना प्रकारची सुंदर, पावन व अमृतासारखी कंदमूल फळे सर्वांकडे आदराने पुष्कळ पाठविली तेव्हा पितर देव अतिथि आणि गुरु यांचे पूजन करून लोक फराळ करू लागले. ॥८ व दोहा ॥

**टीका. चौ. ५ - (१) जनका पाहुणचार किं करि महि** - काल जनकराज आल्यापासून शोकसागर सर्वत्र पसरला होता. तो शोकाचा आवेग मुनिवरांच्या उपदेशाने व कथाश्रवणाने नष्ट झाला तोच वनाने असे सौंदर्य धारण केले व महीने अशी काही अद्‌भुत रचना केली की शोकरसाचे रूपांतर शृंगाररसांत होण्यास वेळ लागला नाही. पण हा शृंगाररस रामप्रेमांगभूत असल्याने भक्तिरसाचा पोषक आहे; म्हणूनच मागील चौपायांत शृंगाररसाचे वर्णन केले आहे. अयोध्यावासी लोक येऊन त्यांचा शोक निरास झाल्यावर असेच वनादि सौंदर्याचे वर्णन (२४९-२५०) केले आहे; त्या सौंदर्यापेक्षा हे सौंदर्य अधिक मनोहर आहे. **(क)** जनक भूमिपती आहेत; सीता भूमिजा आहे. जनकराजा वनांत आल्याने त्यांची पत्नि मही-भूमि जणू त्यांना पाहुणचार करीत आहे. आपले पति व प्रजा शोकाकुल आहेत असे पाहून तिने असे सौंदर्य निर्माण केले कीं - तें लोकांचे मन-हरण करू लागले. ते शोक विसरले व रामप्रेमात मग्न होऊ लागले.

**चौ. ६-७ - (१) स्नान करुनि ...** जसजसे लोक स्नान करून येऊ लागले तसतसे आज्ञा घेऊन, कुठे उतरावयाचे याचा विचार करू लागले. **(क)** काल आल्यापासून आज दुपारी अडीच प्रहर होईपर्यंतचा सर्वकाळ शोकांतच गेला. कुठे उतरावयाचे ही कल्पना सुद्धा कोणाच्या मनांत स्नान करून येईपर्यंत आली नव्हती. फलाहार करण्याची सूचना मिळाली असल्याने आता उतरण्याचा विचार करू लागले. **(ख)** तोच जिकडे दृष्टी जाईल तिकडे मनोहर वृक्ष दिसूं लागले. जो वृक्ष पहावा तो सुंदर ! त्या बरोबर मन प्रसन्न झाले; हा सर्व रामप्रभाव आहे असे वाटून **अनुरागति** - कृतज्ञतायुक्त अनुराग वाढला, रामप्रेम मग्न होऊ लागले व उतरले झाडाखाली सोडली गाठोडी, व लावले बिऱ्हाड ज्यानी त्यानी.

**चौ. ८ व दोहा** - (१) लोक उतरतात न उतरतात तोच त्यांची पुढली सोय रामगुरुंनी लावली. लोक स्नानाला गेले तेव्हाच पत्र पुष्प कंदफलादिकांची ओझी घेऊन वनवासी लोक येऊ लागले होते. **(क) दल** = तुलसीदले, बिल्वदले, दूर्वादले, रानकेळीची व पळसाची पाने ही पाने फराळाचे जिन्नस घेण्यासाठी पाठविली. येथे फुलांचा उल्लेख नसला तरि दो. २७८ मधे वनवासी लोकांनी फुले आणल्याचा उल्लेख आहे, म्हणून फुलेही पाठविली असे मानणे भाग आहे. सार हे की पूजेचे साहित्य व कंदमूलफले विपुल पाठविली. **(ख) पुजुनि पितर सुर अतिथि गुरु** - देवपूजा करून पंचमहायज्ञ करून मग फराळ करू लागले. पितरांचा उल्लेख आधी करून ब्रह्मयज्ञांतील तर्पण - पितृतर्पण सुचविले. म्हणजे ब्रह्मयज्ञ सुचविला. नंतर सुरांचा - देवांचा उल्लेख करून वैश्वदेव सुचविला व अतिथि शब्दाने बलिहरण सुचविले. **असे न मानल्यास चित्रकूटच्या वनांत लक्षावधि अतिथि याच वेळी आले असे मानावे लागेल; कारण प्रत्येकाने अतिथिपूजन केले आहे.** नंतर गुरुपूजन करून फराळ (कंदमूलफलभक्षण) करू लागले. कोणी म्हणतील की वैश्वदेव भाताशिवाय होत नाही. पण हे अज्ञान आहे. **'यदन्नः पुरुषो भवति तदन्नाः तस्य देवताः'** (वा.रा. २।१०२। ३०) मनुष्य जें अन्न खात असेल तेच त्याच्या देवतांना चालते. **विचार करावा वाचकांनी की वनांत झाडाखाली उतरले आहेत; चार वाजून गेले आहेत; दोन दिवसांत पाण्याचा घोट पोटांत गेला नाही; शोकाने अशक्त व कृश झाले आहेत; तरीही पूजा व (पंचमहायज्ञ) वैश्वदेव केल्याशिवाय कंदमूलफळेसुद्धा खाल्ली नाहीत ! यावरून काय तो बोध द्विजांनी घ्यावा.**

*हिं. । एहि बिधि बासर बीते चारीं । रामु निरखि नर नारि सुखारी ॥१॥*
*। दुहुँ समाज अति रुचि मन माहीं । बिनु सिय राम फिरब भल नाहीं ॥२॥*
*। सीता राम संग बनबासू । कोटि अमरपुर सरिस सुपासू ॥३॥*
*। परिहरि लखन रामु बैदेही । जेहि धरु भाव बाम बिधि तेहीं ॥४॥*
*। दाहिन दइउ होइ जब सबही । राम समीप बसिअ बन तबही ॥५॥*
*। मंदाकिनि मज्जनु तिहुँ काला । राम दरसु मुद मंगल माला॥६॥*
*। अटनु राम गिरि बनु तापस थल । असनु अमिअ सम कंद मूल फल ॥७॥*
*। सुख समेत संबत दुइ साता । पल सम होहिं न जनिअहिं जाता ॥८॥*
*हिं. दो. । एहि सुख जोग न लोग सब कहहिं कहाँ अस भागु ॥*
*॥ सहज सुभायँ समाज दुहु रामचरन अनुरागु ॥२८०॥*

*हिं. । एहिं बिधि सकल मनोरथ करहीं । बचन सपेम सुनत मन हरहीं ॥१॥*
*म. । या परिं चार संपले वासर । रामा निरखुनि सुखी नारि नर ॥१॥*
*। आवड उभय समाज मना ही । बरें गमन रामाविण नाहीं ॥२॥*
*। सीतारामां सवें वास वनिं । कोटि अमरपुर समान सुखखनि ॥३॥*
*। त्यजुनि राम लक्ष्मण वैदेही । ज्यां प्रिय गृह विधिवंचित तेही ॥४॥*
*। होइ दैव उजवें पुरतें जैं । राम-समीप वास बिपिनीं तैं ॥५॥*
*। मज्जन मंदाकिनीं त्रिकालां । रामदृष्टि मुद-मंगल-माला ॥६॥*
*। अटन रामगिरि वन तापसथळ । अशन अमृत-सम कंदमूलफल ॥७॥*
*। सुख संयुत संवत हे चवदा । क्षणसम होति, न कळति गत कदा ॥८॥*
*म.दो. । सुखा योग्य या जन न सब भाग्य कुठें म्हणतात ॥*
*॥ स्वभावें चि अनुरक्त उभ समुदय रामपदांत ॥२८०॥*
*म. । यापरिं सकल मनोरथ करती । प्रेमळ वच परिसत मन हरतीं ॥१॥*

**अर्थ** - याप्रमाणे चार दिवस निघून गेले; रामचंद्रांस निरखून पाहण्याने सर्व नर नारी सुखी आहेत. ॥१॥ दोन्ही समाजांच्या मनांत अशी आवड आहे की; (सीता) रामचंद्रांशिवाय परत जाणे बरे नाही ॥२॥ सीतारामांच्या संगतीत वनांत वास करणे (सुद्धा) कोटि अमरपुरां (स्वर्गा) सारखे सुखाची खाण आहे. (खनि = खाण) ॥३॥ रामलक्ष्मण व सीता यांच्या वाचून ज्याना घर प्रिय वाटत असेल त्यांना विधिने (दैवाने) ठकविले असे समजावे. ॥४॥ जेव्हा दैव पुरते अनुकूल (उजवे) असेल तेव्हांच रामाच्या समीप वनांत राहण्यास सापडणार ! ॥५॥ मंदाकिनीत त्रिकाळी स्नान व आनंदमंगलांची मालिका असे रामदर्शन (दृष्टि = दर्शन) ॥६॥ रामगिरि, रामवन आणि तापसांची स्थळे (पहात) हिंडणे आणि अमृतासारख्या कंदमूलफलांचा आहार ॥७॥ यांत चौदा वर्षे सुखांत क्षणासारखी जातील; केव्हां गेली ते कळणार सुद्धा नाही ॥८॥ (पण) या सुखाला योग्य सगळे लोक नाहीत; असे कुठे भाग्यांत आहे? असे सर्व म्हणत आहेत. दोन्ही (उभ) समुदाय (समुदय) स्वभावताच रामपदीं अनुरक्त आहेत.॥दो. २८०॥ याप्रमाणे सगळे लोक मनोरथ करीत आहेत; त्यांची प्रेमळ वचने कानी पडतांच मन चोरून घेत आहेत.॥१॥

**टीका - (१) यापरिं चार संपले वासर** - यापरिं = पूर्वी वर्णन केल्याप्रमाणे. जनक दूत आले त्या दिवशी अयोध्यावासी लोकांनी भाकीत केलेच होते की

आता निदान चार दिवस राहण्यास तरी सापडणार (२७३।२). त्याप्रमाणे हे चार दिवस गेले. जनकदूत रामवनवासाच्या ६८ व्या दिवशी आले व दुसऱ्या दिवशी मिथिलापती आले म्हणजे **वनवासाचे ७२ दिवस गेले. (क) चौ.** ८ - **सुखसंयुत = सुखसंयुक्त = सुखात.**

**दो.** - (१) लोक म्हणतात की रामसंगतीत वर वर्णन केल्याप्रमाणे राहणे सगळ्यांच्या कुठले भाग्यात ! म्हणजेच **निराशेचा अंकुर फुटला आहे.** चार दिवस सुखात गेल्यावर आता पुढे काय होणार असा प्रश्न उत्पन्न झाल्यावर ही चर्चा सुरू झाली. मनोरथ शब्दाने सुचविले की असे घडणे शक्य दिसत नाही. या मनोरथांवरून दोन्ही समाजांच्या स्वाभाविक रामप्रेमाचे दर्शन मात्र होते. असे मनोरथ करण्याचे तरी कोणाच्या भाग्यांत आहे !

***जनकागमन प्रकरण येथे समाप्त झाले.***

●●●

## सुनयनादि व कौसल्यादि भेट प्रकरण (२८१।२ - २८५)

*हिं. । सीय मातु तेहि समय पठाई । दासीं देखि सुअवसरु आई ॥२॥*
*। सावकास सुनि सब सिय सासू । आयउ जनकराज रनिबासू ॥३॥*
*। कौसल्याँ सादर सनमानी । आसन दिए समय सम आनी ॥४॥*
*। सीलु सनेहु सकल दहु ओरा । द्रवहिं देखि सुनि कुलिस कठोरा ॥५॥*
*म. । सीता-माता धाडी ज्यांसी । आल्या सुसमय बघुनी दासी ॥२॥*
*। सीता सासुनां अवसर, कळलें । जनकांतःपुर आलें सगळें ॥३॥*
*। कौसल्या सादर सन्मानुनि । दे आसन समयोचित आणुनि ॥४॥*
*। स्नेह - शील - संपूर्ण उभयता । द्रवति कठिण पवि बघत ऐकतां ॥५॥*

**अर्थ** - सीतेच्या मातेने ज्यांना धाडल्या होत्या त्या दासी चांगली सवड (आहे की नाही) पाहून आल्या ॥२॥ सीतेच्या सर्व सासवांना सवड (फुरसत) आहे असे कळले तेव्हा जनकराजांचा सगळा राणीवसा आला ॥३॥ कौसल्येने त्यांचा आदराने सन्मान केला व परिस्थितीस योग्य अशी आसने (स्वतः) आणून दिली. ॥४॥ दोहीकडे असलेले संपूर्ण शील व संपूर्ण स्नेह पाहतांच व ऐकताच कठीण वज्रांना (सुद्धा) द्रव फुटला (असता) ॥५॥

**टीका. चौ. २-३ - (१) सीतामाता धाडी ज्यांसी** ... दासी - विहिणींना फुरसत आहे की नाही; केव्हा आहे हे पाहून (विचारून) या असे सांगून सीता माता सुनयना राणीने दासींना पाठविल्या होत्या त्या तपास करून आल्या. **(क) अंतःपुर =** राणीवसा, राजाच्या कुटुंबांतील राण्या वगैरे स्त्रिया. जनकराजांच्या अनेक राण्या होत्या इतकेच बालकांडांत सिद्ध झाले आहे.

**चौ. ४-५ - (१) कौसल्या सादर सन्मानुनि ... आणुनि** - आल्याबरोबर उठून उभे राहणे हे आदर देण्याचे लक्षण आहे. या, बसा, वगैरे प्रेमाने म्हणत आलेल्या सगळ्यांना स्वतः आसने आणून बसण्यास दिली; हे विशेष सन्मान देण्याचे लक्षण आहे. **(क)** समयोचित आसने म्हणजे कोणती? सिंहासने दिली नाहीत हे उघड आहे; तसे असते तर सिंहासन, वरासन, शब्द वापरला असता - राम फळाहारी आहेत म्हणून ज्यांनी भोजन करण्याचे नाकारले त्यांची धर्मपत्नी दुखवट्याच्या भेटीत आली असता आज येथे गालिचावर तरी बसेल काय? व्याघ्राजिने, कुशासने, कंबलासनेच आणून दिली असतील. आलेल्या राण्या

केव्हातरी बसावयास येणारच हे सहज जाणण्यासारखे असल्याने आधीच तयारी करून ठेवलेली असणारच.

(२) **स्नेहशील संपूर्ण उभयता** - दोन्ही कडील राण्या स्नेहाच्या व शीलाच्या बाबतीत कोणी कमी आहेत असे नाही. एकमेका विषयी पूर्ण स्नेह आहे व दोघीही पूर्ण सुशील आहेत. यामुळे यांच्या परस्पर भेटीस पाहून कठीण वज्रांना सुद्धा पाझर फुटला असता; व त्याचे संभाषण ऐकूनसुद्धा तसेच झाले असते; मग त्यांची स्वतःची दशा व ती पाहणाऱ्यांची दशा काय झाली असेल याचे वर्णन कोण करणार! **स्नेह** = रामस्नेह असा अर्थही घेता येतोच. एकट्या भरताच्या स्नेहाचा प्रभाव पूर्वी (३२०।६-७) वर्णिला आहे ती टीका पहावी.

***हिं.*** ***। पुलक सिथिल तन बारि बिलोचन । महि नरव लिखन लगीं सब सोचन ॥६॥***
***। सब सियराम प्रीति कि सि मूरति । जनु करुना बहु बेष बिसूरति॥७॥***
***। सीयमातु कह बिधि बुधि बाँकी । जो पय फेनु फोर पबि टाकी ॥८॥***
***हिं. दो.। सुनिअ सुधा देखिअहिं गरल सब करतूति कराल ॥***
***॥ जहँ तहँ काक उलूक बक मानसि सकृत मराल ॥२८१॥***
***म.*** ***। पुलक, शिथिल तनु सजल विलोचन । कुरतडती महि करती क्रंदन ॥६॥***
***। रामसिता - प्रीतीच्या मूर्ती । जणुं करुणा बहु वेषिं विलपती ॥७॥***
***। म्हणे सुनयना विधिमति कुटिला । क्षीरफेन पविघणे किं कुटिला ॥८॥***
***म. दा.। कानिं सुधा दिसतें गरळ करणी सकल कराल ॥***
***॥ काक घुबड बक चहुंकडे मानसिं मात्र मराल ॥२८१॥***

**अर्थ** - देह पुलकित झाले असून हातपाय गळून गेले आहेत. (शिथिल तनु) - नेत्रांत अश्रू आले आहेत; व (नखांनी) जमीन कुरतडीत आक्रोश करीत रडत आहेत.॥६॥सर्व रामसीता प्रेमाच्या मूर्ती असून जणूं करुणा अनेक रूपे घेऊन विलाप करीत आहे.॥७॥ (सीतामाता) सुनयना म्हणाली की विधीची बुद्धि कुटिल आहे; (कारण) त्याने दुधाचा फेस वज्राच्या घणाने की हो कुटून टाकला ! ॥८॥ अमृत कानांनी ऐकण्यासच सापडते पण दिसते मात्र गरळ (विष); कावळे घुबडें व बगळे चोहोंकडे आहेत (दिसतात) पण हंस मात्र मानस सरोवरांतच असतात ! अशी विधीची सर्व करणी कराल आहे. (॥दो. २८१)

**टीका. - चौ. ६-७** (१) दोन्हींकडील राण्यांचे राम व सीता यांच्यावर व एकमेकींवर सारखेच प्रेम आहे; यामुळे सर्वांची दशा सारखीच झाली आहे. सर्व

राण्या सीताराम प्रीतीच्या मूर्तीच आहेत; भरताला रामस्नेहमूर्ति, रामप्रेममूर्ति म्हटले आहे. पण या स्त्रिया असल्याने प्रीतीच्या मूर्ती म्हटले; करुणारसांत मग्न आहेत म्हणून करुणेच्या अनेक मूर्ति म्हटले.

**चौ. ८ (१) म्हणे सुनयना** - या राण्या दुखवट्याचा समाचार घेण्यासाठी बसावयास आल्या आहेत. अशा प्रसंगी प्रेमळ स्त्रियांची जी दशा होते तिचे वर्णन मागील चौपायांत विशेष कारण सांगून केले. **अशा वेळी बसावयास येणाऱ्या व्यक्तिनेच प्रथम तोंड उघडावयाचे असते;** म्हणून सुनयना पट्टराणी असल्याने तिने बोलणे जरूर होते. ती आधी बोलू लागली यावरून तिला कमी शोक झाला होता असे म्हटल्यास ते व्यवहारशून्यतेचे ठरेल. शिवाय पूर्ववचनाशी विरोध उत्पन्न होईल. **(क)** पुढील उपमा पाहिल्या म्हणजे कदाचित असे वाटेल अविवेकी माणसांस की ही वचने कैकयीला उद्देशून आहेत; पण लक्षात ठेवावे की दुखवट्याचे बसण्यास जातात ते कोणाच्या दुःखावर डागण्या देण्यासाठी नसते; निदान सज्जन तरी असे करीत नाहीत. सुनयना कौसल्येसारखीच पूर्ण शीलसंपन्न आहे हे आधीच सांगितले आहे. **(ख) क्षीरफेन पविघर्णे किं कुटिला** - जो दुधाचा फेस अति पौष्टिक, अत्यंत मृदु व हितकारक असतो व ज्याला वैद्यशास्त्रात अमृत म्हणतात; तो वज्राच्या घणाने - टाकीने फोडण्याचा जो प्रयत्न करील त्याच्या बुद्धीत भ्रम झाला आहे असेच म्हणावे लागेल. तसाच विधीच्या ब्रह्मदेवाच्या बुद्धीत भ्रम उत्पन्न होऊन त्याने कुटिल करणी केली. रामचंद्रांसारख्या क्षीरफेनावर त्याने विपत्तींचे, संकटांचे घावावर घाव मारले. रामसीता यांच्या अयोध्येतील शय्येला 'क्षीरफेन मृदु' असे म्हटले आहेच.

**दो. (१) कानिं सुधा दिसतें गरळ** - रामराज्याभिषेकाची बातमी लोकांच्या नुसती कानी आली; पण प्रत्यक्ष दिसले **विष - रामवनवास. रामराज्याला 'सुखसुधा'** असे नुकतेच म्हटले आहे. (२७३।८ पहा) रामवियोगाला विष म्हटले आहे. 'लोक वियोग विषमविषिं जळतां' (१८४।२) **(क) कराल करणीला दृष्टान्त - काक** - दुष्ट, । छिद्रान्वेषी, अविश्वासी प्रस्तावनेत **'काकस्वभाव'** वर्णन पहावे. **घुबडे =** संतनिंदा करणारे. 'होति उलूक संतनिंदारत (७।१२१।२६) 'ममता तरुण तमी अंधारी । द्वेष, राग घुबडां सुखकारी' (५।४७।३) बक = दांभिक, अतिविषयी 'बगळे काक विषयि अति खळ ते' (१।३८।३) **'बकध्यानि** तापस तैं वदला' (१।१६२।६) **दांभिक, कपटी** मुनिविषयीं म्हटले आहे. 'करी इथें बगळा ध्यानाला'

(६।८५।७) मराल = हंस; **'संत हंस** गुण घेति पय-' (१।६) ब्रह्मदेवाने निर्माण केलेल्या या जगात काक, घुबडे, बगळे यांच्या सारखे दुष्ट दुर्जन, दांभिक, अति विषयी, व संतसज्जनांची निंदा करणारेच जिकडे तिकडे भरपूर, हंसासारखा एखादाच संत कोणी क्वचित कुठेतरी दिसतो. हंस मानसांतच दिसतात; तसे संत फार दुर्मिळ **(ख) 'भरत हंस** रविवंश तडागां' (२३२।६) असे रामच म्हणाले आहेत. भाव हा की सर्व जग जरी दुष्ट झाले तरी भरत दुष्टपणा करणार नाहीत. सुनयना सीतामाता आहे; ती कैकयीचे पण सांत्वन करण्यासाठी आली आहे, आणि जनकराजांची प्रिय धर्मपत्नी आहे. या गोष्टींचा विसर पडला की यांतील प्रत्येक वचन कैकयीकडे लावता येईल व मानसांत आधारही सापडतील. पण पश्चात्तापाने आधीच दग्ध झालेल्या व दैवाच्या हातातील बाहुली बनून कलंकित झालेल्या निर्दोष, सीतारामप्रेमी कैकयीला सीतामाता, जनकपट्टराणी अन्योक्तिनी दुःखांवर डागण्या देईल असे या मंद बुद्धीस स्वप्नातही वाटत नसल्याने ते गूढार्थ काढले नाहीत. कैकयीची निंदा, दोषवर्णन इ. ऐकून वाचून ज्यांना समाधान वाटणार असेल त्यांना मा.पी. मध्ये या ठिकाणी भरपूर इच्छाभोजन मिळेल; पण त्यांनी आधी २६३।८ या चौपाईवरील टीका पहावी. या दोह्याच्या अर्थाचा एक श्लोक आहे. **'अमृतं श्रूयते स्वर्गे विषमत्र प्रदृश्यते । काका भेकास्तु सर्वत्र हंसाः सरसि मानसे'** (यत्र तत्र बकाऽ काकाः असा पाठभेद ही आढळतो.)

*हिं. । सुनि ससोच कह देबि सुमित्रा । बिधि गति बड़ि बिपरित बिचित्रा ॥१॥*
*। जो सृजि पालइ हरइ बहोरी । बाल केलि सम बिधि मति भोरी ॥२॥*
*। कौसल्या कह दोस न काहू । करम बिबस दुख सुख छति लाहू ॥३॥*
*। कठिन करम गति जान बिधाता । जो सुभ असुभ सकल फल दाता ॥४॥*
*। ईस रजाइ सीस सबही कें । उतपति थिति लय बिषहु अमी कें ॥५॥*
*। देबि मोहबस सोचिअ बादी । बिधि प्रपंचु अस अचल अनादी ॥६॥*

*म. । शोकें वदली देवि सुमित्रा । विधिगति अति विपरीत विचित्रा ॥१॥*
*। तो सृजि पाळी मग करि होळी । बालकेलि-सम, विधिमति भोळी ॥२॥*
*। म्हणे कौसिला दोष कुणा नहिं । कर्मे सुख दुःखें क्षति लाभ हि ॥३॥*
*। कठिण कर्मगति जाणि विधाता । जो शुभ अशुभ, सकलफल दाता ॥४॥*
*। ईश्वर - आज्ञा शिरिं सर्वांचे । सृष्टी - स्थिति - लय - विष - अमृताचे ॥५॥*
*। देवि मोहवश शोक विफळ हा । विधीप्रपंच अनादि अटळ हा ॥६॥*

**अर्थ** - सुमित्रा देवी शोक करीत म्हणाली की विधिगति (विधिकरणी) अति विपरीत व विचित्र आहे.।।१।। तो बाललीलांप्रमाणे उत्पन्न करतो, पालन करतो व मग सर्वांची होळी संहार करतो; विधिमति भोळी आहे (दुष्ट, कराल नाही)।।२।। कौसल्या म्हणाली की दोष कोणाचाच नाही; सुखदुःखे, लाभ, हानि (क्षति, छति) कर्माने (कर्मानुसार) होत असतात.।।३।। कर्मगति कठीण असून जो शुभ (पुण्य) व अशुभ (पाप) (कर्मांचे) फळ सगळ्यांना देणार आहे तो विधाता तो जाणतो.।।४।। सृष्टि, स्थिति, लय, विष, अमृत इत्यादी सर्वांच्या शिरावर ईश्वराची आज्ञा आहे - चालते.।।५।। म्हणून देवी ! आपण शोक करतो हा विफळ आहे; केवळ मोहाने करतो; विधीने निर्माण केलेला हा प्रपंच अनादि असून अटळ आहे (त्यांत कोणाला बदल करता येत नाही.)।।६।।

**टीका. चौ. १-२** (१) काहीतरी बोलले पाहिजे म्हणून सुनयनेने बोलण्यास प्रारंभ केला व **विषयाला तोंड फोडण्यासाठी म्हणून विधिमति कुटिल व करणी कराल असे म्हटले.** पण हे म्हणणे तत्त्वाला सोडून असल्यामुळे व कोणीतरी बोलले पाहिजे म्हणून सुमित्रा शोक करीतच त्यांत थोडी सुधारणा करते. **(क) विधि-गति अति** विपरीस **विचित्र** येथे **विधि = ईश्वर भगवान** असा अर्थ आहे; पुढे कौसल्या वचनांत हा अर्थ आधी विधाता व मग ईश्वर शब्द वापरून स्पष्ट केला आहे. शिवाय 'अति विचित्र भगवंत गति जगीं कळे कोणास ?' (२।७७) असे रामच म्हणाले आहेत. **(ख)** याला दृष्टान्त दिला **बालकेलिसम** - बाललीलांप्रमाणे. बाललीला कराल कुटिल असते असे कोण म्हणेल ? बाललीला निर्हेतुक असते. खेळ मांडताना आनंद, त्याचे पालन व वृद्धी करताना = खेळ खेळताना आनंद व शेवटी खेळ मोडून टाकताना - मोडून ठेवतानाही आनंद. मधल्या खेळात हसली, रडली, भांडली तरी खेळाच्या पूर्वी व खेळानंतर त्यांतील कोणताच विकार नसतो. **वैषम्य, निर्दयता इ. दोष बालकांच्या बुद्धीत नाहीत, नसतात.** मुलांची बुद्धि भोळी असते. तसेच ईश्वराचे (विधीचे) आहे असे सुमित्रा म्हणाली; म्हणजेच ब्रह्मदेवाची मति कुटिल आहे व करणी कराल आहे, या **अध्यारोपाचा अपवाद केला;** व ही सर्व ईश्वराची लीला आहे असे ठरविले. **(ग)** पण कौसल्येला हेही मान्य झाले नाही. ईश्वर असा खेळ का खेळतो ? ज्या खेळाच्या योगाने जीवांना, त्याच्याच अंशांना, दुःख होते असा खेळ ईश्वराने तरी का खेळावा ? बालक अज्ञानी असतात; पण ईश्वर सर्वज्ञ असून तो खेळ खेळतो असे म्हटले म्हणजे **कृतप्रणाश** व **अकृतोपलब्धि हे दोन दोष**

**उत्पन्न होतात.** केवळ ईश्वराच्या इच्छेने सुख दुःखे, लाभहानि, जन्ममरण यांची प्राप्ति जीवांस होते असे म्हटल्याने, ठरेल की या गोष्टी जीवांना निष्कारणच भोगाव्या लागतात. म्हणजेच कोणी पुष्कळ पुण्य केले तरी त्याचे नियमित फळ नाही व पापाचे पर्वत केले तरी त्याचा काही परिणाम नाही असे ठरेल; म्हणजेच **केलेले कर्म फुकट जाईल = कृतप्रणाश होईल**; व काही केले नसता भोग भोगावे लागले असे ठरल्याने **अकृत-उपलब्धि = न केलेल्याची प्राप्ति होते असे ठरेल**; पण हे अशक्य आहे; कारणावाचून कार्य घडत नाही; (गहू पेरले तर बाजरी पिकत नाही;) हा सिद्धान्त निरपवाद आहे. कारण दिसो, कळो किंवा न दिसो न कळो, धूर निघतो आहे म्हणजे अग्नि असलाच पाहिजे. म्हणून कौसल्या सिद्धान्त सांगते -

**चौ. ३-४ (१) दोष कुणा नहिं** - ब्रह्मदेवाचाही दोष नाही व ईश्वराचाही नाही, किंवा आणखी कोणाचा नाही. मग विचित्र विपरीत घडते कसे ? **(क) कर्मे सुखदुःखें क्षति लाभहि - ज्याला त्याला स्वतःच्याच कर्माचे फळ भोगावे लागते. 'कोणि कुणा सुख दुःख न दाता । निज कृत कर्मभोग ते भ्राता'** (२।९२।४) याच्या टीकेत व इतर अनेक ठिकाणी टीकेत याविषयी विस्तार केला आहे. काही कठीण पापकर्म केले नसता दुःख का होते ? याचे उत्तर **(ख) कठिण कर्मगति जाणि विधाता** - 'कर्मणो गहना गतिः' कर्माची गति, प्रभाव इ. जाणणे फार कठीण आहे; जीवांना ते कळणे शक्य नसते. किती जन्मांपूर्वी केव्हा कोणी काय कर्म केले व त्याचे फळ केव्हा कसे मिळते हे ईश्वराशिवाय कोणालाच कळत नाही. **विधाता =** ईश्वर हे सर्व जाणतो व तोच **शुभ-अशुभ सकल फल दाता आहे.** तोच कर्माचे बरे वाईट फळ पदरात टाकतो. **'शुभ वा अशुभ कर्म-अनुसारें । ईश देई फळ हृदय विचारें'** (७७।७) असे दशरथ म्हणाले आहेत. पुढील चौपाईतच विधात्याला ईश्वर म्हटले आहे. **(ग)** यावर कोणी शंका घेईल की सुखदुःखादींचे लेख लिहिणारा तर ब्रह्मदेव आहे; व येथे शुभाशुभ कर्मफल देणाराला ईश्वर म्हटले हे कसे ? याचे उत्तर -

**चौ. ५ - (१) ईश्वर - आज्ञा शिरिं सर्वांचे** - उत्पत्ति करणारा व सुखदुःखादि लेख लिहिणारा ब्रह्मदेव असो की, पालन करणारा विष्णु असो की संहार करणारा रुद्र-हर असो; त्यांना पूर्ण स्वातंत्र्य नाही व आपल्या लहरीप्रमाणे ते खेळ खेळू शकत नाहीत. ते व इतर सर्व ईश्वरनियोजित अधिकारी ईश्वराच्या आज्ञेनेच आपापले नियोजित कार्य-कर्तव्य निर्ममत्वाने करीत असतात. उदा. सरकारी

अधिकाऱ्याची जी सत्ता असते ती सरकारचीच असते; म्हणूनच एखाद्या अधिकाऱ्याने अधिकारी म्हणून कार्य करीत असता अन्याय किंवा गुन्हा केला तर फिर्याद सरकारवर करावी लागते. पण ईश्वराने नेमलेले अधिकारी अन्याय, अपराध, गुन्हा कधीच करीत नाहीत. कोणी मेला तर देवाज्ञा झाली, असे म्हणण्याची व लिहिण्याची प्रथा या सिद्धान्ताला धरूनच आहे. (क) **विष अमृताचे** - विष जेव्हा कोणाला ठार मारते तेव्हा ते ईश्वराज्ञेनेच मारते - व अमृत जगविते तेही ईश्वराज्ञेनेच. ईश्वराची आज्ञा नसेल तर जालीम विष भरपूर खाऊन, कोणास कळले नाही, विषाचा उतारा दिला गेला नाही तरीसुद्धा ते मारू शकत नाही. या लिहिणाऱ्या हातानेच असे १९०६-१९०७ आश्विन शुद्ध नवमीला केले व या परमार्थमार्गाचा गंधही त्या वेळी नसता हा देह जगला, ही मुद्रण प्रत लिहिपर्यंत ! राहू अमृत पिऊनसुद्धा अमर झाला नाही; पण मीरा पेलाभर भयानक विष पिऊनसुद्धा दिव्यदेही झाली. 'विषमप्यमृतं क्वचिद्भवेत् अमृतं विषमीश्वरेच्छया' २९८।७; ५।५९।८ पहा.

**चौ. ६ - (१) देवि मोहवश शोक विफळ हा** - हिंदीत 'शोचिअ' = शोक करणे असा प्रयोग आहे; व त्याचा संबंध कोणी केवळ सुनयनेकडे घेतात; पण ते योग्य नव्हे. सगळ्याच राण्या शोक करीत आहेत; सुमित्रा तर शोक करीत रडत रडतच बोलली. उचित अर्थ हा आहे की आपले हे शोक करणे निष्फळ आहे. याने परिस्थितीत काही बदल करता येईल असे नाही. आपण सर्वच मोहाला बळी पडलो व त्यामुळे शोक करावासा वाटतो; केल्याशिवाय राहवत नाही. **(क) विधीप्रपंच अनादि अटळ हा** - अनादि काळापासून हे असेच चालले आहे. शोक करणे निष्फळ, निरूपयोगी आहे हे जाणूनसुद्धा वेळ आली म्हणजे शोक केला जातोच. या प्रपंचांतील दुःखशोकाच्या घटना अटळ असतात; त्या कोणालाही टाळता येत नाहीत. हे असे चालावयाचेच. **सूचना** - या काण्डात हा कर्मविपाक सिद्धांत वारंवार मांडला आहे. हा मूलभूत कर्मविपाक सिद्धान्त व सुखदुःख भोगविचार यांची सांगड घालणे वैराग्यप्राप्तीचे एक महत्त्वाचे साधन आहे; व या कांडाचे मुख्य ध्येय धर्माचरणाने वैराग्य प्राप्ती हे आहे. म्हणून धर्माला प्राधान्य व कर्मविपाक सिद्धांताचा विचार या कांडांत प्रारंभापासून शेवटपर्यंत वारंवार दिसेल. कौसल्येचे या चौपाईतील म्हणणे हे तिच्यासह सर्व राण्यांना अनुलक्षून आहे हे पुढील चौपाईवरून सुद्धा दिसते.

*हिं. । भूपति जिअब मरब उर आनी । सोचिअ सखि लखि निज हित हानी ॥७॥*
*। सीय मातु कह सत्य सुबानी । सुकृती अवधि अवधपति रानी ॥८॥*
*हिं.दो. । लखनु रामु सिय जाहु बन भल परिनाम न पोचु ।*
*॥ गहबरि हियँ कह कौसिला मोहि भरत कर सोचु ॥२८२॥*
*म. । मनिं आणुनि नृप जीवन मरणें । निज हित हानि बघुनि सखि रडणें ॥७॥*
*। म्हणे सुनयना सत्य सुवाणी । सुकृतिअवधि कोसलपति-राणी ॥८॥*
*म.दो. । लक्ष्मण सीता राम वनिं गत न अशुभ, शुभ अंतिं ॥*
*॥ म्हणे कौसिला गहिंवरुनि भरतविषयिं मज खंति ॥२८२॥*

**अर्थ** - सखि ! आपले रडणे-शोक करणे केवळ भूपतींच्या जीवनाचा व मरणाचा विचार मनात आणून स्वतःच्या झालेल्या हानीमुळे आहे. (ते शोचनीय नाहीत)॥७॥ (सीतामाता) सुनयना म्हणाली की आपली वाणी सत्य व सुंदर आहे; कारण की अयोध्यापति पुण्यात्म्यांची सीमाच होते व आपण त्यांच्याच राणी आहात. (आपणास हे बोलणे शोभतेच)॥८॥ लक्ष्मण सीता व राम वनात गेले तर त्यांत काही अशुभ (वाईट) होणार नाही. शेवटी शुभ-कल्याणच होईल; पण ! गहिंवरून कौसल्या म्हणते की मला चिंता (खंती) वाटते ती भरताविषयीच ! (रामवियोग झाल्यास भरताचे काय होईल ! हीच भीती)॥२८२॥

**टीका. चौ. ७-८ (१) निजहित हानि बघुनि सखि रडणें** - कौसल्यावचनानी दाखविले की मेलेल्या माणसाबद्दल कोणी जो शोक करतात तो मोहाने, अज्ञानाने ममत्वामुळे करतात व स्वतःच्या झालेल्या हानीमुळे करतात. मेलेल्या माणसासाठी कोणी शोक करीत नसून ममतेने व मुख्यतः स्वार्थामुळे करतात. **(क) सुकृति अवधि कोसलपति राणी - सुकृति अवधि =** सुकृतींची सीमा ' सुकृती पुण्यवान् धन्यः, (अमरे) हे शब्द कौसल्येकडेसुद्धा घेता येतील. पण मागला संदर्भ मुख्यतः भूपतींचा आहे; व शिवाय हे शब्द कौसल्येकडे घेणे परिस्थितीला शोभण्यासारखे नाही. कौसल्या लगेच म्हणाली असती की मी जर अशी सुकृती; पुण्यात्मा, धन्य असते तर ही अशी दशा सर्व बाजूंनी का झाली असती ? त्यांच्या आधीच माझे प्राण निघून गेले असते. मी पापी म्हणून तर हे सर्व पाहण्यास व भोगण्यास जगले आहे. **'सर्वस्वीं मज वाम विधाता'** (१६५।७) **'हें घडलें देखत नयनां या । त्यजि न अभागि जीव तरि काया'** (१६६।६) असे कौसल्या भरताजवळ म्हणालीच आहे. **'तशि पुनीत कौसल्या देवी'** (१।२९४।४) असे वसिष्ठ म्हणाले असले

तरी आजच्या प्रसंगी सुनयनेने सत्य पण अप्रिय बोलणे शोभणार नाही.

**दो. (१) लक्ष्मण सीता राम वनिं गत न अशुभ, शुभ अंतिं...** - येथे कौसल्येच्या विशाल हृदयाचे, दृढ आत्मविश्वासाचे, ज्ञानाचे व भरतप्रेमाचे सुंदर मिश्रण चित्रित केलेले दिसते. राम परमात्मा आहेत हे कौसल्येचे ज्ञान सजीव आहे. **'सर्व धर्मि पित्राज्ञा श्रेष्ठचि'** (५५।८) व 'यतो धर्मस्ततो जयः' असा दृढ आत्मविश्वास आहे. सत्यभाषी दशरथांची वचने खोटी होणार नाहीत अशी तिची पक्की खात्री आहे व **'पुन्हां स्ववश पुरि वसेल शोभन । राम सकल गुणनिधिचे शासन'** होईल (२।३६।३) असे दशरथ म्हणाले आहेत व **'येउनि पाहिन पाय मी'** (२।५३) या सत्यसंध रामाच्या वचनावर तिची दृढ निष्ठा आहे; म्हणून म्हणाली की सीतारामलक्ष्मण वनात गेल्याने अशुभ होणार नाही. किती विशाल हृदय व केवढा धैर्याचा व आत्मविश्वासाचा महामेरु ! हे बोलताना कौसल्येला वाईटही वाटले नाही ! पण भरताचा विचार मनात येताच गहिवरली; हृदय भरून आले, कंठ दाटला व म्हणाली **(क) 'भरतविषयिं मज खंति'** चिंता वाटते फक्त भरताची; कारण **'किती वदूं मी हृदय कठिणता । कुलिशा लाजवि मिळवि महत्ता'** (१७९।८) **'हृदय न** कंपुनि फुटत हर ! कठिण फार पविहून' (१९९) असे उद्गार हा (भरत) सारखे काढीत असतो. याचे वडीलही असेच म्हणाले 'त्या सुतविरहें गेले प्राण न । महा पापि मज समान आन न' (१४९।८) आणि शेवटी काय झाले ! दिवसा भूक नाही, रात्री झोप नाही, कसा झाला आहे पाहिलात ना ! म्हणून त्याचीच चिंता वाटते; बाकी कशाची नाही.

*हिं.* ***। ईस प्रसाद असीस तुम्हारी । सुत सुतबधू देवसरि बारी ॥१॥***
***। राम सपथ मैं कीन्हि न काऊ । सो करि कहउँ सखी सतिभाऊ ॥२॥***
***। भरत सील गुन बिनय बड़ाई । भायप भगति भरोस भलाई ॥३॥***
***। कहत सारदहु कर मति हीचे । सागर सीप कि जाहिं उलीचे ॥४॥***

*म.* ***। ईशकृपें तव आशिषिं भारी । सुत सुतवधू देवसरि वारी ॥१॥***
***। राम-शपथ घेतली कधीं नहि । सद्भावें वदुं ती घेऊन हि ॥२॥***
***। भरत - शील - गुण - विनय - महत्ता । श्रद्धा भक्ति भलाइ बंधुता ॥३॥***
***। वदत शारदामति हि कचरते । सागर शिंपी कधिं किं उपसते ॥४॥***

**अर्थ** - ईश्वराच्या (शंकराच्या) भारी कृपेने व आपल्या आशीर्वादाने पुत्रवधू देवनदी गंगेसारखी व पुत्र गंगाजलासारखा आहे.॥१॥ मी कधीं रामाची शपथ

घेतली नाही; पण आज तीसुद्धा घेऊन सांगते की ॥२॥ भरताचे शील, गुण, नम्रता, महत्ता, श्रद्धा (विश्वास) भक्ति, चांगुलपणा व बंधुभाव ॥३॥ यांचे वर्णन करण्यास सरस्वती देवीची (शारदा) बुद्धि सुद्धा कचरते. (तेथे माझी बुद्धि) शिंपी कधी सागर उपसून टाकू शकेल काय ?॥४॥

**टीका. चौ. १ (१) ईशकृपें =** शंकराच्या कृपेने (२८५।४ पहा). सत्पुत्र होणे हेसुद्धा ईशकृपेवरच अवलंबून आहे. पण ईशकृपा पुण्यसंचयानेच होत असते. 'तुम्हिं गुरु विप्र धेनुसुर-सेवी । तशि पुनीत कौसल्या देवी' (१।२९४।४) असे वसिष्ठ दशरथांस म्हणाले. या पुण्यामुळे राम पुत्र झाले. ४३।६ पहा. पण आपल्या पुण्याचा उल्लेख न करता ईशकृपेचा हवाला देणे हे निरहंकार वृत्तीचे व सौजन्याचे लक्षण आहे. **(क) सुत सुतवधू देवसरि वारि -** 'बारी' = जल, बारि हा शब्द हिंदीत मानसांत पुल्लिंगी वापरला आहे. म्हणून देवसरि = देवनदी गंगा = सुतवधू सीता; व गंगाजल = सुत, राम; सीतेनें स्त्रीपुरुष (पत्नीपति) संबंधाला हाच दृष्टान्त नदी व वारी दिला आहे. 'जिय बिनु देह **नदी** बिनु **बारी** । तैसिअ नाथ **पुरुष** बिनु **नारी**' (६५।७) **वारी** = निवारण करणारे. गंगा पापं निवारण करते. तसे हे जोडपे पाप, ताप, दुःख, दैन्य, जन्ममरणारदी सर्व अनिष्ट गोष्टींचे निवारण करणारे आहे. भागीरथी गंगा स्थावर आहे, तिच्याजवळ जावे लागते; पण सीता गंगा व राम गांगवारि (गंगाजल) ठिकठिकाणी जाऊन सर्वांना पावन करणार आहेत; यामुळे त्यांच्याविषयी चिंता मुळीच नाही व वनात गेल्याने परिणाम शुभच होणार आहे.

**चौ. २ - (१) राम शपथ घेतली कधीं नहिं** - आईबाप सहसा पुत्राची शपथ घेत नाहीत, पण पुढे जे बोलणार आहे त्यावर विश्वास बसावा व कुशंका = शंका घेण्यास जागा राहू नये म्हणून रामाची शपथ घेतली. पुत्राची खोटी शपथ घेणारा **वृद्ध ब्राह्मण** पाहिला पण ती शपथ घेतल्यापासून सहा महिन्यांच्या आत त्याचा तो मुलगा (पुण्यास) तडकाफडकी मरणही पावला. खोटी शपथ घेतल्याने पुण्याचा क्षय होतो; व ज्या पुण्याने ती वस्तु प्राप्त झालेली असते त्या पुण्याचा विनाश झाल्याने ती वस्तु हातची जाते; निरुपयोगी ठरते. म्हणूनच कुबडीने कैकयीला बजावले होते की रामशपथ घेतल्याशिवाय राजावर विश्वास ठेऊ नकोस (२।२२।७) येथे कैकयीचाच संबंध असल्याने रामशपथ घेतल्याशिवाय विश्वास बसणार नाही असे खात्रीने वाटल्यामुळेच रामशपथ घेऊन कौसल्या

सांगणार आहे की भरत रामाबरोबर वनात गेले तरच त्यांच्याविषयीची चिंता दूर होईल.

**चौ. ३-४ (१) भरत-शील-गुण...बंधुता** - या चौपाईत भरताच्या सातगुणांचा उल्लेख आहे. ते जणूं सप्त सागरच आहेत. त्या गुणांचे वर्णन करणे म्हणजे शिंपीने सागरातील पाणी उपसून तो रिकामा करण्यासारखे आहे. ज्या गुणांचे वर्णन करण्यास सरस्वती देवीला धीर होत नाही; तेथे कौसल्या म्हणते माझी शिंपीसारखी बुद्धि काय वर्णन करणार ? दशरथ भरताविषयी काय म्हणत असत ते आता सांगते.

*हिं.* ***। जानउँ सदा भरत कुलदीपा । बार बार मोहि कहेउ महीपा ॥५॥***
***। कसें कनकु मनि पारिखि पाएँ । पुरुष परिखिअहिं समयँ सुभाएँ ॥६॥***
***। अनुचित आजु कहब अस मोरा । सोक सनेहँ सयानप थोरा ॥७॥***
***। सुनि सुरसरि सम पावनि बानी । भई सनेहँ बिकल सब रानी ॥८॥***

*हिं.दो.* ***। कौसल्या कह धीर धरि सुनहु देबि मिथिलेसी ॥***
***॥ को बिबेकनिधि बल्लभहि तुम्हहि सकइ उपदेसिं ॥२८३॥***

*म.* ***। जाणें सदा भरत कुलदीपक । कितिदां वदले मज नृपनायक ॥५॥***
***। कसें जनक मणि पारखि लाभत । स्वभावें चि नर समयिं परीक्षित ॥६॥***
***। अनुचित आज असें मम भाषण । शोकीं स्नेहीं अल्प चतुरपण ॥७॥***
***। श्रवुनि पूत गंगेसम वाणी । स्नेह-बिकल झाल्या सब राणी ॥८॥***

*म.दो.* ***। वदे सधीरा कौसला श्रुणु देवी मिथिलेशि ॥***
***॥ तुम्हां ज्ञाननिधि-वल्लभे कोण काय उपदेशि ॥२८३॥***

**अर्थ** - भरत कुलदीपक आहेत हे मी सदा जाणतो असे महाराज मजपाशी कितीक वेळा म्हणाले.॥५॥ सोने कसाला लावल्याने व मणि (रत्न) रत्नपारखी मिळाल्याने परीक्षा (किंमत) होते तशी पुरुषाची परीक्षा प्रसंगी (योग्य वेळी, समयि) त्याच्या स्वभावावरूनच होते.॥६॥ आज मी असे बोलणे अनुचित आहे (खरे) पण शोकामध्ये व स्नेहामध्ये चतुरपणा (शहाणपणा) अल्प होतो - कमी पडतो.॥७॥ (ही) गंगेसारखी पवित्र (पूत) वाणी ऐकून सर्व राण्या स्नेहाने व्याकुळ झाल्या ॥८॥ (तेव्हा) कौसल्या धीर धरून (स-धीरा) म्हणाली की देवी ! मिथिलेश्वरी ! हे पहा (श्रुणु) की ज्ञाननिधीच्या प्रिय पत्नीला तुम्हाला कोण काय उपदेश करणार ! ॥ दो. २८३॥

**टीका. चौ. ५-६ (१) कितिदां वदले मज नृपनायक** - भाव हा की भरताच्या स्वभावाची परीक्षा त्यांना सहज झाली होती. पण केवळ पहिला चरण घेतला म्हणजे अर्थ होतो की पहिल्यापासूनच जाणते. हे कौसल्येच्या चरित्रावरून सत्य ठरते. **(क) स्वभावेंचि नर समयिं परीक्षित** - भाव हा की आम्हा दोघांशिवाय भरताच्या स्वभावाचे ज्ञान कोणाला झाले नव्हते ते या दुर्धर प्रसंगाने झाले. संकटकाळीच, प्रसंग पडला म्हणजेच, पुरुषाची परीक्षा होते. 'यथा चतुर्भिः कनक परीक्ष्यते निघर्षण च्छेदनतापताडनैः ॥ तथा चतुर्भिः पुरुषः परिक्ष्यते त्यागेन शीलेन गुणेन कर्मणा' (सु.र.) दुर्धर प्रसंग ओढवल्यावर लोक भरताविषयी साशंक होते; – होणे साहजिक होते, त्यांत कोणाचा दोष नव्हता; पण आता सर्वांची खात्री झाली की भरत कुलदीपक आहेत. **(ख) दोन दृष्टान्त कशासाठी ? - समाधान** - दशरथराजांनी या चिंतामणींची परीक्षा सहज स्वभावताच केली होती. उत्तम रत्नपारखी असतो तो रत्न हातात घेतल्याबरोबर त्याची सहज परीक्षा व किंमत करू शकतो; त्याला इतर साधनांची अपेक्षा नसते; तसे दशरथ होते. सोन्याची परीक्षा करणारा कितीही हुशार असला तरी त्याला निदान कसोटी तरी घ्यावी लागतेच. वजन व सोने आहे की नाही हे एखादा क्वचित हातात घेतल्यावर सांगू शकेल; पण कसे किती हे सांगण्यास कसोटी पाहिजेच. लोकांना कसोटी सापडली तेव्हा त्यांनी परीक्षा केली.

**चौ. ७ (१) अनुचित आज असे मम भाषण** - दशरथ निधनाच्या समाचारासाठी आल्या असता सावत्र मुलाच्या गुणांची प्रशंसा करीत बसली आहे हे लोकाचाराविरुद्ध म्हणून अनुचित भरताला त्याच्या मातेने व पित्याने दिलेले व रामचंद्रांनी मान्य केलेले राज्य त्याने त्यागले असता, कौसल्येने त्याची प्रशंसा करणे म्हणजे त्याने केले ते योग्य केले असे म्हणण्यासारखे आहे; म्हणून अनुचित. ते राज्य रामाचे होते व कौसल्या रामजननी म्हणून तिने हे म्हणणे अनुचित; म्हणून 'मम' हा शब्द घातला आहे. इतर कोणी हेच म्हटले असते तर अनुचित ठरले नसते. **(क) शोकीं स्नेहीं अल्प चतुरपण** - भाव हा की शोकाने किंवा स्नेहाने व्याकुळ होऊन बोलणाराच्या ठिकाणी शहाणपणा चतुरपण फारसे रहात नाही. कौसल्या तर शोकाने आणि स्नेहानेही व्याकुळ झाली आहे त्यामुळे उचित, अनुचित हा विचार सहज सुटला; राहिला नाही.

**चौ. ८ (१) श्रवुनि पूत गंगेसम वाणी** - गंगा सर्वांना पावन करते. त्या

प्रमाणे 'दोष कुणा नहि' असे म्हणून कौसल्येने मंथरा, कैकयी, देव, सरस्वती, विधि इ. सर्वांना दोषमुक्त - पावन केले. भरताला नुसता पावन करून न थांबता, लोक काय म्हणतील याची पर्वा न करता त्याची भरपूर स्तुती केली. स्वतःचा प्राणप्रिय पुत्र व अत्यंत लाडकी सून यांच्या वनवास दुःखाची व त्यांच्या विरहाची चिंता नाही पण भरताची चिंता लागली आहे ! यापेक्षा हृदयाची व वाणीची पावनता आणखी कोणती असेल ?

**दो.** (१) या दोह्याचा संबंध पुढील चौपायांशी आहे. पुढील विनंतीची ही पूर्व तयारी आहे. क्षमायाचना आहे. **ज्ञाननिधिवल्लभे** - भाव हा की आपणही ज्ञानखाणि आहात म्हणून तर ज्ञाननिधीना प्रिय झाल्यात. तुमच्या सारख्यांना सांगण्याची आवश्यकता नाही व माझी योग्यता पण नाही; पण स्नेह चिंतावश झाल्याने सांगितल्याशिवाय राहवत नाही, म्हणून काही विनंती करणार आहे.

***हिं.*** ***। रानि राय सन अवसरु पाई । अपनी भाँति कहब समुझाई ॥१॥***
***। रखिअहिं लखनु भरतु गवनहिं बन । जौं यह मत मानै महीप मन ॥२॥***
***। तौ भल जतन करब सुबिचारी । मोरें सोचु भरत कर भारी ॥३॥***
***। गूढ़ सनेह भरत मन माहीं । रहें नीक मोहि लागत नाहीं ॥४॥***

***म.*** ***। राणि ! नृपानां सुसंधि साधुनि । आपल्यापरि सांगा समाजाउनि ॥१॥***
***। फिरवा लक्ष्मण जाति भरत वनिं । जर हें मत मानेल भूपमनिं ॥२॥***
***। तर सुयत्न करणें सुविचारीं । मज चिंता भरताची भारी ॥३॥***
***। स्नेह सुगूढ भरत मनिं राहीं । राहत, दिसत भलें मज नाहीं ॥४॥***

**अर्थ** - राणी ! चांगली संधि साधून तुम्ही आपल्या परीने राजांना समजाऊन सांगा की - ॥१॥ लक्ष्मणांस परत फिरवावे (ठेऊन घ्यावे) व भरतांस रामाबरोबर वनात जाऊ द्यावे; जर हे मत राजांच्या मनाला मान्य असेल ॥२॥ तर चांगला विचार करून कसून प्रयत्न करावा; कारण मला भरताची भारी चिंता वाटते.॥३॥ भरताच्या मनातला रामस्नेह अति गूढ आहे; भरत जर (घरीं) राहिले तर चांगले होईल असे मला वाटत नाही.॥४॥

**टीका. चौ. १-२ (१) अपल्यापरिं सांगा** - कसे काय सांगायचे ते आपण ठरवा; व तुमचे म्हणणे म्हणून सांगावे म्हणजे राजे योग्य की अयोग्य ते ठरवितील. माझे मत म्हणून सांगितलेत तर तोटा इतकाच की माझा मान राखण्यासाठी म्हणून ते जास्त विचार न करता मान्यता देतील. मिथिलेश्वरीने ही कौसल्येची

कळकळीची महत्त्वाची सूचना अक्षरशः पाळली आहे; कौसल्येचे नावसुद्धा मधे आणले नाही. **(क) फिरवा - लक्ष्मण भरत जाति बनिं** - अयोध्येचे रक्षण करण्यास कोणीतरी पाहिजेत. राम अयोध्येत येत नाहीत हे कौसल्येने निश्चित जाणले आहे. लक्ष्मणाचा स्नेह प्रगट आहे.

**चौ. ४ - (१) स्नेह सुगूढ भरत मनिं राही** - प्रगट असलेल्या विकारापेक्षा गूढ असलेला कोणताही विकार अधिक घातक व तापदायक असतो. क्रोध आल्यावर भडभड बोलून मोकळ्या होणाऱ्या माणसाच्या शरीरावर त्याचा फारसा परिणाम होत नाही; पण क्रोधाला मनातल्या मनात घोळवीत राहणाऱ्या माणसाच्या शरीरावर फारच वाईट परिणाम होतो. शोकविलाप करीत अश्रू ढाळणाऱ्या माणसाला शोकाने मूर्च्छा येण्याची फारशी भीती नाही; पण अत्यंत प्रेमळ असून शोक दाबून ठेऊन, डोळ्यांत अश्रू येऊ देत नाही व विलाप करीत नाही अशा माणसाला केव्हा मूर्च्छा येईल याचा नेम नसतो. भरताचा स्नेह असाच फार गूढ आहे. ते रामाज्ञेच्या विरुद्ध काही बोलणार नाहीत. परत घरी येतीलही पण दाबून ठेवलेल्या विरह दुःखाने केव्हा काय होईल याचा नेम नाही. भरताचे प्राण राहणार नाहीत अशी भीती कौसल्येला वाटत आहे. हे सर्व ऐकून कैकयीला काय वाटले असेल ? किती पश्चात्ताप झाला असेल ?

*हिं.* *। लखि सुभाउ सुनि सरल सुबानी । सब भइ मगन करुन रस रानी ॥५॥*
*। नभ प्रसून झरि धन्य धन्य धुनि । सिथिल सनेहँ सिद्ध जोगी मुनि ॥६॥*
*। सबु रनि बासु बिथकि लखि रहेऊ । तब धरि धीर सुमित्राँ कहेऊ ॥७॥*
*। देबि दंड जुग जामिनि बीती । राम मातु सुनि उठी सप्रीती ॥८॥*

*हिं.दो.* *। बेगि पाउ धारिअ थलहि कह सनेहँ सतिभाय ॥*
*॥ हमरें तौ अब ईस गति कै मिथिलेस सहाय ॥२८४॥*

*हिं.दो.* *। बघुनि सुभाव सुवाणी सरला - । ऐकुनि, मग्न करुणरसिं सकला ॥५॥*
*। गगनिं सुमन झड धन्य धन्य रब । स्नेह-सिथिल मुनि योगिसिद्ध तंव ॥६॥*
*। राणिवसा सब थक्क बघतसे । धरुनि सुमित्रा धीर वदतसे ॥७॥*
*। देवि नाडियुग यामिनि टळली । प्रेमें राममाय तैं उठली ॥८॥*

*म.दो.* *। यावें लवकर अतां सखि ! वदली युत सद्भाव ॥*
*॥ अम्हां अतां तो ईशगति साह्य किं मिथिला राव ॥२८४॥*

**अर्थ** - तो शुद्ध भाव (सु-भाव) पाहून व सरळ सुवाणी ऐकून सगळ्या

(सकला) राण्या करुणारसांत मग्न झाल्या.॥५॥ आकाशांतून फुलांच्या पावसाची झड लागली व धन्य धन्य असा ध्वनि (रव) ऐकू येऊ लागला; तेव्हा (तंव) मुनि, योगी व सिद्ध स्नेहाने शिथिल झाले.॥६॥ सर्व राणीवसा थक्क होऊन बघत राहिला; तेव्हा धीर धरून सुमित्रा म्हणाली की.॥७॥ देवी ! दोन घटका (नाडी, संस्कृत) रात्र उलटून गेली; तेव्हा (ते ऐकून) राममाता प्रेमाने उठली.॥८॥ व सद्भावाने म्हणाली की सखी आता लवकर यावं; आम्हाला तर आता ईश (शंकर) आधार आहे की मिथिलापति साह्य आहेत.॥ दो.२८४ ॥

**टीका. चौ. ५-६ (१) सुवाणी =** गंगेसारखी पवित्र (२८३।८) **'सरला'** - याने गंगेपेक्षा श्रेष्ठत्व सुचविले. गंगेचा प्रवाह कुटिल असतो, सरळ नसतो. **करुणारसिं मग्न =** शोकाने व्याकुळ झाल्या सगळ्या राण्या. **(क) स्नेह शिथिल** - हा शोक स्नेहजनित आहे असे जाणून, ऐकून सिद्ध योगीमुनि सुद्धा भरतस्नेहात इतके मग्न झाले की त्यांचे हातपाय गळले. **(ख) गगनिं सुमन झड** - पावसाची झड लागावी तशी फुलांची झड लावली देवांनी. देवांना पाहिजे होता तो मुद्दा सापडला. रघुनाथांस अयोध्येत नेण्याचा प्रयत्न करा असे न सांगता भरतांस त्यांच्या बरोबर वनात पाठविण्याविषयी जनकराजांस सांगण्यास सांगितले. यामुळे देवांची खात्री झाली की रामचंद्रांस परत नेण्याचा प्रयत्न आता कोणी करीत नाही म्हणून त्यांस परमानंद झाला; पण हा क्षणिकच आहे हे लवकर दिसेल.

**चौ. ७-८ (१) राणिवसा सब थक्क बघतसे -** स्तंभित होऊन सगळ्या राण्या कौसल्येकडे बघत राहिल्या. या शांततेचा, स्तब्धतेचा भंग न केल्यास किती वेळ जाईल कोणास ठाऊक व पुन्हा शोकाला प्रारंभ झाला म्हणजे लवकर आवरणार नाही असा विचार करून सुमित्रेने आपल्या शब्दांनी सगळ्यांना वृत्तीवर आणल्या. **सु-मित्राच ती ! प्रेमांत कमी नसून व्यवहारांत सदा दक्ष असणारी, प्रसंगावधानी** अशीच सुमित्रा बालकांडांत दिसली आहे. **(क) नाडियुग यामिनि टळली - नाडी =** घटिका (हैमः) तुम्हाला बराच उशीर झाला. सायंकाळच्या अग्निसेवेची वेळ सुद्धा टळून गेली या गोंधळांत. भाव हा की मिथिलापति आपली वाट बघत असतील.

**दो. (१) यावें लवकर अतां सखि -** हा अनुवाद अक्षरशः केला नसून मराठीतील निरोप देण्याच्या पद्धतीला धरून केला आहे. (आपण आता लवकर आल्या स्थानी जावे असा हिंदीचा अर्थ आहे). **(क) अम्हां अतां तों ईश गति**

- ईश = शंकर, महेश. हा अर्थ सुनयनेच्या 'साह्य सदैव महेश भवानी' या पुढील वचनावरून स्पष्ट आहे. पुन्हा ठरले की कौसल्यादि राण्या शिवोपासक आहेत. एक तर शंकर साह्य किंवा दुसरे मिथिलापति यांशिवाय साह्यकर्ता कोणी नाही. महाराजा स्वर्गात, राम वनांत, कोण दुसरे साह्य करणार ? यांत शोकनिराशा आहे. वसिष्ठांचा उल्लेख न करण्यात मिथिलेश्वरांस मोठेपणा देणे हा हेतु आहे.

*हिं.* *। लखि सनेह सुनि बचन बिनीता । जनकप्रिया गह पाय पुनीता ॥१॥*
*। देबि उचित असि बिनय तुम्हारी । दसरथ घरनि राम महतारी ॥२॥*
*। प्रभु अपने नीचहु आदरहीं । अगिनि धूम गिरि सिर तिनु धरहीं ॥३॥*
*। सेवक राउ करम मन बानी । सदा सहाय महेसु भवानी ॥४॥*
*। रउरे अंग जोगु जग को है । दीप सहाय कि दिनकर सोहै ॥५॥*

*म.* *। स्नेह बघुनि वच नम्र ऐकुनी । जनकराणि पद पावन धरुनी - ॥१॥*
*। वदे देवि ! तव उचित विनति ही । दशरथगृहिणी राम जननि ही ॥२॥*
*। प्रभु निज नीचासिहि आदराती । अग्नि धूम्र शिरिं गिरि तृण धरती ॥३॥*
*। सेवक राजे तनमनवाणीं । साह्य सदैव महेश - भवानी ॥४॥*
*। अपणां कोण सहायक लायक । दीप कि शोभे भानु सहायक ॥५॥*

**अर्थ** - स्नेह पाहून व नम्र वचन ऐकून जनकराणी कौसल्येचे पावन पाय धरून ॥१॥ म्हणाली की देवी ! आपली ही विनंती आपल्या योग्यच आहे; कारण आपण दशरथांच्या धर्मपत्नी व रामजननी आहात.॥२॥ समर्थ असतात ते (आपला) म्हटलेल्या - आपल्यापेक्षा नीचालाही आदर देतात; अग्नि धुराला आपल्या शिरावर घेतो व पर्वत तृणाला आपल्या शिरावर धारण करतात.॥३॥ राजे तनमनवाणीने आपले सेवक आहेत; सदा सर्वदा साह्यकर्ते महेशभवानी आहेत (हे मात्र खरे).॥४॥ आपणांस सहायक होण्यास (जगात) कोण लायक-पात्र-आहे ? दीप कधी सूर्याचा साह्यकर्ता म्हणून शोभेल का ?॥५॥

**टीका. चौ. १-२ (१) वच नम्र ऐकुनी** - पूर्वी सरळ व गंगेसारखी पवित्र ही विशेषणे कौसल्येच्या वचनांस लावली; आता नम्र म्हटले. सरळ, नम्र व परमपावन असे कौसल्येचे बोलणे असते; कुठे एक गुण मुख्य दिसेल कुठे दुसरा एखादा दिसेल. **(क) पद पावन धरुनी** भाव हा की मी आपल्या स्तुतीला पात्र नाही; मी आपल्या पायांची एक दासी आहे असे समजावे. एकतर विहीण,

त्यांत सम्राटपत्नी, आणि रामाची माता व इतकी प्रेमळ, सरळ, नम्र व पावन इत्यादी अनेक कारणांनी वंद्य आहेच. **(ख) देवि तव उचित विनति** - आपण जी विनंती केलीत ती आपल्या मोठेपणाला शोभेशीच आहे. कारण की आपण दशरथांच्या धर्मपत्नीच ! **'दशरथ गुणगण वर्णन न घडे त्यांसम जगिं नहिं, अधिक कुणिकडे'** (२०९।८) अशांची आपण धर्मपत्नी व रामचंद्रांची माता असल्यामुळे आपण अत्यंत नम्रपणाने आम्हाला मोठेपणा दिलात ते आपल्या मोठेपणाला साजेसेच केले - मोठ्यांचा हा स्वभावच असतो.

**चौ. ३-४ (१) प्रभु निज नीचासिहि आदरती** - याला दोन दृष्टान्त दिले. **अग्नि** दिव्य व **पर्वत** भव्य, गंभीर. अग्नीत असलेले दोष पर्वतात नाहीत व पर्वतातले दोष अग्नीत नाहीतच शिवाय गुणभेद आहेतच. हिंदीत 'अगिनि' स्त्रीलिंगी आहे. व गिरि पुल्लींगी म्हणून अग्नि व गिरि = कौसल्या व दशरथ. धूम = धूर या अर्थाने हिंदीत पुल्लिंगी असला तरी तो शब्द स्त्रीलिंगीही आहेच म्हणून व तृण = 'तिन' पुल्लिंगी आहे; म्हणून धूम व तृण = सुनयना व जनक, असा जनकराणीचा भाव आहे. **धुराचा व तृणाचा उपयोग अग्नि व पर्वत यांना मुळीच नाही; व त्यांच्यामुळे त्यांची शोभा वाढते असेही नाही हा मुख्य मुद्दा सुनयना येथे सुचवित आहे. (क) सेवक राजे तनमन वाणीं** - असे आपल्या पतीविषयी कसे म्हणाली ? स्वतः जनक लक्षावधि लोकांच्या देखत असेच म्हणाले आहेत व असे म्हणणे पतीला आवडेल हे जाणून म्हणाली - **'संबंधिं राजन् आपले अम्हि आज महती लाहलों । या राज्यविभवा सहित सेवक फुकट जाणां जाहलों'** (१।३२६ छंद २) असे जनकराजा दशरथांस म्हणाले आहेत. शिवाय ही नम्रता व निरहंकारिता आहे. **(ख) साह्य सदैव महेशभवानी** - हां ! महेश मात्र आपले सहायक आहेत व शोभण्यासारखे आहेत; कारण ते महान् ईश आहेत. ते जगाचा संहार करणारेही आहेत व जग उत्पन्न करण्यास समर्थ अशी त्यांची शक्ती भवानी आहे. आमचे राजे साह्यकर्ते न शोभता सेवक म्हणूनच शोभतात; आणि महेश भवानी पूर्ण साह्यकारी असल्यावर इतर कोणाच्या साह्याची आपणांस आवश्यकताच काय ?

**चौ. ५ - (१) अपणां कोण सहायक लायक** - इतर देव सुद्धा आपले सहायक शोभत नाहीत. देवांना साह्य करणारे दशरथ महाराज होते ! आपण त्यांच्या राणी आहात ! दृष्टान्त दिला - **(क) दीप किं शोभे भानु सहायक ? -**

दीपाचा प्रकाश घरांत पडत असला थोडासा (दिवसा) तरी तो सूर्याला काय साह्य करू शकणार ? त्याने सूर्याच्या तेजात व प्रकाशात का भर पडणार आहे ? व सूर्याला त्याची जरूर कधी व कशी लागणार ? हां ! पूजा करण्यासाठी सेवेसाठी निरांजन सूर्याला दाखविणे योग्य आहे, तसेच राजांचे. दोघीही परमनम्र व अहंकाररहित आहेत - शिवाय जनकराणी म्हणाली ते ऐतिहासिक सत्य आहे. **देवांची मदत घेऊन जनकांनी आपल्या मानवशत्रूंचा पराभव केला आहे; पण दशरथांनी देवांच्या असुर-शत्रूंचा पराभव करून देवांना विजय मिळवून दिला आहे !**

*हि.* ***। रामु जाइ बनु करि सुर काजू । अचल अवध पुर करिहहिं राजू ॥६॥***
***। अमर नाग नर राम बाहुबल । सुख बसिहहिं अपनें अपनें थल ॥७॥***
***। यह सब जागबलिक कहि राखा । देबि न होइ मुधा मुनि भाषा ॥८॥***

*हिं.दो.* ***॥ अस कहि पग परि पेम अति सिय हित बिनय सुनाइ ॥***
***सिय समेत सियमातु तब चली सुआयसु पाइ ॥२८५॥***

*म.दो.* ***। राम वनीं करुनी सुरकार्यहि । करिति अचल कोसलपुरिं राज्य हि ॥६॥***
***। रामभुजबळें अमर नाग तर । वसतिल निज निज लोकिं सुखीं वर ॥७॥***
***। पूर्विंच भाकति याज्ञवल्क्य, तें । मुनि-वच देवि मुधा ना ठरतें ॥८॥***

*म.दो.* ***। मग नमुनी प्रेमें अति सीतेस्तव विनवून ॥***
***॥ आज्ञा सीतामाय घे स-सिता जाइ निघून ॥२८५॥***

**अर्थ** - राम वनात (जाऊन) देवांचे कार्य करून अयोध्येचे राज्य (चिरकाळ) अचळ (अकंटक) करतील.॥६॥ रामचंद्रांच्या बाहुबळाने अमर (देव, स्वर्गलोक) नाग (पाताळ) व नर (मृत्युलोक) आपापल्या लोकांत (स्थळी, ठिकाणी) उत्तम (= वर) सुखांत राहतील.॥७॥ हे सर्व भाकीत याज्ञवल्क्य ऋषींनी पूर्वीच केले आहे; ते मुनींचे वचन हे देवी ! कधीच खोटे ठरणार नाही.॥८॥ (असे म्हणून) मग अति प्रेमाने नमस्कार करून अति प्रेमाने सीतेसाठी विनंती केली व सीतेची माता सीतेला बरोबर घेऊन आज्ञा घेऊन गेली-॥ दो. २८५ ॥

**चौ.** ६-८ (१) या सर्व गोष्टी सांगण्यांत हेतु इतकाच आहे की या गोष्टी जरी कौसल्येला माहीत असल्या तरी इतरांस कळावे व त्यांनी निराश होऊ नये; व राम सध्या परत येतील ही आशा बाळगू नये. याज्ञवल्क्यांचे वचन खोटे होणार नाही हे सर्वमान्य असल्यामुळे त्यांचा उल्लेख मुद्दाम केला. हे याज्ञवल्क्यांनी केव्हा सांगितले याला स्पष्ट आधार नसला तरी ते जनकांचे गुरु

होते व जनकसभेत कथा सांगत असत हे ऐतिहासिक सत्य आहे. अध्यात्म रा. सीतेच्या वचनावरून ठरते की **तिने विवाहापूर्वीच रामायणश्रवण केले होते. 'रामायणानि बहुशः श्रुतानि बहुभिर्द्विजैः ॥ सीतां विना वने रामो गतः किं कुत्रचिद्वद'** (२।४।७७-७८)

**दोहा. (१) सीतेस्तव विनवून** - सीतेला आमच्या बरोबर पाठविलीत तर बरे होईल अशी विनंती कौसल्येला केली व लगेच सीता मातेबरोबर गेली. यावरून ठरते की सीता कौसल्यादि मातांच्या तंबूतच होती. **(क) येथे मांडवी उर्मिला व श्रुतकीर्ति** यांच्याविषयी काहीच **उल्लेख नाही** त्या अर्थी त्या आलेल्याच नाहीत असे ठरते. वनात येताना लक्ष्मण उर्मिलेच्या भेटीला सुद्धा गेला नाही; हे जाणून भरताने मांडवीला घरी राहण्यास सांगून सर्व व्यवस्था पाहण्यास सांगितले असेल व पतीच्या इच्छेविरुद्ध म्हणून उर्मिला आली नसेल व दोघी राहिल्याने श्रुतकीर्ति सुद्धा राहिली हे व्यावहारिक कारण झाले. पण **अध्यात्म दृष्ट्या** या तिघी म्हणजे तीन अवस्था आहेत. तिन्ही अवस्थांचा त्याग केल्याशिवाय तुर्यारूपी सीतेची कृपा होऊन राम-ब्रह्म-प्राप्ति होऊ शकत नाही हे मुख्य कारण आहे.

*मिथिला अयोध्या - राजमहिला भेट प्रकरण समाप्त.*



## सीता व परिजन - जनकादि भेट प्रकरण (२८६।१ - २८७ पूर्वार्ध)

हिं. *। प्रिय परिजनहि मिली बैदेही । जो जेहि जोगु भाँति तेहि तेहि ॥१॥*
*। तापस बेष जानकी देखी । भा सबु बिकल बिषाद बिसेषी ॥२॥*
*। जनक राम गुर आयसु पाई । चले थलहि सिय देखी आई ॥३॥*
*। लीन्हि लाइ उर जनक जानकी । पाहुनि पावन पेम प्रान की ॥४॥*

म. *। प्रिय परिजनांस मग वैदेही । भेटे ज्यां त्यां योग्य जसें ही ॥१॥*
*। बघुनि जानकिस तापस वेषीं । व्याकुळ सकळ विषाद विशेषीं ॥२॥*
*। जनक रामगुरु-आज्ञा घेउनि । निघति बघति सीते तळिं येउनि ॥३॥*
*। जनक धरिति हृदिं जानकि, जाणुनि । प्रेमा प्राणां पावन पाहुणि ॥४॥*

**अर्थ -** मग वैदेही आपल्या प्रिय नातेवाइकांना ज्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणे भेटली.।।१।। जानकीला तापस वेषांत पाहून सगळे परिजन विशेष विषादाने विशेष व्याकुळ झाले.।।२।। श्रीरामगुरु वसिष्ठांची आज्ञा घेऊन जनक निघाले, व तळावर आले तो त्यांस सीता (आलेली) दिसली ।।३।। आपल्या पवित्र प्रेमाची व प्राणांची पावन पाहुणी आहे असे जाणून जनकांनी जानकीला हृदयाशीं धरली.।।४।।

**टीका. चौ. १-२ (१) वैदेही भेटे -** जरी स्वतःच्या देहावरसुद्धा आसक्ति नाही तरी विदेहाचीच कन्या असल्याने सर्वांना प्रेमाने भेटली व व्यवहार मर्यादांचे पालन केले; मोठ्यांच्या पाया पडून, बरोबरीच्यांस गळ्यांत गळा घालून, लहानांच्या मस्तकावर, पाठीवर प्रेमाने हात फिरवून, कोणास हृदयाशीं धरून व कोणाला कुशल विचारून, याप्रमाणे यथाधिकार भेटली. **(क) व्याकुळ सकळ विषाद विशेषीं -** पुष्कळ दिवसांनी वनवासात असलेली भेटली यामुळे स्नेहाबरोबर विषादही वाटला व तपस्विनी वेषांत - मुनिवेषांत, वल्कले नेसलेली दिसली यामुळे विशेष विषाद वाटला व त्यामुळे विशेष व्याकुळता.

**चौ. ४ (१) जनक धरिति हृदिं जानकि - 'रायें जानकि हृदयीं धरली । ज्ञान महामर्यादा सरली'** (१।३३८।६) अशी एका चरणाची पुनरुक्ति येथे आहे; व 'ज्ञानमहामर्यादा सरली' हे येथे पण घडले हे सुचविले. वरील वचन वरातीच्या वेळी जानकीला पालखीत बसविण्यापूर्वी भेटले त्या वेळचे म्हणजे वियोगाच्या वेळचे आहे. दोन्ही ठिकाणी सीता, वैदेही शब्द नसून जानकी = चिदानंदलहरी

(रामभक्ति) हा अर्थ आहे. वियोगाच्या वेळी ज्ञानाची महामर्यादा सरली हे ठीक आहे; पण आज तळावर तंबूंत आली असता भेटताना अशी दशा का ? याचे उत्तर **(क) 'जाणुनि प्रेमा प्राणां पावन पाहुणि** - या शब्दांत आहे. आली असली तरी काय पाहुणी म्हणून आली आहे; परत जाणार आहे येथे न राहता, हे जाणले आहे; म्हणजे योग व वियोग एकत्रच आहेत ! **(ख) आज परिस्थिति अशी आहे** की प्राणांसारखी प्रिय, जगज्जननी जानकी पाहुणी आली असून काही पाहुणचार करता येत नाही, की काही वस्त्रे अलंकार देता येत नाहीत ! मग पाहुणचार कसा करायचा ? देहाची पाहुणी राहिलेली नाही; रात्र असल्यामुळे कंदमूलफळे घे असे म्हणण्याचीही सोय नाही; त्यामुळे राहिली प्राणांची व प्रेमाचीच फक्त पाहुणी. प्राण व प्रेम यांचे निवासस्थान आहे हृदय ! म्हणून हृदयांशी धरली; याचा अर्थच हा की प्राण तिला प्रेमाने भेटले हाच सर्व पाहुणचार ! पूर्वी प्रेम व प्राण तिला भेटत असत पण हृदयांत राहून भेटत असत; आज बाहेर येऊन भेटले हाच मुख्य फरक ज्ञानमहामर्यादा सरली ही तेथील स्थिती येथे झालीच पण तिचे वर्णन येथे निराळ्या पद्धतीने रूपक - उत्प्रेक्षांच्या आधारे फारच सुंदर केले आहे.

*हिं.* ***। उर उमगेउ अंबुधि अनुरागू । भयउ भूप मनु मनहुँ पयागू ॥५॥***
***। सिय सनेह बटु बाढत जोहा । ता पर राम पेम सिसु सोहा ॥६॥***
***। चिरजीवी मुनि ग्यान बिकल जनु । बूडत लहेउ बाल अवलंबनु ॥७॥***
***। मोह मगन मति नहिं बिदेह की । महिमा सिय रघुबर सनेह की ॥८॥***

*म.* ***। उरिं अनुराग अंबुधी उसळे । जणूं प्रयाग नृपति-मन बनलें ॥५॥***
***। सीतास्नेह दिसे वट वाढत । रामप्रेम शिशू वर शोभत ॥६॥***
***। मुनि चिरजीवी ज्ञान विकल जणुं । पावे बुडत बाल-अवलंबनु ॥७॥***
***। मोहमग्न नहिं कधिं विदेह मति । रघुवर-सिता-स्नेह-महिमा अति ॥८॥***

**अर्थ -** हृदयांत अनुरागसागर उसळला व राजाचे मन जणू प्रभाग बनले ॥५॥ (तेथे) सीतास्नेहरूपी अक्षयवट वाढत असलेला दिसला व त्यावर रामप्रेमरूपी शिशु (बालमुकुंद) शोभायमान झालेला आढळला.॥६॥ (जनकराजांचे) ज्ञानरूपी चिरजीवी मार्कंडेय मुनि व्याकुळ होऊन जणू बुडत असता त्यास त्या बालकाचा आधार मिळाला.॥७॥ विदेहाची मति कधीं मोहमग्न होणे शक्य नाही; हा केवळ सीतारघुवर स्नेहाचा महा महिमा आहे.॥८॥

**चिरजीवी मुनि - मार्कंडेय** - हे मृकंडु मुनींचे पुत्र - अल्पवयी असतानाच यमदूत यांना नेण्यास आले तेव्हा यांनी शंकरांच्या पिंडीला मिठी मारून शंकरांचा धावा केला; तेव्हा शंकर प्रसन्न होऊन यांना चिरंजीवी केले. अश्वत्थामा बली वगैरे सात चिरंजीव असले तरी त्यांचे आयुष्य मार्कंडेयांच्या इतके नाही. साठ वर्षे पूर्ण होण्याच्या शान्तीच्या हवनात मुख्य देवता मार्कंडेय असून गौण देवता अश्वत्थामादि सात चिरंजीवी आहेत.

पुढे यांनी आपल्या अपार तपश्चर्येने नरनारायणांस प्रसन्न केले. ते प्रगट झाल्यावर मार्कंडेयाने स्तुति केली तेव्हा वर माग असे सांगितले. मुनीने सांगितले की आपल्या दर्शनापलीकडे आणखी काही मागण्यासारखेच नाही. तथापि ज्या आपल्या मायेने सर्व ब्रह्मांड मोहित झाले आहे असे म्हणतात ती माया म्हणजे काय आहे हे पाहण्याची इच्छा आहे. तुमची अभिलाषा पूर्ण होईल असा वर देऊन भगवान अंतर्धान पावले.

पुढे काही काळाने, मार्कंडेय महाज्ञानी पुष्पभद्रा नदीकाठी उपासना करीत बसले असता जोराचे वादळ सुरू होऊन भयंकर जोराचा पाऊस सुरू झाला. सर्व समुद्रांनी पृथ्वी जलमय करून टाकली. आकाश स्वर्ग इत्यादी सर्वच पाण्यात बुडाले. एकटे हे चिरंजीव महामुनि महाज्ञानी असूनसुद्धा त्या प्रलयाच्या दृश्याने भयभीत होऊन वाऱ्याच्या जोराने व लाटांच्या तडाक्यांनी इकडे तिकडे वाहत चालले आहेत; कसे तरी जीव मुठीत धरून तरंगत आहेत; असा पुष्कळ काळ गेला. नंतर एकदा एके ठिकाणी एक मोठा वटवृक्ष वाढत असलेला दिसला. त्या वडाच्या एका उंच शाखेवर एका वटपत्रावर एक सुंदर लहान बालक - शिशु - आपल्या कमलकराने कमलासारख्या पायाचा आंगठा मुखकमलात घालीत असलेला दिसला. 'करारविंदेन पदारविन्दं मुखारविन्दे विनिवशयन्तं ॥ वटस्य पत्रस्य पुटे शयानं बालं मुकुन्दं मनसा स्मरामि' असे त्याचे हृदयात स्मरण करीत आश्रयाला त्यांच्याजवळ चालले तोच भगवान अदृश्य झाले व ते सर्व प्रलय दृश्य तत्क्षणी नाहीसे झाले. (भाग १२ वा. ८, ९, १०, महा-भा. वनपर्व अ. १८८-१९०); **ब्रह्मपुराण** अ. ५२-५६ यांत ही कथा आहे.

## रूपक

**१. मार्कंडेय मुनि** चिंरजीव, विनाश न पावणारे; तसे जनकांचे ज्ञान कधी नष्ट न होणारे. प्रलयकाळी सागरांची वृद्धी होऊन ते उसळले त्याप्रमाणे सीतेला

हृदयाशी धरताच **कन्या-प्रेमरूपी सागर उचंबळला** व त्यांत ज्ञानरूपी मार्कंडेय वाहू लागला; अविनाशी असल्याने बुडाला नाही, तसे ज्ञान नष्ट झाले नाही; पण फार व्याकुळ भयभीत झाला मुनि तसेच ज्ञान. ज्ञान नष्ट होणार की काय असे वाटू लागले. मार्कंडेय व्याकुळ झाले ते प्रयागात; म्हणून **भयभीत झालेले मन हे प्रयागतीर्थ.** (क) प्रलयकाळी प्रयागचा अक्षयवट नष्ट होत नाही. तो प्रलय जलाच्यावर वाढत जातो; त्यांत बुडत नाही; व भगवान त्यावर बालरूपाने विराजतात. जनकाच्या मनरुपी प्रयागात **सीतास्नेहरूपी वट** वाढत चाललेला दिसला. कन्याप्रेमरूपी सागर ज्ञानाला बुडवू पहात आहे असे दिसताच मनाने स्मरण केले की सीता कन्या तनया नसून उद्‌भवस्थिति संहारकारिणी, क्लेशहारिणी, सर्वश्रेयस्करी रामवल्लभा आहे. (बा.मं.५) त्याबरोबर ज्ञानरूपी मार्कंडेयाची व्याकुळता कमी झाली व त्याला जणू वाटू लागले की या वटाच्या आश्रयाने आपण जगू शकू. असे वाटते तोच त्या सीतास्नेहरूपी वटवृक्षावर राम प्रेमरूपी बालक दिसू लागला. सीता रामवल्लभा आहे हे जाणताच; सीतास्नेह रामप्रेमविभूषित होताच, ज्ञान-मुनीची व्याकुळता नष्ट झाली व ते ताजेतवाने झाले. सार हे की विदेह असे महाज्ञानी होते व या वेळी ते मोहमग्न झाले नाहीत याचे कारण ते सीताराम भक्त आहेत. ते जर सीताराम भक्त नसते तर कन्याप्रेमरूपी मोहममता सागरात त्यांचे ज्ञान नष्ट झाले असते.

**चौ. ८ - (१) रघुवर सिता स्नेह महिमा अति -** जनक व्याकुळ झाले हा सीताराम स्नेहाचा अति महिमा आहे. त्यांची मति मोहमग्न झाली होती असे म्हणता येत नाही, कारण त्यांचे माहात्म्यज्ञान नष्ट झाले नाही, असे नसते तर आत्मज्ञान बुडालेच असते. **सीता आदिशक्ति व राम परमात्मा आहेत हे ते विसरले नाहीत.** 'तत्रापि न माहात्म्यज्ञान विस्मृत्यपवादः' (ना. भ. २२) अशी ही भक्ति 'कर्मज्ञानयोगेभ्योऽप्यधिकतरा' (ना.भ.२५) **कर्म ज्ञान व योग यांच्यापेक्षा ही अधिक श्रेष्ठ आहे. ल. टे.** या वेळच्या जनकाच्या मनःस्थितीचे चित्र दाखविण्यास या मार्कंडेयाच्या रूपकासारखे दुसरे साधनच सापडणार नाही. रूपकयुक्त उत्प्रेक्षेनेच या स्थितीचे वर्णन करावे लागले.

*हिं.दो.* ***। सिय पितु मातु सनेह बस बिकल न सकी सँभारि ॥***

***॥ धरनिसुता धीरज धरेउ समउ सुधरमु बिचारि ॥२८६॥***

*हिं.* ***। तापस वेष जनक सिय देखी । भयउ पेमु परितोषु बिसेषी ॥१॥***

*। पुत्रि पवित्र किए कुल दोऊ । सुजस धवल जगु कह सब कोऊ ॥२॥*
*। जिति सुरसरि कीरति सरि तोरी । गवनु कीन्ह बिधि अंड करोरी ॥३॥*
*। गंग अवनि थल तीनि बड़ेरे । एहिं किए साधु समाज घनेरे ॥४॥*
म.दो. *। सीता पितर-प्रेमवश बिकल भुले तनु-भान ॥*
*॥ धरणिसुता धीरा धरी समय सुधर्म सुजाण ॥२८६॥*
म. *। दिसतां सीता तापस-वेषीं । पित्या प्रेम परितोष विशेषीं ॥१॥*
*। पुत्रि पवित्रीकृत कुल उभयहि । सुयश-धवल-जग वदती सकलहि ॥२॥*
*। जिंकुनि सुरसरि तुझी कीर्ति सरि । कोटी ब्रह्मांडी गमना करि ॥३॥*
*। करी प्रथित गंगा त्रिस्थानां । ही करि साधु-समाजां नाना ॥४॥*

**अर्थ** - सीता मातापित्यांच्या स्नेहाला वश होऊन, व्याकुळ होऊन, देहभान विसरली; (पण) समय व श्रेष्ठ धर्म उत्तम प्रकारे जाणणारी असल्याने धरणिसुतेने धीर धरला.॥दो.२८६॥ पित्याने (जनकाने) जानकीला तापसवेषांत पाहिली व त्याचे प्रेम विशेष वाढले व विशेष परितोष झाला.॥१॥ (व म्हणाले की) पुत्रि (मुली) तू दोन्ही कुळे पवित्र केलीस; व तुझ्या यशाने (कीर्तीने) जग उज्ज्वल झाले असे सर्वच म्हणतात.॥२॥ देवसरितेला जिंकून तुझ्या कीर्ति सरितेने कोटी ब्रह्मांडांत गमन केले.॥३॥ गंगेने (या जगात) तीनच स्थाने प्रसिद्ध केली (मोठी केली) पण तुझ्या कीर्तिसरितेने अनेक साधु समाजानां प्रतिष्ठित केले.॥४॥

**टीका. दो.** (१) माता व पिता स्नेहाने व्याकुळ झालेली पाहून सीतासुद्धा त्यांच्या स्नेहाने व्याकुळ झाली; पण क्षणभरच. ती धरणीचीच सुता; तिच्या ठिकाणी धरणीचा धृति (धीर, धैर्य) हा गुण सहज असल्याने तिने चटकन धीर धरला. येथे सतीधर्माचे धारण करण्यासाठी धीर धरला. **'धारणाद्धर्ममित्याहु धर्मो धारयते प्रजाः' स्त्रियांचा सुधर्म** = उत्तम धर्म म्हणजे सतीधर्म, पतिव्रता धर्म. त्याची धारणा जगात व्हावी, **पतीला सोडून पित्याच्या घरीही एक रात्रसुद्धा एकटीने राहणे हा पतिव्रतांचा धर्म नाही हे स्त्रियांस कळावे म्हणून धीर धरला.** जसे राम 'धर्ममार्ग चरित्रेण' दाखवीत आहेत तसा स्त्रियांचा उत्तम धर्ममार्ग सीता आपल्या चरित्राने दाखवीत आहे. **(क) समय-सुजाण** - तिला वाटले की मी व्याकुळ झाले हे पाहून आईबापांस वाटेल की माहेरच्या माणसांचा विरह हिला दुःखद वाटत आहे व वनवासाचे कष्ट हिला सहन होत नाहीत. मग त्यांनी राहण्याचा आग्रह केला तर काही बोलता येणार नाही; व वनात न राहता आमच्याबरोबर तुला आलेच पाहिजे

असे म्हणाले तर आज्ञा मोडता येणार नाही म्हणून **हा समय प्रेमाने व्याकुळ होण्याचा नाही हे तिने जाणले** म्हणून समय सुजाण म्हटले. सीता व्याकुळ झाली. क्षणभर ती ममतेमुळे किंवा स्वजन वियोगाने नव्हे. आपल्या भक्तांचे दुःख पाहून दुःखी झाली. शंकर सुद्धा **'भक्त विरह दुःखे दुःखीं'** (१।७६।२) होतात. **'शीघ्र परावी पिडा पावती'** (२।८५।२) असे राम आहेत; तशीच सीता आहे.

**चौ. १ (१) दिसतां सीता तापस वेषीं** - तपस्वी वेषात असूनसुद्धा सीता – आहे, शान्त आहे, त्याबद्दल तिला दुःख होत नाही हे पाहून, जाणून जनकाचे प्रेम वाढले; त्यांस परम संतोष वाटला. इतर मात्र या वेषामुळेच विशेष व्याकुळ झाले (२८६।२). पतिव्रता धर्माचे महत्त्व व अनुपम प्रभाव जनक जाणतात म्हणून त्यांस परम संतोष वाटला. **ल.टे. - येथे दाखविले की** कन्या पतिव्रता धर्माचे उत्तम आचरण करीत असेल तर तिच्या क्लेशांकडे कृशतेकडे, जागतिक सुखाच्या अभावाकडे न पाहता उलट तिला प्रोत्साहन देणे **हे आईबापांचे कर्तव्य आहे;** एवढेच नव्हे तर त्यांना त्याबद्दल परम संतोष व परम धन्यता वाटली पाहिजे; व त्यांनी तिच्या धर्मपालनाच्या आड येता नये. अन्न नाही, वस्त्र नाही, पैसा ना अडका इ. विचार मनात आणणेसुद्धा पाप आहे. जागतिक विषय सुखदुःख दोन दिवसांचे; पण पतिव्रता धर्माचा प्रभाव किती ते पहा -

**चौ. २ (१) पुत्रि पवित्रीकृत कुल उभय हि** - या व पुढील दोन चौपायांतील ओजस्वी भाषा सांगते की जनकांच्या चित्तांत संतोषाबरोबर उत्साहसुद्धा पुष्कळ भरला आहे. **(क) पवित्रीकृत** - पवित्र केली गेली. उभय हि कुल = निमिकुल व रघुकुल. सध्या येथे दोनच कुळातील मंडळी आहेत. वास्तविक पाहता कन्या तीन कुळांचा उद्धार करू शकते - मातृकुल (आजोळ) पितृकुल व पतिकुल. पुत्र फक्त मातृकुल व पितृकुल यांचाच उद्धारक होऊ शकतो. मुलीच्या तोंडावर आपण तिची प्रशंसा करीत आहोत हे व्यवहारदक्ष जनक उत्साहाच्या व प्रेमाच्या भरात विसरले. हे पुढे (चौ. ५) सुचविले जात आहे.

**चौ. ३-४** (१) मागल्या चौपाईत सीतेच्या कीर्तीची व्यापकता सांगितली. येथे कीर्तीचे पावित्र्य व प्रभाव गंगेशी तुलना करून सांगतात. गंगेपेक्षा अधिक व्यापक आहे. गंगा फक्त एकाच ब्रह्मांडांत व तीन लोकांतच आहे; म्हणून तिला त्रिपथगामिनी म्हणतात. या लोकांतील काही जीवांनाच ती पावन करते कारण ती देश परिच्छिन्न आहे. सीतेची कीर्तिनदी अनंत ब्रह्मांडांत सर्वत्र व्यापून

राहिली आहे व त्या सर्वांना ती पावन करू शकते. याची प्रतीति कवींनी बालकांडांत सती-विश्वरूपदर्शनात आधीच देऊन ठेवली आहे. (१।५४।७ - १।५५।५) अनंत ब्रह्माविष्णुमहेशादि सीतारामसेवा करीत असल्याचे दाखविले आहे. **(क) गंगा प्रथित करी त्रिस्थानां** - हरिद्वार, प्रयाग व गंगासागरसंगम ही तीन स्थाने गंगेने विशेष प्रसिद्ध केली आहेत. **(ख) ही करि साधुसमाजा नाना - 'मुदमंगलमय संतसमाजहि । जो जगिं जंगम तीर्थराजही'** (१।२।७) सीतेच्या कीर्तीच्या श्रवणाने, मननाने साधु समाजरूपी अनेक प्रयाग व साधुरूपी अनेक हरिद्वार व गंगासागर निर्माण होतील व ते सर्व जंगम !

*हिं.* *। पितु कह सत्य सनेहँ सुबानी । सीय सकुच महुँ मनहुँ समानी ॥५॥*
*। पुनि पितु मातु लीन्हि उर लाई । सिख आसिष हित दीन्हि सुहाई ॥६॥*
*। कहति न सीय सकुचि मन माहीं । इहाँ बसब रजनीं भल नाहीं ॥७॥*
*। लखि रुख रानि जनायउ राऊ । हृदयँ सराहत सीलु सुभाऊ ॥८॥*

*हिं.दो.* *। बार बार मिलि भेंटि सिय बिदा कीन्हि सनमानि ॥*
*॥ कही समय सिर भरत गति रानि सुबानि सयानि ॥२८७॥*

*म.* *। स्नेहें सत्य पिता शुभ वदले । सीते संकोचे जणुं गिळलें ॥५॥*
*। माता पिता पुन्हा हृदिं घेती । सदुपदेश शुभ आशिस देती ॥६॥*
*। वदे न सीता मनिं संकोचित । रात्रिं राहणें इथें किं अनुचित ॥७॥*
*। राणि ओळखुनि सांगे रावा । हृदयीं शीला स्तवी स्वभावा ॥८॥*

*म.दो.* *। सीते कितिदां भेटुनी बोळविती सन्मानिं ॥*
*॥ सांगे सुसमयिं भरत गति राणि शहाणि सुवाणिं ॥२८७॥*

**अर्थ** - पित्याने स्नेहाने सत्य व शुभ वर्णन केले (खरे; पण) सीतेला जणूं संकोचाने गिळली.।।६।। माता व पिता यांनी तिला पुन्हा हृदयाशी धरलीं व उत्तम उपदेश करून शुभ आशीर्वाद दिले.।।६।। सीता काहीच बोलत नाही पण मनात संकोच वाटत आहे की - रात्री इथे राहणे बरे नाही.।।७।। राणीने (सीतेचा हेतु) ओळखून राजाला सांगितले व ते तिच्या शीलाची व स्वभावाची मनात प्रशंसा करू लागले.।।८।। सीतेला कितीदा तरी भेटून (आलिंगन देऊन) दोघांनी तिला सन्मानाने निरोप दिला (पोचवली). नंतर योग्य वेळी शाहण्या राणीने सुवाणीने भरताची दशा (राजाला) सांगितली.

**टीका. चौ. ५-६ (१) स्नेहें सत्य...गिळलें** - वडिलांनी केलेली स्तुती ऐकून

सीतेला अत्यंत संकोच वाटला; लज्जेने मान खाली घातली व असे वाटू लागले की इथून पळून जावे व लपावे कुठेतरी. असे वाटणे हे उत्तम शीलाचे व संतांचे लक्षण आहे. **'स्वगुण कानिं पडतां संकोचति । अन्यगुणां परिसत बहु हर्षति'** (३।४६।१). मुलामुलींच्या सद्‌गुणांचे वर्णन त्यांच्या तोंडावरच काय, त्यांच्या मागेही करू नये. पण सीतेच्या स्नेहामुळे व तिच्या सद्‌गुणांमुळे उत्साह इतका वाढला की नकळत बोलून गेले; ही चूक आता दुरुस्त केली जाणार आहे. ।। प्रीतीची ही रीति अशी ।। आहे. नियम, शिष्टाचार इ. मागे पडतात. **(क) माता पिता पुन्हा... देती** - सीतेचा हा अलौकिक गुण पाहून स्नेहाला उकळ्या आल्या व पुन्हा आलिंगन दिले; ही मागच्या चुकीची दुरुस्ती !

**चौ. ७-८ (१) रात्रिं राहणें इथें किं अनुचित** - अनुचित कां याची काही कारणे पूर्वी (२८६) टीकेत दिली आहेत. येथे राहणे म्हणजे पतिसंगति, सेवा यांपेक्षा यांची ममता अधिक असे सिद्ध करणे आहे; वानप्रस्थ धर्माच्या विरुद्ध आहे; ज्या परिस्थितीत पति त्या परिस्थितीत पत्नी. प्रभु झोपडीत ! एकटे ! व मी स्वजनांच्या संगतींत, राजशाही तंबूत राहू नि काय गाद्यागिर्द्यांवर झोपू ? इ. विचार मनात चालले आहेत. **(क) राणीनें कसें ओळखलें ?** तीसुद्धा पतिव्रता, स्त्रीच, म्हणून तिला कळले. खाली पाहणे, पुन्हा दरवाजाकडे **पाहणे**, आसनावर न बसणे, पदर सावरणे व सचिंतचर्या यांवरून स्त्रियांना कळणे सोपे.

**ल.टे. -** सीतेचे वय अवघे १०-१०।। वर्षांचे (वा. रा. प्रमाणे) ७२ दिवस वनवासांत आहे; फार दिवसांनी आईबापांची भेट झालेली; असे असून एक रात्र आईबापांच्या तंबूत राहून गप्पा गोष्टी करण्याची इच्छासुद्धा तिला झाली नाही; इतकी पतिनिष्ठा, धर्मनिष्ठा, त्याग, मनोनिग्रह व असामान्य इंद्रिय निग्रह असणाऱ्या अशा पतिव्रतांना ब्रह्माविष्णुरुद्र सुद्धा का वंद्य मानणार नाहीत व का घाबरणार नाहीत ? **(क)** सीतेचे हे सुशील पाहून जनकांस पुन्हा प्रेमाचे भरते आले, पण प्रशंसा उघड न करता मनात केली.

**दो.** (१) बरोबर काही देणेच शक्य नसल्याने वारंवार जवळ घेऊन आलिंगन दिले हेच दिले; व दांपत्य दूरवर पोचवण्यास गेले असेल व नंतर भाऊ, संरक्षक वगैरे देऊन आश्रमापर्यंत पोचविली असेल; कारण रात्रीची वेळ व अरण्य आहे.

***सीता-परिजन-जनकादि भेट प्रकरण येथे समाप्त झाले.***

(२) सांगे सुसमयिं भरतगति - महाराज प्रसन्न आहेत, व पूर्ण एकान्त

आहे असे पाहून कौसल्येचा उल्लेख न करता कौसल्येच्या सूचनेचा उपक्रम केला व भरताच्या स्वभावाचे, गूढ स्नेहाचे व परिस्थितीचे वर्णन करून भरत अयोध्येत राहिले तर काय होईल वगैरे ओघाओघाने सांगितले असे जनकांच्या पुढील वचनांवरून ठरते. सूचना - दोह्याच्या या उत्तरार्धाचा संबंध पुढील प्रकरणाशी आहे.

*श्रीमानस-गूढार्थ-चंद्रिका अयोध्याकांड अध्याय २६ वा समाप्त.*

●●●

## अध्याय २७ वा

## जनक-सुनयना-संवाद प्रकरण (२८८।१-२९०।२)

*हिं.* *। सुनि भूपाल भरत ब्यवहारू । सोन सुगंध सुधा ससिसारू ॥१॥*
*। मूदे सजल नयन पुलके तन । सुजसु सराहन लगे मुदित मन ॥२॥*
*। सावधान सुनु सुमुखि सुलोचनि । भरत कथा भव बंध बिमोचनि ॥३॥*
*। धरम राजनय ब्रह्मबिचारू । इहाँ जयामति मोर प्रचारू ॥४॥*
*। सो मति मोरि भरत महिमाही । कहै काह छलि छुअति न छाही ॥५॥*

*म.* ***। श्रवुनि भूप भरत व्यवहार । कनकिं सुगंधि सुधें शशिसार ॥१॥***
***। मिटले सजल नयन पुलकित तन । वर्णु लागले सुयश मुदित मन ॥२॥***
***। ऐक सुसावध सुमुखि सुलोचनि । भरत कथा भवबंध - विमोचनि ॥३॥***
***। धर्मि नृपनयीं ब्रह्मविचारीं । यथामती मी प्रवेशकारी ॥४॥***
***। कशी भरतमहिमा मम मति ती । वर्णि, शिवे छाये न छलें ती ॥५॥***

**अर्थ** - सोन्यांत सुगंध आणि सुधेत चंद्राचे सार यांच्यासारखा भरताचा व्यवहार भूपतींनी ऐकून घेऊन -॥१॥ अश्रू आलेले आपले डोळे मिटले (त्यांच्या) सर्वांगावर रोमांच उभे राहिले व आनंदित मनाने ते भरताचे सुयश वर्णू लागले.॥२॥ सुमुखी, सुलोचनि ! अगदी सावधपणे ऐक, भरतकथा भवबंधांतून मुक्त करणारी आहे.॥३॥ धर्म, राजनीति व ब्रह्मविचार यांत मी यथामति प्रवेश करू शकतो.॥४॥ पण ती माझी मति भरतमहिमा कसा वर्णू शकेल ? (कारण) ती छलानेही त्या महिम्याच्या छायेला स्पर्श सुद्धा करू शकत नाही.॥५॥

**टीका. - चौ. १ - (१) भरत व्यवहार । कनकिं सुगंध सुधें शशिसार** - भरताच्या व्यवहाराला येथे सुगंधयुक्त सोने व शशिसारयुक्त सुधा असे म्हटले. आता सोने (कनक) सुगंध, सुधा व शशिसार म्हणजे काय हे मानसाधारेच ठरविणे चांगले, म्हणजे अर्थाबद्दल साधार निश्चय होईल. **(क) कनक** (सोनें) **कनक-तेज** जसे वाढे दाहें । प्रियतमचरणनेम निर्वाहें' (२०५।५) याने ठरले की **प्रियतमचरणनेम** = कनक सोने. **(ख) सुगंध** - 'बंधु चंदना कुठार तोडी । तरी दे **निजगुण सुगंध** गोडी' (७।३७।८) 'सुगंध' शब्द मानसांत हिंदीत एकंदर १६ वेळा वापरला आहे; पण या उत्तरकांडांतील चौपाईतच तो रूपकात वापरला आहे; सुगंध = निजगुण. भरताच्या व्यवहारात त्यांचा मुख्य गुण (निजगुण जसा चंदनाचा सुगंध मुख्य

गुण) म्हणजे सेवकधर्माचे परम आदर्शभूत पालन-संरक्षण. म्हणून ठरले की **प्रियतमचरण नेमाचा निर्वाह करण्यात सेवकधर्माचे पालन करणे म्हणजे कनकांत सुगंध.** या गुणामुळेच, या सुगंधामुळेच भगवंतावर आपली प्रतिज्ञा मोडण्याची पाळी आली नाही. **(ग) सुधा - 'पूर्ण राम-सुप्रेम** पियूषें... भक्त आता प्या अमृत पोटभर । केली सुलभ **सुधे** वसुधेवर' (२।२०९।५-६) याने ठरले की रामसुप्रेम = सुधा. **(घ) शशिसार - 'भरताचरण पुनीत परमही ।... शमन सकल संताप समाजा ॥... रामस्नेहिं सुधाकर** सारहि परमपुनीत भरताचरण म्हणजे रामस्नेहांत शशि = सुधाकर, सार... (२।३२६।५-८) 'श्रीरामसीताप्रेम पीयूष' (३२६ छंद) **सीतारामप्रेमात परम पावन आचरण म्हणजेच सुधेत शशिसार.** (ङ) **सीताराम प्रेम असून परम पावन आचरण असणे परम दुर्लभ आहे.** सीताराम प्रेमसुधेत परमपुनीत आचरणरूपी शशिसार म्हणजे चंद्रामृत असून **प्रियतमचरणनेमनिर्वाह करणे** त्याहून फार दुर्लभ; आणि **त्यांतही सेवकधर्माचे आदर्शभूत पालन** - संरक्षण तर अति अति दुर्लभ. पण भरताच्या व्यवहारात या चारी गोष्टी आतापर्यंत उत्तम प्रकारे दिसून आल्या आहेत. या चार गोष्टी एकत्र असणे म्हणजेच सोन्यात सुगंध व सुधेत शशिसार (चंद्रामृत). भरताने सेवकधर्माचे काटेकोर पालन केले नसते तर श्रीरघुनाथास सक्रिय प्रतिज्ञाभंग म्हणजे अधर्म करावा लागला असता; व पुढील रामायण अगदी निराळे झाले असते. (सुबास शब्द हिंदीत स्त्रीलिंगी असल्याने 'सुगंध' वचनाशी तुलना करणे अगदी अयोग्य). सूचना - **मा. पी. मध्ये** या लेखकाचा या चौपाईवरील जो भाव प्रसिद्ध झाला आहे **तो सदोष आहे.**

(२) शशिसाराला - चंद्रामृताला सुद्धा सुधा म्हणतात; पण स्वर्गातील सुधा व शशिसारसुधा यांत पुष्कळ अंतर आहे. चंद्रामृत उज्वल, तापहर, प्रसन्नता देणारे व प्रकाशमय असते. हे गुण स्वर्गीय सुधेत असत नाहीत; पण चंद्रामृतांत स्वाद नसतो तो स्वर्गातील सुधेत असतो; म्हणून दोन्ही अमृतांतील दोष नसून सर्वगुणसंपन्न असे जे अमृत तेच सुधा व शशिसार. वरील सर्व विवेचनाचे सार दोन चौपायांत असे सांगता येईल -

***। सोनें प्रियतमपदाब्ज नेम हि । पालन सेवकधर्म सुगंधहि ॥१॥***

***। सुधा प्रेम पर्दि सीता रघुवर । भरताचरण चि इंदु-सार वर ॥२॥***

या चौपाईचा विस्तार ३२६।४ पासून ३२६ छंद अखेरपर्यंत आहे; ती टीका पहावी.

**चौ. २-३ (१) मिटले सजल नयन** - सुनयना भरतगति सांगत असतांच जनकांच्या नयनांत अश्रू आले होते. नंतर जो विचार करू लागले तो कवींनी मागील चौपाईत दिला आहे. विचार करता करता जनक भरतप्रेम समाधिमग्न झाले, तेव्हा डोळे मिटले गेले. शंकर जसे रामकथा सांगण्यास आरंभ करताना (१।१११; व ५।३३।२-३) रामप्रेममग्न झाले आहेत तसेच जनक येथे झाले व नंतर वृत्तीवर येऊन भरतसुयश वर्णू लागले. **(क) भरतकथा भवबंध विमोचनि** - **भरतकथा =** भरत चरित्र, भरताचे आचरण. **'मधुर मंजुमृदमंगलकरही ॥५॥ हरण कठिण कलि कलुषें क्लेशहि । महामोह तमि दलन दिनेशहि ॥ पापपुंजकुंजर-मृगराजा । शमन सकल संताप समाजा ॥ जनरंजन भंजन भवभारहि । रामस्नेहिं सुधाकर सार हि ॥८॥** (३२६). भरताचरण भवबंध विमोचन का व कसे करते ते या चार चौपायांत दाखविले आहे. भरतचरित्रांत कविराज इतके रंगले आहेत की भरतचरित्राची फलश्रुति येथे दिल्याशिवाय राहवले नाही. वर दिलेल्या चौपायांत व ३२६ छंद व सोरठा यांत पुन्हा आहेच !

**चौ. ४-५ (१) धर्मि नृपनयीं ब्रह्मबिचारीं - प्रवेशकारी** - येथे सुद्धा धर्माला प्राधान्य, मग नीति व शेवटी ब्रह्मविचार असाच क्रम ठेवला आहे. पूर्वी अनेक वेळा असाच दिसला आहे. जनकराज म्हणतात मी याचे वर्णन करू शकतो. ब्रह्म शब्दातीत, मनोवाचातीत असून, धर्माचे तत्त्व अत्यंत गूढ असून आणि राजनीति अनेकरूप असूनसुद्धा याचे वर्णन मी शब्दांने करू शकतो; पण भरत महिमा असा आहे की त्याचे वर्णन करण्यास शब्द तर नाहीतच पण बुद्धीनेही त्याच्या छायेला छळाने सुद्धा स्पर्श करता येत नाही. छायेपर्यंत छलाने सुद्धा बुद्धी पोचू शकत नाही. वसिष्ठांची बुद्धिसुद्धा कशी कुंठित झाली पहा - **'भरत महामहिमा जलराशी । मुनिमति उभी तटीं अवलासी** (२५७।२-३ टी.पहा.) **'वदा प्रगट सुप्रेम कोण करि । कोण्या छाये कविमति अनुसरि'** (२४१।३) सार हे की ब्रह्म शब्दातीत मनोबुध्यातीत असले तरी त्याचे वर्णन निषेध रूपाने तरी करता येते पण भरत महिमा कल्पनातीत असून नेति नेति असा निषेध रूपानेही वर्णन करता येत नाही. **(क) छळाने स्पर्श करणे** म्हणजे काहीतरी बनवून सांगणे. कहाणी सांगणे. बनवून सांगण्यास कल्पना शक्ती उपयोगी पडते पण जे कल्पनातीत असून निषेधही करता येत नाही त्याच्यापुढे मन, बुद्धी, चित्त, अहंकार, वाचा ही सर्वच कुंठित होतात. जनक म्हणतात मला वर्णन करता

येत नाही यांत काही नवल नाही पण कोण कोण असमर्थ आहेत ते सांगतो ऐक -

*हिं. । बिधि गनपति अहिपति सिव सारद । कबि कोषिद बुध बुद्धि बिसारद ॥६॥*
*। भरत चरित कीरति करतूती । धरम सील गुन बिमल बिभूती ॥७॥*
*। समुझत सुनत सुखद सब काहू । सुचि सुरसरि रुचि निदर सुधाहू ॥८॥*

*हिं.दो. । निरवधि गुन निरूपम पुरुष भरत भरत सम जानि ॥*
*॥ कहिअ सुमेरु कि सेर सम कबिकुल मति सकुचानि ॥२८८॥*

*म. । विधि गणपति शिव शेष शारदा । कवि कोविद बुध मतिविशारदां ॥६॥*
*। भरत चरित कीर्ती कर्तूती । धर्म शील गुण विमल विभूती ॥७॥*
*। समजत ऐकत सुख सकलांतरि । शुचि गंगे रुचि सुधे निरादरि ॥८॥*

*म.दो. । निरवधिगुण निरूपम पुरुष भरतु भरतसम नान ॥*
*॥ गणा सुमेरु किं शेर-सम कविकुल लजायमान ॥२८८॥*

**अर्थ** - विधि (ब्रह्मा) गणपति, शिव, शेष, शारदा (सरस्वती) कवि, कोविद, विद्वान व जे कोणी बुद्धिविशारद असतील त्या सर्वांना - ॥६॥ भरताचे चरित्र कीर्ति, करणी, धर्म, शील, विमल गुण व विमल ऐश्वर्य - ॥७॥ समजण्यात व ऐकण्यात अंतरांत सुख होते. भरतचरित्रादि पवित्रपणात गंगेचा व स्वादात अमृताचा सुद्धा निरादर करणारे (त्यांना मागे टाकणारे) आहे.॥८॥ भरताच्या गुणांना सीमा नाही व ते उपमारहित पुरुष आहेत; भरत भरतासारखे आहेत; त्यांच्यासारखा दुसरा कोणी नाही. सुमेरु पर्वत शेरासारखा गणाल काय ? (म्हणूनच) सर्व कविवर्ग लज्जायमान होतो. (त्यांची बुद्धि भरतगुण वर्णन करण्यास लाजते).॥ दो.२८८ ॥

**टीका. चौ. ६-७ (१) विधि गणपति...विशारदां** - पहिल्या चरणांत ब्रह्मलोकादि स्वर्ग व पाताळ यांतील उत्तमोत्तम पाच वक्त्यांची गणना आहे. दुसऱ्या चरणांत त्यांच्यापेक्षा कमी अधिकाराच्या चार वक्त्यांचा अवरोह क्रमाने उल्लेख आहे. **कवि** = शुक्राचार्य, व्यास - वाल्मीकी इ; **कोविद** - बृहस्पति, शौनकादि; **बुध** - पंडित विद्वान व **मतिविशारद** = इतर जे कोणी बुद्धिकौशल्य असलेले असतील ते. असा नऊ जणांचा उल्लेख आहे. पुढे सांगतात की भरताच्या सात गुणांपैकी एका एका गुणाचे वर्णनसुद्धा या नऊ जणांस प्रत्येकी किंवा सर्व मिळून करता येणार नाही मग सात गुणांचे, सप्तसागरांचे वर्णन कसे करणार ? **(क) विमल** - हे विशेषण नुसत्या

विभूतीकडे न घेता बाकी सर्वांच्या बरोबर घेणे आवश्यक आहे. भरत विमल यश बिधु (कीर्ति, विधु) असे भरद्वाजांनी म्हटले आहे. या प्रमाणे प्रत्येक गोष्टीला विमल किंवा पावन विशेषण वापरलेले सापडेल. **'भरत शील गुण विनय महत्ता । श्रद्धा भक्ति भलाइ बंधुता ॥ वदत शारदा मतिहि कचरते । सागर शिंपी कधिं किं उपसते'** (२८३।३-४) असे कौसल्येने सुनयना राणीजवळच म्हटले आहे; व त्यांत सप्त सागरांचाच उल्लेख आहे. **'भरतभाव राहणि कर्तूती । भक्ति बिरति गुण विमल विभूती ॥ वर्णत सकल सुकवि संकोचति । कुंठित शेष गणेश गिरा मति'** (३२५।७-८) असे कवींनी म्हटले आहे व यांतसुद्धा सातच गोष्टी आहेत.

**चौ. ८ (१) समजत ऐकत सुख** - समजते, ऐकतां येते पण वर्णन करता येत नाही. कोणी तरी **वर्णन केल्याशिवाय ऐकता कसे येईल ?** भाव हा आहे की भरत जेव्हा काही बोलतात, बोलले तेव्हा त्यांचे ते भाषण ऐकून समजते की अमुक अमुक गुण यांच्या ठिकाणी आहेत; पण त्या गुणांचे वर्णन करता येत नाही. **(क) शुची गंगे रुचि सुधे निरादरि** 'भरताचरण पुनीत परम ही' (३२६।५) आहे; तशीच गंगा 'परमपुनीता' (१।२१) छंद). 'परम पावन जान्हवी' भरताचरण 'मधुर मंजु मुद मंगलकर ही' (३२६।५) आहे; तशीच 'गंगा सब मुदमंगल मूला आहे. 'सुधा सलिल भरित' (वि.प.) 'शोभत शशिधवलधार' (वि.प.) यांत मंजुत्वाचा - सौंदर्याचा भाव आहे. याप्रमाणे गंगा व भरत यांची पावनता सारखी असता गंगेला कमी का लेखली ? रात्रीच्या प्रहरांपैकी मध्यरात्रीचा व नंतरचा असे दोन प्रहर गंगास्नान निषिद्ध आहे; पण भरतचरित्र **'निशिदिनिं सुखद सदा सर्वांना'** आहे. शिवाय पूर्वी दाखविल्याप्रमाणे गंगा देशपरिच्छिन्न आहे. सर्वांस सुलभ नाही.

**दो. (१) गणां सुमेरु किं शेरसम** - कोणाचे वर्णन करावयाचे असेल तर उपमा वगैरेंनी केले जाते; पण जेथे उपमा नाही, ज्यांच्या सारखा सुद्धा दुसरा नाही तेथे वर्णन कसे करणार ? सुमेरु पर्वत किती मोठा आहे हे सांगण्यास त्याच्यासारखा सुद्धा दुसरा नाही. त्याच्यासारखा तोच इतकेच फार तर म्हणता येईल. पण पदार्थ तोलण्याचे जे शेराचे वजन असते त्याच्यासारखा सुमेरु पर्वत आहे असे म्हणणे जसे हास्यास्पद ठरेल तसेच कोणतीही उपमा देऊन भरताचे वर्णन केले तरी हास्यास्पद ठरेल म्हणून कविसमाज ते करण्यास लाजतो. **(क)** भरतासारखे भरत हे जसे म्हटले तसेच रामासारखे राम असेही म्हटले. 'निरूपम न उपमा आन, रामचि राम सम वदती श्रुती' (७।१२ छं.)

निरवधि गुण निरूपम पुरुष भरत प्रभु निरवधि निरूपम जगदीश्वर (७।९२।८)
गणां सुमेरु किं शेर सम सम कोटिशत खद्योत रवि वदतां जशी लघुता अती
अमित भरत महिमा श्रुणु राणी महिमा नाम रूप - सकल अमित अनंत (७।९१।३)
शुचि गंगे निरादरि अमित कोटि तीर्था सम पावन (७।९२।२)

हिं. *। अगम सबहि बरनत बरबरनी । जिमि जलहीन मीन गमु धरनी ॥१॥*
*। भरत अमित महिमा सुनु रानी । जानहिं रामु न सकहिं बखानी ॥२॥*
*। बरनि सप्रेम भरत अनुभाऊ । तिय जिय की रुचि लखि कह राऊ ॥३॥*
*। बहुरहिं लखनु भरतु बन जाहीं । सब कर भल सब के मन माहीं ॥४॥*

म. *। वर्णुं न शकति कोणि वरवर्णी । जशि जलहीन मीन गति धरणीं ॥१॥*
*। अमित भरत महिमा श्रुणु राणी । जाणति राम, न वदवे वाणीं ॥२॥*
*। प्रेमें भरतानुभाव वानुनि । नृप वदले स्त्रीमन-रुचि जाणुनि ॥३॥*
*। फिरतिल लक्ष्मण, जाति भरत वनिं । हितकर सर्वांचे रुचे सर्वमनिं ॥४॥*

**अर्थ** - हे वरवर्णी जसे जलहीन धरणीवर माशाने गमन (गति-गमु हिंदी) करणे, चालणे शक्य नाही त्या प्रमाणे (भरत महिमा --) कोणीच वर्णन करू शकत नाहीत.॥१॥ (कारण) राणी ! हे पहा की भरताचा महिमा अमित आहे (अपार अगाध आहे); राम जाणतात पण त्यांनासुद्धा वाणीने सांगता येत नाही.॥२॥ (याप्रमाणे) प्रेमाने भरताचा अनुभाव ( = प्रभाव, महिमा) वर्णन करून स्त्रीच्या मनातील रुचि जाणून भूपति म्हणाले की - ॥३॥ लक्ष्मण परततील व भरत वनात जातील (तर) ते सर्वांना हितकर होईल व सर्वांच्या मनाला आवडते. (हे खरे पण -) ॥४॥

**टीका. चौ. १-२ (१) जशि जलहीन धरणीं मीन गति** - जलहीन धरणीवर मासा गमन - संचार करू शकत नाही, हिंडू फिरू शकत नाही. येथे वर्णनाची अत्यंत अशक्यता दाखविली. धरणी प्राणिमात्राला धारण करणारी असली तरी तिच्या पृष्ठभागावर जर पाणी नसेल तर ती मीनाच्या गमनाला धारण करू शकणार नाही. **(क) वरवर्णी** - हा वरवर्णिनी शब्दाचा अपभ्रंश आहे. हा शब्द आणखी फक्त एकदाच व सीतेलाच वापरला आहे. **'तयां बिलोकुनि विलोकि धरणी । उभयीं संकोचित वरवर्णी'** (११७।३ टी. पहावी) (ख) जाणति राम, न वदवे वाणीं' - **'तात ! तुम्हां मी नीट जाणतो'** (२६४।५) असे रामच म्हणाले आहेत. वर्णन करता न येण्याचे कारण - **'वदत भरत गुण-शिला स्वभाव हि । प्रेमपयोधिं मग्न रघुराव हि'**

(२३२।८) वर्णन करू लागले की मन भरतप्रेमात बुडते. शिवाय जे अनंत आहे त्याचा अंत कोणालाही लागला तरी अनंतत्त्व उरणार नाही.

**चौ. ३ - (१) प्रेमें भरतानुभाव वानुनि** - भरत + अनुभाव = प्रभाव; भरताचा अनुभाव, भरताचा प्रभाव. **'अनुभावः प्रभावे** स्यात् निश्चये भावसूचने' (मेदिनी) (मा.पी.मध्ये 'इत्यमरः' म्हणून दिलेले वचन अमरांत नाही !) प्रभाव = महिमा; तो वर्णन करता येत नाही असे जनक आताच म्हणाले मग, 'प्रभाव वर्णन केला' असे कवि कसे म्हणतात ? वर्णन करता येत नाही असे जे दृष्टान्तादि देऊन सांगितले ते वर्णन नाही केले काय ? अवर्णनीय आहे हे या वर्णनावरूनच कळले ना ? **'म्हणौनि सद्गुरु वर्णवे ना । हे गे हेचि माझी वर्णना । अंतरस्थितीचिया खुणा । अंतर्निष्ठ जाणती'** (दा.बो. १।४।३१) **(क) नृप वदले स्त्रीमन - रुचि जाणुनि** - यावरून ठरते की सुनयनेने आपला मुख्य मुद्दा स्पष्ट न सांगता सूचित केला होता. भरत अयोध्येत राहिले तर त्यांचे काय होईल; बरे न राहिले तर अयोध्येचे पालन व रक्षण कोण करणार याचा विचार करणे जरूर आहे; असे म्हणाली असेल एवढ्यावरून तिच्या मनातील भाव सहज कळण्यासारखा आहे.

*हिं.* *। देबि परंतु भरत रघुबर की । प्रीति प्रतीति जाइ नहिं तरकी ॥५॥*
*। भरतु अवधि सनेह ममता की । जद्यपि रामु सीम समता की ॥६॥*
*। परमारथ स्वारथ सुख सारे । भरत न सपनेहुँ मनहुँ निहारे ॥७॥*
*। साधन सिद्धि राम पग नेहू । मोहि लखि परत भरत मत एहू ॥८॥*

*हिं.दो.* *। भोरेहुँ भरत न पेलिअहिं मनसहुँ राम रजाइ ॥*
*॥ करिअ न सोचु सनेह बस कहेउ भूप बिलखाइ ॥२८९॥*

*हिं.* *। राम भरत गुन गनत सप्रीती । निसि दंपतिहि पलक सम बीती ॥१॥*
*। राज समाज प्रात जुग जागे । न्हाइ न्हाइ सुर पूजन लागे ॥२॥*

*म.* *। देवी परंतु रघुवर-भरतीं । प्रीती प्रतीति ना तर्कवती ॥५॥*
*। भरत अवधि ही स्नेहा ममते । राम तरी कीं सीमा समते ॥६॥*
*। स्वार्थ सकल परमार्थ सुखानां । आणिति भरत मनीं स्वप्नां ना ॥७॥*
*। स्नेह रामपदिं सिद्धी साधन । हें मज दिसे भरत-मत-लक्षण ॥८॥*

*म.दो.* *। चुकुनिहि भरत न टाळिती मनें हि रामाज्ञेस ॥*
*॥ शोक नसावा स्नेहवश वदले विकल नरेश ॥२८९॥*

म. *। राम-भरत-गुण गणतां प्रीतीं । उभयां निमिषासम रजनी ती ॥१॥*
*। राज-समाज उदयिं युग जागति । स्नान करुनि सुर पूजूं लागति ॥२॥*

**अर्थ** - परंतु देवी ! रघुवर व भरत यांच्यातील प्रीती व प्रतीति (विश्वास) तर्कवत नाहीत.॥५॥ भरत स्नेह व ममता यांची जरि अवधि (सीमा) असले तरी राम समतेची सीमा आहेत.॥६॥ सगळे स्वार्थ, सगळे परमार्थ व सगळी सुखे यांपैकी कशालाही भरत स्वप्नातसुद्धा मनात आणीत नाहीत. ॥७॥ रामपदी स्नेह हेच साधन व हीच सिद्धी हे भरतांच्या मताचे लक्षण मला दिसते-वाटते.॥८॥ भरत चुकून कल्पनेने (मनाने) सुद्धा रामाज्ञा टाळणार - मोडणार नाहीत; म्हणून स्नेहाला वश होऊन शोक, चिंता करू नये; असे व्याकुळ होऊन नरेश (जनकराजा) म्हणाले.॥दो.२८९॥ राम व भरत यांच्या गुणांचे वर्णन व चिंतन करीत असताच त्या दोघांना ती रात्र निमिषासारखी गेली-वाटली.॥१॥ सकाळी दोन्ही राजसमाज जागे झाले व स्नान करून देवपूजा करू लागले.॥२॥

**टीका. चौ. ५-६ (१) रघुवर-भरतीं प्रीती प्रतीति** - दोघांची एकमेकांवर प्राणांसारखी प्रीति-प्रेम असल्याचे वर्णन १६८, १६९।१ कौसल्येने, २०१।८ व छंद निषादराजाने, २०५।७-८ त्रिवेणीत प्रयाग राजाने व २०८।६-८ भरद्वाजांनी केले आहे; यांशिवाय आणखी पुष्कळ वचने आहेत. **(क) प्रतीति** - विश्वास एकमेकांवर पूर्ण असल्याची उदा. **'त्यजितिं न मज रघुवीर, निज गणुनी प्रतिति मलाहि'** (१८३) २६९ पहा. भरतावर रामविश्वास - **'भरत वचनिं मम साधु जाणता'** (२२७।५) असे राम म्हणाले, २५९।८; व ३०५।४ पहा. **(ख) ना तर्कवती** - तर्कातीत आहेत. येथे तर्क उपयोगी पडण्यासारखा नाही. ब्रह्म जसे तर्कातीत आहे. **'तर्कः अप्रतिष्ठः'** (श्रुति) तशी यांची प्रीति व प्रतीती तर्काने जाणण्यास त्याहूनही कठीण आहेत.

**(२) भरत अवधि ही स्नेहा ममते** - राम भगवान आहेत हे जाणून स्नेह आहे व राम बंधु आहेत हे जाणून ममता आहे. यांची परम सीमा भरत आहेत. **(क) राम समतेची सीमा आहेत** - याचा अर्थ हा की ॥ **जयापाशीं जैसा भाव । तया लागीं तैसा देव ॥ 'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्'** (भ.गी.) **'तदपि करिति सम विषम विहारा । भक्त-अभक्त-हृदय-अनुसारां'** (२१९।५ टी.प.) भरतांचा जितका जसा स्नेह व ममता रामावर आहे; तसाच स्नेह व तशीच ममता राम भरतावर करतात. भाव हा की **भरताला वनवासाचे दुःख भोगू देण्यास राम तयार होणार नाहीत.**

**चौ. ७-८ (१) स्वार्थ सकल परमार्थ सुखानां... स्वप्नां ना** - भरताला रामप्रेमाशिवाय इतर कशाचीही यत्किंचित इच्छा नाही; नको आहे. **'अर्थ न धर्म न काम रुचि, नको गतिहि निर्वाण ॥ जन्मजन्मरति रामपदिं हें वरदान न आन'** (२०४); १९७।८ पहा. **(क) स्नेह रामपदिं सिद्धी साधन** - रामस्नेह हेच साधन व रामस्नेह हेच साध्य हेच भरताचे मत असावे असे जनकांस वाटत आहे. मागील भरताची वचने त्यांना माहीत नाहीत तरी जनकांस जे वाटले तेच सत्य आहे. त्यांचे अनन्य अपार प्रेम रामावर असून, ते नाही असे त्यांस वाटत आहे. ते मिळावे अशी त्यांना तळमळ आहे. रामकृपेशिवाय ते मिळणार नाही हे ते जाणतात. मग ज्यांची कृपा संपादन करावयाची त्यांची आज्ञा मोडून ती मिळणार नाही हे काय त्यांस कळत नसेल ? म्हणून म्हणतो की -

**दो. - (१)** भरत रामाज्ञा मनाने सुद्धा मोडणार नाहीत - राम हृदयस्थ, अन्तर्यामी, सर्वज्ञ आहेत हे ज्याला माहीत आहे तो रामकृपाकांक्षी रामाज्ञा मोडण्याचा विचार तरी कसा करील ? **(क) वदले विकल नरेश** - स्वतः व्याकुळ होऊनच हे सांगितले पण जनक रामभरत स्नेह व्याकुळ झाले; शोकचिंता व्याकुळ नाही झाले.

**चौ. १-२ (१) राम भरत गुण गणता... रजनी ती** - भगवान व भगवद्‌भक्त यांच्या गुणवर्णनात रात्र क्षणासारखी जाऊ लागली म्हणजे समजावे की थोडे तरी भगवत्प्रेम मनात व बुद्धीत आहे, पण **भगवान व भक्त यांच्या गुणवर्णनांत, श्रवणांत, चर्चेत कंटाळा येऊ लागला,** घड्याळाकडे लक्ष जाऊ लागले, झोप येऊ लागली **तर नक्की समजावे की प्रेमाचा अभाव व विषयासक्तीचा मोठा गाव गच्च भरला आहे.**

**येथे जनक सुनयना संवाद प्रकरण समाप्त झाले. आता पुनःश्च हरिः ओम्, रघुनाथ वसिष्ठ संवाद हे छोटे पण मोटे गोड प्रकरण आहे.** २९०।३-२९१।६.

*हिं. । गे नहाइ गुर पहिं रघुराई । बंदि चरन बोले रुख पाई ॥३॥*
*। नाथ भरतु पुरजन महतारी । सोक बिकल बनबास दुखारी ॥४॥*
*। सहित समाज राउ मिथिलेसू । बहुत दिवस भए सहत कलेसू ॥५॥*
*। उचित होइ सोइ कीजिअ नाथा । हित सबही कर रौरें हाथा ॥६॥*

*म. । स्नाति जाति गुरुकडे रघुपती । नमुनि चरणिं कल पाहुनि वदती ॥३॥*
*। नाथ ! भरत माता पुरवासी । शोकाकुल दुःखी वनवासीं ॥४॥*
*। सहित समाज राव मिथिलापति । बहु दिन झाले क्लेशां साहति ॥५॥*
*। उचित गमे तें करणें आतां । नाथ ! सर्वहित अपले हातां ॥६॥*

**अर्थ** - रघुपतींनी स्नान केले व ते गुरुकडे गेले; आणि पायांना वंदन करून त्यांचा कल पाहून म्हणाले की - ॥३॥ नाथ ! भरत, सर्व माता व पुरवासी लोक शोकाकुल असून (आणखी) वनवासांत दुःखी होत आहेत.॥४॥ (तसेच) राजा मिथिलापती आपल्या सर्व समाजासह आज पुष्कळ दिवस क्लेश सोशीत आहेत.॥५॥ योग्य वाटेल ते आपण करावे; आता सर्वांचे हित आपल्या हातात आहे.॥६॥

**टीका. चौ. ३ (१) स्नाति जाति** - स्नानाच्या उल्लेखाने पूजेपर्यंतचे नित्यकर्म सुचविले पूजेचा उल्लेख मागल्याच चौपाईत केला आहे. गुरूंना वंदन करण्यासाठी त्यांच्या तंबूंत गेले. **(क) कल पाहुनि वदती** - प्रसन्न आहेत असे पाहून विनंती करतात -

**चौ. ४-६ (१) शोकाकुल दुःखी वनवासीं - 'राम गुरुंना प्रेमें वदले'** (२४८।४) पासून **'स्वामी करितिल गमे इष्ट तें'** (२४८।८) या पाच चौपाया पहाव्या. त्यांचे सार येथे प्रसंगानुसार थोडी भर घालून सांगितले. **(क) मिथिलापति क्लेशां साहति** - परम ऐश्वर्यात राहणारे असून सर्व मंडळी कंदमूल फलाहारी बनून वनवासाचे क्लेश सोशीत आहेत हे मला बघवत नाही. **(ख) उचित गमे तें करणें आतां - 'स्वामी करितिल गमे इष्ट तें'** (२४८।८) असे पूर्वी सांगितले; तसेच आता; पण **सर्वहित अपले हातां** - सर्व जगाचे हित करणे न करणे आता आपल्या हाती आहे; कारण मी बचनबद्ध झालो आहे भरतांस. ध्वनि हा की मला अयोध्येत परत जावे लागणार नाही असा काही उपाय ठरवून एकदा लवकर निर्णय घ्यावा.

*हिं.* *। अस कहि अति सकुचे रघुराऊ । मुनि पुलके लखि सीलु सुभाऊ ॥७॥*
*। तुम्ह बिनु राम सकल सुख साजा । नरक सरिस दुहुँ राज समाजा ॥८॥*
*हिं.दो.* *। प्रान प्रान के जीव के जिव सुख के सुख राम ॥*
*॥ तुम्ह तजि तात सोहात गृह जिन्हहि तिन्हहि बिधि बाम ॥२९०॥*
*म.* *। वदुनि असें रघुराज संकुचति । प्रकृति शील पाहुनि मुनि पुलकति ॥७॥*
*। राम तुम्हां बिण सब सुख, उभयां । राज समाजा समान निरया ॥८॥*
*म.दो.* *। प्राणां प्राण हि जिवा जिव सुखास सुख तुम्हिं राम ॥*
*॥ त्यजुनि तुम्हां ज्या रुचे गृह तात तयां विधि वाम ॥२९०॥*

**अर्थ** - असे म्हणून रघुराज (अति) संकोचित झाले; तो स्वभाव (प्रकृति) व ते शील पाहून मुनि रोमांचित झाले.॥७॥ (व म्हणाले की) राम ! तुम्ही

प्राणांचे प्राण, जीवांचे जीव व सुखांचे सुख आहात; तुम्हाला सोडून ज्यांना घर गोड वाटत असेल त्यांचे दैव (च) उलटे फिरले.।। दो.२९० ।।

**टीका. चौ. ७-८ (१) रघुराज संकुचति** - गुरुंनी न विचारता अशा प्रकारची सूचना द्यावी लागली याचा फार संकोच वाटला. **'बहुत कथित हें करुनि घृष्टते'** (२४८।८); न सुचवावे तर अंगिकारलेल्या व्रतांत दोष उत्पन्न होतो व लक्षावधि सुखार्ह लोक दुःख भोगीत आहेत. **(क) प्रकृति** = स्वभाव असा इतका संकोची; व **शील** हे की लोकांचे वनवास दुःख पाहून दुःखी, कष्टी झाले आहेत; पण स्वतःच्या वनवास दुःखाचे काही वाटत नाही; **(ख) राम तुम्हांविण सब सुख...निरया** - भाव हा की तुम्हाला वाटते पण येथे वनवास दुःख कोणालाच वाटत नाही; आपल्या अतिकोमल स्वभावामुळे व प्रेमामुळे आपल्याला तसे वाटते. उलट आपल्या समीप सर्वांना अनंत स्वर्गसुखासारखे सुख होत आहे. तुम्हाला सोडून जगातील सुखांत जाऊन राहणे म्हणजे नर्कात पडल्यासारखे वाटेल. **'सीतारामां सर्वे वास वनिं । कोटि अमरपुर समान सुखखनि ।। त्यजुनि रामलक्ष्मणवैदेही । ज्यां प्रिय गृह विधिवंचित तेही'** (२८०।३-४) असे दोन्ही समाजातील सर्व लोक म्हणालेच आहेत. त्याचेच सार येथे वसिष्ठांनी सांगितले.

**दो. (१) प्राणां प्राणहि... सुखास सुख राम - 'पुत्र परम तुम्हिं प्रिय सर्वांचे । प्राणां प्राणहि जीव जिवांचे ।।** (५६।७) असे कौसल्या म्हणाली आहे; **'जीवन जीवां प्राणां प्रियही । सकल सखा निःस्वार्थी रामही'** (७४।६) असे सुमित्रेने म्हटले आहे. तेच भाव येथे आहेत. 'आनंदा आनंदहि दाते' (१।२१७।२) = सुखास सुख देणारे. **राम = 'जो आनंदसिंधु सुखरासी । त्रिजगी पावे लवें सुखासी'** (१।१९७।५) या अर्थाकडे वसिष्ठ येथे बोट दाखवित आहेत. **(क) त्यजुनि तुम्हां ज्यां रुचे गृह...वाम** - गूढ भाव हा आहे की लोकांच्या मनाची दृढ भावना काय आहे हे मी तुम्हाला सांगितले; येथून परत जाण्याची इच्छा दोन्ही समाजात आज तरी दिसत नाही व उत्पन्न होणे फार कठीण दिसते. रामभक्तीचा उत्साह मुनींच्या मुखांतून महत्त्वाचे आणखी सिद्धान्त बाहेर पाडीत आहे.

***हिं.*** ***। सो सुखु करमु धरमु जरि जाऊ । जहँ न राम पद पंकज भाऊ ।।१।।***
***। जोगु कुजोगु, ग्यानु अग्यानू । जहँ नहिं राम पेम परधानू ।।२।।***
***। तुम्ह बिनु दुखी सुखी तुम्ह तेहीं । तुम्ह जानहु जिय जो जेहि केहीं ।।३।।***
***। राउर आयसु सिर सबही कें । बिदित कृपालहि गति सब नीकें ।।४।।***

*। आपु आश्रमहि धारिअ पाऊ । भयउ सनेह सिथिल मुनिराऊ ॥५॥*
*। करि प्रनामु तब रामु सिधाए । (रिषि धरि धीर जनक पहिं आए) ॥६॥*
म. *। जळो कर्म सुख धर्म हि साधन । जिथें राम-पद-पंकज- भाव न ॥१॥*
*। योग कुयोग, बोध अज्ञान हि । रामप्रेम न जिथें प्रधानहि ॥२॥*
*। दुःखि तुम्हांविण सुखी तुम्हांस्तव । ज्यां मनिं जें तें जाणां वास्तव ॥३॥*
*। अपली आज्ञा सकलां मस्तकिं । विदित कृपाला गती समस्त किं ॥४॥*
*। आपण लावा स्वाश्रमिं पाया । स्नेह-शिथिल झाले मुनिराया ॥५॥*
*। प्रणमुनि राम आश्रमा परतति । (ऋषि सधीर आले जनकाप्रति) ॥६॥*

**अर्थ** - जिथे रामपदकमलांच्या ठिकाणी भक्ति (भाव, प्रेम) नाही, ते कर्म, तो धर्म, ते सुख आणि सर्व साधने यांना आग लागो. (ती सर्व निरर्थक होत).॥१॥ जिथे रामप्रेमाला प्राधान्य नाही तो योग कुयोगच, आणि ते ज्ञान (बोध) अज्ञानच (समजावे).॥२॥ (हे दोन्ही समाज) तुमच्या वाचून दुःखी व तुमच्यामुळे सुखी (होणारे) आहेत; व ज्यांच्या मनात जे आहे ते सर्व तुम्ही यथार्थ जाणताच.॥३॥ आपली आज्ञा सर्वांच्या मस्तकावर आहे; व हे कृपाला आपण समस्त (सर्वांगपूर्ण) स्थिती जाणताच.॥४॥ तरी आता आपण आपल्या आश्रमात जावे; असे म्हणून मुनिराज स्नेहाने शिथिल झाले. (बोलवेना).॥५॥ राम प्रणाम करून आश्रमात परतले.॥६॥ (पुढील चरण पुढल्या प्रकरणातला आहे.)

**टीका. चौ. १-२** (१) रामचंद्रांचे सत्य स्वरूप व लोकांची अनन्य भक्तिभावना यांचे वर्णन करता करता मुनिराज रामभक्तिरसात असे रंगले की राम समोर आहेत हे जणू विसरले; आणि त्यामुळे **या दोन चौपाया नाटकांतील स्वगत भाषणा सारख्या आहेत.** लक्ष्मणाचेही असेच झालेले आपण पाहिले आहे. **(क)** या दोन चौपायांचाच विस्तार याच मुनिराजांनी रामचंद्रांसमोरच उत्तर कांडांत केला आहे. '**योगमखव्रतदान ॥ ज्यास्तव करणें तो मिळे धर्म न या सम आन**' (७।४८) पासून ७।४९।८. '**पदसरोजरत जो असतोही**' पर्यंत पाहणे. त्यांतच म्हटले आहे की - '**मळें धुउनि कधिं मळ किं नाशतो । वारि मधुनि कुणि घृत किं पावतो ॥ प्रेमभक्ति जलविण रघुवर तों ॥ अभ्यंतर मल कधीं न जातो**' (चौ. ५-६) येथे भाव हा आहे की रामप्रेमरूपी निर्मल जल नसेल तर कर्म, धर्म, इतर सर्व व्रत व यमनियमादि साधने, योग, ज्ञान इत्यादी (साबण) पुष्कळ वापरले तरी हृदयांतील वासना व अहंकारादि मळ साफ जाणार नाहीत; म्हणून रामप्रेमविहीन या

साबणांना आग लागो. **(ख) राम प्रेम न जिथें प्रधान हि'** - रामप्रेम, रामभक्ति प्राप्त झाल्यानेच परमसुखाचा लाभ होईल व भवभंग होईल असा दृढ निश्चय व ही भक्ती प्राप्त करणे हे मुख्य ध्येय योगाभ्यासात व ज्ञानप्राप्तीच्या साधनांत व ज्ञानप्राप्त करण्यात **नसेल तर तो योग कुयोग = दुष्ट योग व ते ज्ञान अज्ञानच समजावे. 'सा तु कर्म ज्ञान योगेभ्योऽप्यधिकतरा'** (ना.भ. २५) हेच येथे व्यतिरेकाने सांगितले. रामप्रेम प्राप्त करण्याचा निश्चय करून त्याला अनुकूल असतील त्या कर्म, धर्म, योग, ज्ञान इ. साधनांचा उपयोग केला तरच त्या सर्वांचे सार्थक आहे. **'भवतु निश्चयदार्ढ्यादूर्ध्व शास्त्र रक्षणम्'** (ना.भ.१२) **'अन्यथा पातित्यशंकया'** (ना.भ. १३). हे सिद्धान्तच येथे ग्रथित केले आहेत.

**चौ. ३-४ (१) दुःखि तुम्हां विण... जाणां वास्तव - वास्तव** = यथार्थ, खरे खरे. मागील आठव्या चौपाईत व दोह्यांत जे सांगितले तेच येथे व्यतिरेक व अन्वय या दोन्ही पद्धतीने सांगितले. आपण सर्वांच्या हृदयांत वास करणारे असल्याने मी म्हणतो अशी स्थिती (गति) सर्वांच्या हृदयाची आहे की नाही हे आपण जाणताच. **(ख)** असे असले तरी **'अपली आज्ञा सकलां मस्तकिं'** आपल्या आज्ञेचे उल्लंघन कोणी करणार नाहीत अशी खात्री बाळगावी. **(ग)** 'जळोकर्म' वगैरे पासूनच्या बोलण्यातील गूढ भाव हा आहे की आपण अयोध्येत सध्या परत येणार नाही हे दिसतेच आहे; व भरतादि सर्व आपल्या वाचून दुःखी राहणार हेही दिसतेच; तथापि सर्व लोक आपली आज्ञा शिरसामान्य करतील हे तितकेच खरे आहे; पण आपण कृपालु होऊन कर्मधर्मादि सर्व साधनांत रामपदपंकज भाव प्रधान राहील असे काही दिलेत तर विरहदुःख कसे तरी सह्य होईल. **चरण पादुका देण्याविषयीची ही गूढ सूचना आहे.**

**चौ. ५-६ (१) आपण लावा स्वाश्रमिं पाया -** ।। मी करतो की उचित उपाया ।। असे पुढे म्हणणार होते पण हृदय स्नेहाने भरून आले व वाणी कुंठित झाली. **(क) प्रणमुनि राम आश्रमा परतति** - आले तेव्हा रघुपती (रघुराऊ) आले पण परत गेले ते राम गेले. भाव हा की - अयोध्योत परत जावे लागत नाही अशी खात्री होऊन आनंद झाला. पुढील चरण पुढल्या प्रकरणातला आहे. येथे **रामवसिष्ठ संवाद समाप्त झाला आता पुढे.**

●●●

## वसिष्ठ - जनक भेट (२९१।६-२९२।६)

हिं. *। (करि प्रनामु तब रामु सिधाए) । रिषि धरि धीर जनक पहिं आए ।।६।।*
*। राम बचन गुरु नृपहि सुनाए । सील सनेह सुभायँ सुहाए ।।७।।*
*। महाराज अब कीजिअ सोई । सब कर धरम सहित हित होई ।।८।।*

हिं.दो. *। ग्यान निधान सुजान सुचि धरम धीर नरपाल ।।*
*।। तुम्ह बिनु असमंजस समन को समरथ एहि काल ।।२९१।।*

म. ***। (प्रणमुनि राम आश्रमा परतति) । ऋषि सधीर आले जनकाप्रति ।।६।।***
***। रामवचन गुरु नृपां निवेदित । स्नेह-सुशीलें सहज सुशोभित ।।७।।***
***। महाराज तें अतां करावें । धर्म-सहीत हित सर्वा व्हावें ।।८।।***

म.दो. ***। ज्ञाननिधान सुजाण शुचि - धर्म - धीर नरपाल ।।***
***।। या समयिं न कोणी, तुम्हीं संकट शमवुं शकाल ।।२९१।।***

**अर्थ** - (प्रणाम करून राम आपल्या आश्रमास गेले) ऋषि वसिष्ठ धीर धरून (स-धीर) जनकराजांकडे आले.।।६।। स्नेहाने व सुशीलाने सहज सुशोभित असलेले रामचंद्रांचे म्हणणे गुरुंनी राजांस सांगितले (निवेदन केले).।।७।। (व म्हणाले की) महाराज ! धर्मासहित सर्वांचे हित होईल ते (कार्य) आता आपण करावे.।।८।। (कारण) आपण ज्ञाननिधान, शहाणे-चतुर, पवित्र धर्माचे आचरण करणारे धीर असे नरपाल आहात; या (अडचणीच्या) वेळी आपणच संकट निवारू शकाल; इतर कोणी (करू शकणार) नाही.।।दो.२९१।।

**टीका. चौ. ७-८ (१) स्नेह सुशीलें सहज सुशोभित** - रामचंद्रांच्या भाषणांतील स्नेह व सुशील यांचा प्रभाव वसिष्ठांवर एवढा पडला की ते सर्व भाषण व त्यांतील स्नेह शीलनिर्मित सहज सौंदर्य यांचे वर्णन जनकराजांजवळ केले. **(क) धर्मसहित हित सर्वा व्हावे** - सर्वांचे धर्मासहित हित होईल असा काही तरी मार्ग या अडचणींतून काढा अशी विनंती केली. **एकच वाक्य** - 'सर्वांचे धर्मसहित हित होइ' - **पण सर्व विश्वाला गवसणी घालणारे आहे**. एकाच उपायाने सर्वांचे हित साधणे कठीण असे कोणी म्हणतील म्हणून त्याला धर्मसहित हे विशेषण जोडावे लागले. कोणाच्याही धर्माचा विनाश होऊ दिला नाही; व सगळ्यांना स्वधर्माचे काटेकोर पालन करावयास लावले, सवड दिली, प्रवृत्त केले, की सर्वांचे हित होणारच. 'धारणात् धर्मम् इत्याहुः धर्मो धारयते प्रजाः' धर्मच सर्वांचे, समाजाचे धारण करू शकतो. रामचंद्रांचा धर्म

प्रतिज्ञा पालन, भरताचा धर्म पित्राज्ञा, राजाज्ञापालन; प्रजेचा धर्म रामाज्ञा व भरताज्ञा पालन; देवांचे हित, राक्षसांचे हित, सर्व जगाचे हित इतक्या सगळ्या गोष्टी साधतील ते करावे, असा उपाय सांगावा, हे सार आहे.

**दोहा.** (१) वरच्यासारखा उपाय शोधून काढणारांत कोणकोणते गुण पाहिजेत हे पूर्वार्धात सुचविले आहे. **(क) ज्ञाननिधान** - ब्रह्मज्ञान, धर्मज्ञान, राजनीतिज्ञान इ. विविध ज्ञानांचा यांत अंतर्भाव होतो. **सक्रिय, अनुभवजन्य विविधशास्त्रज्ञान व ब्रह्मज्ञान.** **(ख) सुजाण** - शास्त्रज्ञानाची व्यवहाराशी सांगड घालण्यात चतुर. **(ग) शुचिधर्म** - भक्तिरहित धर्म अशुचि, जाळून टाकण्यास योग्य असे वसिष्ठांनी आधीच सांगितले आहे; म्हणून शुचि धर्म = **भागवत धर्म** याचे आचरण व रहस्य जाणणारा पाहिजे. **(घ) धीर** - सात्विकधृतिसंपन्न; प्रसंगावधानी, निःपक्षपाती, निःस्वार्थ, **(ड) नरपाल** - मनुष्यांचे पालन करणारा. यास प्रजावात्सल्य, व्यवहारदक्षता, निर्लोभता, दातृत्व, आणि ईशन सामर्थ्य या गोष्टी लागतात. **राष्ट्रहित, समाजहित, लोकहित साधकांनी याचा अवश्य विचार करावा.**

(२) आपल्या शिवाय हे करण्यास कोणी समर्थ नाही; कारण सगळ्यांना आपला स्वार्थ दिसतो आहे; आणि माझी मति भरतभक्तिवश झाली असल्याने सर्वांचे हित करण्यास उपाय ठरविण्यास मी पात्र नाही. राम काय म्हणाले ते मी सांगितलेच व ते भरताला वचन देऊन वचनबद्ध झालेले आहेत. प्रसंग असा अडचणीचा आहे. **ल.टे.** वसिष्ठांसारखे ब्रह्मर्षि जनकराजाकडे जाऊन ही अशी विनंती करीत आहेत ! मोठेपणाचा अहंकार जरा तरी आहे काय ? **स्वतःची बुद्धी पक्षनिष्ठ बनली म्हणून बाजूस सरण्याची कोणाची तयारी आहे आज ?** आज तर याच्या उलट आहे, आधी कोणत्या तरी पक्षात पडावयाचे म्हणजेच पक्षपाती बनावयाचे, त्या पक्षाची शिस्त पाळावयाची, इतर पक्षांशी विरोध करावयाचा व सर्व लोकांचेच काय सर्व जगाचे सुद्धा हित करण्याचे यज्ञकंकण बांधल्याचा नगारा पिटावयाचा !

*हिं.* *। सुनि मुनि बचन जनक अनुरागे । लखि गति ग्यानु बिरागु बिरागे ॥१॥*
*। सिथिल सनेहँ गुनत मन माहीं । आइ इहाँ कीन्ह भल नाहीं ॥२॥*
*। रामहि रायँ कहेउ बन जाना । कीन्ह आपु प्रिय प्रेम प्रवाना ॥३॥*
*। हम अब बन तें बनहिं पठाई । प्रमुदित फिरब बिबेक बड़ाई ॥४॥*
*। तापस मुनि महिसुर सुनि देखी । भए प्रेमबस बिकल बिसेषी ॥५॥*

*। समउ समुझि धरि धीरजु राजा । चले भरत पहिं सहित समाजा ॥६॥*

म. *। परिसुनि वचन जनक अनुरागति । ज्ञान-विराग विरागि, बघत गति ॥१॥*

*। स्नेह-शिथिल चिंतिति चित्तां ही । आलों इथें भलें कृत नाहीं ॥२॥*

*। रायें वनिं रामांस धाडिले । प्रियप्रेम आपलें पाळिलें ॥३॥*

*। आम्हिं वनांतुनि धाडुं वनातें । प्रमुदित परतू ज्ञानमहत्तें ॥४॥*

*। द्विज तापस मुनि परिसुनि बघती । प्रेमें व्याकुळ विशेष बनती ॥५॥*

*। धरिति धीर नृप समजुन समया । भरताप्रति गत सह समुदाया ॥६॥*

**अर्थ** - (वसिष्ठांचे) भाषण ऐकून जनक अनुरागमग्न झाले; ती त्यांची दशा (गति) बघताच ज्ञान व विराग विरागी बनले.॥१॥ स्नेहाने शिथिल होऊन चित्तांतच विचार करू लागले की आपण इथे आलो हे चांगले केले नाही. (चूक झाली आपली) ॥२॥ दशरथ राजांनी रामचंद्रांस वनात धाडले (खरे, पण) आपल्या प्रियाच्या प्रेमाचे पालन करून दाखविले (रामविरहाने देहत्याग केला).॥३॥ आम्ही (मात्र आता) त्यांस वनांतून वनास पाठवू व ज्ञानाच्या महत्तेने (ज्ञानाचा टेंभा मिरवीत) मोठ्या आनंदाने परत जाऊ !॥४॥ ब्राह्मण, तापस, मुनि यांनी वसिष्ठांचे वचन ऐकले व ही जनकांची दशा पाहिली मात्र तो ते सर्व प्रेमाने विशेष व्याकुळ झाले.॥५॥ समय ओळखून राजांनी धीर धरला व समुदाया (समाजा) सहित भरताकडे गेले.॥६॥

**टीका. चौ. १-२ (१) जनक अनुरागति** - रामप्रेमाचा उमाळा आला; प्रेममग्न झाले. रामभाषण ऐकून बोलू लागताना वसिष्ठांची जशी दशा झाली तिच्यापेक्षा अधिक, ते रामभाषण व त्याची वसिष्ठांनी केलेली प्रशंसा ऐकून विदेही जनकांची झाली. वसिष्ठ बोलू शकले पण यांच्या मनवाणीत बोलण्याची शक्तीच राहिली नाही. **(क)** ती स्नेहमग्न दशा पाहून **'ज्ञानविरागविरागी'** बनले. ज्ञानविरागांना वाटले की आता आपली येथे आवश्यकता नाही. म्हणून ते निघून गेले; कारण स्त्री संगतीत राहणे हे काही वैराग्याचे लक्षण नाही; असा विचार त्यांनी केला. प्रेमभक्ति ही स्त्री आहे; तिच्याविषयी त्या दोघांना वैराग्य उत्पन्न झाले व गेले तिच्याकडे पाठ फिरवून ! भाव हा की जामात या भावाने रामस्नेहात मग्न झाले; मात्र ऐश्वर्याचा विसर पडला नाही. **(ख) स्नेह शिथिल चिंतिति चित्ता** - येथे आलो ही चूक झाली असे वाटले; कारण अयोध्येत चला म्हणून सांगता येत नाही; व या बिकट प्रश्नाचा निर्णय करण्याची नसती जबाबदारी शिरावर येऊन पडली. आम्ही विश्वविदित ज्ञानी ! त्याचा हा परिणाम ! भरत जावई,

राम जावईच ! कोणाला काय व कसे सांगणार ! येथून पुढील सर्व विचार मनातच चालले आहेत. **जनक या वेळी काहीच बोलले नाहीत.**

**चौ. ३-४** (१) यांत जनक आपल्या ज्ञानाला वक्रोक्तीने धिक्कारीत आहेत; ज्ञानी असल्याचा पश्चात्ताप होत आहे व दशरथच धन्य असे वाटत आहे. अपरिहार्य म्हणून महाराजांनी नगरांतून वनात जाण्यास सांगितले. वनात धाडले खरे पण रामविरहाने देहत्याग करून त्यांनी आपले प्रेम खरे करून दाखविले आणि आम्ही ? फार मोठे ज्ञानी, परम विरागी भक्त ! पण आहे कुठे प्रेम ! अयोध्येत परत नेण्याची ताकद नाही; स्वतः संगतीत राहता येत नाही आणि प्राणही जात नाहीत, हे आमचे ज्ञान ! भरत खरोखरच धन्य ! त्यांच्या प्रेमाने प्रभु प्रतिज्ञाभंग करण्यास सिद्ध झाले ! आम्ही ज्ञानी, धर्मनिष्ठ, नीतिनिपुण ! परत चलता का ? असे सुद्धा म्हणता येत नाही. लोक म्हणतील की हे ज्ञानिशिरोमणि झाले नसते तर भरताला कबूल केल्याप्रमाणे प्रभु अयोध्येत परत आले असते; व चारी भाऊ प्रेमाने एकत्र सुखात नांदले असते ! हाच मोठेपणा, हीच ज्ञानाची महती ! व ही कीर्ति बरोबर घेऊन आम्ही परत जाणार व ख्याति होणार की - ।। विदेहास नहिं मोह नि माया । उदासीन धन असुनी जाया ।।१।। धाडुनि कन्ये जामात्यासी । - वनीं, परतले मुदित गृहासी ।।२।। कुठे पाहिला असा सासरा । प्रेमाश्रूला नाहिं आसरा ।।३।। काय नवल नारदा न माया । नाहीं ज्या धन धाम न जाया ।।४।। असल्या ज्ञाना देव न देवो । रडत रामविरहें मृति येवो ।।५।। हो लखलाभ बोध तो जनका । मोक्ष अम्हां तो देउं मुळिं नका ।।६।। इ. इ.

**चौ. ६ - (१) धरति धीर नृप... सह समुदाया -** विचार केला की स्नेहमग्न होऊन असे कोरडे विचार व पश्चात्ताप यांचा काही उपयोग होणार नाही; ज्या अर्थी येथे आलास त्या अर्थी ज्ञानीविरागी म्हणून असलेली प्रसिद्धी कारणी लावलीच पाहिजे. वसिष्ठ व हा सर्व समाज यांना किती वेळ तिष्ठत ठेवणार ? ऊठ ज्ञानिराजा ! चल भरतांकडे; त्यांच्याच हाती सर्व आहे; ते काय म्हणतात ते प्रथम पाहिले पाहिजे. जावई, भावाचे जावई, म्हणून बोलावणे बरे वाटले नाही; म्हणून स्वतः सर्वांना घेऊन गेले.

***वसिष्ठ - जनक भेट प्रकरण येथे समाप्त झाले.***

●●●

## जनक - भरत - संवाद (२९२।७-२९४।५)

*हिं.* *। भरत आइ आगें भइ लीन्हे । अवसर सरिस सुआसन दीन्हे ॥७॥*
*। तात भरत कह तेरहुति राऊ । तुम्हहि बिदित रघुबीर सुभाऊ ॥८॥*
*हिं.दो.* *। राम सत्यब्रत धरम रत सब कर सील सनेहु ॥*
*॥ संकट सहत सकोच बस कहिअ जो आयसु देहु ॥२९२॥*
*म.* *। भरत पुढें येउनि त्यां नेती । समयोचित शुभ आसन देती ॥७॥*
*। तात भरत ! वदले निमिराव किं । तुम्हां विदित रघुविरस्वभाव किं ॥८॥*
*म.दो.* *। राम सत्यव्रत धर्मरत स्नेहि सुशील कृपाल ॥*
*॥ संकोचें संकट सहति सांगुं जसें किं म्हणाल ॥२९२॥*

**अर्थ** - भरत पुढे येऊन त्यांस घेऊन गेले व समयानुसार चांगली आसने (बसावयास) दिली.॥७॥ तेव्हा निमिराजा म्हणाले की तात ! भरत । तुम्हाला रघुवीराचा स्वभाव माहीत आहे की - ॥८॥ राम सत्यव्रत, धर्मनिष्ठ, स्नेही, सुशील (स्नेहरत व शीलरत) व कृपाल आहेत; त्यामुळे सर्वांच्या संकोचाने संकट सोशीत आहेत; तरी तुम्ही जे म्हणाल ते आम्ही त्यांस करण्यास सांगू.॥दो.२९२॥

**टीका. चौ.** ७-८ (१) **समयोचित शुभ आसन** - मृगाजिन, व्याघ्राजिन, कंबलासने, कुशासने इ. २८१।४ टी.प. **(क) रघुविरस्वभाव** - रघुविर = रघुवीर; हा शब्द भावपूर्ण आहे. यांतील भाव धर्मरत, स्नेहीं, संकट सहति, या शब्दांनी दोह्यांत सुचविले आहेत.

**दो.** (१) या हिंदी दोह्यांत **सबकर =** सर्वांचा - चे, असा अर्थ आहे; पण तो 'सीलु' व सनेहु (शील, स्नेह) यांच्याशी सुसंगतपणे लागत नाही. मागला 'रत' शब्द स्नेह व शील यांच्या बरोबर स्नेहरत, शीलरत असा घेतला तरच अर्थ लागतो की सर्वांच्या स्नेहांत रत व शीलांत रत. हा अर्थ स्नेही व सुशील कृपाल असा मराठीत स्पष्ट केला; टीकाकार येथे मौन आहेत. **(क)** धर्मरत व सत्यव्रत या शब्दांनी **धर्मवीरता सुचविली,** स्नेही कृपाल शब्दांनी **कृपावीरता** सुचविली, आणि संकटसहति यांनी **त्यागवीरता** सुचविली. सर्वस्वाचा त्याग करून मुनिवेषाने वनात येऊन राहिले आहेत; त्याग व धर्म यांचा फार निकट संबंध असतो. **(ख) धर्मरत** असल्याने वडिलांचे वचन पूर्ण करण्याची प्रतिज्ञा करून वनात आले आहेत. **सत्यव्रत** - सत्यसंघ असल्याने प्रतिज्ञेचा भंग करणे त्यांस मोठे

संकट वाटत आहे. **स्नेही** असल्याने तुमच्या, आमच्या व लोकांच्या स्नेहाचा तिरस्कार करता येत नाही. **सुशील** असल्याने परत जा, मी येत नाही असे सांगण्याचा त्यांना धीर होत नाही. **स्नेही, सुशील व कृपाल** असल्याने आपण सर्व कंदमूलफलाहार करून वनात राहतो हे पाहून त्यांच्या हृदयास क्लेश होतात. अशा अनेक प्रकारे संकोचात पडले आहेत. यांतून त्यांनी कसे सुटावे हे तुम्ही ठरवा व आम्हांस सांगा म्हणजे आम्ही त्यांस तसे करण्यास सांगू. **पुन्हा भार भरतशिरावरच !**

*हिं.* *। सुनि तन पुलकि नयन भरि बारी । बोले भरतु धीर धरि भारी ॥१॥*
*। प्रभु प्रिय पूज्य पिता सम आपू । कुलगुरु सम हित माय न बापू ॥२॥*
*। कौसिकादि मुनि सचिव समाजु । ग्यान अंबुनिधि आपुनु आजू ॥३॥*
*। सिसु सेवक आयसु अनुगामी । जानि मोहि सिख देइअ स्वामी ॥४॥*
*। एहिं समाज थल बूझब राउर । मौनमलिन मैं बोलब बाउर ॥५॥*
*। छोटे बदन कहउँ बड़ि बाता । छमब तात लखि बाम बिधाता ॥६॥*

*म.* *। परिसुनि लोचन सजल, पुलकुनी । वदले भरत धीर अति धरुनी ॥१॥*
*। प्रभू ! पूज्य पितृसे प्रिय आपण । कुलगुरु सम हित माय न बाप न ॥२॥*
*। कौशिकादि मुनि सचिव समार्जी । ज्ञान अंबुनिधि आपण आजीं ॥३॥*
*। शिशु सेवक आज्ञा-अनुगामी । जाणुनि शिकवण मज द्या स्वामी ॥४॥*
*। या स्थळिं समाजि आपण पुसतां । मौन मलिन मी वदत मूर्खता ॥५॥*
*। लघु मुखिं मोठा घास घेतसे । क्षमा ! बघुनि बिधि वाम मज असे ॥६॥*

**अर्थ** - (जनकांचे भाषण) ऐकून डोळे पाण्याने भरलेले व शरीर रोमांचित झालेले भरत अति धीर धरून म्हणाले की - ॥१॥ प्रभो आपण पित्यासारखे पूज्य व प्रिय आहात; कुलगुरुसारखे हितकर्ते (हित = मित्र, सुहृद) आईबापसुद्धा नाहीत (ते येथे आहेत) ॥२॥ कौशिकादि अनेक मुनि व सचिव यांच्या समाजात ज्ञानाचे सागर, आपण आज (येथे) आहांत.॥३॥ स्वामी ! मी आपला शिशु व आज्ञापालन करणारा सेवक (अनुगामी) आहे हे जाणून मला आपण उपदेश (शिकवण) करावा (त्या प्रमाणे मी करीन) ॥४॥ या (चित्रकूटसारख्या) स्थळी व या समाजात आपण विचारता (खरे) पण मी मलीन (आर्त) असल्याने मौन राहणेच योग्य आहे व बोलणे म्हणजे मूर्खपणा आहे; (मी मौन राहीन तर मलिन मनाचा व बोलेन तर उद्धट ठरेन).॥५॥ मी लहान तोंडी मोठा घास

घेत आहे; म्हणून माझे दैव फिरले आहे हे जाणून आपण मला क्षमा करावी.॥६॥

**टीका. चौ. १ (१) परिसुनि लोचन सजल** - जनकांच्या वचनाने स्पष्टपणे कळले की प्रभु रघुवीर माझ्या स्नेहाने व शीलामुळे अडचणींत, संकोचांत पडले आहेत. प्रभूंचे मागले वचन व **'जो स्वामिस संकोचिं पाडतो । स्वहित इच्छि मति नीच दास तो'** हे (२६८।३) स्वतःचे वचन भरतांस आठवले व प्रभूंनी प्रतिज्ञा मोडण्याचेही माझ्या स्नेहाने कबूल केले ! असे मनात येताच भरत **रामप्रेमाने व पश्चात्तापाने व्याकुळ झाले,** ते इतके की बोलण्यासाठी **अतिधीर** धरावा लागला. जनक व वसिष्ठ यांचे नुसता **धीर** धरून भागले. **(क)** पुढल्या दोन चौपायांत या सभेची अलौकिकता व महती सांगून त्यांच्या पुढील दोन चौपायांत या सभेत बोलण्याची आपली अपात्रता सांगतात.

**चौ. २ (१) प्रभू । पूज्य पितृ से प्रिय आपण** - हा चरण जनकांनाच उद्देशून आहे. यात जनकांचे **पिता या दृष्टीने महत्त्व सांगितले आहे;** आणि 'ज्ञानअंबुनिधि आपण आजीं' या पुढील **वचनात** नात्याचा संबंध लक्षात न घेता **जनकांचा जगप्रसिद्ध अधिकार व व्यक्तिमत्त्व यांचे दिग्दर्शन केले आहे. (क)** जनकांचाच उल्लेख आदि अंती करण्यात हेतु हा आहे की तेच वसिष्ठ कौशिकादि सर्व समाजाचे पुढारीपण घेऊन स्वतः आले व त्यांनीच भरतांस आपले मत सांगण्यास सांगितले व तेच रामचंद्रांस त्या प्रमाणे सांगणार आहेत; म्हणजेच ते या सभेत प्रमुख, अध्यक्ष आहेत. **(ख) येथे प्रभू पूज्य प्रिय पिता** - हे सर्व शब्द सहेतुक आहेत. **प्रभू =** सर्व समर्थ व पुत्र ज्यांस पूज्य प्रिय मानतो असा पिता उपस्थित असल्यावर पुत्राने बोलण्याची काय आवश्यकता ? बाप **असमर्थ** असेल किंवा पुत्र बापाला **पूज्य** मानीत नसेल तर पुत्राने बोलणे जरूर आहे. समर्थ असून, पूज्य वाटत असून **प्रिय** वाटत नसेल; बाप आपले काही अप्रिय करील अशी शंका पुत्राला असेल तर **कदाचित** पुत्राने आपले मत सांगणे योग्य ठरेल; पण या तिन्ही गोष्टी जेथे आहेत तो पिता हजर असता पुत्राने आपले मत सांगणे म्हणजे पित्याविषयी अनादर, अपूज्यता व अप्रियता प्रगट करण्यासारखे होईल. **श्वशुर या नात्याने जनक भरतांस पित्यासारखे आहेत.**

**(२) कुलगुरु सम हित माय न बाप न** - ज्या कुलगुरुंच्या सारखे हित = सुहृद, हितकर्ते, आईबापसुद्धा असू शकणार नाहीत असे परम समर्थ कुलगुरु (वसिष्ठ) येथे हजर आहेत. त्यांचा व जनकांचा विचारविनिमय होऊन मगच

इकडे आले आहेत हे वसिष्ठांनी जनकाबरोबर येणे व जनकांनी बोलणे यावरून सहज कळण्यासारखे आहे; यामुळे येथे गुरु वसिष्ठांचा अधिकार सुद्धा जनकांकडे आला आहे; म्हणून ते 'कुलगुरु सम' आहेत. रामचंद्रांनी जनकांस **'पितृ कौशिक वसिष्ठ राम'** जाणले (१।३४२।८) कसे व का हे तेथे टीकेत स्पष्ट केले आहे. भरत याच तिघांचा उल्लेख येथे करीत आहेत; व तेथे असलेलेच भाव येथे आहेत. पिता माता प्रेमाला वश होऊन एखादे वेळी चुकून पुत्राचे अहित करतील पण वसिष्ठांसारख्या कुलगुरूंकडून ते कधीही घडणार नाही. **'जन्महेतु सकलां पितृमाता'** (२५५।६) पासून तीन चौपाया टीकेसह पहाव्या, म्हणजे हित-हितकर्ते शब्दांचे वैशिष्ट्य कळेल. **'करि कल्याण दलुनि दुःखांसी'** हा अधिकार ज्यांच्या आशीर्वादाचा ते हितकर्ते गुरु येथे आहेत व त्यांचा अधिकार त्यांनी जनकांस दिला आहे. (दो. २९१) पहा.

**चौ. ३ - (१) कौशिकादि मुनि** - स्वतः क्षत्रिय जन्मले व ब्रह्मर्षी झाले; प्रतिसृष्टी निर्माण करण्याचा ज्यांचा अधिकार ते विश्वामित्र - कौशिक, राजनीति, प्रजावात्सल्य इ. क्षत्रियोत्तम-गुणांनी विभूषित असलेले येथे आहेत; व मार्कंडेय, जाबाली, कात्यायन, वामदेव इ. महासमर्थ ऋषि मुनि येथे आहेत आणि या सर्वांनी जनकाचे प्रमुखत्व मान्य केले आहे. म्हणजेच गुरुवसिष्ठ व कौशिकादि महामुनी यांस जनक मान्य वाटत आहेत. **(क)** कारण **'ज्ञान-अंबुनिधि आपण'** - येथील ज्ञान अंबुनिधि शब्दाने **'ज्ञाननिधान सुजाण शुचि-धर्म धीर नरपाल ॥... संकट शमवुं शकाल'** (२९१) या दोह्यांतील सर्व भाव सुचविले आहेत. हे वसिष्ठांनीच जनकांस 'कौशिकादि मुनि सचिव समाजी' च सांगितले आहे. तोच भाव येथे भरतांच्या मनातील आहे.

**चौ. ४ (१) शिशु सेवक आज्ञा-अनुगामी** - पित्याच्या, श्वशुराच्या **नात्याने शिशु व गुरु या नात्याने सेवक आहे** व आज्ञा मोडणारा आहे असे नाही; म्हणून काय करावे हे मला विचारीत न बसता शिकवण्या - आज्ञा - मिळण्याची खोटी की हा आपला शिशु व सर्वांचा दास काही विचार न करता तिचे पालन करील; असे असता आपण मला विचारता !

**चौ. ५ (१) या स्थळिं समाजिं आपण पुसतां** ! रामगिरीसारखे स्थळ, आता वर्णिला असा ज्यांचा अधिकार अशा ऋषिमुनींचा समाज व सर्वांना मान्य असे ज्ञानसागर आपण असून मला विचारता हे आश्चर्य आहे. या सभेची ही अपूर्व

अलौकिकता कोठे व माझी क्षुद्रता कोठे ? सुमेरूच्या पासंगाला शेर काय उपयोगी ! **(क) मौन मलिन मी वदत मूर्खता** - पूर्वीसुद्धा मी या बाबतीत मौन राहण्याचेच ठरविले होते; कारण माझे मन माझ्या स्वतःच्या, मातांच्या व प्रजेच्या स्वार्थाच्या विचाराने मलिन झालेले आहे. म्हणून अशा समाजात मी मार्ग सांगणे हा मूर्खपणा आहे; व जे बोलले जाईल ते मूर्खपणाचेच असणार. **(ख) दुसरा भाव** हा की 'मौन मलिन' - मी जर बोललो नाही तर मलिन, लबाड समजला जाईन; लोकांना वाटेल की राम अयोध्येत यावे असे यास वाटत नाही म्हणूनच हा बोलत नाही; बरे बोललो तर म्हटतील की काय हो ! उद्धट आहे ! अशा समाजात आपली उचलली जीभ नी लावली टाळ्याला ! **'मौनान्मूकः प्रवचनपटुर्वातुलो जल्पको वा । घृष्टः पार्श्वे वसति च सदा दूरतश्चाप्रगल्भः ॥ क्षान्त्या भीरुर्यदि न सहते प्रायशोनाऽभिजातः । सेवाधर्मः परम गहनो योगिनामप्यगम्यः ॥** (भर्तृहरि). या श्लोकांत म्हटल्याप्रमाणे स्थिति होणार; न बोललो तर आज्ञेचा उपमर्द केला असे ठरेल; म्हणून -

**चौ.** ६ (१) लहान तोंडी मोठा घास घेण्याची पाळी आली आहे हे माझे दुर्दैव समजून आपण क्षमा करावी. या प्रमाणे क्षमायाचना करून भरत आता विषयाकडे वळणार

*हिं.* *। आगम निगम प्रसिद्ध पुराना । सेवा धरमु कठिन जगु जाना ॥७॥*
*। स्वमि धरम स्वारथहि बिरोधू । बैरु अंध प्रेमहि न प्रबोधू ॥८॥*

*हिं.दो.* *। राखि राम रुख धरमु व्रतु पराधीन मोहि जानि ॥*
*॥ सब कें संमत सर्ब हित करिअ पेमु पहिचानि ॥२९३॥*

*म.* *। निगमागम वदतात पुराणें । सेवाधर्म कठिण जग जाणे ॥७॥*
*। स्वामि-धर्म नी स्वार्थ विरोध हि । वैर अंध, ना प्रेमीं बोध हि ॥८॥*

*म.दो.* *। प्रभु रुचि धर्म व्रत जतन, परवश मज जाणून ॥*
*॥ सकलां संमत सकलहित करणें प्रेम बघून ॥२९३॥*

**अर्थ -** वेद, शास्त्र, पुराणे म्हणतात की सेवाधर्म कठिण आहे; जग (सुद्धा) हे जाणते.॥७॥ स्वामिधर्म आणि स्वार्थ यांत विरोध (उत्पन्न झाला) आहे, (असतो); वैर (विरोध) आंधळे असते व प्रेमात ज्ञान-विवेक-रहात नाही.॥८॥ म्हणून मी परवश (पराधीन) आहे. हे जाणून स्वामी (प्रभु) रामचंद्रांची इच्छा, त्यांचा धर्म व त्यांचे सत्यव्रत यांचे संरक्षण (जतन) होईल असे सर्वांना मान्य

। सर्वांचे हितकारक वाटेल ते सर्वांचे प्रेम पाहून (प्रेमाकडे पाहून) करावे.॥दो.२८३॥

**टीका. चौ. ७-८ (१) सेवाधर्म कठिण** - मागील चौपायांचा समारोप व पुढील कथनाचा उपक्रम या चौपाईने केला आहे. सेवाधर्म कठीण या वाक्याने कळते की **'मौनमलिन'** याचा जो दुसरा अर्थ केला आहे तोच भरताच्या मनातील भाव आहे. सेवाधर्म कठीण कसा याचे प्रत्यक्ष उदाहरण दाखवितात. **(क) स्वामिधर्म नी स्वार्थ विरोध** - स्वामी रामचंद्रांचा धर्म सांगतो की प्रतिज्ञा पालन केलेच पाहिजे. म्हणून अयोध्येत परत जाता येत नाही. माझा सेवकाचा स्वार्थ सांगतो की स्वामींनी अयोध्येत परत यावे. असा दोघांमध्ये पूर्ण विरोध म्हणजे वैर आहे. 'वैरं विरोधो विद्वेषः (अमरे) या मानसिक भावना आहेत. **(ख)** सेवकाचा धर्म नव्हे की त्याची भावना, त्याचा स्वार्थ स्वामींच्या धर्माच्या आड यावा. हा विरोध कोणत्या मार्गाने दूर करावा हे कळण्यास दृष्टी शाबूत असावी लागते, पण **वैर अंध** झालेले असते. हे स्वामिधर्म व स्वार्थ यांतील वैर दोघांच्या वैरांतून निर्माण झालेले नसून आम्हा दोघांच्या परस्पर प्रेमातून निर्माण झाले आहे; राम व भरत या दोघांत वैर असते तर हा भरत आज अयोध्येच्या सिंहासनावर बसलेला दिसला असता. आम्हां दोघांत इतके प्रेम आहे की काय करावे याचा विचार आम्हा दोघांनाही करता येत नाही. **प्रेमीं ना बोध हि** याचा हा असा अर्थ आहे. बाह्य चक्षू आंधळे व अन्तश्चक्षू मलीन झालेले अशी आहे माझी दशा ! अशा स्थितीत अमुकच करा हे मी कसे सांगू ? तथापि असे करावे.

**दो. (१) मी परवश** - पराधीन म्हणजे सेवक असल्याने मला स्वतंत्रपणे विचार करण्याचा अधिकार नाही, हे ध्यानात घेऊन आणि आमच्या सर्वांच्या प्रेमाकडे जरा तरी बघून स्वामींची इच्छा, स्वामींचा धर्म, त्यांचे सत्यव्रत यांचे रक्षण होईल व सर्वांचेच हित होईल असे आपण सर्वांच्या संमतीने करावे. **(क)** जनकांनी भरतास दो. २९२ मध्ये जे सांगितले त्यांत स्वतःच्या व सर्व लोकांच्या प्रेमाची आणि स्वतःच्या पराधीनतेची भर घालून भरतानी सर्व जबाबदारी या सभेवर म्हणजे अध्यक्षांवरच टाकली.

*हिं.* ***। भरत बचन सुनि देखि सुभाऊ । सहित समाज सराहत राऊ ॥१॥***
***। सुगम अगम मृदु मंजु कठोरे । अरथु अमित अति आखर थोरे ॥२॥***
***। ज्यों मुखु मुकुर मुकुरु निज पानी । गहि न जाइ अस अद्भुत बानी ॥३॥***

*। भूप भरतु मुनि सहित समाजू । गे जहँ बिबुध कुमुद द्विजराजू ॥४॥*
*। सुनि सुधि सोच बिकल सब लोगा । मनहुँ मीनगन नवजल जोगा ॥५॥*
म. *। श्रवुनि वचन पाहुनी स्वभाव । सह समाज वाखाणिति राव ॥१॥*
*। सुगम अगम मृदु मंजु कठोर हि । अर्थ अमित अति अल्प अक्षर हि ॥२॥*
*। जरि मुख मुकुरिं मुकुर निज पाणीं । घेववे न तशि अद्‌भुत वाणी ॥३॥*
*। भूप भरत मुनि सहित समाजा । गत जिथ विबुध-कुमुद-उडुराजा ॥४॥*
*। लोक शोक विव्हळ हें कळतां । जणूं मीनगण नव जल येतां ॥५॥*

**अर्थ** - (भरताचे) भाषण ऐकून आणि स्वभाव पाहून सर्व समाजासहित राजा जनक (त्या भाषणाची) प्रशंसा करू लागले.॥१॥ सुगम असून अगम्य (अगम), सुंदर मृदु असून कठोर, अर्थ अमित पण अक्षरे अगदी थोडी.॥२॥ जरि मुकुर (आरसा) आपल्या हातात असला व त्या मुकुरांत आपले मुख असले तरी ते घेववत नाही तशी भरताची वाणी (भाषा-भाषण) अद्‌भुत आहे.॥३॥ राजा जनक भरत, वसिष्ठादि, मुनि व सर्व समाज यांच्यासह तिथे गेले जिथे देवरूपी, कुमुदांचे उडुराज (चंद्र, रामचंद्र) आहेत.॥४॥ नवे पाणी आले म्हणजे मीनांचे थवे जसे व्याकुळ होतात तसेच जणू हे (ही बातमी) कळतांच सर्व लोक शोकाने व्याकुळ झाले.॥५॥

**टीका. - चौ. २-३** (१) या दोन चौपायांत भरताच्या भाषणाची अद्‌भुतता हेतु व दृष्टान्त यासह सांगितली. 'सुगम अगम' या चौपाईत हेतु सांगितला; पुढल्या चरणांत दृष्टान्त दिला व नंतरच्या चरणांत 'वाणी अद्‌भुत आहे' हा सिद्धान्त सांगितला; हे भाषण म्हणजे मागला दोहा व त्याच्या पूर्वीची एक चौपाई म्हणजे तीन ओळीच आहेत. **(क)** परस्पर विरोधी धर्मांनी युक्त आहे म्हणून अद्‌भुत-आश्चर्यकारक. **येथे अद्‌भुत रस आहे;** व तो इतका अद्‌भुत आहे की वसिष्ठकौशिकादिमुनि आणि ज्ञानांबुधी विदेही जनकसुद्धा त्या रसाळ भाषणाची प्रशंसा करू लागले पण मति कुंठित झाली. **(ख) मंजु =** मंजुळ, मनोहर हे विशेषण सर्वच भाषणाला लागू आहे; आणि म्हणूनच या अलौकिक सभेचे मन हरण केले. **परस्पर विरोधी धर्मांच्या तीन जोड्या आहेत** - सुगम अगम, मदु कठोर, अर्थअमित अक्षरे अति अल्प. यांचे स्पष्टीकरण दृष्टान्ताच्या साह्यानेच केलेले बरे.

(२) **सुगम अगम** - आरसा अगदी लहान असला तरी त्यांत त्याच्यापेक्षा

पुष्कळ मोठे असलेले सगळे मुख्य, रंगरूप अवयव, अंतरांतील भावना विकास; इत्यादी सर्व अगदी जवळ (आपल्याच एका हातावरच) सहज दिसतात; पण त्या मुखाचे ग्रहण करता येत नाही, हातात घेता येत नाही. तसेच भरताच्या अति अल्प शब्दांत जनकांच्या दो. २९२ मधील भाषणाचे प्रतिबिंब आहे; **पण ते सेवाधर्मरक्षणरूपी कठोर काचेला सर्वांचे प्रेमरूपी पारा** (रसराज) **एका बाजूस लावून** तयार केलेल्या सुंदर आरशांत प्रतिबिंबित झाले असल्याने त्या भाषणाने सर्वांना आनंद झाला; पण जसे मुखाचे आरशांतील प्रतिबिंब हाताने घेणे अशक्य - अगम्य तसेच भरत काय करण्यास सांगतात हे त्यांच्या भाषणावरून कळणे अगम्य झाले आहे. स्वामिधर्म व सेवकस्वार्थ यांतील वैर कायम ठेऊन सेवकधर्माचे संरक्षण करण्यास सांगत आहेत; म्हणजेच रामरुचि, रामधर्म, सत्यव्रत, भरताचे व प्रजेचे प्रेम व भरतांचा सेवकधर्म या परस्पर विरोधी गोष्टी साधल्या पाहिजेत हा शब्दार्थ कळला; **हा अर्थ अगदी सुगम आहे;** पण या गोष्टी साधणे अतिकठीण, फार काय या सर्वांना अशक्यच वाटत आहे. **या कशा साधाव्या हे अगम्य आहे;** मुळीच कळत नाही. **(क)** सर्वांचे हित व येथे जमलेल्या दोन्ही समाजांचे प्रेम राखणे या गोष्टी साधल्या पाहिजेत. ते शब्दांनी कळले; पण सर्वांचे हित म्हणजे देव, धर्म, जग यांचे हित आणि अयोध्यावासी लोकांचे प्रेम यांत विरोध आहे; या दोन गोष्टी कशा साधाव्या हे कळत नाही म्हणून अगम्य आहे. **अर्थ विश्वाला व्यापून आहे म्हणून अमित** आणि अक्षरे सर्वहित व सर्वप्रेम रक्षण, तीनच शब्द ! **हे साधणे कठीण वाटते म्हणून कठोर.** सर्वच भाषण **रामप्रेमरसाने मृदु** झालेले आहे. या प्रमाणे भरताच्या भाषणातील मुख्य तीन गोष्टींतील प्रत्येक गोष्ट इतरांशी विरोधी असल्याने हे तीन विरोध उत्पन्न झाले. भरत जे करा म्हणतात ते काय हे कळत नाही व शब्दार्थाने जे कळते ते करणे अशक्यप्राय, फार कठीण आहे. **(ख) काव्यभाषागुण दृष्टीने मृदु =** माधुर्य, **मंजु =** प्रसाद व **कठोर =** ओज हे तिन्ही काव्यगुण या भाषणांत आहेत. 'स्वामिधर्म नी स्वार्थ विरोध हि । वैर अंध, ना प्रेमीं बोधहिं' यांत **ओज** गुण आहे. उच्चार कानांना कठोर वाटणारे आहेत. 'प्रभुरुचि धर्म व्रत जतन परवश मज जाणून' यांत **प्रसाद** गुण आहे व उत्तरार्धात **माधुर्य** गुण आहे, प्रेमाचा ओलावा आहे.

**चौ. ४ (१) गत जिथ विबुधकुमुद-उडुराजा उडु =** नक्षत्र, त्यांचा राजा = नक्षत्र राजा = चंद्र (द्विजराज्) विबुध = देव; कुमुद = चंद्रविकासी कमळे. **या**

**वाक्याने पुढील दरबारात होणारा निर्णय सुचविला.** पुढील देव व शारदा यांच्या भाषणांत 'विबुध' शब्दच अनेक वेळा वापरलेला दिसेल. **(क) विबुध =** पंडित, ज्ञानी; 'विबुधो ज्ञे सुरे' ज्ञ = ज्ञानी, विद्वान, पंडित (अ. व्या. सु.) 'सज्जन कुमुद' (१।३२ रा) या अर्थाने भाव हा की जनक, वसिष्ठ, भरत इत्यादी सर्व शाहण्या, सुजाण लोकांनासुद्धा प्रसन्न करतील; हेही सुचविले. म्हणजेच जी गोष्ट कठीण, अशक्यवत् वाटत आहे ती तेथे = रामचंद्रांकडे गेल्यावर सहज होणार आहे.

**चौ. ५ (१) लोक शोक विव्हळ हे कळतां** - हे म्हणजे भरतांनी जे आपले मत दिले ते; सर्व लोकांना कळताच दोन्ही राजसमाजातील सर्व लोक शोकाने व्याकुळ झाले. (क) 'जणूं मीनगण नव जल येतां' - २।१५३।६ टीका पहावी.

***जनक - भरत संवाद प्रकरण समाप्त.***

●●●

## 'स्वार्थी सुर हरले घाबरले' प्रकरण (२९४।६ - २९६।१)

हिं. *। देवँ प्रथम कुलगुर गति देखी । निरखि बिदेह सनेह बिसेषी ॥६॥*
*। राम भगतिमय भरतु निहारे । सुर स्वारथी हहरि हियँ हारे ॥७॥*
*। सब कोउ राम पेममय पेखा । भए अलेख सोच बस लेखा ॥८॥*
हिं.दो. *। रामु सनेह सकोच बस कह ससोच सुरराज ॥*
*॥ रचहु प्रपंचहि पंच मिलि नाहिं त भयउ अकाजु ॥२९४॥*
म. *। देव आधिं कुलगुरु-गति पाहतिं । बघुनि विदेहस्नेह अधिक अति ॥६॥*
*। रामभक्तिमय भरत निरखले । स्वार्थी सुर हरले घाबरले ॥७॥*
*। रामप्रेममय चि जन दिसले । लेख शोचवश अलेख बनले ॥८॥*
म.दो. *। स्नेह-भीड-वश रामहि म्हणति खिन्न सुरराज ॥*
*॥ रचा प्रपंचा पंचमतिं झाले न तर अकाज ॥२९४॥*

**अर्थ** - देवांनी प्रथम कुलगुरु वसिष्ठांची (प्रेम) दशा पाहिली; नंतर विदेहांच्या ठिकाणचा अति अधिक स्नेह पाहिला;॥६॥ (नंतर) भरत तर रामभक्तिमयच दिसले; तेव्हा स्वार्थी देव (मनात) हरले व घाबरले (थरकांप सुटला) ॥७॥ पुढे पाहतात तो सगळे लोकच रामप्रेममय दिसले; तेव्हा तर लेख (= देव) अपार-अपरिमित शोक-चिंतातुर झाले.॥८॥ (अलेख = ज्याचा लेख - हिशोब, मोजमाप करता येत नाही असा, असे).॥ तेव्हा देवराज खिन्न होऊन म्हणाले की राम तर स्नेहाला व भिडेला वश होणारे आहेत म्हणून पंचांच्या मताने प्रपंच म्हणजे माया कपट काहीतरी रचा; नाही तर अकार्य झालेच (म्हणून समजा) ॥दो.२९४॥

**टीका. - सूचना** - अध्यक्ष जनक, उपाध्यक्ष वसिष्ठ, सरचिटणीस भरत इत्यादी सर्व कार्यकारी मंडळ व कार्यकारिणीचे सर्व सभासद, सभासद नसलेल्या पण परम मान्य अशा सत्तारहित सर्व सत्ताधारी महापुरुषाकडे पुरुषोत्तमाकडे (धर्मनिष्ठ, सत्यसंध, नीतिप्रीतिरक्षक, शीलगुणसिंधु, निःस्वार्थी, सरळ व परम कृपालु अशांकडे हो !) जाताना पाहिले. कार्यकारिणीत झालेली चर्चा गुप्त ठेवण्याचा प्रयत्नच न केला गेल्याने, ती द्विपदचारी मुखपत्रांनी तत्काळ चारी दिशांस प्रसृत केली. ती कळल्यावर अयोध्या-मिथिला-वासी लोकांवर काय परिणाम झाला तो मागल्या चौपाईत (५) प्रथम सांगितला. देवांना ही बातमी अतारी तारायंत्रांनी मिळतच होती; त्यांच्यावर काय परिणाम झाला व त्यांनी म्हणजे

सत्तासूत्रे हाती नसलेल्या डाव्या गटाने, विरोधी पक्षाने, काय केले हे साहव्या चौपाईपासून सांगतात. **दोन्ही पक्ष शोक-चिंतातुर असे फक्त आताच घडले.**

**चौ. ६-७ (१) कुलगुरुगति - 'स्नेहमिथिल झाले मुनिराया'** (२११।५). **विदेहस्नेह** - २९२।१-५ मध्ये वर्णिलेला पहावा. **रामभक्तिमय भरत** - १८४।४; २०८।८ पहा.

**चौ. ८ (१) रामप्रेममयचि जन दिसले** - प्रथम भरत रामप्रेममूर्ति झाले; नंतर निषादराज रामसखा; व आता तर सर्वच लोक भरतासारखेच रामप्रेममूर्ति बनले हे कवींनी येथे दाखविले. एकट्या भरताच्या प्रेमाला वश होऊन रघुनाथाने प्रतिज्ञा मोडण्याची कबुली दिली व आता तर जनक, वसिष्ठ, भरत व लक्षावधि लोक रामप्रेममय झालेले ! या सर्वांच्या स्नेहाच्या दडपणामुळे राम अयोध्येत परत जाणार असे वाटून देवांचा धीर सुटला; त्यांच्या हृदयांत थरकाप सुटला. (हहरना = थरारणे, कंप सुटणे) **(क) लेख अलेख शोचवश झाले** - त्यांचे लेख हे नाव यथार्थ ठरले. 'आदितेया दिविषदो लेखा - देवाः' (अमरे) 'चित्रायै लिख्यन्ते इति लेखाः' (अ.व्या.सु.) चित्रादिकांत जे रेखाटले, चित्रित केले जातात ते लेख = देव. भाव हा की निर्जीव चित्रांसारखे झाले; पण अलेख शोचवश झाले. कल्पनातीत अपार चिंतेने व्याकुळ झालेल्या देवांची चित्रे जशी दिसली असती तसे दिसू लागले; व याला कारण त्यांचा स्वार्थ !

**दो. - (१) स्नेह भीडवश रामही...सुरराज - 'प्रभु संकोची प्रेमवश प्रेमपयोनिधि भाइ ॥ छल शोधुनि यत्ना करा सर्व साधले जाइ'** (२१७) अशी विनंती सुरराजाने शोकाकुळ होऊन देवगुरुंना केली होती. तेथील भावच येथे आहे. त्या वेळी एकच प्रेमसागर होता; आता तर तीन प्रेममहासागर व लक्षावधि समुद्र आहेत ! हा जसा फरक पडला तसा दुसरा फरक म्हणजे 'सर्व साधले जाईल' असे म्हटले होते; आता म्हणतात, **अकार्य झालेच** म्हणून समजा. लहानशा किरकोळ विषयांतसुद्धा किती सुंदर अन्वय ! **(क) रचा प्रपंचा पंचमति** - पूर्वी देवगुरूंनी एकदा कान उघाडणी केली (२१८-२२०।२ पहा.) व जे सांगितले तेच त्यांनी पुन्हा समजाऊन सांगितले (२४१।७-८ पहा) पुन्हा देव घाबरले व आपसांतच विचार करून भरताचे स्मरण करू लागले. (२६५।१-२६६।४ पहा) तेव्हा सुरगुरुंनी पहिलेच तुणतुणे वाजविले; असे पाहून आता गुरुजींना न विचारताच तातडीने पंचकमिटी नेमली (अशुभस्य कालहरण करण्यासाठी नव्हे) व प्रपंच = कपट,

माया रचना करण्यास सांगितले. **सत्तामदाने स्वपक्षस्वार्थांध बनून सुरराजाने गुरुपदेशाला पायाखाली तुडवला व वटहुकूम काढला.** देव बिचारे काय करणार ! स्वतः काही करवत नाही म्हणून ते मंथरेच्या व कैकयीच्या मतीला करवतणारी, पूर्वी अनुकूल ठरलेली, जी अयोध्येची साडेसाती तिला आता बोलावतात -

हिं. *। सुरन्ह सुमिरि सारदा सराही । देबि देव सरनागत पाही ॥१॥*
*। फेरि भरत मति करि निज माया । पालु बिबुध कुल करि छल छाया ॥२॥*
*। बिबुध बिनय सुनि देबि सयानी । बोली सुर स्वारथ जड़ जानी ॥३॥*
*। मो सन कहहु भरत मति फेरू । लोचन सहस न सूझ सुमेरू ॥४॥*

म. *। स्मरुनी प्रार्थति देव शारदे । देवि ! पाहि ! सुर शरण थार दे ॥१॥*
*। फिरव भरतमति रचुनी माया । पाल विबुधकुल, कर छल-छाया ॥२॥*
*। देवि सुज्ञ सुर-विनंति ऐकुनि । वदे स्वार्थ-जड विबुधां जाणुनि ॥३॥*
*। मला म्हणां किं भरतमति फेरव । नेत्रिं सहस्र न मेरु दिसे तव ॥४॥*

**अर्थ** - देवांनी शारदेचे स्मरण करून प्रार्थना केली की, देवी ! आम्ही सर्व देव तुला शरण आलो आहोत; आमचे रक्षण कर (पाहि !) व आश्रय (थार, थारा) दे.॥१॥ माया रचून भरताची बुद्धी फिरव व कपट (छल) रूपी छाया कर आणि विबुधकुळांचे पालन कर.॥२॥ देवांची (विबुधांची) विनंती ऐकून व विबुध स्वार्थाने जड झाले आहेत हे जाणून सुज्ञ (शहाणी, सयानी) देवी म्हणाली की - ॥३॥ भरताची मति फेरव असे मला म्हणता होय ? हजार नेत्र असून त्यांनी तुम्हाला मेरू (सुमेरू) पर्वत दिसत नाही ?॥४॥

**टीका. चौ. १-२** (१) गुरुमहाराजांकडे जावे तर ते भरतपक्षपाती रामभक्त दिसतात; ते पुन्हा पहिलेच उपदेशाचे तुणतुणे वाजविणार असे वाटून देवांनी शारदादेवीचे स्मरण करून तिचे आवाहन केले. कारण रामवनवास कार्य साधण्यात तिने देवांच्या प्रार्थनेप्रमाणे पूर्वी मदत केली होती. कपटाने भरताची बुद्धि फिरविणे म्हणजेच शोकचिंता संतप्त झालेल्या या लेकरांवर छलछाया करणे ! येथे विबुध = विशेष बुध, विशेष ज्ञानी, विशेष शाहणे !

**चौ. ३-४** (१) **देवि सुज्ञ सुर विनंति ऐकुनि...** या वेळी शारदा शहाणी झाली आहे; याचे कारण इतकेच की **'तैं कृत काहिं रामरुचि बघुनी'** (२१८।३ टी.प.) देवांच्या विनंतीला देवगुरुंचा पाठिंबा आहे हे तिने त्या वेळी जाणले होते; पण या वेळी देवगुरुंचा पाठिंबा नाही व रामाची इच्छा नाही. त्यामुळे

**'हानि अतां कीं कुचाळ करुनी'** हे ती सुज्ञ असल्यामुळे जाणते; शिवाय **'कुशल कवी विनवितील मजसी'** (२।१२।७) हा तिचा स्वार्थ आता अशक्य आहे, हे जाणते. (क) **स्वार्थजड विबुधां जाणुनि** - स्वार्थजड = स्वार्थामुळे मूढ, महामूर्ख, पढतमूर्ख बनलेले. विशेष ज्ञानी, **विशेष बुद्धिमान देव सुद्धा स्वार्थांध झाले म्हणजे पढतमूर्ख बनतात व निंद्य ठरतात !** मग माणसांनी विचार करावा की स्वार्थ आणि ज्ञान, स्वार्थ आणि बुद्धिमत्ता, स्वार्थ आणि लोकसत्ता, स्वार्थ आणि लोककल्याण यांचा योग किती चांगला व कोणाच्या हिताचा ? पूर्वी **'उच्चनिवास नीच कर्तूती । शकति न पाहुं परावि विभूती ॥ विबुध नीचघी'** असे मनांत म्हणून का होईना, पण देवकार्य केले आहे. येथे मात्र देवी चिडली आहे.

**चौ. ४ (१) मला म्हणा किं भरतमति फेरव - फेरव** = फेर (बदल) यांवरून फेरवणे हे नामधातूचे रूप तयार केले. हिंदीतील 'फेरू' हा शब्द क्लिष्ट आहे. फेरना = भेद पाडणे, बदल करणे, उलटापालट करणे हा हिंदी शब्दाचा अर्थ आहे पण संस्कृतात फेरू = जंबुक, कोल्हा असा अर्थ आहे; व हा गूढार्थ येथे फेरू शब्दांत आहे. संस्कृतांत फेरव = कोल्हा. **'सृगाल वंचक क्रोष्टु फेरू-फेरव-जम्बुकाः'** (इत्यमरे) हा श्लेष साधण्यासाठी फेर या नामापासून फेरवणे हा धातु तयार केला. भाव हा की जंबुका ! सिंहाच्या छाव्याची खोडी काढण्याचे धारिष्ट तुला होत नाही म्हणून मला पुढे करू पाहतोस काय ? **(क) नेत्रिं सहस्र न मेरु दिसे तव** - भाव हा की हजार डोळे असून पूर्ण आंधळा झाला आहेस. ज्या मेरु पर्वताच्या गुहात लपून राहता तोसुद्धा दिसत नाही ! देवगुरुंनी पूर्वी असेच म्हटले आहे पण मनात **'गणिति अलोचन सहस्रनयना'** (२१८।१ टी.प.) शारदा पडली बडबडी ! ती कशाला देवेंद्राची भीड बाळगते. **'गिरामुखर...'** (१।२४७।५) **(ख) उपदेश** - स्वार्थांध होऊन हरिभक्तांना छळणाऱ्या लोकांना ते कितीही मोठे, सत्ताधीश, ऐश्वर्यसंपन्न असले तरी सात्विक देवता त्यांना मदत न करता थप्पड मारतात व कामना निष्फळ व प्रार्थना अरण्यरुदन ठरतात.

*हिं । बिधि हरि हर माया बड़ि भारी । सोउ न भरत मति सकइ निहारी ॥५॥*
*। सो मति मोहि कहत करु भोरी । चंदिनि कर कि चंद कर चोरी ॥६॥*
*। भरत हृदयँ सिय राम निबासू । तहँ कि तिमिर जहँ तरनि प्रकासू ॥७॥*
*। अस कहि सारद गइ बिधिलोका । बिबुध बिकल निसि मानहुँ कोका ॥८॥*
*हिं.दो. । सुर स्वारथी मलीन मन कीन्ह कुमंत्र कुठाटु ॥*

*॥ रचि प्रपंच माया प्रबल भयभ्रम अरति उचाटु ॥२९५॥*

हिं. *। करि कुचालि सोचत सुरराजू । भरत हाथ सब काजु अकाजू ॥१॥*

म. *। विधिहरिहर-माया सुप्रबला । भरत-मतिस बघुं शके न अबला ॥५॥*

*। ती मति फिरवा म्हणता मातें । चोरि चंद्रिका कधिं चंद्राते ॥६॥*

*। वसति भरतहृदिं राम नि सीता । तिमिर किं जिथें प्रकाशे सविता ॥७॥*

*। वदुनि शारदा गत विधिलोका । सुरां बिकलता जशि निशिं कोकां ॥८॥*

म.दो. *। स्वार्थी विबुध मलीन मन करिति कुमंत्रकुथाट ॥*

*॥ सृजिति कपट-मायें प्रबल भ्रम-भयार्ति उच्चाट ॥२९५॥*

म. *। करुनि कपट सुरपति चिंता करि । कार्य हानि वा सिद्धि भरत-करिं ॥१॥*

**अर्थ** - ब्रह्मदेव विष्णु व महादेव यांची अति प्रबल माया सुद्धा भरताच्या मतीकडे पाहण्यास असमर्थ (अवला) असल्याने बघू शकत नाही.॥५॥ ती भरताची मति फिरव असे मला म्हणता होय ? चंद्रिकेने (चांदण्याने) कधी चंद्राची चोरी केली आहे काय ? (करू शकेल काय ?) ॥६॥ भरतांच्या हृदयांत राम व सीता यांचा निवास आहे ! जिथे सूर्य प्रकाशत असतो (उगवलेला आहे) तेथे कधी काळोख असतो काय ?॥७॥ असे म्हणून शारदा ब्रह्मलोकास निघून गेली; व रात्री चक्रवाकांना जशी व्याकुळता येते तसे सर्व देव व्याकुळ झाले.॥८॥ (तरीपण) स्वार्थी, मलीन मनाच्या बिबुधांनी (देवांनी) दुर्विचाराने (कुमंत्र) दुष्ट प्रयत्न (कुभाट) केलाच. आपल्या प्रबल कपट मायेने प्रबल (अति) भ्रम, भय, दुःख व उच्चाटन यांची निर्मिती केली.॥ दो.२९५ ॥ असे कपट करून सुरराजा इंद्र चिंता करू लागला की कार्यसिद्धि किंवा कार्यहानि (आता) भरतांच्या हाती आहे ! (काय करावे !).॥१॥

**टीका. - चौ. ५ (१) विधि हरिहर माया... अबला** - राममायासुद्धा रामभक्ताकडे बघण्यास घाबरते. **'सानुकूल भक्तिस रघुराया । म्हणून घाबरे तिज अति माया'** (७।११६।५-७ पहा.) मग रामाचे जे अति अल्प अंश असे त्रिदेव त्यांची माया काय करू शकणार ? भरतमतीला फिरवावयाची आहे; विरंचि मायेला विशेष रचना करावयाची आहे असे मानले तरी आधी भरताच्या रामभक्तिमय मतीला चोरून नेली पाहिजे, तिचा संहार केला पाहिजे; हे कार्य हराचे म्हणजे हरमायेचे; पण ते करण्यास हरमाया असमर्थ आहे; साध्या अबलेसारखी आहे. जिथे संहार नाही तिथे ब्रह्मदेवाची माया, उत्पत्ति करणारी

काय करू शकेल; मग रजोगुणी रागद्वेषांची उत्पत्ति कशी होऊ शकेल ? व उत्पत्तिच नाही तिथे हरी--- विष्णूची माया १४ वर्षे पालन कशाचे करणार ? असा उल्लेख सहेतुक आहे.

**चौ. ६ (१) पाठभेद - चंद कर =** चंद्राची या ऐवजी चंडकर = सूर्य असा पाठ गोरखपूर प्रतीत व मा.पी.मध्ये आहे. पण 'चंद कर' हा पाठभेद मा.पी.मधे दिलेला सापडला व हा फार संयुक्तिक वाटल्याने घेतला आहे. कारण चंद्रिका म्हणजे चंद्रप्रकाश व सूर्य या दोन भिन्न वस्तू असल्याने कदाचित चंद्रिका चंडकराची चोरी करू शकेल असे म्हणता येईल; पण चंद्रिका व चंद्र तत्त्वतः अभिन्न असल्याने चंद्रिकेने चंद्राची चोरी करणे कधीच शक्य नाही. **(क) भरत मति ही चंद्रिका** आहे व रामचंद्ररूपी चंद्र तेथे सतत आहे, असे देवांना सरस्वतीच आता (चौ. ७) बजावीत आहे. भरतमति रामभक्तिमय झालेली आहे. रामभक्ति व राम एकरूप आहेत **'रसः** वै सः' (श्रुति) 'रामभक्ति**रस**' (२०८) म्हणून जी शक्ति, माया रामाची चोरी करू शकेल तीच भरतबुद्धीत भेद उत्पन्न करू शकेल. रामभक्तीला राममाया सुद्धा अति घाबरते **'सानुकूल भक्तिरस रघुराया । म्हणुनि घाबरे तिज अति माया'** (७।११६।५) मग इतरांच्या मायांचा पाड काय ?

**(२) चंडकर =** सूर्य, हा पाठ घेतल्यास दृष्टान्त द्राष्टान्ताकडे वरच्यासारखा लावता येत नाही. हा पाठ नुसती अशक्यता दाखवील पण कारणमीमांसा वरच्यासारखी सांगू शकत नाही. **(क)** शिवाय चोरीची वेळ रात्र असते, रात्रीच चंद्रिकेचे अस्तित्व असते व त्या वेळी सूर्य नसतोच. म्हणजे यांचा संबंधच येऊ शकत नाही; म्हणून **चोरीचा प्रश्नच अनुपपन्न आहे. (क)** येथे चंद्र चंद्रिका या दृष्टान्ताने हे दाखवावयाचे आहे की मंथरा व कैकयी यांची मति जशी रात्री फिरविली तशी **रात्री भरताची मति फिरविता येणार नाही. दिवसा फिरविता येणार नाही याला सूर्याचा दृष्टान्त पुढे आहेच.** सीतेने आपली व रामाची अभिन्नता याच दोन दृष्टान्तांनी सुचविली आहे. (२।९७।५-६ पहा.)

**चौ. ७ - (१) तिमिर किं जिथें प्रकाशे सविता - तिमिर =** मोह ममता, अज्ञान; सूर्य = सविता = ज्ञान. जिथे ज्ञान प्रभाकर राम स्वतः आहेत व प्रभाकराची (सूर्याची) प्रभारूपी सीता जिथे आहे तेथे मोह रागद्वेष इ. अंधार कोण निर्माण करणार ? **'हृदयिं वसति खल नाना तोंवर । लोभ मोह मद मान नि मत्सर ॥ जों हृदयीं न वसति रघुनायक । तूण कटीं धृतकार्मुक सायक'** (५।४७।१-

२) ज्या हृदयांत राम आहेत तेथे कोणताच विकार उत्पन्न होऊ शकत नाही, याविषयी अनेक वचने मानसांत आहेत. **'राम सच्चिदानंद दिनेशीं'** (१|११६|५) यांत राम = सूर्य असे स्पष्टच सांगितले आहे. या दृष्टान्ताने सुचविले की दिवसा भरत मति फिरविता येणार नाही.

**चौ.** ८ (१) 'छल छाया' रूपी चक्रवाकीचा वियोग या विबुध चक्रवाकांना असह्य झाला. अति चिंताग्रस्त झाले. त्यांच्या डोळ्यांपुढे अंधार दिसू लागला ! या अंधारात भरत मतीची चोरी न करता आली तरी इतर जे रामप्रेममय झाले आहेत त्यांच्या मतीची चोरी करण्याचे स्वार्थी सुरांनी ठरविले आहे.

**दोहा. - (१) स्वार्थी विबुध मलीन मन...'** यांनी आपल्या कुबुद्धिने कुविचार = **कुमंत्र** केला; व निंद्य, दुष्ट प्रयत्न = **कुथाट** सुरू केला. आपल्या मायाशक्तीने **उच्चाट** = उच्चाटन करण्याचा प्रयोग केला. त्याने लोकांच्या मनात भ्रम उत्पन्न झाला; त्याचे वर्णन पुढे (३०२) आहे. भय-सिंह व्याघ्रादिकांचे. घर, संपत्ती यांचे काय होईल इ... आर्ति = दुःख कष्ट; उघड्यावर, झाडाखाली, रानांत राहण्याने होणारे. या प्रयोगाचा परिणाम प्रत्यक्ष दिसू लागेल तेव्हा सांगतील. आता जनकादि सर्व मंडळी रघुनाथाकडे जाऊन पोचतील; म्हणून इकडला बंदोबस्त करून सुरराज तिकडल्या भविष्याचा विचार करू लागले.

चौ. १ - (१) करुनि कपट सुरपति चिंता करि - या बाकीच्या लोकांची भीती आता उरली नाही; पण भरतावर आपल्या मायेचा काही परिणाम होणार नाही असे शारदेच्या म्हणण्यावरून वाटते. देवाचे कल्याण अकल्याण आता भरतांच्याच हातात आहे. ते काय म्हणतील कोणास ठाऊक हीच मुख्य चिंता लागली आहे. म्हणून इंद्रही गुप्तरूपाने तिकडेच गेले असतील.

***'स्वार्थी सुर हरले घाबरले' प्रकरण येथे समाप्त.***

●●●

# चित्रकूटचा दुसरा दरबार (२९६।२ - ३०९।८)

हिं. *। गए जनकु रघुनाथ समीपा । सनमाने सब रबिकुल दीपा ॥२॥*
*। समय समाज धरम अबिरोधा । बोले तब रघुबंस पुरोधा ॥३॥*
*। जनक भरत संबाद सुनाई । भरत कहाउति कही सुहाई ॥४॥*
*। तात राम जस आयसु देहू । सो सबु करै मोर मत एहू ॥५॥*
*। सुनि रघुनाथ जोरि जुग पानी । बोले सत्य सरल मृदु बानी ॥६॥*

म. ***। जाति जनक रघुनाथ समीप । त्यां सन्मानिति रविकुलदीप ॥२॥***
***। समय-समाज-धर्म-अविरोधें । कथिलें तैं रघुवंश पुरोधें ॥३॥***
***। जनक-भरत-संवाद निवेदित । सुंदर भरत-भाषणा वर्णित ॥४॥***
***। तात राम जशि आज्ञा होइल । मत माझें किं सर्व तें करतिल ॥५॥***
***। तैं रघुनाथ जोडुनी पाणी । वदले सत्य सरळ मृदु वाणी ॥६॥***

**अर्थ** - जनकराज (सर्व मंडळींसह) रघुनाथासमीप पोचले; तेव्हा रविकुलदीप रामचंद्रांनी त्या सर्वांचा (यथोचित) सन्मान केला.॥२॥ मग रघुवंशाचे पुरोहित (पुरोधा) वसिष्ठांनी प्रसंग, समाज व धर्म यांना विरोधी नसणारे (अनुकूल) असे सांगितले.॥३॥ प्रथम जनक व भरत यांचा संवाद निवेदन केला व भरताच्या सुंदर भाषणाचे वर्णन केले;॥४॥ व म्हणाले की तात राम ! जशी आपली आज्ञा होईल तसे सर्व करतील असे माझे मत आहे.॥५॥ तेव्हा रघुनाथ हात जोडून सत्य, सरळ व मृदु बोलू लागले.॥६॥

**टीका. चौ. २ (१) जाति जनक** - निघताना 'भूप भरत मुनि सहित समाजा' (२९४।४) निघाले. येथे जनकाचाच उल्लेख करून तोच क्रम सुचविला. मुख्य जनकच आहेत. **(क) रघुनाथ** - सुचविले की आता रघुकुल सनाथ केले जाईल. **(ख) रविकुलदीप** - सध्या रविकुल दिवाकर वनांत असल्याने, रविकुल अंधारांत चाचपडत आहे, मार्ग सापडत नाही; हे आवश्यक तेवढा प्रकाश देतील; पण तो दीपाच्या प्रकाशासारखाच उपयोगी पडणार; भाव हा की लोकांचे समाधान होईल पण रात्र असल्याचे भान राहणारच. ३९।७ शी तुलना करा. रविकुलकमल दिवाकराचा उदय अयोध्येत होईल तेव्हाच रात्र संपेल. **(ग) सन्मानिति** - पुढे येऊन, प्रणाम करून घेऊन गेले, समयोचित आसने दिली व पूज्य मंडळी बसल्यावर आपण बसले.

**चौ. ३-४ (१) रघुवंशपुरोधें - पुरोधा =** पुरोहित. गुरु न म्हणता पुरोहित म्हटले; कारण सध्या गुरुत्वाचा अधिकार जनकांकडे सोपविला आहे. पुरोहिताप्रमाणे देशकाल परिस्थित्यनुरूप धर्माचे रहस्य सुचवितील; अमुकच करा असे सांगणार नाहीत; दोन्ही समाजांची स्थिति पाहून त्यांच्या विरुद्ध नाही व धर्मविरोधी नाही असे बोलले. **(क) जनकभरत संवाद** निवेदन केला. त्यांत प्रथम जनकांनी भाषण केले ते व नंतर भरताचे भाषणही सांगितले व त्या भाषणाची जी प्रशंसा सर्वांनी केली ती ही सांगितली. (२९२।७ पासून २९४।३).

**चौ. ५ (१) राम ! जशि आज्ञा होइल - मत माझें -** स्वतःचे जनकाचे व भरतांचे मत त्यांच्या संवादावरून स्पष्टपणे कळण्यासारखे आहे; पण त्यांत वसिष्ठांचे मत नाही ते येथे सांगितले. माझे मत आहे की आपली आज्ञा होईल त्याप्रमाणे करण्यास सर्वच कबूल आहेत. जनक व भरत यांचा नात्याचा संबंध असल्याने वसिष्ठांनी सर्वांच्यावतीनेही सांगितलेच; कारण की हेच सर्वांचे मत आहे.

*हिं.* ***। बिद्यमान आपुनि मिथिलेसू । मोर कहब सब भाँति भदेसू ॥७॥***
***। राउर राय रजायसु होई । राउरि सपथ सही सिर सोई ॥८॥***

*हिं.दो.* ***। राम सपथ सुनि मुनि जनकु सकुचे सभा समेत ॥***
***॥ सकल बिलोकत भरत मुखु बनइ न ऊतरु देत ॥२९६॥***

*म.* ***। तुम्हिं मिथिलापति असुनि उपस्थित । मी सांगणे सर्वपरिं अनुचित ॥७॥***
***। आपण राजे आज्ञा देती । शपथ आपली सत्य शिरीं ती ॥८॥***

*म.दो.* ***। श्रवुनि शपथ ही मुनि जनक लज्जित सभेसमेत ॥***
***॥ सकल विलोकिति भरत मुख उत्तर देउं न येत ॥२९६॥***

**अर्थ -** आपण (गुरु) व मिथिलापति येथे हजर असता मी सांगणे (आज्ञा देणे) सर्व प्रकारे अयोग्य आहे.।।७।। आपण व राजा मिथिलापति जी आज्ञा द्याल ती, आपली शपथ घेऊन सत्य सांगतो की मी शिरावर धरीन (ती शिरोधार्य) ।।८।। ही रामचंद्रांनी घेतलेली शपथ ऐकून मुनि वसिष्ठ व राजा जनक सभेसहित लज्जित (संकोचित) झाले. काही उत्तर देता येत नाही व सर्व भरताच्या तोंडाकडे बघत राहिले. ।।दो.२९६।।

**टीका. चौ. ७-८ (१) मी सांगणें सर्व परिं अनुचित -** वसिष्ठ म्हणाले की **'जशि आज्ञा होइल...'** गुरुने शिष्याला असे जरि सांगितले तरी शिष्याने गुरुला आज्ञा देणे अनुचित; जावयाने सासऱ्याला आज्ञा देणे अनुचित. रामचंद्रांनी वसिष्ठांच्या

आग्रहाने व भरतभक्तिवश होऊन आधीच सांगून टाकले आहे की भरत सांगतील ते मी आज करतो; त्यामुळे आता या बाबतीत आज्ञा देण्याचा किंवा आपले मत सांगण्याचा त्यांस तो खरोखरच अधिकार राहिला नाही म्हणून या बाबतीत काही सांगणे अनुचितच. **(क) शपथ आपली, सत्य, शिरीं ती** - अयोध्येत परत चला असे सांगितले तर राम मान्य करतील की नाही अशी शंका राहू नये हे शपथ घेण्याचे एक कारण आहे. आधीच भरतांस वचन दिले असून ही सर्व जबाबदार मंडळी पुनः पुन्हा तेच तेच सांगत आहेत, पण काही सांगण्याचा अधिकार स्वतःकडे राहिलेला नाही व मुख्य प्रश्नाचा निर्णय होत नाही आणि व्यर्थ कालक्षेप मात्र होतो आहे असे पाहून, कोंडी फोडण्यासाठी शपथ घेतली.

**दो. (१) लज्जित सभे समेत** - अत्यंत संकोच वाटला की शपथ घेण्याची पाळी - प्रभूंवर आपण आणली ! शिवाय अयोध्येत चला असेही सांगता येत नाही व आम्ही सर्व परत जातो आहे असे सांगावे तर भरताचे प्राण निघून जातील की काय ही भीति; असा दोन्हीकडून संकोच वाटू लागला; उत्तर देणे अशक्य झाले; व दीन असहाय बनून भरताच्या तोंडाकडे बघत राहिले, वसिष्ठ जनक व सर्व सभासद ! सर्वांची बुद्धि कुंठित झाली. धर्म त्याग करा असे सांगण्याचा धीर कोणास होत नाही व भरताच्या प्रेमामुळे त्यांचे काय होईल ही भीती आहे; यामुळे ही कोंडी उत्पन्न झाली आहे. ज्यांच्या निमित्ताने ही कोंडी उत्पन्न झाली आहे त्यांनीच ती फोडणे योग्य असल्याने भरताच्या तोंडाकडे पाहण्याशिवाय उपायच नव्हता. **धर्मनिष्ठा व अलौकिक रामप्रेम यांच्यांत हा सामना आहे.**

*हिं. । सभा सकुच बस भरत निहारी । रामबंधु धरि धीरजु भारी ॥१॥*
*। कुसमउ देखि सनेहु सँभारा । बढ़त बिंधि जिमि घटज निवारा ॥२॥*
*। सोक कनकलोचन मति छोनी । हरी बिमल गुन गन जगजोनी ॥३॥*
*। भरत बिबेक बराहँ बिसाला । अनायास उधरी तेहि काला ॥४॥*

*म. । सभा संकुचित दिसतां सारी । रामबंधु धीर धीरा भारी ॥१॥*
*। कुसमय बघुनी स्नेह सांवरी । विंध्यवृद्धी जशि घटज आवरी ॥२॥*
*। शोक कनकलोचन, धी क्षोणी - । हरी; विमल गुणगण जगयोनी - ॥३॥*
*। भरत विवेक वराह विशाळहि । अनायास उद्धरि तात्काळहि ॥४॥*

**शब्दार्थ** - घटज - अगस्ति ऋषि, कनकलोचन - हिरण्याक्ष; धी-बुद्धि; क्षोणी (छोनी) पृथ्वी; जगयोनी - ब्रह्मदेव, वराह - वराहावतार; अनायास - श्रम न पडतां, सहज.

**अर्थ** - सर्व सभा खजील झालेली दिसतांच रामबंधु भारी धीर धरता झाला.।।१।। अगस्ति ऋषिंनी विंध्य पर्वताची वाढ जशी आवरली (कमी करून जास्त होऊ दिली नाही) त्या प्रमाणे अडचणीची वेळ आहे हे जाणून भरतानी आपला स्नेह सावरला (दाबून टाकला व वाढू दिला नाही). ।।२।। (सर्व लोकांचा) शोकरूपी हिरण्याक्ष (जनकादि सर्वांच्या) बुद्धिरूपी पृथ्वीला चोरून नेता झाला; तेव्हा निर्मल गुणसमूहांनीयुक्त भरतरूपी ब्रह्मदेवापासून (भरताचा-) विवेकरूपी विशाल वराहावतार झाला व त्याने तत्काळ, काही आयास न पडता (त्या बुद्धिरूपी पृथ्वीचा उद्धार केला.।।३+४।।

**टीका. चौ. १ (१) राम बंधु -** रामाचाच धाकटा भाऊ ! ज्यांनी अयोध्येसारख्या राज्याचा व साम्राज्याचा व प्रिय मातापितादिकांचा सहज त्याग केला पण धीर सुटला नाही त्यांचाच भाऊ !

धीरधुरंधर बनला; हे करणे बरेच कठीण गेले म्हणून 'भारी' शब्द वापरला. कसा धरला धीर पहा -

**चौ. २ (१) कुसमय बघुनी स्नेह सांवरी - कुसमय** - बिकट प्रसंग; काय करावे याचा निर्णय होत नाही; प्रभूंनी शपथ घेतली आहे; सर्व सभेची बुद्धि किंकर्तव्य मूढ, कुंठित झाली आहे; लोक वनवासांत असलेले पाहून स्वामींस कष्ट होत आहेत, असा बिकट प्रसंग आहे; व हे सर्व स्वतःमुळे, स्वतःच्या स्नेहातिशयामुळेच हे भरतांनी जाणले; व तो स्नेहच दाबून टाकला, कमी केला. तो इतका वाढला होता की जनक, वसिष्ठांसारख्यांची बुद्धि कुंठित झाली. तो कसा कमी केला याला दृष्टान्त देतात - **(क) विंध्यवृद्धि जशि घटज आवरी -** विंध्यपर्वत कुंभज ऋषींचा शिष्य. तो खूप उंच वाढू लागला व इतका वाढला की जगात हाहाकार होण्याची वेळ आली. हे संकट दूर करण्याची कामगिरी कुंभज (घटज) ऋषींवर सोपविली गेली. ते काशींत होते. विश्वेश्वरांचा निरोप घेऊन ते दक्षिणेकडे चालले. ते विंध्य पर्वताला दिसताच त्याने गुरूंना साष्टांग नमस्कार घातला; सपाट पडला व गुरूंना मार्ग दिला. तेव्हा अगस्त्यांनी सांगितले की मी परत येईपर्यंत असाच पडून रहा. अगस्ति पुन्हा परत आले नाहीत व विंध्य पुन्हा उठला नाही. यावरूनच कुंभजांस अगस्त्य नाव पडले.

(२) भरतांचा स्नेह इतका वाढला की त्यामुळे देव चिंतेत पडले; रामचंद्रांना बोलण्यास व करण्यास मार्ग उरला नाही. जनक वसिष्ठांसारख्यांना खजील व्हावे

लागले तेव्हा भरतरूपी कुंभजांनी त्या स्नेहाला रघुनाथापुढे सपाट करून टाकला. जो फार उंच वाढला होता तो फार दूरवर पसरला; व राम वनवासातून येईपर्यंत त्याने कोणाचा मार्ग अडविण्याइतके वाढू नये असा बंदोबस्त करून टाकला. सार हे की भरत आता या प्रसंगांतून मार्ग मोकळा करून देणार; व सर्वांची भीती दूर करणार.

**चौ. ३-४ (१) या दोन चौपायांत वराहावताराचे रूपक आहे.** हिरण्याक्षाने पृथ्वीला पळवून सागरात बुडविली. त्याचा वध करण्यासाठी व पृथ्वीचा उद्धार करण्यासाठी वराहावतार झाला. ब्रह्मदेवाच्या (जगयोनीच्या) नाकांतून एक लहानसे वराहाचे पिलू बाहेर पडले व वाढत वाढत फार विशाल झाले, तोच वराहावतार भगवंतांनी घेतला. त्यांनी पृथ्वीला आपल्या दाढांवर धरून बाहेर काढून यथापूर्व ठेवली. म्हणजेच पृथ्वीचा उद्धार केला; व हिरण्याक्षाचा वध केला. तसेच येथे घडले; ते कोष्टकरूपाने पुढे दाखविले आहे. **जगयोनी** = जगाचे जन्मस्थान, म्हणजे जगाची उत्पत्ति करणारे **ब्रह्मदेव.**

## वराहावतार - हिरण्याक्षवध रूपक

| हिरण्याक्षादि | क्रम | शोक आदि |
|---|---|---|
| हिरण्याक्ष (कनकलोचन). | १ | सभेचा शोक. |
| क्षोणी - पृथ्वी. | २ | सभेची कुंठित झालेली बुद्धि. |
| हिरण्याक्षाने पृथ्वी पळविली. | ३ | शोकाने बुद्धीला पळविली. |
| पृथ्वी समुद्रांत लपविली. | ४ | किंकर्तव्य मूढता, हाच समुद्र. |
| ब्रह्मदेव (जगयोनि). | ५ | भरत. |
| ब्रह्मदेवापासून वराहावतार. | ६ | भरत-विवेक. |
| पृथ्वीला पूर्व स्थानी आणून ठेवली. | ७ | सर्वांची बुद्धि ठिकाणावर आली, (आणली). |
| हिरण्याक्षाचा वध केला. | ८ | शोकाचा विनाश केला. |
| दाढेने पृथ्वीचा उद्धार. | ९ | विवेकयुक्त वाणीने बुद्धीचा उद्धार. |
| वराहरूपी भगवंतांस फार श्रम पडले. | १० | विवेक वराहाला श्रम मुळीच नाहीत. |
| सर्व देवादिक प्रसन्न, निर्भय झाले. | ११ | सर्व लोक व देव प्रसन्न होतील. |

| | | |
|---|---|---|
| देवांनी पुष्पवष्टी व स्तुति केली. | १२ | देवांनी पुष्पवृष्टी व स्तुति केली. ३०१ छंद जनकादि सर्व सभेने प्रशंसा केली. (३०८) पहा. |

आता भरत जे भाषण करणार आहेत त्याचा परिणाम काय होणार हे या रूपकाने सुचविले. सर्वांचा शोक, चिंता, भय इ. नष्ट होऊन सर्वांना आनंद होईल हे सुचविले आहे.

*हिं.* *। करि प्रनामु सब कहँ कर जोरे । रामु राउ गुर साधु निहोरे ॥५॥*
*। छमब आजु अति अनुचित मोरा । कहउँ बदन मृदु बचन कठोरा ॥६॥*
*। हियँ सुमिरि सारदा सुहाई । मानस तें मुख पंकज आई ॥७॥*
*। बिमल बिबेक धरम नय साली । भरत भारती मंजु मराली ॥८॥*

*हिं.दो.* *। निरखि बिबेक बिलोचनन्हि सिथिल सनेहँ समाजु ॥*
*॥ करि प्रनामु बोले भरतु सुमिरि सीय रघुराजु ॥२९७॥*

*म.* *। सर्वांना प्रणमुनि कर जोडिति । राम राव गुरु साधुंस विनविति ॥५॥*
*। क्षमा आज मम अनुचित करणें । वदत कठोर वचन मृदु वदनें ॥६॥*
*। रुचिर शारदे, हृदयीं स्मरली । ये मानसांतुनी मुख-कमलीं ॥७॥*
*। विमल विवेक - धर्म - नय - शाली । भरत - भारती मंजु मराली ॥८॥*

*म.दो.* *। बघुनि विवेक - विलोचनीं स्नेहें शिथिल समाज ॥*
*॥ करुनि नमन वदले भरत स्मरुनि सिता रघुराज ॥२९७॥*

**अर्थ** - सर्वांना प्रणाम करून हात जोडले आणि राम, राजाजनक, गुरु वसिष्ठ व कौशिकादि सर्व साधू यांना प्रार्थना करतात की - ॥५॥ मी कोवळ्या मुखाने भाषण करीत आहे; हे माझे अयोग्य करणे (धृष्टता) आपण आज क्षमा करावे.॥६॥ (असे म्हणून) रुचिर (सुंदर) शारदेचे हृदयांत स्मरण केले; तेव्हा ती (नाभिरूपी) मानससरोवरांतून मुखकमळांत आली.॥७॥ विमल ज्ञान (विवेक) धर्म व नीती यांनी विभूषित ही भरताची मंजुल भारती (वाणी) मंजुल मराली (हंसी) आहे.॥८॥ विवेक रूपी नेत्रांनी पाहिले तो सर्व समाज स्नेहाने शिथिल झालेला दिसला; तेव्हा सीता व रघुराज यांचे स्मरण करून नमस्कार करून भरत म्हणतात.॥२९७॥

**टीका. - चौ. ५-६ (१) प्रार्थना विनंती** - काय केली ती चौ. ६ मध्ये आहे. **(क) वदत कठोर वचन मृदु वचनें** - वय लहान-कोवळे आहे व अधिकारही

शिशूचा आहे; **'शिशु सेवक आज्ञा-अनुगामी'** (२९३।४) असे भरत म्हणालेच आहेत; म्हणून कोमल मुख म्हटले. मोठ मोठी माणसे काही उत्तर देत नाहीत व १७।१८ वर्षांच्या मुलाने अशा अलौकिक सभेत बोलण्यास उठणे ही धृष्टता आहे म्हणून क्षमा मागितली. **कठोर** - सुचविले की माझे बोलणे ऐकून कदाचित कोणाला दुःख होईल; पण आज प्रसंगच असा बिकट आहे की मला जे वाटते ते बोलून दाखविणे जरूर आहे; म्हणून आजचा दिवस क्षमा करावी.

**चौ. ७ - (१) रुचिर शारदे** - ब्रह्मलोकांत राहणारी शारदा, सरस्वती देवी ही नव्हे. ही रामप्रेमात रंगलेली, परम शुद्ध, निःस्वार्थ अशी शारदा आहे म्हणून हिला रुचिर म्हटले. **(क) ये मानसांतुनी** - मानस सरोवरांत राहणारी ही आहे. येथे हंसिनी ध्वनित केली. **ही शारदा म्हणजे परा वाणी - 'नाभिस्थानी परावाचा'** (दा.बो.) ही गुणातीत परम निर्मळ आहे. नाभीला मानसांतच सर - सरोवर म्हटले आहे. 'सायक एक **नाभिसर** शोषी' (६।१३।१) परा वाणीच वरवर येत मुखांत आली म्हणजे वैखरी होते. पण ती अशी वर येत असता फार थोड्यांस कळते. ती शारदा श्वेतकमलांत वसते तशी ही भरतांच्या मुखकमलांत विराजमान झाली.

**चौ. ८ - (१) विमल विवेक - धर्म - नय - शाली - मराली** - विमल विवेक = विमल ज्ञान, न विमल धर्म, विमलनीति यांच्याप्रमाणे चालणारी. शल-चालते, शाली - चलन करणारी, चालणारी, वागणारी. अज्ञान अधर्म; अनीति यांचा आश्रय कधीं न करणारी, अशी ही - **भरतभारती.** भरतांची वैखरी वाणी आहे. ब्रह्मलोकांत राहणारी शारदा **'दुःसह दुःखद जणूं ग्रहदशा'** (२।१२।८) आहे. रामवनवासाचे कारण तीच बनली; तिला 'विमल विवेक धर्मनय शाली' कशी म्हणता येईल ? **(क) मंजु मराली - सुंदर हंसी, हंसिनी. 'भरत हंस रविवंशतडागा। जन्मुनि कृत गुण दोष विभागां ॥ पय गुण घे त्यजि अवगुण वारी । स्वयशें कृतजग भास्वर भारी ॥'** (२३२।६-७) असे रामच म्हणाले आहेत. असे हंस भरत आहेत; मग त्यांची वाणी सुंदर हंसिनी नसेल तरच नवल. ही हंसिनी खाते काय, राहते कुठे हे तर पहा - **'यश तुमचें मानस विमल हंसिनि जिव्हा ज्याचि ॥ मुक्ताफळ गुणगण टिपी राम रहा हृदिं त्याचि'** (२।१२८) ही वैखरी वाणी सुचविले की भरत आता आपल्या वैखरीने रामगुणगण वर्णन करतील.

**दो. (१) बघुनि विवेक विलोचनीं** - हा विवेकविलोचन सुद्धा विमल आहे; कारण गुरुचरणांना नमन केले आहे - (चौ. ५). **'तत्कृत विमल विवेक विलोचन**

**वर्णिन रामचरित भवमोचन'** (१।२।२) विमल विवेक = विमल ज्ञान. स्नेह शिथिलता चर्मचक्षूंनीसुद्धा दिसते; पण यांनी विमल विवेक चक्षूने पाहिली. भाव हा की सर्व सभा रामाचे ऐश्वर्य विसरून गेली आहे व शपथ घेणे वगैरे कारणांनी केवळ माधुर्य भावाने स्नेह शिथिल झाली आहे, हे जाणले. म्हणून आता ही मंजु मराली बोलू लागणार. (क) **रघुराज** शब्दाने सुचविले की भरत आता रामचंद्रांचे रघुराजत्व जाहीर करून सांगणार.

*हिं.* ***। प्रभु पितु मातु सुहृद गुर स्वामी । पूज्य परम हित अंतरजामी ॥१॥***
***। सरल सुसाहिबु सील निधानू । प्रनत पाल सर्बग्य सुजानू ॥२॥***
***। सुसमरथ सरनागत हितकारी । गुनगाहकु अवगुन अघ हारी ॥३॥***
***। स्वामि गोसाँ इहि सरिस गोसाई । मोहि समान मैं साइँ दोहाई ॥४॥***

*म.* ***। प्रभु पितरौ गुरु सुहृद स्वामी । पूज्य परम हित अंतर्यामी ॥१॥***
***। सरल सुसाहिब शीलनिधान हि । प्रणतपाल सर्वज्ञ सुजाण हि ॥२॥***
***। सुसमर्थहि शरणागत-हितकर । गुणग्राहि सब अवगुण-अघ-हर ॥३॥***
***। अपणांसम आपण सुस्वामी । स्वामी द्रोहि जगीं मजसा मी ॥४॥***

**अर्थ** - प्रभु ! आपण माझे आई, बाप, (पितरौ) सहृद (मित्र) व स्वामी आहांत; परम पूज्य, परम हितकर्ते व अंतर्यामी आहेत.॥१॥ सरल, उत्तम धनी, असून शीलनिधान आहांत; सर्वज्ञ, सुजाण असून प्रणतपालक आहांत.॥२॥ फार समर्थ असून शरणागताचे हित करणारे आहात; व गुणग्राहक असून सर्व दोष निवारक व सर्व पापसंहारक आहात.॥३॥ महाराज ! आपल्यासारखे उत्तम स्वामी जगात आपणच व माझ्या सारखा स्वामीद्रोही मीच.॥४॥.

**टीका. चौ. १-३** (१) या तीन चौपायांत वीस विशेषणांनी प्रभूचे वर्णन केले आहे; व चौथ्या चौपाईत अनन्वय अलंकाराने दोघांच्या मधील महदंतर दाखवून स्वतःचे अत्यंत दैन्य सुचविले आहे. (क) **प्रभु पितरौ...स्वामी - प्रभु** = परमात्मा, भगवान असा अर्थ घेणे जरूर आहे; कारण पुढे स्वामी, सुसमर्थ, हे प्रभु शब्दाचे दोन अर्थ निराळे आहेतच. बाकीच्या चार विशेषणांनी सुचविले की जगांतील सर्व नाती तुमच्याच पायाशी आहेत; व त्यांतील प्रत्येक नात्याचा अधिकार आज्ञा व उपदेश देण्याचा आहे. सुचविले की उपदेश करून आज्ञा द्यावी. सहांचे वर्णन येथे केले आहे. (ख) **पूज्य परम हित अंतर्यामी** - आपण अंतर्यामी असल्याने माझ्या हृदयांतील सर्व जाणता; आपण जगत्पूज्य व सर्वांचे हितकर्ते आहांत; पण मला

परम पूज्य व माझे परम हितकर्ते आहांत; हे मी जाणतो.

(२) **सुसाहिब =** उत्तम सेव्य; सेवा करण्यास योग्य; कारण सरळ, शीलनिधान सर्वज्ञ, सुजाण व प्रणतहितकर्ते आहांत. इतके सर्व गुण कोणाही सेव्याच्या ठिकाणी सापडणार नाहीत. **प्रणत = दीन** असा अर्थ करणे जरूर आहे; कारण शरणागतहितकर हा शब्द पुढे आहेच. ताटिकेला मारल्यावर दीन जाणून निजपद दिले आहे. (१।२०९।६ पहा.)

**चौ. ३ (१) सुसमर्थहि शरणागत हितकर** - शरण्याच्या ठिकाणी वरचे पंधरा गुण असले व तो कर्तुमकर्तु अन्यथा कर्तु समर्थ नसेल व यापुढील चार गुण नसतील तर तो शरणागताचे - सेवकाचे सर्व बाजूंनी कल्याण करू शकणार नाही; म्हणून हे पांच गुण अत्यंत आवश्यक पण अति दुर्लभ शेवटी सांगितले. भाव हा की या अडचणींतून मार्ग काढण्यास समर्थ कोणी नाही; म्हणून आम्ही सर्व आपणांस शरण आलो असता आपण माधुर्यभावात शिरून सर्व भार आमच्यावरच टाकता ! आम्हा जीवांची शक्ती ती किती ? तरी शरणागतांचे हित होईल असा मार्ग सुचविणे आपणांसच शक्य आहे. आपण शरणागतांचे, सेवकांचे, दीनांचे गुण तेवढे पाहता (गुणग्राही), त्यांच्या दोषांकडे व पापांकडे बघत नाही; कारण सर्व दोष व पापे यांचा संहार इच्छामात्रे करण्याचे सामर्थ्य आपणांपाशीच आहे.

**चौ. ४ - (१)** अशा प्रकारचा उत्तम स्वामी आपल्या सारखा दुसरा ब्रह्मांडांत नाही. आपल्यासारखे स्वामी आपणच ! मात्र आपल्या सारख्या स्वामींना शोभणारा सेवक मी मुळीच नाही. मी स्वामीद्रोही आहे आणि माझ्यासारखा स्वामीद्रोही दुसरा कोणी नसल्याने माझ्यासारखा स्वामी द्रोही मीच. येथे दोहाई = शपथ हा अर्थ संयुक्तिक नाही. कारण की येथे स्वामींची परमोच्च अलौकिक श्रेष्ठता व सेवकाची परम नीचता असा विरोध अनन्वय अलंकाराने साधावयाचा आहे. ही परमनीचता, स्वामीद्रोह = स्वामी विरोध कसा केला हेच आता स्पष्ट करून दाखवितात.

*हिं.* ***। प्रभु पितु बचन मोह बस पेली । आयउँ इहाँ समाजु सकेली ।।५।।***
***। जग भल पोच उँच अरु नीचू । अमिअ अमरपद माहुर मीचू ।।६।।***
***। राम रजाइ मेट मन माहीं । देखा सुना कतहुँ कोउ नाहीं ।।७।।***
***। सो मैं सब बिधि कीन्हि ढिठाई । प्रभु मानी सनेहँ सेवकाई ।।८।।***

*हिं.दो.* ***। कृपाँ भलाई आपनी नाथ कीन्ह भल मोर ।।***
***।। दूषन भे भूषन सरिस सुजसु चारु चहु ओर ।।२९८।।***

म. *। प्रभु - पितृ - वचना मोहें लंघुनि । आलो इथें समाजा सजवुनि ॥५॥*
*। जगिं सज्जन खल उच्च नीचही । अमृत अमरपद गरल मृत्य ही ॥६॥*
*। रामाज्ञा मोडील मनां ही । दर्शनिं कानिं कुठें कधिं नाहीं ॥७॥*
*। कृता धृष्टता ती मी देवा । स्नेहें प्रभु मानिती सुसेवा ॥८॥*

म.दो. *। नाथ कृपें नि भलाइनें केलें मम हित फार ॥*
*॥ भूषणसम दूषण सकल सुयश चारु दिशिं चार ॥२९८॥*

**अर्थ** - प्रभूचे व पित्याचे वचन मोहाने उल्लंघन करून मी सर्व समाजाला (सैन्य इ.) सजवून येथे आलो.॥५॥ जगात सुष्ट-दुष्ट, उच्च-नीच, अमृत-अमरपद, विष-मृत्यु, इत्यादि कोणी मनाने सुद्धा रामाज्ञा मोडील-मोडू शकेल असे (कोणाच्या) पाहण्यात किंवा ऐकण्यात कधी कुठेही नाही.॥६-७॥ पण देवा ती धृष्टता मी केली परंतु स्वामींनी स्नेहामुळे तिला उत्तम सेवा म्हणून मानली.॥८॥ नाथ ! आपल्या कृपेने व चांगुलपणाने माझे फारच हित केले; सर्व दूषणे भूषणासारखी झाली व सुंदर निर्मल (चारु) यश चारी दिशांस पसरले.॥ दो. २९८ ॥

**टीका. चौ. ५ (१) प्रभु पितृ-वचना मोहें लंघुनि आलो - (क)** सुमंत्राच्या बरोबर प्रभूंनी पाठविलेला निरोप कोणी भरतांस सांगितला नाही. अयोध्येतील दरबारांत तो निरोप सांगणे अत्यंत महत्त्वाचे व आवश्यक होते तरी तेव्हाही कोणी सांगितला नाही. मग भरताला प्रभुवचन कसे कळले ? **'अथ पासुनि इति आपली करणी । कुटिल कटोर मुदित मन वर्णी'** (१६०।८) याप्रमाणे कैकयीने सर्व सांगितले त्यांत वनगमनापूर्वीचे **'राज्य मिळे प्राणप्रिय भरता । विधि अनुकूल आज मज पुरता'** (४२।१) हे रामवचन तिने सांगितले असणारच; त्यामुळे भरतांस वाटत आहे की प्रभुवचन भंग केला; पण त्यांनी तसा वचन भंग, दोष केला नाही. हे **'भलें फार कृत भरत हें -'** (दो. २१७) या भरद्वाज वचनाने सिद्ध आहे. **(ख)** पितृवचन पाळण्याबद्दलची सूचना मात्र अयोध्येतील दरबारात वसिष्ठादिकांनी अनेक वेळा दिली होती. भरतांस आत्मग्लानीने वाटत आहे की स्वामिवचन भंगाने स्वामिविरोध व पितृवचन भंगाने पितृविरोध केला. सैन्य व अभिषेकाची तयारी सज्ज करून आलो, हे स्वामींनी केलेल्या प्रतिज्ञेच्या विरुद्धच केले व यांतही स्वामिविरोध घडला असे भरतांस वाटत आहे.

**चौ. ६-७ (१) जगिं सज्जन खल...** २५४।६-८ ची टीका पहावी. येथील सिद्धान्तच वसिष्ठांनी सांगितला आहे. 'रामाज्ञाच शिरीं सर्वांसी'.

**चौ. ८ - (१) कृता धृष्टता ती मी देवा** - रामाज्ञेचे उल्लंघन कोणीच ब्रह्मदेवादिसुद्धा करू शकत नाहीत; फार काय कोणी रामेच्छासुद्धा उल्लंघन करू शकत नाहीत हा निरपवाद सिद्धान्त मानसांतच आहे. **'राम करूं इच्छिति तें घडतें । कोणि नसे जो करी उलटतें'** (१।१२८।१) असे असता भरत म्हणतात की मी रामाज्ञा मोडली; हे केवळ त्यांच्या दीनतेचे, आत्मग्लानीचे व सेवाभावाचे प्रतीक आहे. **'चुकुनिहि भरत न टाळिती मनें हि रामाज्ञेस'** (२८९) असे जनक म्हणाले आहेत. भरताची भेट व्हावी अशी तीव्रतम इच्छा रामाचीच होती व त्यांस भरतभेटीची तळमळ लागली होती म्हणूनच भरतांस चित्रकूटास येण्याची इच्छा झाली हे पूर्वी टीकेत अनेक वेळा दाखविले आहे. (२।७।६-८ पहा). **(क) स्नेहें प्रभु मानिति सुसेवा** - आज्ञाभंग दोषाला प्रभूंनी माझ्यावरील स्नेहामुळे उत्तम सेवा असे मानले. 'आपणांसम आपण सुस्वामी' याची यथार्थता येथे दाखविली व आज्ञाभंग, पित्राज्ञाभंग, सेवकधर्मभंग केला असे दाखवून 'स्वामीद्रोहि जगीं मजसा मी' या वचनाची यथार्थता दाखविली.

**दो. (१) नाथ कृपें नि भलाइनें केलें मम हित फार** - या दोह्यांत दाखविले की कोणाही जीवाचे कल्याण होते, कीर्ति होते, ते सर्व रामकृपा व रामाच्या चांगुलपणामुळेच होते. सेवकाच्या दोषांकडे न पाहता आपल्या ब्रीदाकडे पाहण्याच्या प्रभूच्या स्वभावामुळेच होते; कोणाच्या स्वतःच्या प्रतापाने व भलेपणामुळे होत नाही. येथे सेवकाने प्रभूंच्या उपकारांविषयी पराकाष्ठेची कृतज्ञता व आपली परम दीनता दाखविली आहे; **असे असेल तेथेच रामकृपा होते. 'राम भलेपण आपले असे भलें सकलांस ॥ सदा सत्य जर वाक्य हें भलें - तुलसीदासास'** (१।२९ म.) हेच भरतांनी येथे सांगितले. वि. प. पद २५२ 'राम भलाई आपनी' पहा.

*हिं.* *। राउरि रीति सुबानि बड़ाई । जगत बिदित निगमागम गाई ॥१॥*
*। क्रूर कुटिल खल कुमति कलंकी । नीच निसील निरीस निसंकी ॥२॥*
*। तेउ सुनि सरन सामुहें आए । सकृत प्रनाम किहें अपनाए ॥३॥*
*। देखि दोष कबहुँ न उर आने । सुनि गुन साधु समाज बखाने ॥४॥*
*। को साहिब सेवकहि नेवाजी । आपु समाज साज सब साजी ॥५॥*
*। निज करतूति न समुझिअ सपनें । सेवक सकुच सोचु उर अपनें ॥६॥*
*। सो गोसाइँ नहिं दूसर कोपी । भुजा उठाइ कहउँ पन रोपी ॥७॥*

*म.* *। अपली रीति सुबाणा महती । जगत-विदित निगमागम वदती ॥१॥*

*। क्रूर कुटिल खल कुमति कलंकी । नीच निशील निरीश निशंकी ॥२॥*
*। तेही सम्मुख शरण परिसतां । सकृत् प्रणमतां अपले करतां ॥३॥*
*। दोष दिसुनि कधिं मनिं न अणितां । श्रवुनि गुणां संतांत वानितां ॥४॥*
*। स्वामि कोण दासांस रक्षतो । स्वयें सकल साजां जो सजतो ॥५॥*
*। निज करणी स्वप्नीं ना स्मरतां । जनसंकोच शोच मनिं धरतां ॥६॥*
*। असा स्वामि नहि दुसरा कोणी । वर्दे करुनि पण भुज उचलोनी ॥७॥*

**अर्थ** - आपली (वागण्याची -) सुंदर रीत, सुंदर बाणा, व महती जगप्रसिद्ध असून वेदपुराणादि वर्णन करतात.॥१॥ क्रूर कुटिल, दुष्ट, दुर्बुद्धी, कलंकित नीच, निश्शील, निरीश्वरवादी (व अनाथ) निःशंक - ॥२॥ असे सुद्धा शरण आलेले ऐकून व समोर पाहून त्यांनी एकदाच प्रणाम केल्याबरोबर त्यांना आपले करता मानतां ॥३॥ दोष दिसून सुद्धा कधी मनात आणीत नाही व (उलट) गुण ऐकून स्वतः संतांच्या समूहांत त्यांची संत म्हणून प्रशंसा करता.॥४॥ असा कोण स्वामी आहे की जो सेवकांचा सर्व साज-संच जमवून (त्यांच्याजवळ नसलेले त्यांस पुरवून) त्यांचे रक्षण करतो ? (योगक्षेम, प्रापंचिक व पारमार्थिक, चालवितो).॥५॥ आपण सेवकासाठी केलेले महत्कृत्य (करणी) मनातसुद्धा आठवीत नाही व दासांचा संकोच व चिंता आपण आपल्या मनांत बाळगीत असता.॥६॥ असा स्वामी दुसरा कोणीही नाही हे मी बाहू वर करून पण करून (प्रतिज्ञेने) सांगतो.॥७॥

**टीका. - सूचना** - या सात चौपायांत श्री रघुनाथाच्या दासवत्सल स्वभावाचे फारच बहारीचे पण थोडक्यात वर्णन आहे. असली वचने बालकांडांत व पुढील कांडांत स्फुट वेच्यासारखी आली आहेत. ती बहुतेक सर्व येथे असून भरतांच्या रामस्नेहाने रंगली आहेत.

**चौ. १ - (१) रीति-सुबाणा महती** - आपल्या चांगुलपणामुळे सेवकांचे हित करणे ही रीति पूर्वसंदर्भावरून ठरतेच. बोलणे चालणे, हसतमुखाने पाहणे, विनम्रता इत्यादींनी समोरच्या व्यक्तीचे मनहरण करणारा सहज स्वभाव असा अर्थही आहेच. **(क) सुबाणा** - श्रेष्ठ ब्रीद पण, प्रतिज्ञा. **'जीव भक्तिमान् नीच जरि महा । प्राणप्रिय मज बाणा मम हा'** (७।८६।१०) 'ऐका बिभीषणा प्रभु-रीती । सदा सेवकीं करिती प्रीती' (५।७।६).

**चौ. २-३ (१) क्रूर, कुटिल** इत्यादी नऊ दोषांचा उल्लेख करून दोषांची परम सीमा सुचविली; नऊ या अंकापेक्षा मोठा अंक नाही. **'कोटि विप्रवध पाप जया ही ।**

**येतां शरण, न त्यजूं तया ही ॥ सम्मुख होइ जीव मम जेव्हां । जन्म कोटि अघ नासे तेव्हां'** (५।४४।१-२). ५।४८।२-३ पहा. अशी आणखी पुष्कळ वचने आहेत. **(क) सकृत् प्रणमतां अपला करतां** - सकृत् = एकदां **सकृदेव प्रपन्नाय तवास्मीति च याचते । अभयं सर्व भूतेभ्यो ददाम्येतद्व्रतं मम** (वा.रा. ६।१८।३३-३४)

**चौ. ४ - (१) दोष दिसुनि कधिं मनिं न आणितां - 'प्रभुमनिं राहि न चूक कृतीची । स्मरती शतदां स्थिती हृदींची ॥ अघें व्याध इव ज्या हत वाली । करि सुकंठ मग तीच कुचाळी ॥ तीच कृती मग बिभीषणाची । स्वप्निं हि रामा स्मृति न तयाची ॥ भेटत भरतां त्यां गौरविले । रघुवीरें नृपसदसिं वर्णिले'** (१।२९।५-८) यापूर्वीच्या दोन चौपाया व पुढील दोहा पाहणे.

**चौ. ५ (१) स्वयें सकल साजां जो सजतो** - सेवकांचा ऐहिक व पारमार्थिक योगक्षेम चालवितात. 'अप्राप्त प्रापणं योगः' 'प्राप्तस्य रक्षणं क्षेम' जे प्राप्त झालेले नसेल ते पुरवितात व जे प्राप्त झाले असेल त्याचे रक्षण करतात. जे सद्गुण त्यांच्या जवळ नसतील ते त्यांना देतात व त्यांची त्या गुणांबद्दल प्रशंसा करतात. माता बालकांच्या अंगावर वस्त्रे, भूषणे आपण होऊन, त्यांनी न मागता, त्यांच्या इच्छेविरुद्ध सुद्धा घालते. त्यांना अन्न-औषध देऊन आपणच पुष्ट करते आणि 'माझं बाळ कसं सुंदर दिसतं आहे !' असे म्हणून त्याची दृष्ट काढते व त्याचे रक्षणही करते. असेच भगवान करतात. **'त्यांस सदा मी रक्षीं ताता ! । जशी बालकां जपते माता ॥५॥ प्रौढतनय सम मजला ज्ञानी । बालक सुत सम दास अमानी ॥ मम बल भक्तां स्वबल तयानां । काम कोप हे रिपु उभयानां'** (३।४३।५-९ पर्यंत पहा.) कामक्रोधादि रिपू यापासून, कुसंगतीपासून रक्षण करतात. १।१३।६-७ पहा.)

**चौ. ६ - (१) निज करणी स्वप्नीं ना स्मरतां** - सेवकासाठी काही कितीही केले तरी ते केले असे वाटत नाही. मात्र प्रभूसाठी सेवकाने थोडेसे जरी केले तरी फार मोठे उपकार त्याने केले असे वाटते. त्याने केलेल्याच्या संकोचाने दबलेले असतात व त्या सेवकाची चिंता वाहतात. **'सर्व सुधारिल तो मम दोषू । करत कृपा तत्कृपे न तोषू'** (१।२८।३). बिभीषणाला लंकाराज्य दिले तरी काहीच दिले नाही म्हणून संकोच वाटला. शृंगवेरपूरच्या त्या नावाड्याच्या सर्व पूर्वजांचा व कुटुंबाचा उद्धार केला तरी वाटले की काहीच दिले नाही.

***हिं. । पसु नाचत सुक पाठ प्रबीना । गुन गति नट पाठक आधीना ॥८॥***
***हिं.दो. । यों सुधारि सनमानि जन किए साधु सिरमोर ॥***

*॥ को कृपाल बिनु पालि है बिरिदावलि बर जोर ॥२९९॥*

म. *। पाठ-निपुण पोपट पशु नाचे । गुण गति वश पाठका नटाचे ॥८॥*

म.दो. *। जनां सुधारुनि गौरवुनि केले साधुकिरीट ॥*

*॥ पाळिल कोण कृपालु विण ब्रीदावलि निज नीट ॥२९९॥*

**अर्थ** - पोपट पाठ म्हणून दाखविण्यात कुशल असतात व पशु नाचण्यात कुशल असतात; पण (पोपटाचा पाठ म्हणून दाखविण्याचा) गुण पाठकाच्या - त्याला पढविणाराच्या अधीन असतो व (पशूची नाचण्याची) गति (त्याला शिकविणाऱ्या) नटाच्या अधीन असते.॥८॥ (तसेच) आपण आपल्या सेवकांस (जनां) सुधारले व त्यांचा गौरव करून त्यांस साधूंचे मुकुटमणी बनविले. असा कृपालुशिवाय कोण आहे की जो आपली ब्रीदावली उत्तम प्रकारे पाळू शकेल ? (आपल्यावाचून कोणी नाही.) ॥ दो. २९९ ॥

**टीका. चौ. ८ - (१) पाठनिपुण पोपट** - पोपटाचा स्वभावगुण असा नाही की तो मनुष्यांची सुसंस्कृत, शुद्ध, सुंदर भाषा बोलू शकेल. पण पोपट जेव्हा असे सुंदर बोलतो तेव्हा त्याची प्रशंसा केली जाते. ती प्रशंसा खरोखर त्याची नसून त्याला पढविणाराची असते; पण लोक करतात त्या पोपटाची प्रशंसा व त्याची कीर्ति होते. **(क) पशुनाचे** - वाघ, सिंह, माकडे, बैल वगैरे सर्कशीत किंवा खेळांत ज्या विशिष्ट हालचाली करून दाखवितात त्या त्या पशूंना स्वभावतः करता येत नसतात. त्यांना त्या गति, नृत्य इत्यादी शिकविणारा जो नट असेल त्याच्या कौशल्याने त्यांना त्या करता येतात; पण कीर्ति होते त्या नंदीबैलाची वगैरे. हे दृष्टान्त आहेत.

**दोहा.** (१) कोणीही जीव असला तरी तो जन्मतः, स्वभावतः अविद्येला वश झालेला असतो म्हणूनच जन्माला येतो. अलौकिक गुण अविद्येचे नसतात, ते ईश्वराने दिलेले असतात. भगवानच ते देतात व त्याच्या त्या गुणांचा स्वतः गौरव करतात व करवितात; व त्यांना साधूंचे शिरोमणि बनवितात. सुग्रीव, अंगद, हनुमान, बिभीषण ही उदाहरणे आहेतच. आपल्या सेवकाला आपले गुण देऊन आपणच त्याचा गौरव करून त्याला भागवतोत्तम करून उत्तम गति व कीर्ति मिळवून देणे हे ब्रीद आपल्या शिवाय दुसरा कोणीही पाळू शकणार नाही. हे ब्रीद उत्तम प्रकारे अखंड चालविणारे आपणच आहांत; कारण आपण अत्यंत कृपाळु असून सर्व समर्थ आहांत. असे कृपाळु व समर्थ इतर कोणी नाहीत. **(क) ल.टे. - 'गुण तुमचे समजे निज दोषां'** (१३१।४) या वचनाची कारणमीमांसा

येथे दिली आहे; व **उपदेश आहे** की आपल्यांत जे सद्‌गुण असतील ते 'देणे ईश्वराचे' (दा.बो.) असे जाणून त्यांविषयी कृतज्ञ रहावे व दीन बनून आपले दोष स्वतः जाणून ते नाहीसे केले जावे म्हणून भगवंताला प्रार्थना करीत असावे.

*हिं.* *। सोक सनेहँ कि बाल सुभाएँ । आयउँ लाइ रजायसु बाएँ ॥१॥*
*। तबहुँ कृपाल हेरि निज ओरा । सबहिं भाँति भल मानेउ मोरा ॥२॥*
*। देखेउँ पाय सुमंगल मूला । जानेउँ स्वामि सहज अनुकूला ॥३॥*
*। बड़ें समाज बिलोकेउँ भागू । बड़ीं चूक साहिब अनुरागू ॥४॥*
*। कृपा अनुग्रहु अंगु अघाई । कीन्हि कृपानिधि सब अधिकाई ॥५॥*
*। राखा मोर दुलार गोसाईं । अपनें सील सुभायँ भलाईं ॥६॥*

*म.* *। स्नेह-शोकिं कीं बाल-चपलतां । आलो लंघुन वचन तत्वतां ॥१॥*
*। तरी ब्रीद निज कृपालु बघुनी । घेति सकल मग गोड मानुनी ॥२॥*
*। पाय सुमंगल-मूल पाहिले । स्वामि सहज अनुकूल जाणिलें ॥३॥*
*। भाग्यहि कळलें महत्समाजीं । चूक महा, स्वामी अति राजी ॥४॥*
*। कृपा-अनुग्रह सांग पूर्ण ही । केला, सकल कृपाल अधिक ही ॥५॥*
*। स्वामि लाड मम सब पुरवीले । स्वाभाविक सुजनतें सुशीलें ॥६॥*

**अर्थ** - स्नेहाने म्हणा, शोकाने म्हणा कीं बालचपलतेने (स्वाभाविक मूर्खपणाने) म्हणा, स्वामींची आज्ञा मोडून (येथे) आलो (खरा).॥१॥ तरीसुद्धा कृपाळूनी आपल्या ब्रीदाकडे पाहून माझे सगळे गोड मानून घेतले.॥२॥ सुमंगलांचे मूल असे हे पाय दिसले (तेव्हा) जाणले. खात्री झाली की स्वामी सहज अनुकूल आहेत.॥३॥ महापुरुषांच्या समाजात माझे भाग्यही मला कळून आले की इतकी मोठी चूक केल्यानंतर सुद्धा स्वामी माझ्यावर फार प्रसन्न (राजी) आहेत.॥४॥ हे कृपाल ! आपण माझ्यावर सर्वांग परिपूर्ण कृपा-प्रसाद (अनुग्रह) केला, इतकेच नव्हे तर सर्वच अधिक केले.॥५॥ स्वामी ! आपण आपल्या स्वाभाविक सौजन्याने व सुशीलाने माझे सर्व लाड पुरविलेत.॥६॥

**टीका. चौ. १-२ (१) स्नेह-शोकिं - 'एकचि दुःसह दाह मनाला'** (१८२।६) पासून १८३।२ पर्यंत शोक हे कारण आहे. **'विण रघुवीर बघुनि आवासा'** (१७९।६) इत्यादी अनेक वचनांत स्नेह आहे. **'रामा वनिं अभिषेकिति मुनिवर'** (१८७।३) यांत **बालस्वभावाची चपलता** आहे. हा विचार बालकासारखाच होता. **(क) ग्लानी तात वृथा करतां अति** (२६३।५) **पासून 'स्मरतां तव नामास'** (२६३)

पर्यंत रामचंद्रांनी केलेली भरताची प्रशंसा पहावी.

**चौ. ३-४ (१) भाग्यहि कळलें** - जनक, वसिष्ठ, विश्वामित्र इत्यादि अलौकिक दिव्य पुरुषांच्या सभेत कळून आले की भरत परम भाग्यवान आहेत. मोठा दोष केला असून या सर्वांनी भरतांस निर्दोष ठरवून त्यांची खूप प्रशंसा केली ही गोष्ट भरत म्हणतात अलौकिक भाग्याशिवाय घडणार नाही. शिवाय स्वामीराम फार प्रसन्न झाले.

**चौ. ५-६ (१) कृपा-अनुग्रह - अनुग्रह =** प्रसाद. माझ्या लायकीपेक्षा कितीतरी अधिक कृपाप्रसाद केला. काही बाकी ठेवला नाही. अपराधाकडे पाहिले नाही, पूर्ण प्रेम आहे, प्रशंसा केली; फार काय स्वतःची प्रतिज्ञा मोडण्यास तयार झाले; मी वनांत रहात आहे याचे त्यांना अति दुःख होत आहे, इत्यादी अनेक प्रकारे कृपाप्रसाद परिपूर्ण केला. **(क) लाड मम सकल पुरविले -** चित्रकूटास येऊन पायांचे दर्शन घ्यावे अशी लालसा होती ती पूर्ण केली. रघुनाथांस अयोध्येत घेऊन यावे अशी इच्छा होती; त्याप्रमाणे त्यांनी मी म्हणेन ते करण्याचे कबूल केले आहे; म्हणजे ती इच्छा त्यांनी पुरविल्या सारखीच आहे. त्याग करणार नाहीत, क्षमा करतील असे वाटत होते तेही घडले. बालकाच्या सर्व इच्छा प्रेमळ मातेने पुरवाव्या त्याप्रमाणे पुरविल्या; मात्र त्या माझ्या गुणांमुळे नव्हे, प्रभूच्या स्वाभाविक वात्सल्याने व संकोचशील - भिडस्त शीलामुळे.

**ल. टे.** या सहा चौपायांत भरतांनी आपल्या मुख्य दोषांचा पुन्हा उच्चार करून दाखविले की मागील दोह्यांत वर्णिलेल्या रामस्वभावाचे निदर्शक उदाहरण प्रत्यक्ष मी आहे; हे लक्षात घ्या व प्रभूला अनन्य शरण जा; म्हणजे तुमच्यावर अपार कृपा प्रसाद करतील.

आता पुढील ११ ओळींत मुख्य प्रश्नाकडे वळतील व हा प्रश्न सोडविण्यासाठी भरताने जी सूचना करावी असे प्रभूला वाटत होते. (२७०।३ टी.प.) ती प्रदर्शित करून आपले भाषण संपवितील.

*हिं.* ***। नाथ निपट मैं कीन्हि ढिठाई । स्वामि समाज संकोच बिहाई ॥७॥***
***। अबिनय बिनय जथारुचि बानी । छमिहि देउ अति आरति जानी ॥८॥***

*हिं.दो.* ***। सुहृद सुजान सुसाहिबहि बहुत कहब बडि खोरि ॥***
***॥ आयसु देइअ देव अब सबइ सुधारी मोरि ॥३००॥***

*म.* ***। नाथ फार मी कृता धृष्टता । स्वामि-समाज-भीड ना धरतां ॥७॥***

*। अविनय विनय यथारुचि वदणें । गणुनि आर्त अति देवा क्षमणें ॥८॥*

*म.दो. । सुज्ञ सुहृत् स्वामीपुढें बहु वदणें अति दोष ॥*

*॥ द्यावि देव आज्ञा अतां ती करि मज निर्दोष ॥३००॥*

**अर्थ -** नाथ ! मी स्वामी व समाज यांची भीड न धरतां बोललो ही मोठी धृष्टता केली.॥७॥ (माझे हे) अविनयाने (उद्धटपणाने) वा विनयाने वाटेल ते बोलणे अति आर्त (झालेल्याचे) आहे हे जाणून देवा ! क्षमा करावी ॥८॥ (कारण) सुज्ञ (सुजाण) व सुहृद असलेल्या स्वामींपुढे फार बोलणे हा अति दोष आहे; (म्हणून) देवा ! आतां आपण मला आज्ञा द्यावी म्हणजे तीच मला निर्दोष करील.॥ दो. ३००॥

**टीका. - चौ. ७-८ (१) कृता मी फार धृष्टता -** सज्जनांच्या समाजात उत्तर देणे, लहानांनी बोलणे हा उद्धटपणा (धृष्टता) आहे व स्वामींच्याही देखत बोलणे तर फार उद्धटपणा आहे. (क) गणुनि आर्त अति - मी अति आर्त असल्यामुळे मनास वाटेल ते बोललो; ते योग्य की अयोग्य, उद्धटपणाचे की नम्रपणाचे याचा विचारच केला नाही. 'आर्ताचे मनिं विवेक नसतो' 'आर्त कधीं न विचारें वदतो'.

**दो. (१) सुज्ञ सुहृत् स्वामीपुढे... अति दोष -** जो स्वामी सुहृद आहे तो सेवकाचे अकल्याण करणार नाही; पण तो जर अडाणी असेल तर सेवकांचे हिताहित न कळल्यामुळे कदाचित त्याच्याकडून अहित घडेलही. अशा वेळी सेवकाने बोलणे दोषार्ह ठरणार नाही किंवा सुज्ञ असून सुहृद नसेल तर क्वचित बोलणे दोष ठरणार नाही. पण सुज्ञ = सुजाण व सुहृद असलेल्या स्वामीपुढे सेवकाने बोलणे म्हणजे या दोन गुणांपैकी एखादा गुण स्वामींच्या ठिकाणी नाही असे व्यक्त करण्यासारखे आहे म्हणून दोष आहे; व फार बोलणे तर अति दोष ठरतो. **(क) ती करि मज निर्दोष - स्वामीविरुद्ध काही अपराध, दोष घडल्यास त्याचे प्रायश्चित्त - स्वामी देतील त्या आज्ञेचे पालन करणे हे आहे; इतर प्रायश्चितांनी त्या दोषाचे क्षालन होणार नाही.** "स्वामीद्रोह जया घडे । तो यावच्चंद्र नरकीं पडे । तयास उपाय चि न घडे । स्वामी तुष्टल्या वाचुनी ॥ तेंहीं पुन्हां शरण जावें । सद्गुरुस संतोषवावें । कृपादृष्टि झालिया व्हावें । पुन्हां शुद्ध ॥" (दा. बो. ५।३।७१, ७२). हेच येथे भरत सांगत आहेत. आज्ञा देणे हेच संतुष्ट झाल्याचे लक्षण आहे, हा मनांतील भाव आहे.

*श्री मानस गूढार्थ चंद्रिका अयोध्या काण्ड अध्याय २७ वा समाप्त.*

● ● ●

## अध्याय २८ वा

हिं. *। प्रभु पद पदुम पराग दोहाई । सत्य सुकृत सुख सीवँ सुहाई ॥१॥*
*। सो करि कहउँ हिए अपने की । रुचि जागत सोवत सपने की ॥२॥*
*। सहज सनेहँ स्वामि सेवकाई । स्वारथ छल फल चारि बिहाई ॥३॥*
*। अग्या सम न सुसाहिब सेवा । सो प्रसादु जन पावै देवा ॥४॥*
*। अस कहि प्रेम बिबस भए भारी । पुलक सरीर बिलोचन बारी ॥५॥*
*। प्रभु पद कमल गहे अकुलाई । समउ सनेहु न सो कहि जाई ॥६॥*
*। कृपासिंधु सनमानि सुबानी । बैठाए समीप गहि पानी ॥७॥*

म. *। प्रभु-पद-पद्म-पराग-शपथ जी । सत्य-सुकृत-सुख-सीमा शुभ ती ॥१॥*
*। ती घेउनि, वदतो हृदयींची । रुचि जागृति-निद्रा-स्वप्नींची ॥२॥*
*। सहजें स्नेहें स्वामी-सेवा । स्वार्थ-चार फल छल-विण देवा! ॥३॥*
*। आज्ञे सम न सुसाहिब - सेवा । तो प्रसाद जन लाभो देवा ॥४॥*
*। वदत असें प्रेमाकुल भारी । पुलक शरीरिं विलोचनिं वारी ॥५॥*
*। व्याकुळ धरिती प्रभुपद-कमला । स्नेह समय तो जाइ न वदला ॥६॥*
*। सन्मानुनी कृपाब्धि सुवाणीं । वसविति समीप धरुनी पाणी ॥७॥*

**अर्थ** - प्रभूच्या चरणकमलांच्या रजाची जी शपथ तीच सत्य सुकृत व सुख यांची शुभ सीमा आहे (मग प्रभुपद रज व प्रभुपद यांचे काय सांगावे?) ॥१॥ ती शपथ घेऊन जागृति, निद्रा व स्वप्नांतील हृदयाची रुचि सांगतो. ॥२॥ देवा ! स्वार्थ, चार पुरुषार्थ आणि छल याना सोडून स्वाभाविक (सहज) स्नेहाने स्वामींची सेवा करणे. ॥३॥ उत्तम स्वामींची आज्ञा पालन करणे या सारखी दुसरी सेवा नाही; देवा ! तोच प्रसाद या दासाला लाभो (हीच रुचि आहे.) ॥४॥ असे म्हणताच भरत भारी प्रेमव्याकुळ झाले; अंगावर रोमांच उठले व डोळ्यांत पाणी आले. ॥५॥ व (असे) व्याकुळ होऊन प्रभूचे चरणकमल धरले. त्या वेळेचा स्नेह व तो समय यांचे वर्णन करतं येणे शक्य नाही. ॥६॥ कृपासागर रामचंद्रांनी गोड सुंदर शब्दांनी त्यांचा सन्मान करून हाताला धरून त्यांस जवळ बसवले. ॥७॥

**टीका - चौ. १-२ (१) प्रभुपदपद्मपराग - शपथ -** प्रभूच्या चरणकमलरजाची शपथ जर इतकी प्रभावी आहे तर चरणकमल रजाचा - पायधुळीचा प्रभाव काय असेल आणि पायांचा प्रताप काय असेल याची कल्पना सुद्धा करता येणार नाही.

ज्याची शपथ घ्यावी त्याचा जो प्रभाव घेणारांत असेल तो खोटी शपथ घेण्याने नष्ट होतो; व शपथ घेणारा ज्याची शपथ घेतली त्याच्यापेक्षा मोठा असेल तर त्यास दुःख, शोक, संकटे ग्रासतात. **(क) शंका - गाढ निद्रेत रुचि कशी असूं शकेल?** गाढ निद्रेला बीजभाव म्हणतात. जाग्रतीत कधी क्वचित उत्पन्न होणाऱ्या कामनासुद्धा इतर वेळी जशा सुप्तावस्थेत असतात तशीच रोज जागृतीत प्रबल असलेली रुचि आवड सुद्धा प्रसुप्तावस्थेत बीजरूपाने असतेच. प्रसुप्त तनु विच्छिन्न व उदार अशा वासनांच्यासुद्धा चार अवस्था आहेत. निद्रेच्या पूर्वक्षणी जो संकल्प असेल तो निद्रेच्या उत्तर क्षणी असला की तो निद्रेतसुद्धा जागृत होता असे समजावे. आदि अंती जे असते ते मध्ये अनुभवास न आले तरि असतेच.

**चौ. ३-४ - (१) स्वार्थ चार फल - छलविण - छल =** अन्याश्रय, सेव्याशिवाय इतर देवादि मनुष्यांचा किंवा साधनांचा भरवसा, आशा वाटणे. चार फल = अर्थ, धर्म, काम व मोक्ष. **'धर्माऽविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ' (भ.गी)** धर्मविरोधी नसलेला काम व अर्थ या भगवंताच्या विभूति असल्याने त्यांना स्वार्थ म्हणता येणार नाही. जो अर्थ व काम धर्म विरोधी असेल तोच स्वार्थ. निष्काम धर्माचरण ईश्वरार्पण बुद्धीने केले नसेल तर तो धर्म ही स्वार्थच. भरत म्हणतात स्वार्थच काय परमार्थानुकूल अर्थधर्म काम यांचीही रुचि नाही. व अन्य कोणाचा व कशाचा भरवसा नाही. यांच्या इच्छेला सोडून छलहीन परमपरमार्थाचीच रुचि आहे. असा परम परमार्थ म्हणजेच सहज स्नेहाने स्वामींची सेवा आज्ञापालन. **(क) तो प्रसाद मज लाभो देवा** - स्वामींची सेवा व आज्ञा हा प्रसाद मिळावा. कोणता प्रसाद हे सांगणार होते; पण प्रेमविवशतेने बोलता येईना म्हणून तो प्रसाद मज लाभो इतके म्हणतांच पाय धरले व सुचविले की या पायांचा प्रसाद द्या व त्याच्या सेवेची आज्ञा द्या. **'अंतरस्थितीचिया खुणा। अन्तर्निष्ठ जाणती' (दा. बो)** या प्रमाणे प्रभु काय ते समजले व तेच पुढे देणार आहेत.

**चौ. ६-७ - (१) तो समय** - हा अद्‌भुत अनपेक्षित योग भरताच्या व सर्व सभेच्या कोणत्या पुण्याईने व भाग्याने आला हे सांगणे अशक्य आहे. **(क) बसविति समीप धरूनी पाणी** प्रभूनीं ज्याला हातात धरला तो पळसाचा निर्जीव दंड सुद्धा त्रैलोक्याला व्यापून उरण्याइतका मोठा (वामनावतारांत) झाला; मग ज्या सेवकाला प्रभूंनी हातात धरला, ज्याचा हात भगवंतांनी धरला तो रामाच्या एवढा मोठा कां होणार नाही ! हे भाग्य मानसांत हनुमंताशिवाय इतर कोणास

लाभले नाही. तरीपण समीप व परमसमीप एवढा फरक भरत व हनुमान यांच्यात आहेच. (५।३३।४ पहा.) हात धरून परम समीप बसविला फक्त हनुमंताला !

हिं. *। भरत बिनय सुनि देखि सुभाऊ । सिथिल सनेहँ सभा रघुराऊ ॥८॥*

हिं. छं. *। रघुराउ सिथिल सनेहँ साधु समाज मुनि मिथिला धनी ।*
*॥ मन महुँ सराहत भरत भायप भगति की महिमा घनी ॥*
*। भरतहि प्रसंसत बिबुध बरषत सुमन मानस मलिन से ।*
*॥ तुलसी बिकल सब लोग सुनि सकुचे निसागम नलिन से ॥१॥*

हिं. सो. *। देखि दुखारी दीन दुहुँ समाज नर नारि सब ॥*
*॥ मघवा महा मलीन मुए मारि मंगल चहत॥३०१॥*

म. *। श्रवुनि बिनति पाहुनी स्वभावहि । स्नेहें शिथिल सभा रघुराव हि ॥८॥*

म. छं. *। स्नेहे शिथिल रघुराज साधु समाज मुनि मिथिलापती ।*
*॥ चित्तांत वानिति भरत-भक्ती-बंधुता-महिमा अती ॥*
*। भरता प्रशंसिति विबुध वर्षति सुमन मानसिं मलिन से ।*
*। तुलसी विकल सब लोक ऐकुनि संकुचति निशिं नलिन से ।*

म. सो. *। देखुनि दुःखी दीन दो समाजिं सब नारि नर ॥*
*॥ मघवा महा मलीन मृत मारुनि मंगल बघत ॥३०१॥*

**अर्थ** - (भरतांनी केलेली) विनंती ऐकून आणि त्यांचा स्वभाव पाहून सभा आणि रघुराजही स्नेहाने शिथिल झाले ॥८॥ रघुराज साधुसमाज, मुनि वसिष्ठ व मिथिलापति विदेह स्नेहाने शिथिल झाले; व मनांतल्यामनांत, बोलण्याची शक्ति न राहिल्यामुळे भरताची भक्ति व बंधुभाव (बंधुता) यांचा अति महिमा फार वाखाणू लागले. मनाने मलिन झाल्यासारखे विबुध भरताची प्रशंसा करीत सुमने वर्षू लागले. तुलसीदास म्हणतात की हे ऐकून (दोन्ही समाजांतील) सर्व लोक रात्री कमळे संकोचतात तसे संकुचित झाले. ।।छंद।। दोन्ही समाजांतील सर्व नारी नर दीन व दुःखी झाले आहेत असे पाहून महामलीन मघवा (इंद्र) मेलेल्यांना मारून आपले मंगल (करू) बघत आहे. ।।सो., ३०१।।

**टीका. छंद - (१) चित्तांत वानिति** - स्नेहाने सर्व इंद्रिये शिथिल पडली असल्याने वैखरी वाणीने प्रशंसा करता येत नाही म्हणून मनांत करीत आहेत. वैखरीने प्रशंसा करावी असे वाटत आहे पण नाइलाज झाला. **(क) विबुध वर्षति सुमन** - भरताचे भाषण ऐकून वाटले की अयोध्येत चला असे भरत आता

सांगत नाहीत म्हणून आनंद झाला व पुष्पवृष्टि करू लागतात तोच रघुराजही स्नेहाने शिथिल झालेले पाहिले व मनाने मलिन झाले; पण अझून खात्री नाही म्हणून मलिन - कलुषित झाल्यासारखे असे म्हटले. साशंक झाले की रघुराज आपण होऊनच या भरतस्नेहाला वश होऊन परत गेले तर? **(ख) निशिं नलिनसे** - रात्र होतांच नलिन = कमळें मिटतात; तशी सर्वांची तोंडे सुकून गेली; सर्व लोक निस्तेज, दुःखी, दीन झाले; वाटले की राम परत येत नाहीत.

**सो. - (१) देखत दुःखी दीन** - राम परत येत नाहीत असे वाटून हे लोक दुःखी दीन झाले त्याअर्थी भ्रम, भय व आर्ति उत्पन्न होण्याचा जो प्रयोग यांच्यावर केला त्याचा परिणाम झालेला दिसत नाही तरी आता उच्चाटनाचाच प्रयोग केला पाहिजे असे इंद्राला वाटले. (दो. २९५ पहा.) **(क) मघवा** = इंद्र; मह पूजायाम्; सर्व देवांनासुद्धा पूज्य वंद्य असलेला; देवराज **मघवा महा मलीन बनला.** कारण मेलेल्यांना मारून आपले मंगल, कल्याण करू पहात आहे. आधींच रामवियोगभयाने दीन दुःखी झालेल्या लोकांना आणखी दुःख देण्याचा प्रयत्न करीत आहे. **'उच्च निवास नीच कर्तुती'** !

*हिं.* *। कपट कुचालि सीवँ सुरराजू । पर अकाज प्रिय आपन काजू ॥१॥*
*। काक समान पाक रिपु रीती । छली मलीन कतहुँ न प्रतीती ॥२॥*
*। प्रथम कुमत करि कपटु सँकेला । सो उचाटु सब के सिर मेला ॥३॥*
*। सुरमायाँ सब लोग बिमोहे । राम प्रेम अतिसय न बिछोहे ॥४॥*
*। भय उचाट बस मन थिर नाहीं । छन बन रुचि छन सदन सोहाहीं ॥५॥*

*म.* *। कपट-कुचाल-सीम सुरराजहि । पर - हानी प्रिय अपलें काज हि ॥१॥*
*। काकसमान पाकरिपु - रीती । छली मलीन, न कुठें प्रतीती ॥२॥*
*। कुमतें प्रथमचि कपट संकलित । तें उच्चाटन सब शिरिं घालित ॥३॥*
*। सुरमायें सब लोक विमोहित । अतिशय रामप्रेम न विरहित ॥४॥*
*। नाहीं स्थिर मन, भय उच्चाटनिं । क्षण वनरुचि घर रुचे दुजे क्षणिं ॥५॥*

**अर्थ** - सुरराज कपट व कुचाल यांची सीमा आहे; व त्याला दुसऱ्याची हानी (अकार्य) प्रिय वाटते व आपले कार्य प्रिय वाटते. ॥१॥ पाक दैत्याचा रिपु जो इंद्र त्याची रीति (व्यवहार, वागणूक) कावळ्यासारखी कुटिल व मलीन असून कोणावरही विश्वास नाही ॥२॥ पूर्वीच कुविचाराने (कुमंत्राने) कपट एकत्र केले होते तेच उच्चाटन आता सर्वांच्या शिरावर घातले. ॥३॥ (त्या

बरोबर) सुरमायेने सर्व लोक विशेष मोहित झाले; पण त्यांचे अतिशय रामप्रेम नष्ट झाले नाही. (अतिशय-रामप्रेमविरहित न) ।।४।। तथापि उच्चाटनामुळे भय वाटू लागले मन स्थिर राहिले नाही; क्षणभर वनाची आवड वाटते तर दुसऱ्या क्षणी घर प्रिय वाटते. ।।५।।

**टीका - चौ- १-२ - (१) कपट कुचाल सीम सुरराज हि - कुचाल** = दुराचार. सुरराजा असून त्याच्यासारखा कपटी व दुराचारी कोणी नाही. सीम = सीमा. सुरराज शब्दाने सत्ता, ऐश्वर्य, भोग, विलास यांची सीमा दर्शविली. **सुचविले की सत्ता व ऐश्वर्य यांच्या बढतीच्या प्रमाणांत बहुधा कपट व दुराचार यांची बढती होते.** जितकी पूज्यता प्रतिष्ठा वाढते तितकी अंतःकरणाची मलिनता वाढते. **ज्यांनी गुरु साधुसभा - सेवा केली असेल तेच या नियमाला अपवाद होत. (२३१।७ टी.प) (क)** कपटसीमा, दुराचार सीमा, परहानि प्रिय वाटणे, स्वतःचे कार्यच प्रिय वाटणे, कुटिलता (छल), अपवित्रता, मलीनता व अविश्वास हे सात अवगुण सुरराजाच्या ठिकाणी महासागरासारखे आहेत. सप्त सद्गुण सागर असलेल्या भरतांससुद्धा मोहित करण्याचा प्रयत्न करून पाहिला म्हणून या सात पदव्या सुरराजांस मिळाल्या **(ख) पाकरिपु -** पाक नांवाच्या दैत्याचा शत्रु. इंद्राने याचा नाशसुद्धा छल कपटानेच केला. **छली** = कुटिल, असा अर्थ करणे जरूर आहे. कारण कपटाचा उल्लेख मागल्या चौपाईत आहे. इंद्राची ही रीति कावळ्यासारखी स्वाभाविक आहे. **'काकस्वभावादि'** प्रकरण प्रस्तावनेत पहावे (पृ. ६३५) **(म) न कुठे प्रतीति -** नारदासारख्या अजातशत्रूवर विश्वास नाही; स्वतःच्या गुरूवर विश्वास नाही; सरस्वती देवीवर विश्वास नाही हे आतापर्यंत मानसांतच दाखविले आहे.

**चौ. ३ - (१) कुमते प्रथम चि कपट संकलित.** प्रथमचि = पूर्वीच; दो. २९५ पहा. पूर्वीचे सर्वांनी कुमंत्र करून दुष्टपणा करण्याचे ठरवून 'भ्रमभयार्ति उच्चाट' करण्याचे ठरविले त्यांतील भ्रमभयार्ति उत्पन्न करण्याचा प्रयत्न निष्फळ झाला तेव्हा आता उच्चाटनाचा प्रयोग सर्वांच्यावर केला. मंत्रशक्तीने, यंत्र तंत्रशक्तीने किंवा मायाशक्तीने हा प्रयोग करता येतो. येथे इंद्राने सुरमाया शक्तीनेच हा प्रयोग केला. या प्रयोगाचे वर्णन पूर्वी (२१२।३ - ६ टी. पहा) सविस्तर केले आहे; तसला हा प्रयोग नाही.

**चौ. ४-५ - (१) सुरमाये सब लोक विमोहित -** सुरमायेचा परिणाम कोणावर झाला नाही हे पुढे दोह्यांत सांगितले आहे. त्यांच्या शिवाय बाकी सर्वांना देवमायेने

मोहित केले; पण कैकयीचे रामप्रेम जसे नष्ट झाले तसे झाले नाही. **(क) अतिशय रामप्रेम बिरहित न' झाले.** त्यांचे जे अतिशय रामप्रेम होते ते गेले नाही, कमी सुद्धा झाले नाही. **(ख) नाहीं स्थिर मन, भय उच्चाटनि** - अतिशय रामप्रेम असून सुद्धा या उच्चाटनामुळे वनांत राहण्याचे वगैरे भय उत्पन्न झाले. मनाची जी स्थिरता होती की रामसमीप वनांत राहण्यातच सुख आहे वगैरे, ती स्थिरता गेली व मन चंचल झाले. एकदा वाटते वनांतच सुख आहे; लगेच घराची वगैरे आठवण होते व घरी जावेसे वाटते. एकदा वाटते राम समीप भय कसले? पुन्हा वाटते की राम काय प्रत्येकाच्या जवळ रात्री पहाऱ्यावर उभे राहणार आहेत? बरे राहिले तरी प्रभूंना आमच्यासाठी त्रास का? इत्यादि प्रकारे मनरूपी लंबक वन व अयोध्या या दोन टोकांत भराभर भ्रमण करूं लागला. यामुळे तर लोक फारच दुःखी झाले. **(ग)** राम यांना आपले व प्रिय मानीत असूनसुद्धा हे सुरमायेला वश झाले याचे कारण प्रभूंची इच्छाच आहे. असे झाले नसते तर परत जाताना रामवियोग लोकांना असह्य झाला असता, लोक मेले असते हे पुढे ३१७।१-३ मध्ये स्पष्ट सांगितले आहे.

*हिं.* *। दुबिध मनोगति प्रजा दुखारी । सरित सिंधु संगम जनु बारी ॥६॥*
*। दुचित कतहुँ परितोषु न लहहीं । एक एक सन मरमु न कहहीं ॥७॥*
*। लखि हियँ हँसि कह कृपानिधानू । सरिस स्वान मघबान जुबानू ॥८॥*

*हिं.दो.* *। भरतु जनकु मुनिजन सचिव साधु सचेत बिहाइ ॥*
*। लागि देवमाया सबहि जथाजोगु जनु पाइ ॥३०२॥*

*म.* *। द्विधा मनोगति लोक दुःखि अति । सरितसिंधु - संगमिं जणुं जलगति ॥६॥*
*। दुश्चित तोष न कुठे पावती । कुणी कुणास न मर्म सांगती ॥७॥*
*। बघुनि हसति हृदिं कृपानिधान । श्वान युवा मघवान समान ॥८॥*

*म. दो.* *। भरत जनक मुनिजन सचिव ज्ञानि साधु वाचून ॥*
*॥ ग्रासि देवमाया जनां यथायोग्य पाहून ॥३०२॥*

**अर्थ** - सरिता व सागर यांच्या संगमाच्या ठिकाणी जशी जलाची गति तशीच जणू द्विधा मनोगति झाल्याने लोक अति दुःखी झाले आहेत. ॥६॥ दुश्चित - किंकर्तव्यमूढ झाल्याने चित्त कुठेही संतोष पावत नाही; पण हे मर्म (आपल्या मनाची स्थिति, विचार) कोणी कोणाला सांगतही नाही. ॥७॥ हे जाणून (पाहून) कृपानिधान मनांत हसून मनांतच म्हणतात की श्वान युवान व मघवान

हे सारखे आहेत (असे म्हणतात त्यांत शंका नाही) ॥८॥ भरत, जनकराजा, वसिष्ठादि मुनिसमाज, सचिव, ज्ञानी व साधू यांच्या शिवाय इतर सर्व लोकांना ज्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणे (कमीजास्त प्रमाणात) देवमायेने ग्रासले ।।दो. ३०२॥

**टीका - चौ. ६-(१) द्विधा मनोगति - जणुं जलगति** - नदी जेथे सागराला मिळते तेथे नदीचा ओघ सागराच्या पाण्याला धक्का देऊन मागे लोटतो; तोच समुद्राचे पाणी तितक्याच जोराने नदीच्या पाण्याला धक्का देऊन मागे सारते व आपण नदीच्या मुखांत जोराने घुसते हा खेळ पाहणे फार मनोरंजक असते; पण अशी ही धक्का धक्की सारखी चालण्याने खटबळाट होत असतो. तसेच लोकांचे झाले आहे. देवमाया नदीचा ओघ मनाला अयोध्यासागरांत ढकलण्याचा प्रयत्न करीत आहे तर अयोध्यासागर देवमायेच्या धारेला चित्रकूटला ढकलीत आहे. ही धक्का धक्की खळबळ हृदयाला अति दुःखद झाली आहे व अशी खळबळ नेहमीच फार दुःखदायक असते. **(क)** सुरमाया सरिता आहे. लोकांचे मन पाणी आहे; अयोध्या, सिंधु लोकांचे मन पाणी.

**चौ. ७ (१) दुश्चित तोष न कुटे पावती** - चित्त अस्वस्थ आहे. अशा परिस्थितीत तोष समाधान मिळणेच शक्य नसते. कोणताही एक निश्चय करवत नाही. चित्रकूटासही तोष वाटत नाही व अयोध्येतही तोष मिळेल असे वाटत नाही. पण ही आपल्या चित्ताची द्विधागति कोणी कोणास सांगत नाही; लाज वाटते. 'त्यजुनि राम लक्ष्मण वैदेही । ज्यां प्रिय गृह विधि वंचित तेही' (२८०।४) असे काल परवां तुम्हीच म्हणाला होतात ना? असे दुसरे विचारतील ही भीति वाटते; कारण प्रत्येकाला वाटत आहे की माझ्या मनालाच असे वाटत आहे; इतरांना असे वाटत नाही. कोणाला सांगत नाहीत त्यामुळे तर फारच कष्ट होत आहेत मनाला. **(क) ल.टे.** हा सरितासंगमाचा दृष्टान्त देऊन सुचविले की ही सुरमायानदीची गति फक्त चित्रकूटला राम व अयोध्यावासी लोकांच्या संगमाच्या ठिकाणीच संगमासारखी खळबळ उडवीत आहे. हे सुरमायेचे प्राबल्य अयोध्येला जाऊन पोचेपर्यंतसुद्धा राहणार नाही. लोक रामाश्रमांतून निघून अयोध्येस जाण्यासाठी मंदाकिनीच्या पलीकडे गेले की झाले. मग ही सुरमाया गतिविहीन होऊन अयोध्यासागरात विलीन होऊन राहील. सरिताजल सागरांत शिरले की सागररूपच होते.

**चौ. ८ - (१) कृपानिधान** - लोकांचे प्रेम कमी होणार नाही अशी कृपा

आपल्या हास्याने म्हणजे मायेने केली; पण या सुरमायेच्या प्रभावाने लोकांचे वियोगदुःख अनायासे कमी होईल व लोक सुस्थितीत अयोध्येस जाऊन पोचतील असे वाटून त्या सुरमायेकडे थोडे दुर्लक्ष केले हीसुद्धा कृपाच केली. ३१७।१-३ पहा. **(क) हसति हृदिं** हसले एवढ्याच मुळे की स्वर्गाधिपति इंद्र, सुरराजा असून काय हा भ्याडपणा ! हे बिचारे दुःखी दीन लोक; यांच्या काय वाटेस जात होते ! गरिबांचा काळ आहे ! रावणापुढे गोगलगाय ! हा वाईट करायला गेला पण झाले चांगलेच. इन्द्राला श्वान म्हटलेच आहे. (१।१२५ पहा.) **(ख) श्वान युवा मघवान समान** - पाणिनीच्या व्याकरणाचा एक नियम (एक सूत्र) श्वन् युवन् च मघवन् या तिन्ही शब्दांस सारखाच लागू आहे; हे तिन्ही एकाच सूत्रात घातले आहेत. **'श्व युव मघोनाम् अतद्धिते'** या सूत्राचा आधार घेऊन एका कवीने म्हटले आहे की- **काचं मणिं कांचनमेकसूत्रे मूढा निबध्नन्ति किमत्र चित्रम् ॥ विचारवान् पाणिनिरेकसूत्रे श्वानं युवानं मघवानमाह'** मूर्ख लोक काचेचे मणि (पोत) रत्ने व सोन्याचे मणि एकाच सूतांत ओवतात यांत काय नवल? विचारवान पाणिनीने श्वान युवान व मघवान यांना एका सूत्रांत घातले आहेत ! कुत्रा, तरुण व मघवा (इंद्र) हे तिघे सारखेच.' कुत्रा विषयलोलुप निर्लज्ज व भित्रा; (दो. १।१२५ पहा) तरुण कामी, विषयलोलुप व भित्रा, तेव्हा कुत्रा व तरुण यांतले सर्वच दुर्गुण इंद्रांत आहेत हे जाणून की काय पाणिनीने त्यांना एका सूत्रात ओवले असावेत ! **यौवनं धन-संपत्ति मूर्खत्वमति लोभता ॥ एकैकमप्यनर्थाय किमु यत्र चतुष्टयम् ॥ (सुभा.)** मघवा सदा तरुण आहे कारण तो निर्जर जरारहित आहे. सुरराज असल्याने धनसंपत्ती अनुपम आहे; अतिलोभ आहेच सत्तेचा; म्हणून तर सर्वांना भितो व अविश्वासी. हजार नेत्र असून आंधळा हे महामूर्खाचे लक्षण; व १।१२५ मध्ये 'जड' म्हटलेच आहे सुरपतीला ! अशा या चारी गुणांनी म्हणा वा दुर्गुणांनी म्हणा मघवा परिपूर्ण आहे; मग त्यांच्यामुळे केव्हा कोणावर काय अनर्थ ओढवतील हे कोण सांगणार?

**दो.** भरत व जनकादिकांवर सुरमायेचा मुळीच परिणाम झाला नाही. व जे मोहित झाले त्यांच्यावरसुद्धा एकसारखा परिणाम झाला नाही. कोणावर कमी, कोणावर अधिक झाला. याचे कारण जसा त्यांचा अधिक कमी अधिकार; तसाच या भरतादिकांचा अधिकारच असा की त्यांच्यावर सुरमायेचा परिणाम मुळीच होऊ नये. सुरमाया ही अविद्याच आहे व हे सर्व दृढज्ञानी असून भक्त आहेत.

जे नुसते ज्ञानी आहेत त्यांच्यावरही झाला नाही. हे सर्व आधीपासूनच मनाची तयारी करून आहेत की राम परत येत नाहीत. देवांना भीति वाटत होती शेवटी भरताची पण त्यांनीही तो विचार सोडलाच होता.

*हिं.* ***। कृपासिंधु लखि लोग दुखारे । निज सनेहँ सुरपति छल भारे ॥१॥***
***। सभा राउ गुर महिसुर मंत्री । भरत भगति सब कै मति जंत्री ॥२॥***
***। रामहि चितवत चित्र लिखेसे । सकुचत बोलत बचन सिखे से ॥३॥***
***। भरत प्रीति नति बिनय बडाई । सुनत सुखद बरनत कठिनाई ॥४॥***

*म.* ***। दिसले कृपाब्धिला जन विव्हळ । स्नेहें निज भारी सुरपति - छळ ॥१॥***
***। सभा भूप गुरु महिसुर मंत्री - । मतिला भरत सुभक्ति नियंत्री ॥२॥***
***। रामा निरखिति चित्रिं लिखितसे । संकोचति वदण्या शिक्षितसे ॥३॥***
***। भरत - विनति नति प्रीति महत्ता । श्रवणिं सुखद वर्णनीं कठिणता ॥४॥***

**अर्थ** - आपल्या फार स्नेहाने व सुरपतीच्या प्रबळ मायेने लोक फार व्याकुळ झाले आहेत हे कृपासिंधु रामचंद्रांस दिसले ॥१॥ सभा, जनकराजा, गुरुवसिष्ठ, कौशिकादि महीसुर व मंत्री यांच्या सर्वांच्या बुद्धीला भरताच्या प्रबल भक्तीने नियंत्रित केली आहे (ती क्रियाशील होऊ शकत नाही) ॥२॥ हे सर्व चित्रांत रेखाटल्यासारखे रामाच्या मुखाकडे निरखीत राहिले आहेत; व दुसऱ्यांनी पढविल्यासारखे (पोपटासारखे) बोलण्यास संकोच वाटत आहे (म्हणून कोणी काही बोलत नाहीत) ॥३॥ भरताची प्रीति, विनंती, नति (नम्रता) व मोठेपणा ऐकणे सुखद वाटते पण वर्णन करणे कठीण वाटत आहे. ॥४॥

**टीका. चौ. १-३** - (१) सूचना - राम पुढे भाषण करणार आहेत त्याचे कारण सुचविण्यासाठी या तीन चौपाया आहेत. पहिल्या चौपाईतील विषय ३०४।४ मध्ये पुन्हां हाती घेतला जाईल. सध्यां सभेच्या चित्ताची स्थिति इतर श्रवण करण्यास प्रतिकूल असल्यामुळे कवि सद्यस्थितीचे वर्णन करीत आहेत. भरतभाषणाचे महत्व वर्णन करणे राहिले आहे ते चौथ्या चौपाईपासून दहा ओळीत करतील. **(क) सभा भूप... मतिला भरत सुभक्ति नियंत्री** - भरताच्या अनुपम भक्तीने सर्वांची बुद्धि अगदी कुंठित झाली आहे. काय बोलावे हे कोणाच्याच बुद्धीला सुचत नाही. **जणू काय भरत भक्तीने असा वटहुकूमच काढला की आता स्वराज्यांत पूर्ण भाषण स्वातंत्र्य आहे पण कोणी काही विचार प्रगट करावयाचा नाही ! (ख) रामा निरखिति** - रामशपथ ऐकल्यावर जनकवसिष्ठादि

सर्व जसे भरताच्या तोंडाकडे बघत राहिले तसे भरताचे भाषण ऐकल्यावर श्रीराममुखाकडे तटस्थ होऊन बघत राहिले. **(ग) संकोचति वदण्या शिक्षितसे** - बोलण्यासारखे काही राहिले नाही; नवीन कोणताच मुद्दा सापडत नाही; भरतानेच काही बोलण्यासारखे बाकी ठेवलेले नाही. जे कांही कोणी बोलेल ते पूर्वी कोणीतरी व विशेषतः भरत जें बोलले त्यांतलेच असणार; मग पढवलेला पोपट किंवा साक्षीदार जसे बोलतो तसेच बोलावे लागणार; म्हणून बोलण्यास संकोच वाटतो. एकच विषय बोलण्यासारखा आहे पण त्या विषयी कोणाला बोलता येत नाही.

**चौ. ४ - (१) भरत विनति नति...** कोणीतरी भरताची प्रीति वगैरेचे वर्णन करावे असे प्रत्येकास वाटत आहे, कारण ते ऐकण्याने सुख होते; व या चार गुणांचे वर्णन केले तरि - किंवा पुनरुक्तिदोष होणार नाही; पण प्रत्येक जण मनांत म्हणत आहे की हे गुण वर्णन करणे फार कठीण, आपल्या शक्तीच्या बाहेरचे आहे. म्हणून कवि सांगतात-

*हिं.* ***। जासु बिलोकि भगति लवलेसू । प्रेममगन मुनिगन मिथिलेसू ।।५।।***
***। महिमा तासु कहै किमि तुलसी । भगति सुभायँ सुमति हियँ हुलसी ।।६।।***
***। आपु छोटि महिमा बडि जानी । कबिकुल कानि मानि सकुचानी ।।७।।***
***। कहि न सकति गुन रुचि अधिकाई । मति गति बाल बचन की -नाई ।।८।।***

*म.* ***। ज्यांच्या बघुनि भक्तिलवलेशा । प्रेम-मग्नता मुनि मिथिलेशा ।।५।।***
***। तन्महिमा किं वर्णवे तुलसिसि । भक्तीस्वभाव उल्हसि सुमतिसि ।।६।।***
***। स्वयें सान महिमा गुरु जाणत । कविकुलसेतू मानुनि लाजत ।।७।।***
***। वदुं न शके गुण रुची अपरिमित । मतिगति बालवचन सम कुंठित ।।८।।***

**अर्थ** - ज्यांच्या भक्तीच्या लवलेशाला पाहून सर्व मुनि व मिथिलापति यांना प्रेममग्नदशा प्राप्त झाली - (ते प्रेममग्न झाले) ।।५।। त्यांचा महिमा तुलसीदासास कसा वर्णन करतां येईल? पण भक्तीच्या स्वभावाने (सुमतीला उल्हसित केली. (सुमतीला) उल्हास आनंद उत्साह वाटूं लागला)।।६।। पण स्वतः लहान (क्षूद्र) व महिमा मोठा (गुरु) हे जाणून कविकुलांच्या मर्यादेला मान देऊन ती लाजली. ।।७।। गुण वर्णन करण्याची रुचि अपार आहे; पण वर्णन करू शकत नाही; कारण मतीची गति बालकाच्या वाणीसारखी कुंठित झाली. ।।८।।

**टीका. चौ. ५-६ - (१)** भरताचा महिमा वर्णन करता येत नाही; तो शब्दातीत आहे हे सांगावयाचे आहे; पण असे सरळ न सांगता कैमुतिक न्यायाने

गौरवून सांगत आहेत. **(क) भक्तीस्वभाव उल्हसि सुमतिसि** - भक्तीचा हा स्वभाव आहे की भक्तांचा महिमा, प्रभाव वर्णन करण्याची स्फूर्ति, उल्हास ती देते. त्या प्रमाणे भरतांची भक्ति पाहून कवींच्या सुमतीला फार उल्हास वाटू लागला व स्फूर्ति झाली की आपणही भरत महिमा वर्णन करावा.

**चौ. ७-८ - (१) स्वये सान महिमा गुरु जाणत** - पण पाहिले तो महिमा फार मोठा ! (गुरु), अपार अगाध व सुमेरु पर्वता सारखा विशाल ! म्हणून संकोच वाटला. **(क) पण कविकुलसेतू =** कविपरंपरेची मर्यादा, पाहून विशेषच संकोच वाटला, लाजली सुमति. विधि हरिहर. गणपति, अहिपति, शारदा, कवि, कोविद इत्यादींची बुद्धी सुद्धा जे साहस करू शकत नाही ते तुलसीदासांच्या मतीस करवेना. **(ख) वदुं न शके गुण** - महिमा नाहीं वर्णन करतां आला तरि निदान गुणांचे वर्णन करावे अशी अपार आवड सुमतीला उत्पन्न झाली; पण गुणांचेही वर्णन करता येत नाही असे अनुभवास आले; कारण ते वर्णन करण्यास शब्दच सापडत नाहीत. शेवटी **मतीची गति** बालकांच्या वाणीसारखी झाली. काय पाहिजे ते सांगावे असे बालकास फार वाटते; पण शब्दच माहीत नसल्याने, मनांत आलेले बोलून दाखविता येत नाही, तशी मति कवींच्या उल्हसित झालेल्या सुमतीची झाली.

*हिं. दो. । भरत बिमल जसु बिमल बिधु सुमति चकोर कुमारि ॥*
*॥ उदित बिमल जन हृदय नभ एकटक रही निहारि ॥३०३॥*
*हिं. । भरत सुभाउ न सुगम निगमहूँ । लघु मति चापलता कबि छमहूँ ॥१॥*
*। कहत सुनत सति भाउ भरत को । सीय राम पद होइ न रत को ॥२॥*
*। सुमिरत भरतहि प्रेमु राम को । जेहि न सुलभु तेहि सरिस बाम को ॥३॥*
*म. दो. । भरत-विमल-यश विमल विधु सुमति चकोर-कुमारि ॥*
*॥ उदित विमल जन-हृदय-नभिं टकमक पाही भारि ॥३०३॥*
*म. । भरतस्वभाव निगमां सुगम न । कवि ! लघुमतिचे क्षमा चपलपण ॥१॥*
*। वदत भरत-सद्भावा ऐकत । सितारामपदिं कोण नव्हे रत ॥२॥*
*। भरतां स्मरतां रामप्रेम न - । सुलभ जया, त्यासम जगिं वाम न ॥३॥*

**अर्थ** - भरताचे विमल यश हा विमल (पूर्ण-) चंद्र होय व (तुलसीदासांची) सुमति चकोरकुमारी होय, निर्मल (राम-) सेवकाच्या निर्मल हृदयरूपी विमल आकाशात उगवलेल्या त्या चंद्राकडे ती टक लाऊन (तटस्थ, कुंठित होऊन)

बघतच राहिली आहे ।।दो. ३०३।। भरताचा स्वभाव वेदांनासुद्धा सुगम नाही; म्हणून कवि हो ! या लघु मतिच्या चपलपणाची क्षमा करा. ।।१।। भरताच्या सद्भावाचे श्रवण कथन केल्याने सीतारामपदी कोण रत होणार नाही? ।।२।। भरताचे स्मरण केल्याने ज्यास रामप्रेम सुलभ होणार नाही त्याच्यासारखा करंटा जगांत कोणी नाही. ।।३।।

**टीका. - दो.** (१) महिमा व गुण वर्णनातीत आहेत हे पूर्वी सांगितले. यशही वर्णनातीत आहे हे या रूपकाने येथे सांगत आहेत. तथापि हेही सुचवीत आहेत की चकोर कुमारीला चंद्राचे वर्णन करता आले नाही तरी त्याच्याकडे बघत राहून देहभान विसरून जाण्यात ती कृतार्थता, धन्यता मानते; त्याप्रमाणे हृदयांत उगवलेल्या भरत विमल यशरूपी पौर्णिमेच्या, निर्दोष चंद्राकडे बघत राहण्याने कवीच्या मतीस परमानंद होत आहे. **(क) विमलजन हृदय -** याने सुचविले की निर्मळ हृदयी रामभक्तांच्या हृदयांतच हा उगवू शकतो, अनुभवास येतो. आकाश निरभ्र ( = विमल) असेल तरच चकोरीला चंद्रदर्शन होईल. 'भरत विमलयश - विमल बिधुचे वर्णन भरद्वाजांनी केले आहे. (२०९।९-२१०।१). **(ख) चकोरकुमारी** म्हणण्याचे कारण इतकेच की विधिगणपति अहिपति शिव शारदा वगैरेंची सुमति चकोरी आहे. कविसुमति लहान (सान) आहे. हे नुकतेच सांगितले आहे.

**चौ. १** (१) महिमा व गुण अनिर्वचनीय आहेत व यशाकडे सुमति देहभान विसरून बघत राहते म्हणून भरताच्या स्वभावाचे थोडेसे वर्णन केले ही सुद्धा सुमतीने धृष्टताच केली; कारण भरताचा स्वभाव वर्णन करणे वेदांनासुद्धा सुलभ नाही. म्हणून हा जो लघु (क्षुद्र) मतीने चपलपणा केला त्याबद्दल कवींनी क्षमा करावी असे 'मानस कवि तुलसी' म्हणतात.

**चौ. २-३** (१) **भरतसद्भावा ऐकत वदत...रत -** येथे भरतचरित्राची फलश्रुति पुन्हा एकदा अशा प्रकारे सांगून ठेवली. भरताचे चरित्र, सद्भावना यांचे श्रवण व कथन केल्याने सीतारामपदप्रेम प्राप्त होईल; कोणीही हे करू शकेल हे सुचविले. **(क)** भरत चरित्र, भरत सद्भाव यांचे स्मरण केल्याने ( = भरता स्मरतां) रामप्रेम सहज प्राप्त होणार नाही त्याच्या सारखा करंटा - अभागी तोच. **श्रीरामचरित्राची फलश्रुति सुद्धा इतकी वारंवार मानसांत सांगितलेली आढळत नाही. भगवंताच्या चरित्रापेक्षा भरतासारख्या परम भागवत शिरोमणीचे चरित्रच रामप्रेमप्राप्तीचे**

**अधिक सुलभ साधन आहे** हे येथे सुचविले आहे; पण विश्वासाश्रित श्रद्धेने संतमुखाने दीर्घकाळ श्रवण केले पाहिजे. मानसांतील भरतचरित्र श्रोत्यांचे हृदय राम प्रेममय करण्यास पूर्ण समर्थ आहे.

*हिं.* *। देखि दयाल दसा सबही की । राम सुजान जानि जन जी की ॥४॥*
*। धरम धुरीन धीर नय नागर । सत्य सनेह सील सुख सागर ॥५॥*
*। देसु कालु लखि समउ समाजू । नीति प्रीति पालक रघुराजू ॥६॥*
*। बोले बचन बानि सरबसु से । हित परिनाम सुनत ससि रसु से ॥७॥*

*म.* *। बघुनि दयाल दशा सकलांची । राम सुज्ञ जाणुनि जन-जिविंची ॥४॥*
*। धर्म-धुरीण धीर नय-नागर । सत्य-स्नेह-शील-सुख-सागर ॥५॥*
*। देश काल गति बघुनि समाजा । नीती-प्रीति-पाल रघुराजा ॥६॥*
*। वचन बोलले गिरा - सारसें । हित-परिणामि कानिं शशि रससें ॥७॥*

**अर्थ** - दयाळु व सूज्ञ (सुजाण) रामचंद्रांनी सर्वांची दशा व भक्ताच्या (जन) जीवींची (स्थिति व इच्छा) पाहिली, जाणली.॥४॥ (आणि) धर्मधुरीण, धीर, नीतिनिपुण व सत्य स्नेह शील व सुख यांचे सागर.॥५॥ नीतीचे व प्रीतीचे पालक रघुराज, देशकाल परिस्थिति व समाज पाहून - ॥६॥ वचन बोलले; ते वाणीच्या सारा (सर्वस्वा) सारखे, परिणामी हित करणारे व कानांना (ऐकण्यास) चंद्राच्या सारा सारखे (चंद्रामृतासारखे) आहे.॥७॥

**टीका. - सूचना - 'दिसले कृपाब्धिला जन विव्हळ । स्नेहें निज भारी सुरमति-छळ ।'** (३०३।९) तेव्हा आता काय करावयाचे याचा विचार करू लागले; तो विचार रघुनाथांनी केला व लोकांचे चित्तही श्रवणक्षम झाले आहे, म्हणून ते कथासूत्र आता हाती घेतात.

**चौ. ४ - (१) जाणुनि जनजिविंची** - भरताच्या जीवीचे आर्त काय आहे हे जाणले; भरताची तळमळ का व कशासाठी चालली आहे हे जाणले व आता बोलण्यास प्रारंभ करीत आहेत. पुढील तीन चौपायांत रघुराज वक्त्याचे गुण, त्यांच्या वाणीचे गुण व परिणाम यांचे वर्णन आहे.

**चौ. ५-६ (१) धर्मधुरीण** - सर्वांच्या आधी आहेच ! धर्म व **धीर** सोडणार नाहीत; व भरताच्या हृदयाला धीर देतील. **नयनागर** - नीतिनिपुण; नीतीचा त्याग करणार नाहीत; **(क) सत्य, स्नेह** व **शील** यांचा त्याग करणार नाहीत.

स्वतः **सुखसागर** राहून सर्वांना सुखी करतील. **(ख) नीतीचा** भंग न करता **प्रीतीचे** रक्षण करतील; पण **रघुराज** होतील, रघुराज पदवी मान्य करतील; हे सर्व या विशेषणांनी सुचविले आहे. यांतील भावांचे विस्तृत वर्णन वसिष्ठ भाषणांत (२५४।२-७) पूर्वी केले आहे. येथेही प्रीतीच्या आधी नीति आहेच !

**चौ. ७ - (१)** यांत रघुराजांच्या वाणीची विशेषणे आहेत. **गिरासार** - वाणीचे सारसर्वस्व. या भाषणापेक्षा साररूपाने अधिक सांगणे कोणाच्याही वाणीला शक्य नाही. **(क) शशिरस =** चंद्रांतील रस = चंद्रांतील सार = चंद्रामृत. हेच विशेषण भरताच्या आचरणाला लावले आहे. 'रामस्नेहिं सुधाकर-सारहि' (३२६।८) चंद्रामृत आल्हाद, प्रसन्नता देणारे असून तापनिवारण करून शीतलता देते. त्यांतील स्वाद फक्त चकोरच घेऊ शकतात. तसा भरत जनक मुनि इत्यादी देवमायेतून बचलेल्यांना स्वाद लाभेल. बाकीच्यांचे कान तृप्त होतील त्यांतील गोडीने. **(ख) परिणाम** सर्वांचे हित होणार. धर्म, नीति व प्रीति यांचे रक्षण करून सर्वांचे हित होईल असा मार्ग राम आता दाखविणार आहेत.

## श्रीराम-भाषण (३०४।८ - ३०६)

*हिं.* *। तात भरत तुम्ह धरम धुरीना । लोक बेद बिद परम प्रबीना ॥८॥*

*हिं.दो.* *। करम बचन मानस बिमल तुम्ह समान तुम्ह तात ॥*

*॥ गुर समाज लघु बंधु गुन कुसमयँ किमि कहि जात ॥३०४॥*

*म.* *। तात भरत तुम्हिं धर्मधुरिण हि । लोक-वेदवित् प्रेमीं प्रविण हि ॥८॥*

*म.दो.* *। कर्म-वचन-मानस-विमल तुम्हीं तुम्हां सम तात ॥*

*॥ गुरु-समाजिं लघुबंधुगुण कुसमयिं कीं कथितात ? ॥३०४॥*

**अर्थ** - तात भरत ! तुम्ही धर्मधुरीण असून लोक व वेद जाणणारे व प्रेमांत प्रवीण आहांत.॥८॥ कर्माने वाणीने व मनाने तुम्ही विमल असून, तात ! तुमच्या सारखे तुम्हीच आहात; गुरुंच्या (मोठ्यांच्या) समाजात धाकट्या भावाचे गुण कुसमयीं कोणी सांगतात का ? ॥दो.३०४॥

**टीका. - (१)** भरतांनी आपल्या मागील भाषणांत प्रभूची असामान्य महती व स्वतःची परम नीचता, प्रभूचे गुण व आपले दोष इत्यादी प्रकारे पूर्ण विषमता दाखविली. म्हणून येथे राम सांगतात की तुम्ही निर्दोष, निष्पाप आहात धर्मधुरीण आहात, स्वामीद्रोही तुम्ही नसून तुम्ही प्रेम करण्यात प्रवीण आहात. कर्माने,

वाणीने व मनाने इतके विमल आहात की तुमच्या सारखा कोणी नाही. (क) **लोकविद** - लोक व्यवहार, आचरण, नीति वगैरे जाणणारे. **वेदविद =** वेदशास्त्रपुराण इतिहास इत्यादींत पारंगत आहेत. (ख) **गुरुसमाजिं...कुसमयिं कीं कथितात ?** धाकटा भाऊ पुत्राप्रमाणे असल्याने त्याच्या गुणांचे वर्णन करणेच अयोग्य आहे; त्यांतही त्यांच्या मुखावर व गुरुजनांच्या समाजात ते करणे फारच अनुचित आहे. शिवाय ही वेळ आनंदाची, कोणाचे गुण वर्णित बसण्याची नाही; कारण सर्व लोक दुःख, भय, चिंता, अस्वस्थता इत्यादींनी व्याकुळ झालेले आहेत. अशा वेळी ते करणे अत्यंत अयोग्य, कोणीही अशा परिस्थितीत तसे करणार नाहीत. ल. ठे. **येथे सुद्धा धर्म आधी व प्रेम शेवटी आहे.**

*हिं.* ***। जानहु तात तरनि कुल रीती । सत्यसंध पितु कीरति प्रीती ॥१॥***
***। समउ समाजु लाज गुरजन की । उदासीन हित अनहित मन की ॥२॥***
***। तुम्हहि बिदित सबही कर करमू । आपन मोर परम हित धरमू ॥३॥***
***। मोहि सब भाँति भरोस तुम्हारा । तदपि कहउँ अवसर अनुसारा ॥४॥***

*म.* ***। जाणा तात तरणिकुल-रीती । सत्यसंध - पितृ - कीर्ती - प्रीती ॥१॥***
***। गुरुजन लाज समाज हि समया । मित्र-शत्रु नी मध्यम-हृदया ॥२॥***
***। जाणां तुम्हिं सकलांचे कर्मा । स्वीय मदीय परमहित धर्मा ॥३॥***
***। मजसि भरंवसा तुमचा भारी । तदपि सांगुं अवसर-अनुसारी ॥४॥***

**अर्थ** - तात तुम्ही तरणि (सूर्य) कुळाची रीत, सत्यप्रतिज्ञ पित्याची कीर्ती व प्रीती ॥१॥ गुरुजनांची लाज, समाज आणि समय; मित्र शत्रु व मध्यम (उदासीन) यांचे हृदय (त्यांच्या मनांतील भावना) या सर्व गोष्टी जाणतां.॥२॥ तुम्हांला सर्वांचे कर्म, तुमचे स्वतःचे परमहित व धर्म आणि माझे परमहित व धर्म हे सर्व माहीत आहे.॥३॥ मला तुमचा भारी भरवसा वाटतो - (आहे); तथापि प्रसंगानुसार काही सांगतो.॥४॥

**टीका. चौ.** (१) **तरणिकुल रीती - 'रघुकुलरीतिस कदा खंड ना । जावो प्राणहि वचन भंग ना'** (२।२८।४) (क) **'तरणि'** शब्द क्लिष्ट आहे. तरणि = तरन्ति अनेन संसारम् = सूर्य, तरन्ति अनया = तरणि = नौका. कुल = जनपद - देश, गोत्र. 'कुलं जनपदे गोत्रे (मेदिनी). **ज्याच्या योगाने देश उद्धरून जातो ते तरणिकुल.** (ख) **सत्यसंध पितृ कीर्ती - प्रीती -** आपले पिता सत्यप्रतिज्ञ तर इतके की तेवढ्यासाठी प्राणप्रिय पुत्राचा त्याग केला व प्रीती तर इतकी की रामविरहाने

देहत्याग केला. या दोन्ही गोष्टींमुळे कीर्ति अखिल ब्रह्मांडांत पसरली. सुचविले की प्रतिज्ञापालनाची सवड मला द्या व तुम्ही पितृवचन पालनाची तयारी करा.

**चौ. २ (१) गुरुजनलाज** - सर्व गुरुजन तुमच्या व माझ्या मुखाकडे बघत आहेत - त्यांची लाज राखली पाहिजे. आपल्या आचरणाने - विद्यमान गुरुजनांना, पूर्वजांना, पितरांना लाजेने मान खाली घालावी लागणार नाही असे आपण दोघांनी वागले पाहिजे हे तुम्ही जाणता. **(क) समाजा समया** - समय तर इतका बिकट आहे की अयोध्येतील व मिथिलेतील सर्व नरनारी बालवृद्ध समाज येथे आहे व वनवास दुःख भोगीत आहे; केवळ तुमच्या व माझ्यामुळे सर्व समाज दुःखी, शोकाकुल, निःशक्त व कृश झाला आहे. पावसाळा आता सुरू झालाच म्हणून समजा. अशा दशेत समाज वनात राहणे बरे नाही हे तुम्हीही जाणताच. **(ख) मित्र-शत्रु नी मध्यम-हृदयां** - दोन्ही नगरीतले मित्र आहेत ते सर्व येथे आहेत; दोन्ही नगरींचे राजे, सचिव व मुनि नगरींत नाहीत. त्यामुळे दोन्ही नगरी सुरक्षित नाहीत. शत्रू तर अशा संधीची वाटच पहात असतात व मध्यम असतात ते उदासीन, बेफिकीर राहतात हे तुम्ही जाणताच.

**चौ. ३-४ (१) जाणां सकलांचे कर्मा...** धर्मा - राजाचे कर्तव्य, क्षत्रियाचे कर्तव्य विप्र धेनु यज्ञादिसंरक्षण, प्रजासंरक्षण इत्यादी व तुमचे कर्तव्य, स्वीय = स्वतःचे मदीय = माझे, माझे कर्तव्य १४ वर्षे वनवास इ. पालन करणे हा धर्म आहे; आणि धर्माचे पालन केले तरच परम हित होते हे सर्व तुम्ही जाणता; व त्या प्रमाणे तुम्ही वागाल असा मला तुमच्याविषयी पूर्ण विश्वास आहे. तथापि कर्तव्य म्हणून सांगणे भाग आहे म्हणून काही सांगतो.

*हिं.* *। तात तात बिनु बात हमारी । केवल गुरकुल कृपा सँभारी ॥५॥*
*। न तरु प्रजा परिजन परिवारु । हमहि सहित सब होत खुआरु ॥६॥*
*। जौं बिनु अवसर अथवँ दिनेसू । जग केहि कहहु न होइ कलेसू ॥७॥*
*। तस उतपातु तात बिधि कीन्हा । मुनि मिथिलेस राखि सबु लीन्हा ॥८॥*

*म.* *। तात तातविण दशा आपली । पूर्ण गुरुकृपें मात्र वाचली ॥५॥*
*। न तों प्रजा परिजन परिवारा । होता नाश आम्हांसह सारा ॥६॥*
*। जर अकाळिं मावळे दिनेश । वदा कुणा जगिं नव्हती क्लेश ॥७॥*
*। हा उत्पात तसा विधि विरचित । मुनि मिथिलेश्वर सर्व वाचवित ॥८॥*

**अर्थ** - तात ! पित्याच्या अभावी होणारी आपली दुर्दशा केवळ कुलगुरुंच्या

पूर्ण कृपेने वाचली.।।५।। नाही तर प्रजा, सेवक, वर्ग व परिवार यांचा आमच्या सुद्धा नाश झाला असता.।।६।। सूर्य-दिनेश जर अकाळी मावळला तर जगात कोणाला क्लेश होणार नाहीत सांगा बरं ! ।।७।। तसाच हा दैवाने उत्पात केला होता पण मुनि (वसिष्ठ) व मिथिलापति यांनी वाचविला.।।८।।

**टीका. चौ. ५-६ (१) गुरुकृपें मात्र वाचली** - गुरुकृपेचे पाठबळ नसते तर राजा नसलेल्या राजधानीवर केव्हाच कोणीतरी आक्रमण केले असते; किंवा प्रजेत अधर्मवृद्धि झाली असती; ब्राह्मण ऋषिमुनि सोडून गेले असते; चोरलुटारू यांनी प्रजेचा छळ केला असता व आपल्या पूर्वजांना व तुम्हा आम्हाला नर्काचे दरवाजे उघडले गेले असते; व अशा प्रकारे **होता नाश अम्हांसह सारा.** धर्म विनाशासारखा दुसरा मोठा विनाश नाही; या विनाशाला व उत्पाताला दृष्टान्त देतात -

**चौ. ७-८ (१) जर अकाळिं मावळे दिनेश...क्लेश** - या दृष्टान्ताने सुचविले की दशरथ अकाळी मरण पावले. **'क्षीण नृपति कौसल्ये भासत । जाणे रविकुळरवी मावळत'** (२।१५४।३) असे दशरथ मरणसमयीच म्हटले आहे. नुकते कानाजवळचे केस पांढरे होऊ लागले होते; म्हणजे वृद्धपणाचा आरंभच झाला होता. चार पुत्र असून मरणकाळी एकही जवळ नाही हाही अकाळच. एक जरी हजर असता तरी त्यांनी आपल्या देखतच राज्याची व्यवस्था लावली असती व राजविहीन राज्य असा आजच्या सारखा प्रसंग आला नसता. सूर्य अकाळी मावळला तर सर्व जगातच हाहाकार उडून जाईल. काही भागांत अति उष्णतेने लोक मरतील व काही भागांत अति थंडीने मरतील. एके ठिकाणी अकाळी मावळला की काही ठिकाणी अकाळी उगवणारच. **(क)** असाच उत्पात म्हणजे दशरथ मरण दैवाने घडविले; पण **मुनि मिथिलेश्वर सर्व वाचवित.** प्रथम वसिष्ठांचाच उल्लेख आहे; कारण की त्यांनीच प्रथम संरक्षण केले. नंतर मिथिलापतींना कळले. त्यांनी जरी काही विधायक कार्य केलेले दिसत नाही तरी विघातक कार्य केले नाही. त्यांनी अयोध्येवर स्वारी करून भरतादिकांस कैदेत ठेऊन, कैकयीला दंड शिक्षा करून सत्ता आपल्या हाती घेतली असती तर सहज होण्यासारखे होते. किंवा रघुनाथांस परत नेऊन राज्यावर बसविले असते तर राम नाही म्हणू शकले नसते. यानेही धर्मविनाश झालाच असता; दशरथांची प्रतिज्ञा व रामाची प्रतिज्ञा खोटी ठरलीच असती. गोस्वामींनी आपल्या आयुष्यांत मोंगल बादशाहीतील आपसांतील भाऊबंदकी पाहिली होती हे लक्षात ठेवावे.

*हिं.दो. । राज काज सब लाज पति धरम धरनि धन धाम ॥*
*॥ गुर प्रभाउ पालिहि सबहि भल होइहि परिनाम ॥३०५॥*
*हिं. । सहित समाज तुम्हार हमारा । घर बन गुर प्रसाद रखवारा ॥१॥*
*। मातु पिता गुर स्वामि निदेसू । सकल धरम धरनीधर सेसू ॥२॥*
*। सो तुम्ह करहु करावहु मोहू । तात तरनिकुल पालक होहू ॥३॥*
***म.दो.। राज्यकाज सब लाज पत धर्म धरणि धन धाम ॥***
***॥ गुरुमहिमा पाळिल सकल शुभ होइल परिणाम ॥३०५॥***
***म. । सहित समाजा तुमचा अमचा । गृहिं वनिं पाता प्रसाद गुरुचा ॥१॥***
***। गुरु - पितृ - माता - स्वामि - निदेश । सकल - धर्म - धरणी - धर शेष ॥२॥***
***। तें तुम्हिं करुनि मज हिं करुं द्यावें । तात ! तरणिकुल-पालक व्हावें ॥३॥***

**अर्थ** - सर्व राज्यकार्य, लाज व पत (प्रतिष्ठा) धर्म; धरणी, धन व घर या सर्वांचे पालन गुरू महिमा (च) करील व परिणाम शुभ होईल.॥दो.३०५॥ समाजा सहित तुमचा घरी व आमचा वनात रक्षक (पाता) गुरुप्रसादच आहे.॥१॥ गुरु, माता, पिता व स्वामी यांची आज्ञा (आज्ञेचे पालन) सकल धर्मरूपी, धरणीला धारण करणारा शेष आहे.॥२॥ (म्हणून) ते (आज्ञापालन) तुम्ही करावे व मला करू द्यावे व तात ! तुम्ही तरणिकुलाचे पालक व्हावे.॥३॥

**टीका. - दो. (१) गुरुमहिमा पाळिल सकल** - राज्यकारभार पाहणे वगैरे कार्य, राजांचे क्षत्रियांचे आहे. पण त्यांच्या पाठीशी समर्थ गुरुचा महिमा-प्रभाव-असेल तर सर्व गोष्टी निर्विघ्नपणे पार पडून राजांना यश मिळते. आपल्या परम भाग्याने गुरु असे लाभले आहेत की जगातील कोणत्याही क्षत्रिय सामर्थ्याचा ते एकटे निःशस्त्र असून पराभव करू शकतात; फार काय ब्रह्मदेवाचा लेख सुद्धा ते बदलू शकतात; पण त्यांना क्षत्रिय धर्माचे आचरण करण्यास लावणे हा आमचा क्षत्रियांचा, रघुवंशियांचा तरी धर्म नाही. आम्ही निमित्तमात्र पुढे असलो की त्यांचा प्रभावच सर्व काही करील; व फुकटचा मोठेपणा आमच्या पदरात टाकील.

**चौ. १ - (१) सहित समाजा तुमचा...प्रसाद गुरुचा** - लक्ष्मणसहित आम्ही वनात निश्चिंत, निर्भय रहातो, व कशाचीही बाधा होत नाही व काही कमी पडत नाही याचे कारण गुरुचा प्रसादच आहे. तोच समाजासह तुमचेही घरी रक्षण करील. पाता = रक्षक. येथे ओघाओघाने सहज सांगून टाकले की तुम्ही समाजासह घरी जाऊन राज्यव्यवस्था पाहणे तुमचे कर्तव्य आहे. हेही सुचविले

की आम्ही वनात राहणार. गुरुमहिमा व प्रसाद (अनुग्रह) केव्हा उपयोगी पडतात ते आता सुचवितात -

**चौ. २-३ (१) गुरु, पिता, माता व स्वामी** यांच्या आज्ञेचे पालन केले तरच गुरु प्रभाव व गुरुप्रसाद आमचे पालन करतील. नुसते आमचेच नव्हे तर आमच्या सर्व धर्माचे पालन गुरुप्रसादच करील. एकटा शेष जसा सर्व पृथ्वीला आपल्या एकाच फणेवर धारण करतो तसाच आज्ञापालनरुपी शेष गुरुप्रभावप्रसाद रूपी फणेवर आमच्या सर्व धर्मरूपी धरणीला धारण करील. फणा नसला तरी शेष धारण करू शकणार नाही. **(क)** माता व पिता यांची आज्ञा आहे की भरताने राज्य करावे, त्या आज्ञेला वसिष्ठ गुरुंनी स्वतःच दरबारात पूर्ण संमति दिलेली आहे. स्वामी शब्दाने येथे भरतांच्या भावने प्रमाणे स्वतःची आज्ञा सूचित केली. भरत रामचंद्रांसच स्वामी मानतात. आज्ञा द्या म्हणून विनंती केली होती त्याप्रमाणे येथे अप्रत्यक्ष रीत्या आज्ञा दिली आहे. **(ख) तें तुम्हिं करुनि मला करुं द्यावें - तें** = आज्ञा पालन. ज्याच्या वाटणीस जे आले आहे ते तुम्ही व आम्ही करावे व करू द्यावे. असे केले तरच तरणि कुलाचे पालन होईल; ते तुम्ही करावे. करणे तुमच्या हाती आहे. (तुम्ही करालच असा पूर्ण भरवंसा असल्याचे पूर्वीच सांगितले आहे.)

***हिं. । साधक एक सकल सिधि देनी । कीरति सुगति भूतिमय बेनी ॥४॥***
***। सो बिचारी सहि संकटु भारी । करहु प्रजा परिबारु सुखारी ॥५॥***
***। बाँटी बिपति सबहिं मोहि भाई । तुम्हहि अवधि भरि बड़ि कठिनाई ॥६॥***
***। जानि तुम्हहि मृदु कहउँ कठोरा । कुसमयँ तात न अनुचित मोरा ॥७॥***
***। होहिं कुठायँ सुबंधु सहाए । ओड़िअहिं हाथ असनिहु के घाए ॥८॥***

***म. । सिद्धिद एक साधका सर्वहि । कीर्ती सुगति भूतिमय वेणि हि ॥४॥***
***। या बिचारिं अति संकट राहणें । सुखी प्रजे परिवारा करणें ॥५॥***
***। मम विपत्ति सर्वांत विभक्ता । तुम्हां अवधिभर फार कठिणता ॥६॥***
***। तुम्हिं मृदु कळतहि कठिण सांगतो । अनुचित ना मम कठिण काळ तों ॥७॥***
***। संकटिं करिति सुबंधु सहाया । करचि वारितो अशनी-घायां ॥८॥***

**अर्थ** - (आज्ञा ही) साधकाला सर्वच सिद्धी देणारी एक कीर्ती, सद्‌गति (सुगति) व भूतिमय त्रिवेणीच आहे.॥४॥ या विचाराने मोठे संकट सोसणे व प्रजेला व परिवाराला तुम्ही सुखी करणे (योग्य आहे).॥५॥ विपत्ती माझ्यासह सर्वांमध्येच विभागली - वाटली - गेली आहे; पण तुम्हाला १४ वर्षाच्या अवधीत

फार कठीण आहे.॥६॥ तुम्हीं मृदु आहात हे कळत असूनसुद्धा मी तुम्हाला कठिण (कार्य) सांगत आहे; पण हे माझे करणे अनुचित नाही कारण की काळच कठीण आहे.॥७॥ संकटकाळी चांगले बंधूच साह्य करतात; हातच वज्राचे घाव निवारण करतो.॥८॥

**टीका. चौ. ४ - (१) सिद्धिद एक साधका सर्वहि - वेणिहि - वेणि =** वेणीं = त्रिवेणी. मातापित्यांची आज्ञा, गुरुंची आज्ञा व स्वामींची आज्ञा या क्रमशः गंगा-सरस्वती व यमुना आहेत. यांचे पालन ही त्रिवेणी आहे. त्रिवेणी धर्म = कीर्ति; अर्थकाम = विभूति, भूति, व मोक्ष = सद्‍गति देते; म्हणजेच कीर्ति, सद्‍गति व भूति यांची बनलेली आहे. तशीच आज्ञापालनरूपी त्रिवेणी कीर्ति सुगति व भूतिमयच आहे. धर्माने पुण्यसंग्रह होणे व पुण्याईने कीर्ति मिळते. **'पुण्याविण किं मिळे यश पावन'** (७।११२।७). सुगति = मोक्ष, मुक्ति ज्ञानाने मिळते. **'ज्ञान मोक्ष दे..'** (३।१६।१). **'गुरुविण नोहे ज्ञान'** (७।८९). **'ब्रह्मविचार प्रचार सरस्वति'** (१।२।८) म्हणून गुरुची आज्ञा ही सरस्वती हे मानसाधारेच सिद्ध झाले. **(क) 'नास्ति मात्रासमं तीर्थं'** (स्कं. पु.) **'न ह्यतो धर्मचरणं किंचिदस्ति महत्तरम् ॥ यथा पितरि शुश्रूषा तस्य वा वचनक्रिया'** (वा.रा. २।१९।२२) **'सर्व धर्मि पित्राज्ञा श्रेष्ट चि'** (२।५५।८) यावरून ठरले की सर्वतीर्थमयी गंगा = मातापित्यांची आज्ञा. शेष राहिली ती स्वामींची आज्ञा = यमुना = विभूति (भूति) 'विभूतिर्भूतिरैश्वर्यम्' (अमरे) 'विधिनिषेधमय कलिमल हरणी । कर्मकथा ती भानुनन्दनी' (१।२।९) कर्मानेच ऐश्वर्य मिळते. स्वामी संतुष्ट झाले की अर्थ-ऐश्वर्य लाभ सहज होतो. सारांश : **आईबापांची आज्ञा = गंगा = कीर्ति; गुरुची आज्ञा = सरस्वती = सुगति = मुक्ति; आणि स्वामींची आज्ञा यमुना = भूति, ऐश्वर्य, धरणिधाम धन राज्य इ.**

**चौ. ५ (१) या बिचारिं... सुखी प्रजे परिवारा करणें** - माझ्या वियोगांत १४ वर्षे राहणे हे मोठे संकट आहे खरे; पण लक्षावधि प्रजेला सुखी करण्यासाठी, सर्व माता व परिवार व विप्र यांना सुख देण्यासाठी महासंकट व अति दुःखसंकट सोसणे हे तर तरणि कुळाचे व सज्जनांचे ब्रीद आहे. **'संत सहति दुःख परहितलागी' 'भूर्जतरुसम कृपालु संतहि । परहितिं सहति विपद अति सततहि'** (७।१२१।१५-१६)

**चौ. ६ (१) मम बिपत्ति सर्वांत विभक्ता** - वनवास ही रामावर आलेली

विपत्ति अयोध्यावासी सर्वांनाच कमी अधिक प्रमाणात भोगावी लागत आहे. गुरुमहाराजांवरच किती जबाबदारी येऊन पडली ! मातांच्या विपत्तीची कल्पना इतरांना कशी येणार ! त्यांना तर जन्मभर विपत्तींतच रहावे लागणार ! तुम्हाला तर सर्वांच्यापेक्षा फारच कठीण आहे. प्रजापालन, राज्यकारभार पाहणे इ. गोष्टी निमित्तमात्र बनून पण कराव्या लागणार ! पण ही तुमची कठीण दशा १४ वर्षांपर्यंतची मुदत संपेपर्यंत ! जास्त नाही.

**चौ. ७-८ (१) तुम्हि मृदु कळत हि... काळ तों** - तुम्ही फार कोवळ्या हृदयाचे असल्याने हे सोसणे तुम्हाला फारच जड जाणार हे कळत असूनसुद्धा हे सांगावे लागत आहे; पण प्रसंगच फार कठीण आहे त्याला मी तरी काय करणार ! पण ही कठिणता कठीण काळ असेपर्यंतच. **(क) संकटिं करिति सुबंधु सहाया** - उत्सवे व्यसने चैव दुर्भिक्षे शत्रुविग्रहे ।। राजद्वारे श्मशानेच यस्तिष्ठति स बांधवः ।। हे बंधु, बांधव यांचे लक्षण आहे; मग सुबंधु कर्तव्य तर यापेक्षा फारच जबाबदारीचे असणाराच. दृष्टान्त फारच मार्मिक देतात : **(ख) करचि वारतो अशनी - घायां** - येथे सुचविले की सुबंधु म्हणजे आपले दुसरे हातच ! ढाल तुटली तर नुसता हात पुढे होईल व स्वतः असेपर्यंत छातीवर घाव लागू न देता ते स्वतः आपल्यावर घेईल. असा वागेल तो सुबंधु. **लक्ष्मण उजवा हात आहेत व भरत डावा हात आहेत. 'बिपति बटावन बंधु बाँह बिनु करौं भरोसो का को'** विपत्तींत भागीदार होणाऱ्या बंधुरूपी बाहूशिवाय मी कोणाचा भरंवसा धरू' असे रघुवीर लक्ष्मणांस शक्ती लागल्यावर त्यांना उद्देशून म्हणत आहेत. (गीता. ६।७). **'मेरो सब पुरुषारथ थाको'** पद पहावे. लक्ष्मण रामाच्या उजव्या हातालाच मंदिरात दिसतात. **'भुज दाहिनी गँबाई'** असे रामच म्हणाले (गीता. लं.कां.पद ६।४) दाहिनी भुज = उजवा हात.

*हिं.दो.* ***। सेवक करपद नयन से मुख सो साहिब होइ ॥***
***॥ तुलसी प्रीति कि रीति सुनि सुकबि सराहहिं सोइ ॥३०६॥***

*म.दो.* ***। सेवक कर - पद - नयनसे स्वामी मुखा समान ॥***
***॥ प्रीति रीति तुलसी श्रवुनि सुकवि करिति सद्गान ॥३०६॥***

**अर्थ** - सेवक हात पाय डोळे यांच्या सारखे असावे आणि स्वामी मुखासारखा असावा. तुलसीदास म्हणतात की ही प्रीतीची रीति ऐकून सुकवि तिचे गान-प्रशंसा-करतात.।।३०६।।

**टीका.** - यांतील रूपकाने दाखविले आहे की **स्वामी व सेवक यांचा संबंध परस्पर सहायक, पोषक व संरक्षक असा असावा.** नेत्र-नयन हे मुखाचेच अवयव आहेत; नेत्र असतील तरच मुखाची शोभा आहे; व मुख असेल तरच हातपाय इ. अवयवांचे अस्तित्व असणार. असेच राजा व प्रजा यांचे असले पाहिजे. **(क)** हे वचन रामाकडे लावावयाचे तर लक्ष्मण व भरत हे दोन नयन आहेत. नीयते अनेन इति नयनः' (अ.व्या.सु.) **ज्यानें नेला जातो तो नयन.** नयन नसतील तर मुखाला इष्ट दिशेने व योग्य मार्गाने सुखाने जाता येणार नाही; तसेच पायांचे; पायांत काटे केव्हा बोचतील, खाड्यांत केव्हा पडतील याचा नेम नाही. **(ख)** मुख विविध पदार्थांचे सेवन करते ते हातांच्याच साह्याने; पण ते स्वतः चव तेवढी जाणते व तीसुद्धा हातपायादिकांचे हित करण्यासाठी व अहित टाळण्यासाठी. सर्व अन्नादिकांचा रस करून सर्वांच्या पालन पोषणासाठी योग्य मार्गाने शरीरात पाठवून देते. स्वामी-राजा-शासक-अधिकारी, मुख्य असा मुखासमान असावा. **(ग)** हात, पाय, नेत्र इत्यादी सेवकांकडून मुख जी सेवा करवून घेते ती स्वतःसाठी नसून त्या सेवकांच्यासाठीच घेते. हे मर्म स्वामी व सेवक यांनी जाणले तर दोन्ही बाजूंना सुख होईल. डोळे व हातपाय असहकार करतील तर ते स्वतः दुर्बल, अशक्त, कृश होतील व मुखही कृश होईल, पण मुखानेच असहकार केला तर देहरूपी राष्ट्राचाच नाश होईल; याने सुचविले की तुम्ही राज्यसूत्रे हाती न घेतल्यास माझा, तुमचा व सर्व प्रजेचा, परिवाराचा वगैरे सर्वांचाच विनाश होईल. या दोह्याच्या अर्थाची पूर्ती पुढे (३१५, ३१६।१) होणार आहे. **(घ) प्रीतिरीति** - मुख व करचरणनेत्र इत्यादी अवयव यांचे जसे परस्पर अत्यंत प्रेम असते तसेच स्वामी व सेवक यांत असावे. येथे श्रीराम भाषण समाप्त झाले. आता याचा परिणाम चौपायांत सांगतात.

*हिं.* *। सभा सकल सुनि रघुबर बानी । प्रेम पयोधि अमिअँ जनु सानी ॥१॥*
*। सिथिल समाज सनेह समाधी । देखि दसा चुप सारद साधी ॥२॥*
*। भरतहि भयउ परम संतोषू । सनमुख स्वामि बिमुख दुख दोषू ॥३॥*
*। मुख प्रसन्न मन मिटा बिषादू । भा जनु गूँगेहि गिरा प्रसादू ॥४॥*

*म.* *। श्रवुनि सभा सब रघुवर-भाषित । प्रेमपयोधि-सुधेमधिं मिश्रित ॥१॥*
*। स्नेह समाधिंत शिथिल लोक ते । बघुनि शारदा मौना धरते ॥२॥*
*। भरता प्राप्त परम परितोष किं । सम्मुख नाथ विमुख दुख दोष किं ॥३॥*
*। मुख प्रसन्न मन बिषाद मिटला । गिरा-प्रसाद किं मूका मिळाला ॥४॥*

**अर्थ** - प्रेमरूपी क्षीरसागरांतून काढलेल्या सुधेमध्ये (अमृतांत) मिसळलेले रघुवराचे भाषण ऐकून - ॥१॥ ते सर्व लोक स्नेहसमाधीत (मग्न झाल्यामुळे) शिथिल झाले; हे पाहून शारदेने मौन धरले.॥२॥ भरताला परम परितोष प्राप्त झाला की नाथ - (स्वामी) सम्मुख (अनुकूल, प्रसन्न) झाले आणि दुःख व दोष विमुख झाले-गेले.॥३॥ मुख प्रसन्न झाले (कारण) मन प्रसन्न होऊन विषाद नष्ट झाला; (व इतका आनंद झाला की) जणू मुक्याला सरस्वतीचाच प्रसाद मिळाला. (सरस्वतीच प्रसन्न झाली त्यावर).॥४॥

**टीका. चौ. १-२ (१) प्रेमपयोधि सुधेमधिं मिश्रित - 'प्रेम अमृत मंदर विरह भरत पयोधि गंभीर। काढि मथुनि सुर साधु हित कृपासिंधु रघुबीर'** (२३८) **प्रेमपयोनिधि भाइ** (भरत) (२१७) प्रेमपयोनिधि = प्रेमपयोधि = भरत. त्यांतून काढलेले प्रेमरूपी अमृत, सुधा. भरताविषयीच्या शुद्ध प्रेमाने थबथबणारे भाषण ऐकले. लोक सर्व समाज स्नेहसमाधीत मग्न झाला व त्यांची सर्व इंद्रिये शिथिल पडली. जडासारखी तटस्थ दशा प्राप्त झाली. ते पाहून जणू शारदेने मौन धरले; सर्वांची वाणी निरुद्ध झाली; कोणी काही बोलू शकेनात. असा परिणाम सभेवर झाला.

**चौ. ३-४ (१) 'भरता प्राप्त परम परितोष किं सम्मुख नाथ** - स्वामी प्रसन्न झाले अशी खात्री झाल्यामुळे परम संतोष वाटला. **'आज्ञेसमान सुसाहिब सेवा। तो प्रसाद जन लाभो देवा'** (३०१।४) **'द्यावि देव आज्ञा अता ती करि मज निर्दोष'** (३००) अशी केलेली विनंती मान्य करून आज्ञा दिली व आज्ञेने सर्व दोष पळवून लावले. दोष गेल्याने दुःखही राहिले नाही. **(क) गिरा प्रसाद किं मूका मिळला.** सर्वांच्यावर जणूं अप्रसन्न झालेली शारदा भरतांवर प्रसन्न झाली. आता परम प्रसन्न झालेले भरत बोलतील.

*हिं.* *। कीन्ह सप्रेम प्रनाम बहोरी । बोले पानि पंकरुह जोरी ॥५॥*
*। नाथ भयउ सुखु साथ गए को । लहेऊ लाहु जग जनमु भए को ॥६॥*
*। अब कृपाल जस आयसु होई । करौं सीस धरि सादर सोई ॥७॥*
*। सो अवलंब देव मोहि देई । अवधि पारु पावौं जेहि सेई ॥८॥*

*म.* *। प्रेमें पुन्हां प्रणाम करोनी । वदति पाणिपंकजां जुळोनी ॥५॥*
*। साथ गमनसुख नाथ ! लाभलो । जगिं जन्माचा लाभ पावलो ॥६॥*
*। द्याल कृपाल अतां जें शासन । सादर शिरसा करीन पालन ॥७॥*
*। द्या काहीं अवलंबन देवा । लंघिन अवधि करुनि यत्सेवा ॥८॥*

**अर्थ** - पुन्हा प्रेमाने प्रणाम करून कमलांसारखे हात जोडून भरत म्हणाले की.।।५।। नाथ ! आपल्याबरोबर (वनांत -) गमन करण्याचे सुख मला मिळाले व या जगांत जन्मास आल्याचा लाभही मिळाला.।।६।। देव आता कृपाल ! आपण जी आज्ञा द्याल ती मी शिरसामान्य करून आदराने पालन करीन.।।७।। (पण) देवा ! ज्याची सेवा करून (१४ वर्षांचा) अवधि लंघन करता येइल असा काहीतरी आधार द्या-द्यावा.।।८।।

**टीका. चौ. ५-६ (१) प्रेमें पुन्हां प्रणाम - पुन्हां** (बहोरी) शब्दाने सुचविले की याच्या आधी एकदा जसा केला (३०१।६-७) होता तसा केला. भरत रामाच्या जवळ बसलेले आहेत; तेथेच पाय धरून पायांवर डोके ठेवले व उठून हात जोडून बोलू लागले. **(क) साथ गमनसुख लाभला - 'ना तर फिरवा बंधुयुग येतो मी प्रभुसाथ' (२६८)** अशी प्रार्थना पूर्वी केली होती. त्याबद्दल येथे सांगितले. भाव हा की मी आपल्यापासून दूर आहे असे आता मला वाटणार नाही. आपली आज्ञा मी शिरावर धारण केली की मी नित्य आपल्या पायांपाशी आहे असे मला वाटेल; पण एक गोष्ट द्या म्हणजे झाले. (८). **(ख) जनिं जन्माचा लाभ पावलो - 'मम जन्मचि रघुनाथ वनास्तव' (१८२।८). १६४।५-६; २०१।६ पहा.** असे जे वाटत होते ते सर्व जाऊन आता वाटू लागले की जन्म सुफल झाला. याचे एकच कारण, स्वामी प्रसन्न होऊन त्यांनी आज्ञा दिली. आता एक इच्छा **'सहजे स्नेहें प्रभुची सेवा'** (३०१।३) ही राहिली आहे. त्यासाठी आता विनंती करतात.

**चौ. ७-८ - (१) द्याल कृपाल अतां जें शासन... पालन** - यांतील शासन = आज्ञा, पुढील गोष्टीविषयी आहे. मी येथून जाण्यास एका पायावर तयार आहे; पण कधी जाणे योग्य या विषयी आज्ञा, रामगिरि, रामवन इ. पाहण्याची इच्छा आहे त्या विषयी आज्ञा इत्यादि पुढील गोष्टी विषयी हा उल्लेख आहे. आता क्रमाने एकेक विनंती करतील. **(क) द्या काही अवलंबन... यत्सेवा - 'सहजें स्नेहे प्रभुची सेवा'** ही इच्छा राहिली आहे. वनांत बरोबर राहून सेवा करण्याचा योग नाही; म्हणून असे काही तरि द्यावे की ज्याची सेवा केली असता प्रत्यक्ष प्रभुसेवा केल्याचे समाधान मिळू शकेल. या मागणीची पूर्ति चरणपादुका देऊन प्रभु करणार आहेत. **(ख) लंघिन अवधि** - याने सुचविले की १४ वर्षे म्हणजे मोठा महासागर आहे; तो नुसता माझ्या बळावर पार करण्याची शक्ती माझ्यांत नाही; आपण काही आधार दिलात तर मात्र त्या आधाराची

**सेवारूपी नौका** मिळाल्यासारखे होईल व आपला **कृपाप्रसाद कर्णधार होईल** आणि मग अवधि सागर कसातरी लंघवेल.

*हिं. दो. । देव देव अभिषेक हित गुर अनुसासन पाइ ॥*
*॥ आनेउँ सब तीरथ सलिलु तेहि कहँ काह रजाइ ॥३०७॥*
*हिं. । एकु मनोरथु बड मन माहीं । सभयँ सकोच जात कहि नाहीं ॥१॥*
*। कहहु तात प्रभु आयसु पाई । बोले बानि सनेह सुहाई ॥२॥*
*। चित्रकूट सुचि थल तीरथ बन । खग मृग सर सरि निर्झर गिरि गन ॥३॥*
*। प्रभु पद अंकित अवनि बिसेषी । आयसु होइ त आवउँ देखी ॥४॥*
*म. दो. । देव ! देव अभिषेचना संमतिनें गुरुराय ॥*
*॥ तीर्थ सलिल सब आणिलें आज्ञा द्या करुं काय ॥३०७॥*
*म. । महा मनोरथ एक मना ही । भय-संकोचे वदवत नाहीं ॥१॥*
*। तात वदा प्रभु वदले जेव्हां । स्नेहें वदति वचन शुभ तेव्हां ॥२॥*
*। चित्रकूट शुचितीर्थे स्थळ वन । खग मृग सर सरि निर्झर गिरिगण ॥३॥*
*। प्रभु - चरणांकित अवनि विशेषें । जर आज्ञा, पाहीन अशेषें ॥४॥*

**अर्थ** - देव ! आपल्या अभिषेकासाठी गुरुरायांच्या संमतीने सर्व तीर्थांचे जल आणले आहे; त्याचे काय करू ती आज्ञा द्यावी ।।दो. ३०७।। एक मोठा मनोरथ मनांत आहे, पण भयाने व संकोचाने सांगवत नाही. ।।१।। 'तात ! सांगा ! असे जेव्हा प्रभु म्हणाले तेव्हा भरत स्नेहाने सुंदर वचन बोलले ।।२।। पवित्र चित्रकूट, त्यावरील पवित्र तीर्थे, पवित्र स्थळे, पावन वन, खग, पशु, तलाव नद्या निर्झर व पर्वत समूह ।।३।। आणि विशेषेकरून प्रभूच्या चरणांनी अंकित झालेली अवनि इ. सर्व, आज्ञा मिळाली तर निःशेष पहावी (एकदा) अशी (फार) इच्छा आहे. ।।४।।

**टीका - दो. (१) आज्ञा द्या करू काय** - गुरुरायांच्या संमतीने जे विविध तीर्थजल येथे आणले आहे ते परत न्यावयाचे की त्याचा काही दुसरा उपयोग करावयाचा या विषयी आज्ञा मागितली.

**चौ. १ - (१) महा मनोरथ** - एक प्रबल, अनावर इच्छा झाली आहे. **(क) - भय संकोचे वदवत नाही** - अशाच एका वचनाने अर्थ स्पष्ट होईल. **'हौस लक्ष्मणा मनीं आगळी । येउं जनकपुरि पाहुन सगळी ॥ प्रभुभय मुनिसंकोचहि वाटे ॥'** (१।२१८।१-२) भरतांस प्रभूचे भय वाटत आहे व वसिष्ठ मुनींचा संकोच

वाटत आहे. मी येथे असता याला वन पर्वत पाहण्याची इच्छा झाली आहे ! माझ्यापेक्षा यांचेच महत्व याला जास्त वाटत आहे असे प्रभूंना वाटून आपल्यावरील कृपा कमी होईल की काय **असे भय वाटत आहे**. सेवा करावयाची सोडून सृष्टिसौंदर्य पाहण्यास जातो असे कुलगुरु वसिष्ठ मुनींना वाटेल की काय या शंकेने विचारण्यास संकोच वाटत आहे. याने दाखविले की **भरतसुद्धा लक्ष्मणासारखेच संकोची स्वभावाचे आहेत.**

**चौ. ४ - (१) प्रभुचरणांकित अवनि विशेषें** - प्रभुचरणांच्या चिन्हानी परम पावन झालेली असल्याने ही सर्व भूमि विशेष **अवनि** = रक्षण करणारी, **उद्धार करणारी** झाली आहे. म्हणून पहावीशी वाटते. मातीत उमटलेली प्रभूंची पावले पाहिल्यावर भरतांचे प्रेम कसे वाढले याचे वर्णन पूर्वी केलेच आहे. (क) सर्व लोक (अयोध्यावासी) यापूर्वीच चित्रकूट वनपर्वतादि पाहून आले आहेत. भरतांच्या मनांतील शोकचिंतादाह शांत झाला नव्हता म्हणून त्यांस इच्छा झाली नव्हती. आता जी प्रबळ इच्छ झाली तिचे प्रेरक रघुवंशविभूषणच आहेत. **'भरत बघत गत भवरुज भारी'** (२१७।२) असे व्हावे व राम दर्शन पुण्याचे फळ महाभागवतोत्तम शिरोमणीचे दर्शन होऊन सर्वांना प्रेमभक्तीची प्राप्ति व्हावी या हेतूने **प्रभुंनीच कृपाळुपणाने ही प्रेरणा दिली आहे**. जनकपुरवासी लोकांनी ही चित्रकूट प्रदक्षिणा केलेली नाही.

*हिं. । अवसि अत्रि आयसु सिर धरहू । तात बिगत भय कानन चरहू ॥५॥*
*। मुनि प्रसाद बनु मंगल दाता । पावन परम सुहावन भ्राता ॥६॥*
*। रिषिनायकु जहँ आयसु देहीं । राखेहु तीरथ जल थल तेहीं ॥७॥*
*। प्रभु बचन भरत सुखु पावा । मुनि पद कमल मुदित सिरु नावा ॥८॥*

*म. । अत्रि-शासना अवश्य घेणें । तात विगतभय काननिं फिरणें ॥५॥*
*। मुनीकृपें मंगल दायक वन । बंधो ! पावन परम सुशोभन ॥६॥*
*। ऋषिनायक सांगतील जेथें । तीर्थ-सलिल ठेवावें तेथें ॥७॥*
*। प्रभुवचन परिसुनि भरत सुखावति । मुनिपदकमलिं मुदित शिर लावति ॥८॥*

**अर्थ** - तात ! अत्रि ऋषींची आज्ञा अवश्य घ्यावी व निर्भयपणे वनांत हिंडावे. ॥५॥ बंधो ! मुनींच्या कृपेने वन मंगलदायक, परम पावन व परम रमणीय झाले आहे ॥६॥ ऋषिनायक (अत्रि) जेथे सांगतील तेथे (त्या ठिकाणी) सर्व तीर्थजल ठेवावे. ॥७॥ प्रभूचे वचन ऐकून भरत सुखी झाले व त्यांनी अत्रि मुनींच्या चरण कमलांवर आनंदाने मस्तक ठेवले. ॥८॥

**टीका - चौ. ५-६ - (१) अत्रिशासना घेणें** - आता या तीन चौपायांत प्रभु अत्रि ऋषींना मोठेपणा देत आहेत. 'महती दासां सदा देतसां' हेच घडत आहे. **(क) विगतभय काननिं फिरणें** - हें भय म्हणजे **'भय संकोचे वदवत नाही'** यांत ज्या भयाचा उल्लेख केला (चौ. १) ते भय अयोध्यावासी स्त्रीपुरुषांना सुद्धा वनांत हिंडताना सिंहव्याघ्रादिकांचे भय वाटले नाही; असे असता भरतांस, रामबंधूला त्यांचे भय वाटेल असे माथेफिरू, वेड लागलेल्या माणसांशिवाय इतर कोणास वाटणार नाही. **(क) मुनीकृपें मंगलदायक वन... 'प्रभुचरणांकित अवनि विशेषे'** इत्यादि शब्दांनी भरतानी जो मोठेपणा दिला त्याचा परिहार अत्रिऋषींना मोठेपणा देऊन केला. खरे पहाता **'जैं येउनि राहति रघुनायक। तैं पासुन वन मंगलदायक'** (**१३७।५ पासून १३८ पहा**) असे घडले आहे.

**चौ. ८ - (१) मुनिपद कमलिं शिर लावति** - हेतु हा की त्यांनी चित्रकूट यात्रेची अनुज्ञा द्यावी व तीर्थसलिल कुठे ठेवावयाचे हे सांगावे. चित्रकूटच्या सर्व मुनि समाजांत अत्रि मुख्य आहेत म्हणून त्यांना पुढे केले आहेत. **'अत्रि आदि मुनिवर बहु वसती'** (१३२।७) असे वाल्मीकींनीच सांगितले आहे.

*हिं. दो. । भरत राम संवाद सुनि सकल सुमंगल मूल ॥*
*॥ सुर स्वारथी सराहि कुल बरषत सुरतरु फूल ॥३०८॥*

*हिं. । धन्य भरत जय राम गोसाई। कहत देव हरषत बरिआई ॥१॥*
*। मुनि मिथिलेस सभाँ सब काहू। भरत बचन सुनि भयउ उछाहू ॥२॥*
*। भरत राम गुन ग्राम सनेहू। पुलकि प्रसंसत राउ बिदेहू ॥३॥*
*। सेवक स्वामि सुभाउ सुहावन। नेमु पेमु अति पावन पावन ॥४॥*
*। मति अनुसार सराहन लागे। सचिव सभासद सब अनुरागे ॥५॥*

*म. दो. । भरत राम संवाद सब परिसुनि मंगल-मूल ॥*
*॥ स्वार्थि सकल सुर वानुनी वर्षति सुरतरु - फूल ॥३०८॥*

*म. । धन्य भरत गोस्वामि राम जय। देव बळे वदतात हर्षमय ॥१॥*
*। मुनि मिथिलेश्वर सकल सभा ही। श्रवुनि भरत-वचना उत्साही ॥२॥*
*। भरत-राम-गुणगण सुस्नेह। स्तविती पुलकित नृपति विदेह ॥३॥*
*। दास-स्वामी स्वभाव शोभन। प्रेम नेम अति-पावन-पावन ॥४॥*
*। जे ते वर्णु यथामति लागति। सचिव सभासद सब अनुरागति ॥५॥*

**अर्थ** - सकल- मंगलमूल असा भरत राम संवाद ऐकून सगळ्या स्वार्थी

देवांनी प्रशंसा करून कल्पवृक्षांच्या फुलांचा वर्षाव केला. ।।दो. ३०८।। धन्य भरत धन्य भरत, जय गोस्वामी राम, जय गोस्वामी राम ! असे जोरजोराने म्हणत देव हर्षमय झाले ।।१।। वसिष्ठादि मुनि, मिथिलापति जनक व सगळी सभा यांना भरताचे भाषण ऐकून उत्साह चढला ।।२।। भरत व राम यांचे गुणसमूह व सुंदर स्नेह यांची विदेहराज पुलकित होऊन प्रशंसा (स्तुती) करू लागले ।।३।। सेवक व स्वामी यांचा स्वभाव सुंदर आहे आणि त्यांचे प्रेम व नेम अति पावनांनासुद्धा पावन करणारे आहे असे म्हणून जे ते आपापल्या बुद्धीप्रमाणे प्रशंसा करू लागले; (व प्रशंसा करता करता) सचिव सभासद इ. सर्वच अनुरागमग्न झाले. ।।४-५।।

**टीका. दो. (१) भरत राम** - असे म्हणण्याचे कारण भरत प्रथम बोलले हे असले तरि पुढे हे कारण नसतांच भरत राम, भरतराम सेवक स्वामी, असाच क्रम आहे; याने दाखविले की देव आणि मुनिजनकादि प्रमुख लोक यांना भरताच्या गुणांचेच विशेष कौतुक वाटत आहे. येथील हा गूढभाव ३२६।३ मध्ये उघड करून सांगितला आहे. सेवकच स्वामीपेक्षा श्रेष्ठ वाटू लागला. '**॥ सेवक मोठा स्वामिहूनि जो निजधर्म-सुजाण । राम सेतु बांधुनि तरति लंघुनि गत हनुमान ॥' (दोहा ५२८) (क) वर्षति सुरतरुफूल** स्वर्गातील कल्पवृक्षांची वने देवांच्या कल्पना-कामना पूर्ण करीनात; पण आज देवांना भरत हा महाकल्पतरूच लाभला म्हणून स्वर्गातील कल्पवृक्षांच्या फुलांनी जणू भरताची पूजाच केली ! स्वार्थी मोठ्या लोकांचा, मग ते स्वर्गातील देव असोत की पृथ्वीवरील देव असोत, हा स्वभावच आहे की जितका मोठा लाभ ज्याच्याकडून जेव्हा होईल असे वाटते तेव्हा त्याला तितका अधिक सन्मान त्यावेळेपुरता देतात; पण पुन्हां वेळ आली तर त्याचा विनाश करण्यास कचरत नाहीत व आपला स्वार्थ साधल्यावर मागले सर्व विसरतात ! रावणवधानंतर देवांच्या कल्पवृक्षांना फुले नव्हती की काय? त्या वेळी कल्पतरू कुसुमांची वृष्टि केली नाही व रामराज्याभिषेकाच्या वेळीतर साधी फुलेसुद्धा त्यांना कुठे मिळाली नाहीत !

**चौ. १ - (१) धन्य भरत गोस्वामि राम जय** - प्रथम भरताला धन्यवाद व मग रामाचा जयजयकार ! सुचविले की आता निशाचरांवर जय मिळविण्याच्या मार्गास लवकर लागा. **(क) देव बळे वदतात** - इतका उत्साह व आनंद झाला आहे की जोराजोराने धन्यवाद व जयजयकार करू लागले. सर्व लोक

रामवियोगविषमज्वराला बरोबर घेऊन परत जाणार असे ठरतांच यांचा आनंद गगनांत मावेनासा झाला 'परहानीप्रिय अपले काज हि'

**चौ. २-३ - (१) श्रवुनि भरत-वचना उत्साही** - सर्वांना अत्यंत उत्साह चढला. विदेह आपली विदेहता सोडून भरत व राम यांचे गुण वर्णन करू लागले. येथे सुद्धा भरतालाच अग्रस्थान ! राम भरत असे म्हटल्याने काही वृत्तदोष होत नव्हता !

**चौ. ४-५ - (१) दास स्वामी स्वभाव शोभन.... लागति** - विदेहराज मुक्तकंठाने भरत व राम यांची प्रशंसा करू लागले असे पाहतांच इतरांनाही उत्साह चढला; व जो तो आपापल्या बुद्धीप्रमाणे भरताचे रामप्रेम व ते प्रेम रक्षण करण्याचे नेम आणि दोघांचा सुंदर स्वभाव व रामाचे भरतावरील प्रेम व स्वतःचे नेम (सत्यव्रत, धर्मरक्षण इ.) इत्यादि गुणांची प्रशंसा करू लागले; व म्हणू लागले, यांच्या प्रेमनेमामुळे **अतिपावनसुद्धा पावन** होतील. पूर्वी भरताचे प्रेम व नेम वगैरे गूढ होते त्यामुळे कोणाला यथामति वर्णन करणे सुद्धा जमले नाही; पण आता त्यांचे थोडेसे प्रत्यक्ष दर्शन झाल्यामुळे थोडेसे वर्णन करता आले. अशा रीतीने वर्णन करता करता शेवटी **'सचिव सभासद सब अनुरागति** सर्वच रामभरत प्रेमात मग्न झाले.

*हिं.* ***। सुनि सुनि राम भरत संबादू । दुहु समाज हियँ हरषु बिषादू ॥६॥***
***। राम मातु दुखु सुखु सम जानी । कहि गुन राम प्रबोधीं रानी ॥७॥***
***। एक कहहिं रघुबीर बडाई । एक सराहत भरत भलाई ॥८॥***

*म.* ***। ऐकुनि राम-भरत संवादा । युग समाज वश हर्ष-विषादा ॥६॥***
***। राम जननि सम दुःख सुखा गणि । वर्णि रामगुण राण्यासांत्वनिं ॥७॥***
***। कोणि गाति रघुवीर महत्ता । कोणि वर्णिती भरत सुजनता ॥८॥***

**अर्थ** - रामभरत-संवाद ऐकून दोन्ही समाज (राजपरिवार) हर्षविषादांना वश झाले. ॥६॥ रामजननीने दुःख व सुख समान मानले व राण्यांचे सांत्वन करण्यासाठी रामगुणांचे वर्णन केले. ॥७॥ कोणी रघुवीराची महती वर्णू लागतात तर कोणी भरताची सुजनता (चांगुलपणा) वर्णन करीत आहेत. ॥८॥

**टीका - चौ. - ६ - (१) युग समाज वश हर्ष-विषादां** - पूर्वी मुनि, जनक, सर्व सभा व सर्व समाज यांचा उल्लेख करून त्यांच्यावर भरत भाषणाचा काय परिणाम झाला हे सांगितले; त्यांत कोणालाच विषाद वाटला नाही. पुढील चौपाईत कौसल्यादि राण्यांचा उल्लेख आहे म्हणून येथील **समाज =** राजपरिवार, राज

कुटुंबे असा अर्थ घेणे जरूर आहे; व विशेषतः दोन्हीकडील राण्या असा अर्थ आहे. **(क) राम भरत** - येथे पूर्वीच्यासारखा 'भरतराम' उल्लेख नाही. या भेदानेसुद्धा सुचविले की हा वर्ग निराळ्या प्रकृतीचा आहे. ही सर्व कौटुंबिक नात्याची मंडळी असल्यामुळे राम वनांत राहणार म्हणून यांस विषाद वाटला पण धर्मत्याग न करता प्रतिज्ञाभंग न करतां पितृवचन परिपालन करीत आहेत म्हणून हर्ष वाटला; भरताच्या बद्दल जी भीति चिंता वाटत होती ती आता राहिली नाही म्हणूनही हर्ष झाला व १४ वर्षे रामविरहात कंठावी लागणार म्हणून विषाद वाटला. या सर्व मंडळीला भरतापेक्षा रामाविषयी अधिक आदर वाटत आहे हे रामभरत असा क्रम बदलून सुचविले आहे. **हा कौटुंबिक ममतेचा स्वाभाविक परिणाम आहे.**

**चौ.** ७ - (१) **राम जननि सम दुःखसुखा गणि - 'सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ' (भ.गी.)** अशी रामजननीची वृत्ति आहे. तिला सुखही वाटत नाही व दुःखही वाटत नाही. याचे कारण 'रामभरत सुत युग सम मानी' (५५।६) राम परत येतील किंवा त्यांनी यावे अशी तिची अपेक्षाच नव्हती व रामलक्ष्मण सीता वनात गेल्याने काही अशुभ न होता शुभच होणार आहे अशी तिची खात्री आहे. (२८२ पहा) **(क) वर्णि रामगुण राण्यासांत्वनिं** - राम वनांत राहणार म्हणून दोन्हीकडील राण्यांना दुःख वाटत आहे ते निवारण करण्यासाठी रामगुणांचे वर्णन केले. त्यांस सांगितले असेल की ज्यांनी एका बाणाने ताटकेला मारली, बोथट बाणाने मारीचासारख्याला शंभर योजने उडवून दिला; भृगुपतीचा गर्व नाहीसा केला त्या दोघा जगप्रसिद्ध वीरांना वनांत कसले व कोणाचे भय? शिवाय गुरुमहाराजांचा पूर्ण प्रभाव व वडिलांची पुण्याई त्यांच्या पाठीशी असल्याने मी जननी असून मलासुद्धा चिंता वाटत नाही. आपण सर्व वृथा दुर्बळ झालो आहात पण त्या तिघांच्यावर काही दुष्परिणाम झालेला दिसतो का तुम्हाला! त्यांना वनांत जर दुःख वाटत असते तर अगदी पहिल्यासारखी अशी प्रकृति निकोप कशी राहिली असती? इत्यादि.

***दुसरा दरबार समाप्त.***

## भरत-कूप व भरत-चित्रकूट-यात्रा (३०९-३१२)

हिं. दो. *। अत्रि कहेउ तब भरत सन सैल समीप सुकूप ॥*
*॥ राखिअ तीरथ तोय तहँ पावन अमिअ अनूप ॥३०९॥*
हिं. *। भरत अत्रि अनुसासन पाई । जलभाजनं सब दिए चलाई ॥१॥*
*। सानुज आपु अत्रि मुनि साधु । सहित गए जहँ कूप अगाधू ॥२॥*
*। पावन पाथ पुन्यथल राखा । प्रमुदित प्रेम अत्रि अस भाषा ॥३॥*
म. दो. *। वदले भरता अत्रि कीं शैल-समीप सुकूप ॥*
*॥ तिथें तीर्थजल ठेवुं शुचि अनुपम अमृत अमूप ॥३०९॥*
म. *। भरत अत्रि-अनुशासन पावुनि । जलपात्रे सब देती धाडुनि ॥१॥*
***। आपण अनुज-अत्रि-मुनि-साधूं । सहित गत जिथें कूप अगाधू ॥२॥***
***। पावन पाथ पुण्यथळिं राखति । प्रेमे मुदित अत्रि अस भाषति- ॥३॥***

**अर्थ** - अत्रि ऋषि भरतांस म्हणाले की या पर्वताच्या जवळच एक शुद्ध-पवित्र कूप (सुकूप) आहे; तेथे हे पावन (शुचि) अनुपम, अमृतासारखे व पुष्कळ तीर्थजल ठेवू.॥३०९॥ अत्रिमुनींची आज्ञा मिळतांच भरतांनी तीर्थजलाची सर्व पात्रे (पुढे) पाठवून दिली - रवाना केली.॥१॥ मग अनुज (शत्रुघ्न) अत्रि, इतर मुनि व साधू यांच्यासहित भरत, जिथे अगाध कूप होता तेथे गेले.॥२॥ ते पावन जल त्या पुण्यस्थळी ठेवले; तेव्हा अत्रि आनंदित होऊन प्रेमाने असे म्हणाले की ॥३॥.

**टीका. - दोहा** (१) **शैलसमीप सुकूप - शैल** = चित्रकूट, **सुकूप** = पवित्र कूप. **(क) तीर्थ जल** शब्दानेच पावनता सांगितली जाते असे असून पुन्हा पावनशुचि म्हटले व अति पावनत्व सुचविले. हिंदी **'अनूप'** = अनुपम. अमूप = पुष्कळ; या अर्थाचा शब्द मुळात नाही पण हे पुष्कळ तीर्थांचे जल आहे म्हणून मराठीत तो अर्थ स्पष्ट केला.

**चौ.** २-३ (१) **अगाधू = अगाध**, फार खोल; **पाथ** = जल, संस्कृत पायस्. **पुण्यथळ** = पुण्यस्थळ, पवित्र स्थान. **(क)** आधीच पुण्य स्थल, त्यांत हे अनेक तीर्थांचे अति पावन जल ठेवले त्यामुळे या कूपाची पावनता अनंत पटींनी वाढली. **(ख) राखति -** म्हणण्यात भाव हा की नदीत ओतले असते तर वाहून गेले असते; लोकांच्या, पशुपक्ष्यांच्या पायांचा स्पर्श झाला असता; तलावात ओतले

असते तर वाहून गेले नसते पण बाकीचा परिणाम सारखाच झाला असता. हा खूप अगाध (खोल) कूप असल्याने कोणी आंत उतरू शकणार नाही व या **तीर्थजलांचे निरंतर रक्षण होईल.** त्यांचा काही अंश तरी अनंत काळपर्यंत टिकणारच; कारण की हा उन्हाळ्यांत कोरडा पडत नाही. जगातील सर्व तीर्थांचे जल यांत असल्यामुळे याचा महिमा अपार वाढला व भरताच्या हातांनी ते कूपांत ओतले गेल्याने तर त्याचा महिमा अनुपमच वाढणार. **(ग)** अत्रींना आनंद एवढ्यामुळेच झाला की या कूपात हे परम दुर्लभ तीर्थजल ठेवण्याचा योग आला. आता त्या कूपाचा पूर्वेतिहास सांगून त्याला भरतकूप हे नाव अत्रि ठेवतील.

*हिं.* *। तात अनादि सिद्ध थल एहू । लोपउ काल बिदित नहिं-केहू ॥४॥*
*। तब सेवकन्ह सरस थलु देखा । कीन्ह सुजल हित कूप बिसेषा ॥५॥*
*। बिधिबस भयउ बिस्व उपकारू । सुगम अगम अति धरम बिचारू ॥६॥*
*। भरतकूप अब कहिहहिं लोगा । अति पावन तीरथ जल योगा ॥७॥*
*। प्रेम सनेम निमज्जत प्रानी । होइहहिं बिमल करम मन बानी ॥८॥*

*हिं.दो.* *। कहत कूप महिमा सकल गए जहाँ रघुराउ ॥*
*॥ अत्रि सुनायउ रघुबरहि तीरथ पुन्य प्रभाउ ॥३१०॥*

*म.* *। सिद्धस्थळ हें तात अनादी । काळें लुप्त विदित ना अगदीं ॥४॥*
*। सेवक जैं स्थळ स-रस विलोकिति । सुजलासाटिं कूप हा खोदिति ॥५॥*
*। विधिवश घडे विश्व-उपकार हि । सुगम अगम अति धर्म विचार हि ॥६॥*
*। भरतकूप म्हणतील अतां जन । झाला तीर्थजलें अति पावन ॥७॥*
*। प्रेमें मज्जति नेमें प्राणी । होतिल विमल कर्म-मन-वाणीं ॥८॥*

*म.दो.* *। वदत कूप-महिमा सकल गत जेथें रघुराव ॥*
*॥ अत्रि निवेदिति रघुवरा तीर्थी पुण्य प्रभाव ॥३१०॥*

**अर्थ** - तात ! हे सिद्धस्थळ असून अनादि आहे. (परंतु) काळाने लुप्त झाल्यामुळे (कोणाला) अगदी माहीत नव्हते.॥४॥ जेव्हा सेवकांनी हे स-रस (सजल व सुंदर) स्थळ पाहिले तेव्हा चांगल्या पाण्यासाठी त्यांनी हा कूप खणला.॥५॥ दैवयोगाने विश्वावर उपकारच झाले (कारण) जो धर्म विचार सुद्धा अति अगम होता तो सुगम झाला.॥६॥ आता याला लोक भरतकूप म्हणतील, हा अतिपावन तीर्थजलाच्या योगाने अति पावन झाला आहे.॥७॥ जे प्राणी प्रेमाने व नेमाने स्नान करतील (या जलाने) ते कर्माने-मनाने व वाणीने

विमल होतील.॥८॥ कूपमहिमा वर्णन करीत सर्व लोक (परतले व) जेथे रघुराज होते तेथे गेले; मग अत्रींनी या तीर्थात असलेला पुण्याचा प्रभाव रघुवरास सांगितला.॥दो.३१०॥

**टीका. चौ. ४-५ (१) सिद्धस्थळ** - सिद्धांचे निवासस्थान, जेथे साधन शीघ्र सिद्ध होते असे स्थान. **अनादी** - कोणत्या काळापासून हे सिद्धस्थळ आहे हे कोणासच माहीत नाही. अत्रि ऋषी ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांपैकी एक आहेत हे लक्षात असावे. **(क) सेवक सरस स्थळ विलोकिति - सेवक =** शिष्य, अत्रींचे शिष्य. सरस = सुंदर, हा सामान्य अर्थ आहेच पण रस = जल, 'रसो... देह-**त्वम्बु**पारदे' (विश्वः) सरस = सजल. उन्हाळयांत सुद्धा ज्या भूमीवर हिरव्यागार दूर्वा वाढतात व जमीन गार लागते तेथे भरपूर जिवंत पाणी लागेल असे सहज कळते; किंवा दोन मोठ्या वारुळांच्या ओळीत कुठे तरी जिवंत पाणी असते इ. अनेक चिन्हे आहेत. **(ख) सुजलासाठी** - स्वच्छ, निर्मळ पाण्यासाठी. नदीच्या काठी असलेल्या वस्तीत जर सजल कूप नसेल तर पावसाळ्यात घाणेरडे पाणी प्यावे लागते व नाना प्रकारचे रोग होतात; किंवा ४/४ दिवसांचे शिळे पाणी प्यावे लागते. म्हणून शिष्यांनी कूप खणला.

**चौ. ६ (१) विधिवश घडे विश्व-उपकार हि** - त्याच वेळी शिष्यांच्या त्या कामगिरीचे विशेष महत्त्व वाटले नाही; पण आज असे ठरले की हा कूप खणला हा सर्व विश्वावरच उपकार केला; कारण की हा कूप होता म्हणून हे अनुपम तीर्थजल सुरक्षित ठेवता आले; त्यांना बुद्धी झाली कूप खणण्याची ती दैवयोगानेच झाली; म्हणून आज हा दुर्लभ योग आला. **(क) सुगम अगम अति धर्मविचार हि** - हजारो तीर्थांच्या जलात एकाच वेळी स्नान करण्याचा विचारसुद्धा कोणाच्या मनात येणे अति अगम (अगम्य) आहे. पण तेच आज अति सुगम झाले म्हणून विश्वावर उपकार केला गेला असे म्हटले आणि ती गोष्ट आता रोजसुद्धा सहज करता येईल !

**चौ. ७-८ (१) भरतकूप म्हणतिल** - अत्रि ऋषींनी याचा आज नामकरणविधि उरकला. भरतकूप हे नाव ठेवले. यापूर्वी त्या कूपाला नाव नव्हते. **'भरतकूप' नावाचे रेल्वेस्टेशन** मणिपूर - झाशी रस्त्यावर आहे. तेथून भरतकूप हे तीर्थ जवळ आहे. 'भरतकूप' स्टेशन चित्रकूटपासून तीन कोसांवर आहे. आता माहात्म्य व विधि सांगतात. **(क)** कर्ममन वाणीने विमल होणे **ही फलश्रुति आहे.** राम

राज्याभिषेकासाठी आणलेले सर्व तीर्थांचे जल भरतासारख्या रामभक्ताच्या हातांनी यांत ठेवले गेले आहे. **हे माहात्म्य आहे.** प्रेमाने नित्यनियमाने व यमनियमांचे पालन करून स्नान करणे **हा विधि आहे.** दोह्यांत भरतकूप तीर्थोत्पत्तीचा उपसंहार केला आहे. आता पुढे भरताच्या चित्रकूट यात्रेचे रसाळ वर्णन आहे व त्या निमित्ताने भरतांचा प्रभाव पुन्हा दाखविला आहे.

*हिं.* ***। कहत धरम इतिहास सप्रीती । भयउ भोरु निसि सो सुख बीती ॥१॥***
***। नित्य निबाहि भरत दोउ भाई । राम अत्रि गुर आयसु पाई ॥२॥***
***। सहित समाज साज सब सादें । चले राम बन अटन पयादें ॥३॥***
***। कोमल चरन चलत बिनु पनहीं । भइ मृदु भूमि सकुचि मन मनहीं ॥४॥***

*म.* ***। वदत धर्म-इतिहासां प्रीतीं । उजाडलें गत रात्र सुखीं ती ॥१॥***
***। सानुज भरत कर्म निज उरकुनि । राम-अत्रि-गुरु-आज्ञा पावुनि ॥२॥***
***। सहित समाज, साज साधे ते । जाति रामवनिं पदिं फिरण्यातें ॥३॥***
***। मृदुचरणीं अनवाणी चालत । महि मृदु होइ मनीं संकोचत ॥४॥***

**अर्थ** - प्रीतीने धार्मिक ऐतिहासिक कथा सांगण्यांत (व ऐकण्यात) ती रात्र सुखांत गेली व उजाडले.॥१॥ अनुजा सहित भरतांनी आपले नित्यकर्म उरकले आणि राम, अत्रि व गुरुवसिष्ठ यांची आज्ञा घेतली.॥२॥ साधा साज (वेषभूषा) केलेले ते दोघे समाजा सहित रामवनांत फिरण्यासाठी पायी निघाले.॥३॥ ते (भरत शत्रुघ्न) कोमल चरणांनी अनवाणी चालत आहेत (असे पाहून) मही मृदु झाली पण तिला मनांत संकोच वाटत आहे.॥४॥

**टीका. चौ. (१) उजाडलें गत रात्र सुखीं ती** - आज सकाळी स्नानादि उरकून राम वसिष्ठांकडे गेले; तेव्हापासून भेटी, चर्चा, भाषणे, दरबारात भाषणे इत्यादी होऊन नंतर भरतकूपाची उत्पत्ति होऊन परत आले व धर्मेतिहास कथा-कथन श्रवण सुरू झाले व त्यांतच रात्र उजाडली. सर्व दिवसांतच व रात्री फलाहार. विश्रांति कोणासच नाही तरी सुद्धा ही आजची (७३ वी वनवासाची) रात्र सुखांत गेली. याचे कारण भरतादिकांचे चित्त प्रसन्न आहे हेच.

**चौ. २-३ (१)** यांत व पुढेही तीर्थयात्रेचा नित्यक्रम सुचविला आहे. प्रथम प्रातःस्नान संध्या जप पूजादि नित्यकर्म केले पाहिजे. नंतर इष्ट देवता संत गुरु यांचे दर्शन व आज्ञा घेऊन पायी अनवाणी चालत जावे; वेष भूषणे साधी असावी. स्त्रियांनी सुद्धा विशेष अलंकारादि घालू नयेत.

**चौ. ४ (१) महि मृदु होइ, मनीं संकोचत** - भरतांसाठी भूमी पूर्वीही मृदु झाली होती. **'महि मृदु मार्गहि मंगलमूल'** (२१६।८) पण त्या वेळी भूमीला मनांत संकोच वाटला नाही. येथे मही-भूमी आधी मृदु झाली व नंतर मनात संकोच वाटला. एखाद्या महापुरुषाला होत असलेले दुःख पाहून त्यांस सुख देण्याचा प्रयत्न मनापासून यथाशक्ति केल्यानंतर सुद्धा, जो संकोच वाटतो त्यांत हीच भावना असते की जितके करणे आवश्यक आहे तितके आपल्याकडून झाले नाही व करता येणे शक्य नाही. तसेच भूमीला वाटत आहे की माझा पृष्ठभाग जितका मऊ, कोमल करावयास पाहिजे होता तेवढा करता आला नाही. यांना दुःख होणारच; पण स्वभावताच मी शरीराने कठोर ! इ. विचारांनी मनांत संकोच वाटला. **(क) ल. टे. भूमी मनांत संकोचित झाली आहे; शरीराने नव्हे.** जमीन शरीराने संकोचित झाली की दूरची स्थाने जवळ होतील हे खरे; पण त्या संकोचण्याच्या क्रियेत धरणीकंपाने जसे कल्पनातीत अनर्थ होतात तसे अनर्थ होतील. मृदु कशी काय झाली ते आता सांगतात.

हिं. ***। कुस कंटक काँकरी कुराई । कटुक कठोर कुवस्तु दुराई ।।५।।***
***। महि मंजुल मृदु मारग कीन्हे । बहत समीर त्रिबिध सुख लीन्हे ।।६।।***
***। सुमन बरषि सुर घन करि छाहीं । बिटप फूलि फलि तृन मृदुताहीं ।।७।।***
***। मृग बिलोकि खग बोलि सुबानी । सेवहिं सकल राम प्रिय जानी ।।८।।***

हिं.दो. ***। सुलभ सिद्धि सब प्राकृतहु राम कहत जमुहात ।।***
***।। राम प्रान प्रिय भरत कहुँ यह न होइ बड़ि बात ।।३११।।***

म. ***। कुश कंटक कंकर कटु-कुहिली । कुसळ कठोर कुवस्तु लपविली ।।५।।***
***। महि मृदु मंजुल मार्गी करुनी । त्रिविध वायु सुखदायी होउनी ।।६।।***
***। सुर सुम वर्षुनि घन छायेने । तरु फल फूलें तृण मृदुतेनें ।।७।।***
***। मृग निरखुनि सग सुंदर बोलुनि । सेविति सब रामप्रिय जाणुनि ।।८।।***

म.दो. ***। जृंभत वदतां राम सब सिद्धि सब सुलभ कोणाहि ।।***
***।। प्राणप्रिय रामा भरत त्यांस नवल हें नाहिं ।।३११।।***

**अर्थ** - कुश, कांटे, खडे, खाजकुहिली, कुसळे, कठोर-कठिण वस्तु, आणि घाणेरडे अपवित्र पदार्थ-वस्तु (कुवस्तु) इत्यादि लपविले-गुप्त केले.।।५।। (याप्रमाणे) मही मार्ग मृदु व सुंदर करून, त्रिविध वायु सुखदायक बनून - ।।६।। देवफुले वर्षून मेघ छायेने, वृक्ष फुलाफळांनी, तृण मृदुतेने (मृदु होऊन).।।७।। हरिणे वगैरे

पशु (प्रेमाने) पाहून व पक्षी आपल्या मधुर बोलण्याने याप्रमाणे सर्व भरत रामप्रिय आहेत हे जाणून त्यांची सेवा करू लागले.।।८।। जांभई देत असता जे 'राम' म्हणतात त्या कोणालाही सकल सिद्धि सुलभ होतात; भरत तर रामचंद्रांना प्राणप्रिय आहेत, म्हणून त्यांच्या बाबतीत हे काही नवल (आश्चर्य) नाही.।।दो. ३११।।

**टीका. चौ. ५ (१) कटु कुहिली =** खाज कुहिली. ही टाकळ्या-तरवडा-एवढाली झाडे असतात; त्यांचा स्पर्श झाला की अंगाला फार कंड सुटते. **कुहिली** नावाचे वेल ही असतात. त्यांच्या शेंगांवर सोनेरी रेशमासारखी मऊ लव असते; ती वाऱ्याने अंगावर उडाली तर फारच कंड सुटते. **कुसळ** - गवताची अणकुचीदार टोके; ही चांगली बोट बोट लांब, काळी, सुईसारखी असतात. वस्त्राला लागली तरी त्यांत शिरतात व चालताना अंगाला बोचतात. **कठोर वस्तु** - दगड, धोंडे इत्यादी. **कुवस्तु** - पशुपक्ष्यांची विष्ठा, हाडे, कुजलेले, दुर्गंधि येणारे पदार्थ इत्यादी. असे दुःखदायक सर्व काही गुप्त केले गेले. भरताला सुख द्यावे म्हणून भूमीने ही सेवा केली.

**चौ. ६-८ (१) भूमीनें सेवा कशी केली** हे साहव्या चौपाईच्या पहिल्या चरणांत सांगून मग पुढे कोणी कोणी, भरताची सेवा कशी केली हे सांगितले आहे. **(क) सेविति सब रामप्रिय जाणुनि 'सेवक-सेवें राम सुखावति'** हे जाणून सेवा केली. **'करिति कृपा रघुराज जयावर सर्वचि करिती कृपा तयावर'** या वचनाची सत्यता येथे दाखविली.

**दो. (१) जृंभत राम वदतां कोणाहि सब सिद्धि सुलभ** - असा अन्वय आहे. या वचनांत अतिशयोक्ति नाही किंवा अर्थवादही नाही. **जांभई देत असता राम म्हणावयाचे आहे**. जांभई देताना तोंड चांगले उघडे असते तरी 'रा' चा उच्चार करतां येईल पण 'म' चा उच्चार करण्यास ओठ मिटावे लागतात; जांभई पूर्ण होईपर्यंत 'म'चा उच्चार करता येणे शक्य नाही; म्हणजे जृंभत राम वदतां येणें अशक्यवत आहे. रामनाम ज्याच्या हाडीमासी खिळले असेल असाच कोणी एखादा विरळा हे करू शकेल आणि असा जो असेल त्याला सर्वसिद्धि सहज मिळतील यांत तिळमात्र शंका नाही.

*हिं.* ***। एहि बिधि भरतु फिरत बन माहीं । प्रेम नेम लखि मुनि सकुचाहीं ।।१।।***
***। पुन्य जलाश्रय भूमि बिभागा । खग मृग तरु तृन गिरि बन बागा ।।२।।***
***। चारु बिचित्र पवित्र बिसेषी । बूझत भरतु दिव्य सब देखी ।।३।।***

*। सुनि मन मुदित कहत रिषिराऊ । हेतु नाम गुन पुन्य प्रभाऊ ॥४॥*

म. *। विपिनीं भरत फिरत या रीतीं । प्रेम नेम मुनि बघुनि लाजती ॥१॥*

*। पुण्य जलाशय भूमि-विभागां । खग मृग तरु तृण गिरि वन बागा ॥२॥*

*। चारु विचित्र पवित्र विशेष हि । पुसति भरत पाहुनि सब दिव्य हि ॥३॥*

*। ऐकुनि मुदित कथिति ऋषिराज । हेतु नाम गुण पुण्य - प्रभाव ॥४॥*

**अर्थ -** या पुढे दिलेल्या पद्धतीने भरत वनांत फिरत असता त्यांचे प्रेम व वेग पाहून मुनींना लाज वाटू लागली.॥१॥ पुण्य जलाशय, भूमीचे विभाग, पशु, पक्षी, तृण, तरु, पर्वत, वन, बागा -॥२॥ ही सर्व सुंदर, चित्रविचित्र व विशेषच पवित्र आणि सर्वच दिव्य (आहेत असे) पाहून भरत (अत्रि ऋषींना) विचारत.॥३॥ ते ऐकून ऋषिराज (अत्रि) हेतु (कारण) नाम, गुण व पुण्य प्रभाव आनंदाने सांगतात.॥४॥

**टीका. चौ. १ - (१) या रीतीं =** पुढे दिलेल्या पद्धतीने. **(क) प्रेम नेम बघुनि मुनि लाजती** - लज्जा, संकोच यामुळे वाटतो की वनात राहणारे, सर्वस्वाचा त्याग केलेले असून हृदयांत, कृतींत व वचनांत भरतांच्या सारखे रामप्रेम नाही; व भरत ज्या नियमांचे पालन करीत आहेत त्या नियमांचे पालन त्यांच्या संगतीत फिरत असताना करणे मुनींना कठीण जात आहे. भरतांच्या बरोबर मुनि, सचिव इ. सर्व समाज आलेला आहे, या चित्रकूट यात्रेतही.

**चौ. ३ (१) सर्व विशेष पवित्र व दिव्य दिसले** असे येथे म्हटले - पवित्रता व दिव्यता दृष्टीने कशी दिसेल-कळेल, असे कोणी म्हणतील; पण बघणाराचे हृदय व दृष्टि ज्या प्रमाणात पवित्र झालेली असतील त्या प्रमाणांत पावित्र्य व दिव्यता एखाद्या ठिकाणी प्रवेश करताच किंवा स्थान, वस्तु इ. पाहिल्याबरोबर कळते. हा पुष्कळांचा अनुभव या अपवित्र काळांतही कुठे कुठे पाहण्यास व ऐकण्यास सापडतो. 'पाण्यामध्ये मासा । झोप घेतो कैसा । जावें त्याच्या वंशा । तेव्हां कळे ॥ रत्नपारखी एखादा खडा हातात घेतल्याबरोबर त्याची पारख व किंमत करू शकतो; पण ते इतरांस अशक्य असते. **(क) पुसती भरत -** विशेष पावित्र्य आढळले की अत्रींना विचारतात की ही भूमि, हे कुंड इ. विशेष पवित्र कां ? तसेच दिव्यता दिसली की कारण विचारतात. न पाहिलेले पशुपक्षी इ. दिसले की त्यांची माहिती विचारतात.

**चौ. ४ (१) कथिति मुनिराव । हेतु नाम गुण पुण्य-प्रभाव -** अत्रि ऋषिराज

असल्याने त्यांना दिव्यदृष्टी असून ते फारच पुरातन काळापासून तेथेच रहात असल्याने व सर्वज्ञ असल्याने पवित्रतेचे कारण (हेतु) तीर्थ कसे कोणामुळे निर्माण झाले, भूमि विशेष पवित्र व दिव्य दिसण्याचे कारण, पशुपक्ष्यांची व तृण तरूंची नावे व गुण इत्यादी सांगतात. तीर्थ, वन, भूमि यांचा पुण्यप्रभाव वगैरे भरतांस सांगतात. अत्रींच्या आज्ञेने वनांत फिरा अशी जी सूचना प्रभूंनी दिली तिच्यांतील हेतु आता ध्यानात आला असेलच. आता या यात्रेत दिसणाऱ्या भरतांच्या प्रेम-नेमांचे थोडेसे वर्णन करतात -

*हिं. । कतहुँ निमज्जन कतहुँ प्रनामा । कतहुँ बिलोकत मन अभिरामा ॥५॥*
*। कतहुँ बैठि मुनि आयसु पाई । सुमिरत सीय सहित दोउ भाई ॥६॥*
*। देखि सुभाउ सनेहु सुसेवा । देहिं असीस मुदित बन देवा ॥७॥*
*। फिरहिं गएँ दिनु पहर अढ़ाई । प्रभु पद कमल बिलोकहिं आई ॥८॥*
*हिं.दो. । देखे थल तीरथ सकल भरत पांच दिन माझ ॥*
*॥ कहत सुनत हरिहर सुजसु गयउ दिवसु भइ साँझ ॥३१२॥*
*म. । कुठें निमज्जन कुठें प्रणाम हिं । कुठें विलोकत मनिं अभिराम हि ॥५॥*
*। कुठें मिळत मुनि-आज्ञा बसती । सीतेसह दो भावा स्मरती ॥६॥*
*। स्नेह सुसेवा स्वभाव बघती । प्रमुदित वनसुर आशिस् देती ॥७॥*
*। प्रहर अडिच दिन जातां फिरती । प्रभुपद कमलां येउनि बघती ॥८॥*
*म.दो. । क्षेत्र तीर्थ सब पाहिलीं भरतें पांच दिनांत ॥*
*॥ श्रवणि कथनिं हरिहर-सुयश गेला दिन ये रात ॥३१२॥*

**अर्थ** - मनात आनंदित होऊन (प्रसन्न मनाने, मनि अभिराम) कुठे (= तीर्थात) स्नान करतात, तर कुठे प्रणामच करतात. कुठे नुसते दर्शनच घेतात व मनात प्रेम आनंद वाढतात.॥५॥ कुठे मुनीची आज्ञा घेऊन बसतात व सीतेसहित रामलक्ष्मणांचे स्मरण (- ध्यान) करतात.॥६॥ स्नेह, उत्तम सेवा व स्वभाव पाहून वनदेव (वनसुर) प्रमुदित होऊन आशीर्वाद देतात.॥७॥ (रोज) अडीच प्रहर दिवस गेल्यावर परत फिरतात व येऊन प्रभुपद कमलांचे दर्शन घेतात.॥८॥ (या प्रमाणे) सर्व क्षेत्रे व तीर्थे भरतांनी पाच दिवसांत पाहिली. हरिहर-सुयश कथन व श्रवण करण्यात दिवस गेला व रात्र होत आली. (संध्याकाळ झाली.) ॥ दो. ३१२ ॥.

**टीका. चौ. ५-६** (१) स्नान, नमस्कार कुठे कोणाला करतात व अवलोकन

= दर्शन कशाचे करतात या विषयी अनुमान करण्याचे कारण नाही. **'तीर्थां मुनि-आश्रम-सुरधामां । स्नान करिति पाहुनी प्रणामा'** (२२४।२) तीर्थ दिसतांच प्रणाम = दण्डवत नमस्कार करतात व तीर्थात स्नान करतात. मुनि-आश्रम व देवस्थाने यांना पाहतांच प्रणाम करतात. **(क) कुठें विलोकत मनिं अभिराम हि** - 'रामकृपें गिरि कामद बनतीं । अवलोकत खेदा अपहरती ।। सर-सरिता, वन, भूमि विभागां । जणूं पूर मोदां अनुरागा' (२७९।१-२) सर सरिता वन आणि भूमि विभाग यांचे अवलोकन करतांच (= अवलोकत) मनिं अभिराम = पूर मोदा अनुरागा येऊ लागला. **(ख)** तीर्थस्नान देवदर्शनादि प्रसन्न मनाने केले तरच ते योग्य ठरते म्हणून 'मनिं अभिराम' हे शब्द मागल्या प्रत्येक क्रियेबरोबर घेणे जरूर आहे. **(ग) सीतेसह दो भावां स्मरती** - लक्ष्मण लहान असूनसुद्धा भरत त्यांचे रामचंद्रांबरोबर ध्यान करीत आहेत; यावरून **लक्ष्मणाचा अधिकार केवढा हे ध्यानात येईल**. लक्ष्मण या यात्रेत नाहीत हेही लक्षात ठेवावे. रामसेवा हीच लक्ष्मणाची यात्रा !

**चौ.** ७-८ (१) सुसेवा-तीर्थस्नानादि कर्मे उत्तम प्रकारे श्रद्धेने, प्रेमाने व प्रसन्न चित्ताने करणे. **'यस्य हस्तौ च पादौ च मनश्चैव सुसंयतम् । निर्विकाराः क्रियाः सर्वाः स तीर्थफलमश्नुते'** (स्कं. पु. कु. खं.) **(क) प्रहर अडिच दिन जातां फिरती** - ही वेळ मध्यान्ह स्नानाची आहे. (२७८।६ व २७९।६ पहा). सकाळी यात्रेस जाताना स्नानादि करून रामदर्शन घेऊन जात व अडीच प्रहर दिवस गेल्यावर परत येऊन मध्यान्ह स्नान करून पुन्हा रामदर्शत घेत असत.

**दो. (१) श्रवणिं कथनिं हरिहर सुयश...** 'वेणि हरिहर कथा' संतसमाजरूपी प्रयागात असते (१।२।१०). संतसमाजांत बसून हरिहरकथा श्रवण नंतर करीत तो सायंकाळच्या स्नानाची वेळ होत असे. असे रोजच करीत असत पण आज पाचव्या दिवशी उपसंहार रूपाने उल्लेख केला म्हणून भूतकाळ वापरला आहे.

भरत-चित्रकूटयात्रा वर्णन येथे समाप्त झाले. आता शेवटचा दरबार व भरतादि परत जाण्याची तयारी होईल.

***श्रीमानसगूढार्थ चंद्रिका अयोध्याकांड अध्याय २८ वा समाप्त.***



## अध्याय २९ वा.

## चित्रकूटचा तिसरा दरबार (३१३।१ - ३१६।८)

*हिं.* *। भोर न्हाइ सब जुरा समाजू । भरत भूमिसुर तेरहुति राजू ॥१॥*
*। भल दिन आजु जानि मन माहीं । रामु कृपाल कहत सकुचाहीं ॥२॥*
*। गुर नृप भरत सभा अवलोकी । सकुचि राम फिरि अवनि बिलोकी ॥३॥*
*। सील सराहि सभा सब सोची । कहुँ न राम सम स्वामि सँकोची ॥४॥*

*म.* *। प्रातः स्नान करुनि जन जमती । भरत भूमिसुर तिरहुति नृपती ॥१॥*
*। शुभ दिन आज मनामधिं जाणति । राम कृपाल वदत संकोचति ॥२॥*
*। गुरु-नृप-भरत सभे अवलोकति । राम संकुचुनि अवनि विलोकति ॥३॥*
*। शीला स्तवुनि सभा सब चिंती । कुणि न रामसम भिडस्त नृपती ॥४॥*

**अर्थ** - प्रातः स्नान (संध्यादि) करून भरत वसिष्ठादि महीसुर, तिरहुति राजे (तिरहुति = मिथिला) जनक व सगळे लोक (जन) जमले.॥१॥ कृपालु रामचंद्रानी मनांत जाणले आहे की आज (प्रयाणास) शुभ दिवस आहे; पण सांगण्यास संकोच वाटत आहे.॥२॥ गुरु, जनकराजा, भरत व सगळी सभा यांच्याकडे पाहिले; व राम संकोचाने जमिनीकडे (खाली) पाहू लागले.॥३॥ शीलाची प्रशंसा करून सर्व लोक विचार करू लागले की रामासारखा भिडस्त (संकोची) राजा (स्वामी) कोणी नाही.॥४॥

**टीका.** (१) आजचा दिवस प्रयाणास चांगला आहे हे प्रभुंनी जाणले, सर्वांनी आज परत जावे असे मनात वाटत आहे, पण कृपाळू व भिडस्त स्वभावाचे असल्याने तसे सांगण्यात धीर होत नाही. सर्वांच्या तोंडाकडे एकदा अवलोकन केले व मनात विचार आला की हे लोक आता किती दिवस दुःख भोगणार इथे ! पण स्पष्ट बोलण्यास धीर होत नाही; कारण, परत जाण्याची भाषा भेटण्यास आलेल्या, पाहुणे म्हणून आलेल्या मंडळींनीच प्रथम बोलावयाची असते. कधी जाणार किंवा आज जा असे यजमानाने म्हणणे म्हणजे आलेल्या लोकांचा कंटाळा आला आहे, असे व्यक्त करण्यासारखे आहे. शेवटी नाइलाज म्हणून मान खाली घातली.

*हिं.* *। भरत सुजान राम रुख देखी । उठि सप्रेम धरि धीर बिसेषी ॥५॥*
*। करि दंडवत कहत कर जोरी । राखीं नाथ सकल रुचि मोरी ॥६॥*
*। मोहि लगि सहेउ सबहिं संतापू । बहुत भाँति दुखु पावा आपू ॥७॥*

*। अब गोसाइँ मोहि देउ रजाई । सेवौं अवध अवधि भरि जाई ॥८॥*

हिं.दो. *। जेहिं उपाय पुनि पाय जनु देखै दीनदयाल ॥*

*॥ सो सिख देइअ अवधि लगि कोसलपाल कृपाल ॥३१३॥*

म. *। भरत सुजाण रामरुचि बघुनी । प्रेमें उठले सुधीर धरुनी ॥५॥*

*। वदति जुळुनि कर करुनि दंडवत । नाथ रुची मम सकल पूर्ण कृत ॥६॥*

*। कष्ट बहुत मज-मुळेंचि सकलां । आपण नाना दुःखीं पडलां ॥७॥*

*। आज्ञा द्यावी अतां स्वामिवर । जाउन सेविन अवध अवधिभर ॥८॥*

म.दो. *। ज्या उपायिं पद पुन्हां जन पाहिल दीनदयाल ॥*

*॥ तो अवधीस्तव शिकविणें कोसलपाल कृपाल ॥३१३॥*

**अर्थ** - सुजाण भरत रामचंद्रांची इच्छा जाणून फार धीर धरून प्रेमाने उठले.॥५॥ दण्डवत करून हात जोडून म्हणाले की नाथ ! माझ्या सर्व रुची आपण पूर्ण केल्यात.॥६॥ माझ्यामुळेच सगळ्यांना कष्ट झाले व (माझ्यामुळेच) आपण नाना प्रकारच्या दुःखांत पडलांत.॥७॥ स्वामिवर ! आतां मला आज्ञा द्यावी म्हणजे मी जाऊन अवधि भरेपर्यंत अयोध्येची सेवा करीन.॥८॥ (पण) दीनदयाल ! कोसलपाल कृपाल ! ज्या उपायाने हा दास हे पाय पुन्हा पाहील तो (उपाय) अवधीसाठी याला शिकवावा.॥दो. ३१३॥.

**टीका. चौ. ५-६ (१) भरत सुजाण** - सर्वांनी आज परत जावे अशी रामाच्या मनातील इच्छा त्यांच्या संकोचावरून भरताने जाणली; पण वियोग होणार या भावनेने प्रेमसागर हृदयांत उचंबळू लागला; पण स्वामींना संकोचात पाडणे हे सेवकाचे लक्षण नव्हे; व स्वामींच्या मनातील भाव जाणून त्याप्रमाणे करणे हेच सेवकाचे लक्षण आहे; म्हणून आता आपणच बोलणे जरूर आहे असे ठरविले व त्या प्रेमाला दाबले; पण फार धीर धरावा लागला. **(क) नाथ रुची मम सकल पूर्ण कृत** - ध्वनि हा आहे की एक इच्छा राहिली आहे तेवढी पूर्ण करावी. स्वतःची प्रतिज्ञा मोडण्यास तयार झाले, सेवेची आज्ञा पाहिजे होती ती दिली; तीर्थजलांची व्यवस्था व चित्रकूटची यात्रा यासंबंधी इच्छा पुरविल्या. पण मधली एक **'द्या काहीं अवलंबन देवा'** (३०७।८) ही राहिली आहे ती पुरविण्याविषयी ही गूढ प्रार्थना आहे.

**चौ. ७-८ (१) कष्ट बहुत मजमुळें चि सकलां - 'पाहवती ना व्याकुळ माता । पुरवासी ज्वरिं दुःखद जळतां ॥ मीच किं सकल अनर्थ मुळाशी** (२६२।२-३) **'नाथ**

**भरत, माता पुरवासी । शोकाकुल दुःखी वनवासी ॥ सहित समाज राव मिथिलापति । बहु दिन झाले क्लेशां साहति'** (२९०।४-५) हे रामवचन आहे. आणखी २४८।५-६ पहा. भरत चित्रकूटला आले म्हणून लोक आले आणि म्हणूनच मिथिलापति आले. या सर्वांचे क्लेश पाहून रामचंद्रांस क्लेश झाले; भरताच्या प्रेमामुळे अनेक वेळा संकोचांत पडावे लागले इ. गोष्टींना उद्देशून हे भरत म्हणाले. **(क) स्वामिवर =** श्रेष्ठ स्वामी. भाव हा की अयोध्याधीश आपणच आहांत; सेवक या नात्याने मी अयोध्येची सेवा करीन. पालन, रक्षण करीन असे म्हणाले नाहीत; कारण ती जबाबदारी स्वामींची आहे. **(ख) अवधिभर** - १४ वर्षांची मुदत संपेपर्यंतच; मग नाही हो ! कारण की १४ वर्षे पूर्ण झाली व प्रभु आले नाहीत तर सेवा करण्यास हा दास जिवंत राहिला पाहिजे ना ! **वा.रा.** भरताने प्रायोपवेशन सोडले पण स्पष्ट सांगितले आहे की १४ वर्षे पूर्ण होतील त्या दिवशी आपण आला नाहीत तर मी अग्नि प्रवेश करीन; पण **असली** दंडेली व **धमकी देणे मानसकल्पांतील भरतांच्या स्वभावातच नाही** हे आतापर्यंत अगदी स्पष्ट झाले आहे.

**दो. (१) दीनदयाल** - सर्व लोक व मीसुद्धा आपल्या वियोगामुळे दीन आहोत; आपण दया करून असे काही साधन सांगावे की ज्यामुळे आमची दीनदशा सह्य होईल. **(क) कोसलपाल =** आपणच कोसलाधीश आहात; अयोध्येचे पालन करण्याची जबाबदारी आपली आहे; पण ती माझ्या दीनाच्या शिरावर टाकली आहे. कसे पालन करावे, कशाच्या आधारावर करावे हे मला कळत नाही व माझी ते करण्याची पात्रता नाही; तरी आपणच कृपाळूपणे सर्वांचा सांभाळ कूर्मीप्रमाणे करावा. **(ख) अवधीस्तव =** अवधीसाठी; १४ वर्षांची कालमर्यादा आपल्या आज्ञेचे पालन करीत संपविण्यासाठी लागणारी शक्ति, युक्ति व बुद्धि देईल असे साधन सांगावे, शिकवावे. असा काही उपाय न सापडल्यास १४ वर्षांच्या अवधीनंतर हे पाय पाहण्यास हा दास राहील की नाही सांगवत नाही. सार हे की १४ वर्षे पूर्ण होईपर्यंत मी जिवंत राहण्यास आधार पाहिजे.

***हिं.*** *। पुरजन परिजन प्रजा गोसाईं । सब सुचि सरस सनेहँ सगाईं ॥१॥*
*। राउर बदि भल भव दुख दाहू । प्रभुबिनु बादि परम मद लाहू ॥२॥*
*। स्वामि सुजानु जानि सब ही की । रुचि लालसा रहनि जन ही की ॥३॥*
*। प्रनत पालु पालिहि सब काहू । देउ दुहू दिसि ओर निबाहू ॥४॥*
*। अस मोहि सब बिधि भूरि भरोसो । किएँ बिचारु न सोचु खरो सो ॥५॥*

म. *। प्रभो ! प्रजा सब पुरजन परिजन । स्नेहीं शुचि सब सरस आप्तपण ॥१॥*
*। अपणांस्तव भवदाव हि सुखकर । प्रभुविण वृथा परमपद दुष्कर ॥२॥*
*। स्वामी जाणुनि गति सकलांची । रुचि राहणि लालसा जनाची ॥३॥*
*। प्रणतपाल सकलांही पाळिति । दोन्हिकडे प्रभु सकल निभाविति ॥४॥*
*। असा सर्व मज भूरि भरंवसा । करत विचारा शोच न लवसा ॥५॥*

**अर्थ** - प्रभो ! सर्व प्रजा, अयोध्यावासी व परिवार हीं सर्वच आपल्या स्नेहांत पवित्र आहेत व आप्तपणाही सरस आहे. ॥१॥ आपल्यामुळे भवदावानल सुद्धा सुखकर वाटतो व आपल्याशिवाय (मिळविण्यास) कठीण असे परमपद (मोक्ष) व्यर्थ वाटते ॥२॥ स्वामी ! सर्वांची गति (दशा) व या दासाची रुचि, राहणी व लालसा जाणून ॥३॥ प्रणतपाल सर्वांचेच पालन करतील व प्रभु (सर्वसमर्थ) दोन्हीकडे सर्व गोष्टी निभावून नेतील ॥४॥ असा मला सर्वप्रकारे खूप भरवसा वाटतो; व विचार करतां लवलेश सुद्धा शोकचिंता रहात नाही. ॥५॥

**टीका. - चौ. १ - (१) स्नेहीं शुचि** - प्रेमात पवित्र आहेत. आपल्यावर असणारे सर्वांचे प्रेम शुद्ध निर्मळ व अनन्य आहे. **आप्तपणा =** नात्याचे प्रेमसुद्धा सरस आहे. सर्व प्रजा = अयोध्येच्या बाहेरची प्रजा; अयोध्यावासी व माता वगैरे सर्व परिवार आता पूर्णपणे जाणतात की राम भगवान परमात्मा आहेत; त्यादृष्टीने सर्वांचा स्नेह पवित्र आहे. सर्वांचाच आपल्याशी कोसलपाल रघुनाथ या नात्याने कोणता ना कोणतातरी संबंध आहे. या संबंधाने सुद्धा सर्वांचे आपल्यावरील प्रेम सरस आहे. ते इतके की :

**चौ. २ - (१) आपणास्तव भवदावहि सुखकर** - आपण जवळ असलांत म्हणजे अत्यंत दुःखदायक असा भवदावाग्नीसुद्धा सर्वांना सुखकर वाटतो - वाटेल; अशी सर्वांचीच भावना आहे. २९०।८; २९१।३ प. (क) प्रभुविण वृथा परमपद दुष्कर - प्राप्त होण्यास अति कठीण असे जे परम पद म्हणजे मोक्ष, (कैवल्य) तो मिळाला व आपण जवळ नसलांत तर तो मोक्ष सर्वांनांच नकोसा व दुःखद वाटतो. या दोन चरणांनी ध्वनित केले आहे की आपण अयोध्येत नसतां तेथे राहणे सर्वांनांच नर्कयातनांसारखे क्लेशदायक होईल. म्हणून आपण कोणत्या ना कोणत्या तरी रूपाने अयोध्येत रहावे. प्रभु असल्यामुळे हे आपणांस सहज करतां येईल.

**चौ. ३-४ - (१) जाणुनि गति सकलांची** - मी वर्णन केले त्याप्रमाणे सर्वांची

भावना आहे की नाही हे आपण जाणतांच; म्हणून ती लक्षांत घ्यावी. **(क) रुचि राहणि लालसा जनाची** - लालसा - हौस आहे चरणसेवेची; राहणी आहे सेवकाची व या दोन्ही गोष्टी साधण्यासाठी रुचि - इच्छा कशाची आहे तेही आपण प्रभु - अंतर्यामी - असल्यामुळे जाणतांच; म्हणून तेवढी दासाची रुचि लक्षांत घेऊन - **(ख) प्रणतपाल सकलांही पाळिति** - भाव हा की आम्ही सर्व शरणागत आहोत; प्रणत आहोत; प्रणतपाल हे आपले ब्रीद आहे; म्हणून ते टिकविण्यासाठी तरि आपण सर्वांचे पालन करालच. **(ग) दोहिंकडे प्रभु सकल निभाविति** - वनांत १४ वर्षे राहून ज्या कोणा प्रणतांचे पालन करावयाचे असेल किंवा आणखी काही करणे असेल ते करणे ही एक बाजू झाली; व दुसरी गोष्ट म्हणजे अयोध्येतील सर्व गोष्टींचा व सर्वांचा निर्वाह व सांभाळ करणे या दोन्ही गोष्टी आपणांस सहज करता येतील; कारण आपण प्रभु आहांत.

**चौ. ५ - (१) असा सर्व मज भूरि भरंवसा** - आपण दोन्ही बाजूंचा निर्वाह १४ वर्षे पर्यंत सहज कराल असा मला पक्का विश्वास आहे. या विश्वासानेच मी निश्चिंत होऊन परत जाण्यास तयार झालो; व अयोध्येची सेवा करण्याचे कबूल केले ते याच विचाराने. (क) आपल्या चरण पादुका द्या व त्यांत आपण दिव्यरूपाने निवास करा असे सांगण्यास धीर होत नाही म्हणून वळणावळणाने गौरवून सांगत आहेत. किती भावपूर्ण, किती सौजन्ययुक्त व किती संकोचपूर्ण बोलणे आहे !

*हिं.* ***। आरति मोर नाथ कर छोहू । दुहुँ मिलि कीन्ह ढीठु हठि मोहू ॥६॥***
***। यह बड़ दोष दूरि करि स्वामी । तजि संकोच सिखइअ अनुगामी ॥७॥***
***। भरत बिनय सुनि सबहिं प्रसंसी । खीर नीर बिबरन गति हंसी ॥८॥***

*म.* ***। नाथकृपा आणी मम आर्ती । उभय, बळें मज धीट बनवती ॥६॥***
***। स्वामी हरुनि या अति दोषाला । बिना भीड शिकवा दासाला ॥७॥***
***। भरत विनतिला सभा प्रशंसी । क्षीर-नीर-विवरण गति हंसी ॥८॥***

**अर्थ** - नाथ ! आपली कृपा व माझी आर्ती या दोघांनी मला बलात्काराने (बळें, हठि) धीट बनवला. ॥६॥ स्वामी ! या माझ्या मोठ्या (अति) दोषाला दूर करून, भीड न धरता मला दासाला शिकवावा. ॥७॥ दूधपाणी (क्षीरनीर) निरनिराळे करण्यांत हंसिनीप्रमाणे गति असलेल्या भरताच्या विनंतीची सभा प्रशंसा करू लागली. ॥८॥

**टीका - चौ. ६-७ - (१) उभय, बळें मज धीट बनवती -** भाव हा की आपल्या समोर बोलण्याचा व अमुक करा असे सांगण्याचा माझा स्वभाव नाही व अधिकारही नाही. असे असता धीटपणाने बोललो हा मोठा दोष घडला. पण आधीच मी आर्त झाल्याने विचार राहिला नाही आणि त्यांत पाठबळ मिळाले आपल्या कृपेचे व स्नेहाचे त्यामुळे ही धृष्टता घडली. **'भीड सोडुनी मुदित मन, सांगा करूं ते आज'** (२६४) असे राम म्हणाले; यालाच भरत नाथकृपा म्हणतात. तुम्ही सांगितलेत म्हणून मी बोललो; पूर्वी कबूल केल्याप्रमाणे आतां करा, असे दुसरा कोणी असता तर म्हणाला असता, पण भरत स्वतःलाच दोषी ठरवीत आहेत. **याचे नाव सेवकभक्त ! (क) हरुनि दोषाला शिकवा दासाला -** पुन्हा असला दोष माझ्याकडून घडूं नये, म्हणजे जास्त बोलण्याची इच्छा मला होऊ नये एवढ्यासाठी मला शिकवा एकदा म्हणजे झाले.

**चौ. ८ - (१) विनति** (हिं. बिनय, प्रार्थना) स्त्रीलिंगी आहे म्हणून **हंसी -** हंसिनी म्हटले. एकत्र केलेल्या दूधपाण्याना पृथक पृथक करण्याची गति - कला, निपुणता तिच्या ठिकाणी असते; तसेच या भरत विनंतीने केले. प्रथम रामचंद्रांनी भरतांस याच हेतूने हंस म्हटले आहे - **'भरत हंस रविवंशतडागां । जन्मुनि कृत गुण-दोष विभागां ॥ पय गुण घे त्यजि अवगुण वारी । स्वयशें कृत जग भास्वर भारी'** (२३२, ६-७) हें भरत चित्रकूटास **येण्यापूर्वीचे** वचन आहे. चित्रकूटात **आल्यावर** भरताची **वाणी हंसिनी** बनली आहे- **विमल विवेक धर्मनयशाली । भरत भारती मंजु मराली ॥** (२९७।८) यांतील सर्व भाव येथे आहेत असे समजावे. आता भरत **परत जाण्याच्या वेळी** त्यांची **विनंती हंसी** बनली. २९७।८ ची टीका मुद्दाम पहावी.

हिं. दो. *। दीनबंधु सुनि बंधु के बचन दीन छल हीन ॥*
*॥ देस काल अवसर सरिस बोले रामु प्रबीन ॥३१४॥*

हिं. *। तात तुम्हारि मोरि परिजन की । चिंता बुरहि नृपहि धर बन की ॥१॥*
*। माथेपर गुर मुनि मिथिलेसू । हमहि तुम्हहि सपनेहूँ न कलेसू ॥२॥*

म. दो. *। दीनबंधु हें बंधुवच श्रवुनि दीन छलहीन ॥*
*॥ देश काल - समयोचित वदले प्रभू प्रवीण ॥३१४॥*

म. *। तुमची तात ! माझि सकलांची । चिंता गुरु, नृप या गृह-वनिंची ॥१॥*
*। शिरावरी गुरु मुनि मिथिलेश हि । स्वप्निंहि अम्हां तुम्हां ना क्लेश हि ॥२॥*

**अर्थ** - दीनबंधु, प्रवीण, प्रभु रामचंद्र बंधूचे दीन व छलहीन भाषण ऐकून देशकाल परिस्थितीस अनुसरून म्हणाले की ।। दो. ३१४।। तात ! तुमची माझी, सकलांची, घराची व वनाची चिंता गुरु व नृप यांस आहे. ।।१।। (आमच्या तुमच्या) शिरावर गुरु, मुनि व मिथिलेश असल्याने आम्हांला व तुम्हांला स्वप्नांतसुद्धा क्लेश नाहीत ।।२।।

**टीका - दो. (१) दीनबंधु बंधुवच** - गूढ भाव हा आहे की स्वतः दीनबंधु असून आज दीन असा बंधु त्यांना बंधु झाला. **'संकटि करिति सुबंधु सहाया'** (३०६।८) या रामवचनाप्रमाणे भरत साह्यकर्ता झाला. प्रतिज्ञाभंग न करण्यास साह्य करण्याचे भरताने कबूल केले. वाच्यार्थाने सुचविले की राम दीनबंधु असून त्यांच्या धाकट्या बंधूलाच दीनवचन बोलावे लागले त्या अर्थी भरतांची राहिलेली इच्छा पूर्ण करून त्यांना जे पाहिजे ते साह्य करतील. **प्रवीण** = बोलण्यांत प्रवीण असा अर्थ आहे. **'जयति वचनरचना अतिनागर'** असे आतां राम बोलतील.

**चौ. १-२ - (१) सहित समाजा तुमचा अमचा। गृहिं वनिं पाता प्रसाद गुरुचा ।।** (३०६।९) **'तात ! तातविण दशा आपली। पूर्ण गुरुकृपे मात्र वाचली ।।** (३०५।५) **'मुनि मिथिलेश्वर सर्व वाचवित.'** (३०५।८) असे पूर्वी रामच म्हणाले आहेत. **(क)** चिंतेविषयी बोलताना **'तुमची माझि' असा क्रम** ठेवला पण क्लेशांचा उल्लेख करताना **'अम्हां तुम्हां' असा उलट क्रम** करून सुचविले की वनांत जितके क्लेश आहेत त्यामानाने तुम्हाला अयोध्येत काहीच नाहीत. आम्ही वनांत असून आम्हाला क्लेश होत नाहीत ते गुरु, मुनि व मिथिलेश शिरावर असल्यामुळेच; मग तुम्हांला तर त्याबद्दल मुळीच चिंता करावयास नको. **(ख) शिरावरी** छत्रासारखे आहेत. मजबूत, मोठे,दृढ छत्र शिरावर असले की उन्ह ताप, पाऊस यांचा जसा मुळीच त्रास होत नाही तसेच आपल्याला चिंता, क्लेश इत्यादि काही नाहीत. **(ग) गुरु, मुनि, मिथिलेश** - हे मुनि विश्वामित्र समजणे योग्य नाही. विश्वामित्रांनी अयोध्येच्या राज्यादि कारभारांत पूर्वी किंवा पुढे कोणताच भाग घेतलेला नाही. मात्र वसिष्ठांच्या जोडीला वामदेवांचा उल्लेख मानसांत वारंवार पूर्वीच आला आहे. फार काय त्यांचा उल्लेख वसिष्ठांच्या पूर्वीही केलेला आहे. **'वामदेव तैं वसिष्ठ आले'** (१६९।७) **'वामदेव कुलगुरूही ज्ञानी'** (१।३६१।१) वा.रा. तर भरत पादुका घेऊन जातात त्यावेळच्या वर्णनांत **'वसिष्ठो वामदेवश्च जाबालिश्च दृढव्रतः ।। अग्रतः प्रथयुः सर्वे मंत्रिणो मंत्रपूजिताः'** (२।११३।२) वसिष्ठ

वामदेव जाबालि इत्यादि **मंत्री** पुढे गेले म्हणून **मुनि = वामदेव जाबाली वगैरे** अयोध्येंत राहणारे व मंत्री असलेले महाप्रतापी मुनि.

हिं. *। मोर तुम्हार परम पुरुषारथु । स्वारथु सुजसु धरम परमारथु ॥३॥*
*। पितु आयसु पालिहिं दुहु भाई । लोक बेद भल भूप भलाई ॥४॥*
*।गुर पितु मातु स्वामि सिख पालें । चलेहूँ, कुमग पग परहिं न खालें ॥५॥*
*। अस बिचारि सब सोच बिहाई । पालहु अवध अबधि भरि जाई ॥६॥*
*। देसु कोसु परिजन परिवारू । गुरु पद रजहिं लाग छरु भारू ॥७॥*
*। तुम्ह मुनि मातु सचिव सिख मानी । पालेहु पुहुमि प्रजा रजधानी ॥८॥*

म. *। मम तुमचा हि परम पुरुषार्थ । स्वार्थ सुधर्म सुयश परमार्थ ॥३॥*
*। दोघांनी पित्राज्ञा पालन । भलें वेदिं जनिं नृपां भलेपण ॥४॥*
*। स्वामि मातृ-पितृ-गुरु-वच पाळिति । चालत कुपथिंहि पाय न घसरति ॥५॥*
*। या विचारिं चिंता सब सोडुनि । पाळा पुरी अवधिभर जाउनि ॥६॥*
*। देश कोष परिजन परिवारहि । यांचा गुरुपदरजिं सब भारहि ॥७॥*
*। तुम्हिं मुनि मातृ सचिव-वच पाळा । मही प्रजा नगरी सांभाळा ॥८॥*

**अर्थ** - माझा आणि तुमचा परम परमार्थ, स्वार्थ, सुधर्म, सुयश आणि परमार्थ (म्हणजे) दोघांनी पित्याची आज्ञा पालन करणे हा आहे. याने वेद व लोक यांत आपले भले व राजांना भलेपणा आहे. ॥३-४॥ स्वामी, माता, पिता व गुरु यांचे वचन पाळतात ते आडमार्गाने (कुमार्गाने, कुपथिं) चालत असले तरी त्यांचे पाऊल घसरत नाही; (खाली पडत नाहीत). ॥५॥ या विचाराने सर्व चिंता सोडून तुम्ही जाऊन अवधिपर्यंत अयोध्यापुरीचे पालन करा ॥६॥ देश, कोष (खजिना) पुरवासी व परिवार यांचा सर्व भार गुरुपद रजावर आहे. ॥७॥ तुम्ही (फक्त) मुनि माता व सचिव यांचे वचन पाळा - आणि पृथ्वी, प्रजा व नगरी यांचा सांभाळ करा म्हणजे झाले. ॥८॥

**टीका - चौ.** ३-४ - (१) येथे हे दाखविले की **पित्राज्ञापालन हा धर्म** परम पुरुषार्थ आहे; म्हणजे **चारी पुरुषार्थाहून श्रेष्ट आहे** यांतच स्वार्थ, सुधर्म, सुयश आणि परमार्थाचा अंतर्भाव होतो. **(क) नृपां भलेपण** - आपण दोघांनी मिळून पित्राज्ञा पालन केल्याने राजांची प्रतिज्ञा पूर्ण होईल व त्यांना जो भलेपणा (कीर्ति) मिळाला आहे तो कायम राहील; अन्यथा आपली अकीर्ति तर होईलच पण आपण राजांच्याही अकीर्तीला कारण होऊ.

**चौ. ५-६** - (१) **स्वामि मातृपितृ गुरुवच पाळिति** - भरतांनी आपल्या भाषणांत सर्व मोठेपणा रामास दिला; वसिष्ठ जनकादिकांच्या देखत केलेली प्रशंसा रघुनाथांस रुचली नाही. म्हणून त्या मोठेपणाचा परिहार करण्यासाठी या दोन व पुढील चौपाया आहेत. '**स्वगुण कानिं पडतां संकोचति**' याची ही परमावधि आहे. पूर्वी वनाच्या मंगलदायकतेचे कारण याच पद्धतीने अत्रि ऋषि ठरविले गेले. (क) **पाळा पुरी अवधिभर जाउनि** - याने भरताच्या वचनास पूर्ण संमति दिली '**आज्ञा द्यावी अता स्वामिवर। जाउन सेविन अवधि अवधिभर**' (३१३।८) असे भरत म्हणाले आहेत. त्याप्रमाणे येथे आज्ञा देत आहेत. सुचविले अवधि संपतांच मी परत येईन व मग पुढे तुमच्यावर ही जबाबदारी राहणार नाही. राज्य करा, राज्याभिषेक करून घ्या असे सांगितले नाही. फक्त संरक्षकाचे काम तुम्ही करा हे सुचविले; म्हणजेच 'सेविन' या भरताच्या म्हणण्यास पूर्ण संमति दिली.

**चौ. ७-८** - (१) **गुरुपदरजिं भार** - अमक्याचा भार अमक्याच्या शिरावर असे म्हणण्याची प्रथा आहे. पण शिष्याने गुरूच्या डोक्यावर भार ठेवण्याची भाषा बोलणे लांछनास्पद आहे. गुरूंच्या पायांवर भार घालणेसुद्धा अनुचितच; म्हणून पदरज म्हटले. गुरुपदरज नुसते मस्तकी धारण केलेत की त्या रजाच्या प्रभावानेच सर्वांचे पालन होईल. '**प्रभु-पदपद्मपराग - शपथ जी। सत्य सुकृत सुख सीमा शुभ ती**' (३११।१) असे म्हणून जो मोठेपणा दिला होता भरताने तो माझा नसून गुरुपद रजाचा आहे हे येथे प्रभूंनी सूचविले. **गुरुपदरजाचा प्रभाव** दशरथांनी स्वानुभवाने असाच वर्णिला आहे. '**जे गुरुचरणरेणु -शिरिं धरिती। ते जणुं सकल विभव वश करिती॥ मज सम हें अनुभविति न दूजे। प्राप्त सकल पावन रज-पूजे**' (२।३।५-६) (क) **मुनि मातृ सचिव** - वामदेवादि मुनींचा अंतर्भाव सचिवांत होतो म्हणून येथे **मुनि = वसिष्ठ** असा अर्थ घेणे जरूर आहे.

*हिं. दो.* ***। मुखिआ मुख सो चाहिऐ खान पान कहुँ एक ॥***
***॥ पालइ पोषइ सकल अँग तुलसी सहित बिबेक ॥३१५॥***
*हिं.* ***। राजधरम सरबसु एतनोई। जिमि मन माहँ मनोरथ गोई ॥१॥***
*म. दो.* ***। मुख्य मुखासम पाहिजे खाण्या पिण्यास एक ॥***
***॥ पाळि पोषि अंगां सकल तुलसी सहित विवेक ॥३१५॥***
*म.* ***। इतकें राजधर्म - सर्वस्वहि। गुप्त मनोरथ जसे मनांतहि ॥१॥***

**अर्थ** - तुलसीदास म्हणतात रामचंद्र म्हणाले की - मुख्य मुखासारखा असला पाहिजे. खाण्यापिण्यास तर एकटेंच, पण सगळ्या अंगाचे - अवयवांचे पालन पोषण विवेकाने करते ।।दो. ३९५।। जसे सर्व मनोरथ मनांतच गुप्त असतात तसे राजधर्माचे सर्वस्व इतकेच आहे. (यात सर्व राजधर्म गुप्त आहेत) ।।१।।

**टीका - दो. - (१) ल. टे.** खरोखरच या एका दोह्यांत राजधर्माचे सारसर्वस्व भरून ठेवले आहे. **या एका दोह्यांतील दृष्टान्ताचा विस्तार** शुक्रनीति, चाणक्यनीति, कामंदकीय नीति इ. नीतिशास्त्र ग्रंथांच्या तुलनेने **करून एक मोठा स्वतंत्र ग्रंथ निर्माण करता येण्यासारखा आहे;** यापेक्षा याचे अधिक महत्व काय सांगावे ! दो. ३०६ ची टीका पहावी दोहावलीतील ५०७ - ५१० हे चार दोहे भरतीस घ्यावे. येथे **मुख्य =** राजा असा अर्थ असला तरी जिथे जिथे कोणी मुख्य असेल तिथे तिथे हा दोहा लागू पडावा म्हणून 'भूपति मुख सो' न म्हणता 'मुखिआ' मुख्य म्हटले आहे. हा दोहा लक्षांत ठेऊन मुख्य म्हटले जाणारे, असणारे वा स्वतःस मानणारे वागतील तर कलियुगिं होइल कृतयुग करणी ।। सर्वसुखी व सर्वांचे कल्याण होईल. पण लक्षांत कोण घेतो !

(२) **मुख्य मुखासम पाहिजे** - मुख्य मुखासारखा असावा. राजा एकच असावा. मुख्य राजसत्ता एकाच्याच हाती असावी. कुटुंबप्रमुख सुद्धा एकच असावा; पण मुखासारखा असावा. **खाण्यापिण्यास एक** - खाणेपिणे शब्दाने दार्ष्टान्ताकडे घेतानां सर्व विषयांचे सेवन ग्रहण करणे जरूर आहे, जसा **'विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः' (भ.गी.)** या श्लोकात आहार = विषयग्रहण असा अर्थ आहे. भाष्य पहावे. **(क) पालि पोषि सहित विवेक** - नुसतें पालन करून भागणार नाही किंवा नुसते पोषण करून भागणार नाही व या दोन्ही गोष्टी अविवेकाने करूनही भागणार नाही. प्रत्येक अंगाच्या पोषणाला आवश्यक असलेले रस मुखाकडून योग्य पद्धतीने व आवश्यक प्रमाणांत, वेळच्यावेळी पुरविले गेले व त्या अंगांकडून आवश्यक तेवढे काम करून घेतले तरच सर्व अंगांचे आवश्यक तेवढे पोषण होईल. अनावश्यक व हानिकारक रस, अव्यवस्थितपणे, अवेळी जर मुख पुरवील तर नाना प्रकारचे रोग जसे देहाच्या विविध अंगांना होतात तशी विविध दुःखे प्रजा सचिव वगैरे राज्यांगांना होतील; आणि मग मुखरूपी राजाला नुसता जो रसास्वाद मिळावयाचा तोहि मिळणार नाही. म्हणून खातापितांना जसा विवेक करावा लागतो, पथ्यग्रहण व अपथ्य, कुपथ्य त्याग करावा लागतो त्या प्रमाणे

प्रजा, सचिव, सैन्य, कोष, दुर्ग, देश, राजधानी, सेवक इत्यादि कोणतेही अंग जास्त पुष्ट किंवा कृश होणार नाही व सर्व मयादेत राहतील; असे झाले पाहिजे. शरीराची अंगे जशी एकमेकांस सहायक, पूरक व पोषक असतात व प्रेमाने वागतात तशी सर्व राज्यांगेही एकमेकांस सहायक, पूरक व पोषक प्रेमाने झाली पाहिजेत. देहाचे एखादे अंग फार पुष्ट व एखादे कृश झाले की कुरूपता व व्याधि तेथे येतात तसेच राज्यांगांचे आहे. **(ख)** शरिराच्या ज्या अंगाचा जो स्वभाव धर्म आहे व जे कर्तव्य आहे त्यांचेच अनुष्ठान पालन ती ती अंगे व अवयव करीत असतात. चालण्याचे, उठण्याबसण्याचे वगैरे काम पाय व देण्याघेण्याचे वगैरे हात करतात व हातानीच केले पाहिजे. उजव्या हाताचे काम उजव्या हाताने व डाव्या हाताचे काम डाव्या हातानेच केले पाहिजे; आपत्काली एकमेकांचे काम हात करतात व केले पाहिजे; पण आपत्काल संपताच ज्याचे तोच करतो. 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः' न् 'श्रेयान् स्वधर्मो विगुणः ' 'परधर्मो भयावहः' हे जसे शरिराची अंगे पालन करतात तसे राज्यांतील प्रजा व इतर अंगे यांनी केले पाहिजे. याप्रमाणे अगदी थोडक्यात विस्तार करावयाचा म्हटले तरी नुसत्या अशा तुलनेने कमीत कमी शंभर पृष्ठे नीतिशास्त्रग्रंथांचे आधार न बघतां सहज लिहिता येतील. येथे तुलनेची नुसती दिशा दाखविण्यापेक्षा जास्त लिहितां येत नाही.

(३) **सहित विवेक** - विवेक हे कार्य मुखाचे नसून मन बुद्धि व चित्त यांचे आहे. म्हणून येथे विवेक शब्दाने गुरु व मंत्री समजणे जरूर आहे. पूर्वी राजाला विवेक म्हणजे ज्ञान म्हटले आहे. येथे विवेक म्हणजे कार्याकार्य विवेक, धर्माधर्म, विवेक, सारासार विवेक, योग्यायोग्य विवेक, हिताहित विवेक इत्यादि अनेकांचे ग्रहण करणे जरूर आहे. व हे कार्य गुरु व मंत्री यांचे आहे. एखादा पदार्थ पाहिल्यावर तोंडाला पाणी सुटले तरी तो खावा किंवा खाऊ नये हे ठरविण्याचा अधिकार मुखाचा नाही; तो अधिकार मनबुद्धीचा आहे. त्याप्रमाणे एखादा कायदा करावा असे राजाला वाटले तरी तो गुरुरूपी बुद्धी, मंत्रीरूपी मन यांच्या संमतीशिवाय करतां येऊ नये. **'बुद्धिभूतं त्रिलोकेशं तं नमामि बृहस्पतिम्'** असे देवगुरु बृहस्पतींचे वर्णन मंत्रांत आहे; म्हणून **गुरु = बुद्धि (क) मंत्री =** मंत्रोऽस्यास्ति इति, यद्वा मंत्रयते' मंत्र सांगणारा. मंत्र शब्दच मन व त्रै त्राण करणे या धातू पासून झाला आहे; म्हणून **मंत्री = मन.** असे साधार ठरले.

**(ख) अंगां सकल** - शरिराची बाहेरून दिसणारी अंगे जरी अगदी थोडी असली, तरी दुसरी पुष्कळ अंगे गुप्त आहेत. मेंदू (पांच) फुफ्फुसे दोन, रक्ताशयाचे चार भाग, प्लीहा, यकृत, पित्ताशय, ग्रहणी, मूत्रपिंड, अष्टीला, अनेक चक्रें, अनेक ग्रंथी, आतडी, उदर, वगैरे वगैरे सर्व यादी दिली तर एक पान भरेल. शुद्ध रक्तवाहिन्या, अशुद्ध रक्तवाहिन्या, दोन प्रकारचे ज्ञानतंतू, दांत, जीभ इत्यादि सर्व अवयव व अंगे सुस्थितीत असली तरच देह रूपी राज्याचे आरोग्य टिकते. तसेच राज्य निरोगी राहण्यासाठी राजा मंत्री व गुरु यांनी मिळून प्रयत्न केला पाहिजे. मागल्या चौपायांत मंत्री व गुरु यांचा उल्लेख आधी केला आहे व येथे विवेक शब्दाने सुचविला आहे.

**चौ. १ - (१) गुप्त मनोरथ जसे मनांतहि** - मनोरथ जसे मनांत गुप्त असतात तसे वरील दोह्यांत सर्व राजधर्म गुप्त आहेत. 'मनोरथानामगति र्न विद्यते' मनोरथांची गति कुठे नाही असे नाही. त्याच प्रमाणे दोह्यांत जे राजधर्माचे सारसर्वस्व सांगितले त्याची गति अमुक एका राजधर्मात नाही असे नाही. भाव हा की राजधर्माचा कोणताही शास्त्रमान्य सिद्धान्त असो तो या दोह्याने व्यक्त करतां येईल.

*हिं.* ***। बंधु प्रबोधु कीन्ह बहु भाँती । बिनु अधार मन तोषु न साँती ॥२॥***
***। भरत सील गुर सचिव समाजू । सकुच सनेह बिबस रघुराजू ॥३॥***
***। प्रभु करि कृपाँ पाँवरीं दीन्हीं । सादर भरत सीस धरि लीन्हीं ॥४॥***

*म.* ***। बंधुस केला प्रबोध बहुपरिं । विण आधार, न तोष शांति परि ॥२॥***
***। भरत शील गुरु सचिव समाज । लज्जा - स्नेह - विवश रघुराज ॥३॥***
***। प्रभु परि कृपें खडावा देती । सादर भरत धरुनि शिरिं घेती ॥४॥***

**अर्थ** - रामचंद्रांनी बंधूला अनेक प्रकारे उपदेश (प्रबोध) केला; परंतु आधारावाचून त्यास संतोष व शांति प्राप्त होईनात. ॥२॥ भरताचे शील व स्नेह आणि गुरु, सचिव व समाज यांची लज्जा (संकोच) यांना रघुराज विशेष वश झाले ॥३॥ परंतु प्रभूंनी कृपेने (आपल्या) खडावा दिल्या व भरताने त्या आदराने शिरावर धारण करून घेतल्या. ॥४॥

**टीका - चौ. - २ - (१) बंधुस केला प्रबोध बहु परिं** - येथें रामचंद्रांनी केलेल्या उपदेशाचा उपसंहार आहे. आतांपर्यंत जो उपदेश केला त्या सर्वांचे सार अयोध्येस परत जाण्यास निघालेल्या भरतांस पुन्हा सांगून त्यांचे समाधान

करण्याचा प्रयत्न केला. (**क**) **विण आधार, न तोष शांति परि - परि** = परंतु, दिसले की योग्य आधार न दिल्यामुळे यांना संतोष होत नाही; व असेच परत गेले तरि त्यास एक क्षणभर सुद्धा शांतता वाटणार नाही; त्यामुळे वाटले की खडावा देणे जरूर आहे.

**चौ. ३ - (१) भरतशील गुरु ..... रघुराज** - भरताच्या शीलामुळे त्यांच्या स्नेहाला फार वश होऊन खडावा देण्यांचे मनांत आणले खरे पण गुरुजनांच्या समाजांत देण्यास फार लज्जा वाटू लागली. अति संकोच वाटू लागला. भरताच्या शीलाकडे पाहतां वाटले की आधाराशिवाय भरत जगूं शकणार नाहीत. असा दुहेरी पेच पडला; कारण ते रघुराज आहेत; व त्यांनी मर्यादाभंग करणे योग्य नव्हे; पण प्राणसंकटाचा विचार केला तर गुरु वगैरे कोणाला आपला अपमान झाल्यासारखे वाटणार नाही असे वाटले; तेव्हा....

**चौ. ४ - (१) प्रभु परि कृपें खडावा देती** - प्रभु शब्दाने सुचवले की आपला रघुराजपणा विसरले व ऐश्वर्यभावाने खडावा दिल्या. प्रभूंनी त्या हातांत धरून पुढे करतांच भरतांनी अत्यंत आदराने आपले मस्तक त्यांच्या खाली करून हातांनी धरल्या व मस्तकावर धारण करून घेतल्या. त्या खडावा म्हणजे प्रभूंचे चरणच, प्रभूंच या भावनेने त्यांना भूमीचा स्पर्श होऊ दिला नाही. हाच आदर त्याक्षणी भरतांचा आनंद गगनाला ठेंगणे म्हणाला असेल !

**या खडावा कुठल्या? - वा.रा. २।११२।११३** त वर्णन आहे की भरताने आपल्या बरोबर आणलेल्या सुवर्ण-पादुका रामचंद्रांपुढे ठेऊन पायांत घालण्यास सांगितले व त्या अयोध्येचे योगक्षेम चालविण्यासाठी मागितल्या. वसिष्ठांनीही देण्याविषयी सूचना केली. नंतर रामचंद्रांनी त्या दिल्या. भरताने त्यांना प्रदक्षिणा नमस्कार करून हत्तीवरील अंबारीत ठेवल्या. (**क**) येथे मानसांत 'सुवर्ण पादुका' असा उल्लेख कुठेच नाही. येथे प्रथम **पाँवरीं = खडावा** असा स्पष्ट उल्लेख आहे. सुवर्ण पादुकांना नुसता 'खडावा' शब्द कोणी वापरत नाहीत व वापरणार नाहीत. खडावा म्हणजे लाकडाच्या; त्यांना 'काष्ठ पादुका' असे संस्कृतांत म्हणतात. पुढे 'चरन पीठ', पादुका असेच उल्लेख आहेत. सबब राम ज्या खडावा वनांत वापरीत असतील त्या दिल्या असे मानणेच मानसांतील उल्लेखांनुसार योग्य ठरते. कैकयीने मुनिपट भाजन वगैरे आणून दिले त्यांत असतील किंवा भरद्वाजांनी पूजा केली त्या पूजेत दिल्या असतील अथवा

चित्रकूटच्या भिल्ल कोळ्यांनी नवीन तयार करून दिल्या असतील असे मानणे योग्य. चित्रकूटच्या मुनींनी दिल्या असे मानणे मात्र योग्य ठरणार नाही; कारण रघुवर ब्राह्मणांकडून असले काहीही घेणार नाहीत. भरद्वाजांनी पूजा केल्याचा उल्लेख असल्यामुळे पूजेत अर्पण केलेल्या घेणे अयोग्य नाही. **(ख)** काही गुरुभक्त असे होऊन गेले की सद्गुरूंच्या चर्मपादुकांची (जोड्यांची) पूजा करीत असत. **पादुका कशाच्या हा प्रश्न अति गौण आहे. कोणाच्या पादुका व त्या घेणाराची भावना यांनाच महत्व आहे.**

*हिं.* *। चरनपीठ करुना निधान के । जनु जुग जामिक प्रजा प्रान के ॥५॥*
*। संपुट भरत सनेह रतन के । आखर जुग जनु जीव जतन के ॥६॥*
*। कुल कपाट कर कुसल करम के । बिमल नयन सेवा सुधरम के ॥७॥*
*। भरत मुदित अवलंब लहे तें । अस सुख जस सिय रामु रहे तें ॥८॥*

*म.* *। करुणानिधिचे चरणपीठ जे । प्रजा-प्राण-यामीक धीट ते ॥५॥*
*। भरत स्नेह - रत्न संपुट ते । जीव यतनिं जणुं अक्षर युग ते ॥६॥*
*। कुल - कपाट, कर कुशल कर्मि ते । विमल नयन सेवा - सुधर्मि ते ॥७॥*
*। भरतां मुद अवलंब लाभतां । सुख जस सीताराम राहतां ॥८॥*

**अर्थ** - जे करुणासागर रामचंद्रांचे चरणपीठ (चालण्याचे आसन = खडावा) आहेत ते प्रजाप्राणाचे धीट यमिक - पाहरेकरी - संरक्षक आहेत. ॥५॥ ते भरताच्या स्नेहरूपी रत्नाचे संपुट - डबी - डबा आहेत. व ते जीवाच्या यत्नांत - साधनांत जणू दोन अक्षरे (रा म) आहेत. ॥६॥ रघुकुलाचे कपाट आहेत आणि कुशल कर्मात ते हात आहेत; व सेवारूपी सुधर्मात ते नयन आहेत. ॥७॥ अवलंब मिळाल्यामुळे भरतांस असा आनंद झाला व असे सुख झाले की जसे सीताराम (घरी येऊन) राहिल्याने झाले असते. ॥८॥

**टीका - चौ. ५ - (१) चरणपीठ - पदपीठ नाही म्हटले चरणो** - भ्रमणे भक्षणे चापिं नपुंसक उदाहृतः' (मेदिनी) चरणं = भ्रमणं; म्हणून सुचविले की ज्या पादुका घालून राम संचार करीत असत त्या काष्ठपादुका = खडावा. पीठ = आसन, पाट, पिढे. जेथे पाय - ठेवण्याचे स्थिर आसन असा अर्थ आहे तेथे चरणपीठ न म्हणतां 'पदपीठ' म्हटले आहे. (२।९८।१ पहा.) **(क)** प्रजाप्राण यामीक धीट ते - यामिक (यामीक = पाहरेकरी; पाहरा देऊन वित्तादिकांचे संरक्षण करणारा. पाहरेकरी धीट असेल तरच तो रक्षण करू शकेल म्हणून

मुळांत नसलेला धीट शब्द घातला. प्रजाप्राण = प्रजेचे प्राण व प्रजेला प्राणांसारखे प्रिय वाटणारे भरत. **'होति, भरत सकलां प्राणप्रिय'** (१८५।२) प्रजा व भरत यांच्या प्राणांचे संरक्षण करणारे दोन धीट पाहरेकरी म्हणजे या खडावा. सुचविले की या खडावा जर मिळाल्या नसत्या तर भरत व प्रजा यांचे प्राण राहिले नसते. हे पाहरेकरी प्राणांना जाण्यास वाटच मिळू देणार नाहीत.

**चौ. ६ (१) भरत स्नेहरत्न संपुट ते** - संपुट - पेटी, डबी; जिच्यात मूल्यवान वस्तु ठेवतात ती. भरताचा रामस्नेह रूपी चिंतामणी या खडावारूपी पेटीत बंद करून ठेवला. आता हा स्नेह प्राणांना हृदयांतून घेऊन जाणार नाही. स्नेह हृदयांत गूढ होता. प्राणाचे निवासस्थान सुद्धा हृदयच **'हृदि प्राणो गुदे ऽपानः'** खडावा मिळाल्या नसत्या तर हृदयांत गूढ असलेला स्नेह रामविरहाने हृदय विदीर्ण करून प्राणांना घेऊन वनांत रामाजवळ गेला असता. पण आता स्नेहाला बाहेर काढला व दोन खडावारुपी डबींत भरून ठेवला; त्यामुळे तो आता हृदय विदारण करून प्राणांना घेऊन जाणार नाही. या प्रमाणे प्राणाला हृदयांत सुरक्षित ठेवण्याचे कार्य खडावारूपी धीट पाहरेकऱ्यांनी केले. असा हा संबंध आहे - म्हणून हा चरण मागल्या चरणाच्या पुढे त्याला जोडून आला. भरताच्या प्राणांचे संरक्षण हे दोन यामीक कसे करतात हे प्रथम सांगितले. **(क) जीव यतनिं जणुं अक्षर युग ते** - यतनम् = रक्षणम् (गी.ल.) = जतन. जीवाचे जतन-रक्षण करण्यात रा व म या दोन अक्षरांसारखे आहेत. **'दोन्हिं अक्षरें मधुर मनोहर । वर्णविलोचन दास जीव तर'** (१।२०।१) ही दोन अक्षरे म्हणजे दासाचा जीव आहेत. **'नर नारायण सम सुभ्राते । जगपालक दासां सुत्राते'** (१।२०।५) हे म व रा यांच्याबद्दलच म्हटले आहे. प्राण स्वतः जाऊ शकत नाही जीवच त्याला व इतरांना घेऊन जातो. जीवाचेच रक्षण केले; त्याला जाऊ दिला नाही म्हणजे प्राण जाणार नाहीत. या दोन खडावा जीवाचेच जतन = संरक्षण करतात. भरतांचा जीव रामलक्ष्मणांजवळ राहण्यासाठी विशेष तळमळत होता. पण आता या दोन खडावा म्हणजे **'नरनारायण सम सुभ्राते'** (म.रा.) आहेत. **'नर नारायण तुम्हिं कीं दोनी'** (४।१।१०) असे हनुमंताने रामलक्ष्मणांविषयी त्यांनाच विचारले आहे. या दोन खडावा म्हणजे 'राम' नाम म्हणजेच दोघे भाऊ रामलक्ष्मण असे भरतांस वाटले, व लोकांनाही वाटले. **'जगपालक'** (१।२०।५) प्रजेला वाटणार की रामलक्ष्मणच आपले पालन करण्यासाठी येऊन राहिले आहेत.

**चौ. ७ - (१) कुलकपाट - कपाट** - दार, दाराच्या फळ्या, **'नाम पाहरा दिननिशीं तुमचें ध्यान कपाट'** (५।३०) भरत राम खडावारूपी रामलक्ष्मणांच्या ध्यानांत मग्न होत राहिले म्हणजे त्यांचा जीव-प्राण जाणार नाही. भरताचे प्राण गेले की शत्रुघ्न, कौसल्या इत्यादींचे जाणार व हे रामलक्ष्मणांस कळले की त्यांचे जाणार, म्हणजे रघुकुळांतील सर्व पुरुषांचे जाणार व कुलक्षय होणार. हा कुलक्षय या खडावांनी वाचविला म्हणून कुलकपाट म्हटले. दार लाऊन घेतले बाहेरून म्हणजे निघून जाता येत नाही, त्याप्रमाणे खडावारूपी रामलक्ष्मणांच्या ध्यानात इंद्रियद्वारांची कपाटे बंद झाली म्हणजे **'जाण्या प्राण किं वाट ?'** (५।३०) प्राणांना जाण्यास वाटच राहणार नाही. कदाचित नयनरूपी वाट राहील; म्हणून त्या वाटेचा बंदोबस्त पुढील चरणांत सांगितला. **(क) कर कुशलकर्मि ते** - एका हाताचे कुशल कर्म आहे शौच - शुद्धि करणे, मल धुऊन टाकणे व दुसऱ्या हाताचे कुशल, कल्याणकारक कर्म आहे दान. 'दानेन पाणिः' त्याप्रमाणेच मल, पाप विनाश करून दान करणारे हे दोन हात आहेत. **'प्रेमभक्तिजलविण रघुवर तों । अभ्यंतर मल कधीं न जातो ॥ तव पद पद्मीं प्रीति निरंतर । सकल साधनां हें फल सुंदर'** (७।४९।६,४). सकल साधन म्हणजे कर्मच आहे. **'जळो कर्म सुख धर्म हि साधन । जिथें रामपदपंकज-भाव न'** (२९१।१) **कुशलकर्म** = रामपदपंकजभावयुक्त कर्म, धर्म व साधन. म्हणून ठरले की **या खडावांच्या योगाने रामपदपंकजभावयुक्त कर्म, धर्म साधनांचे संरक्षण होईल.**

(२) **विमल नयन सेवासुधर्मि - नयन** = नेणारे; नीयते अनेन इति नयनम् (अ.व्या.सु.) हे विमल नयन कोणते ? **'तत्कृत विमल विवेक विलोचन'** (१।२।२) विमल विवेक = विमल ज्ञान हा एक नयन ठरला. **'ज्ञान विराग नयन उरगारी !'** (७।१२।१४ टी.प.) म्हणून **विमल ज्ञान व विमल विराग हे दोन नयन** हे ठरले. राम ज्ञानाची मूर्ति व लक्ष्मण विरागमूर्ति आहेत हे पूर्वी अनेक वेळा टीकेत दाखविले आहे. **'जैं हृदिं बल वैराग्य विवर्धन ॥ ज्ञान विमल जलिं करी स्नान जैं । रामभक्ति उरिं करी स्थान तैं'** (७।१२२।९,११). म्हणून **सेवा सुधर्म** = हृदयांत रामभक्तीचा निवास होईल असे करणे, पण या ध्येयाकडे घेऊन जाणारे विमल विराग व विमलज्ञान हे दोन नयन पाहिजेत - ते या खडावा आहेत. सार हे की सर्वांना या खडावांच्या सेवेत व ध्यानाने वैराग्य व ज्ञान यांची प्राप्ति होऊन प्रेमभक्ति सर्वांच्या हृदयांत चिरंतन निवास करील.

**चौ. ८ (१) भरता मुद अवलंब लाभतां - राहतां** - प्रत्यक्ष रामविरहांत रहावे लागले तरी खडावा रूपाने रामलक्ष्मण अयोध्येत राहणार व वर दाखविल्याप्रमाणे सर्वांचे रक्षण करून सर्वांचे कल्याण करणार अशी खात्री असल्याने भरतांस आनंद झाला व सुख झाले. खडावा रूपी राम भरतांस राज्यकारभारांत आज्ञा देतात हे पुढे दिसेलच. रघुनाथाने ग्रामप्रवेश न करण्याचा नियम केला असल्याने प्रगट होऊन आज्ञा देण्यास अडचण पडू नये म्हणून भरत लोकवस्ती नसलेल्या ठिकाणी पर्णकुटी बांधून राहणार आहेत. कौसल्येला अयोध्येत रामलक्ष्मण सतत आपल्या पुढे दिसत असल्याचे वर्णन गीतावली (२।५३) मध्ये असले तरी तो भ्रम आहे असे त्याच पदांत कौसल्या म्हणाली आहे. 'माई री मोहि कोऊ न समुझावै' हे पालुपद आहे. 'सेवक कर पद नयनसे स्वामी मुखासमान' (३०६) यांत स्वामी सेवकांचा जो अविनाभाव (वेगळे नसणे, एकत्र असणे) सुचविला त्याप्रमाणे राम पादुका रूपाने भरतांच्या जवळ येऊन राहिले व जेथे राम तेथे लक्ष्मण असावयाचेच. या प्रमाणे दोन्हीकडील निर्वाह भरतांच्या इच्छेप्रमाणे केला गेला. 'दोहिकडे प्रभु सकल निभाविति' (३१४।४ टी.प.) दिसण्यात खडावा असल्या तरी रामलक्ष्मणच आहेत अशी भरताची दृढ भावना आहे. 'यादृशी भावना यस्य सिद्धिर्भवति तादृशी' हे सर्वसाधारण साधकांत सुद्धा अनुभवास येते; मग भरतांविषयी काय सांगावे ? **'हरि सर्वां व्यापुनि सम राहति । मी जाणें कीं प्रेमें प्रगटति'** (१।१८५।५) असे शंकरच म्हणाले आहेत. भरत तर 'साक्षात् रामप्रेममूर्ति' मग त्यांना काय अशक्य आहे ?

***तिसरा दरबार समाप्त व 'कृत रघुपतिंनी बहुविध सांत्वन' हे मुख्य प्रकरण येथे समाप्त झाले.***



## 'सहित पादुका नगरिं निवर्तन' प्रकरण (३१६ - ३२३)

*हिं.दो.* *। मागेउ बिदा प्रनामु करि राम लिए उर लाइ ॥*
*॥ लोग उचाटे अमरपति कुटिल कुअवसरु पाइ ॥३१६॥*
*हिं.* *। सो कुचालि सब कहँ भइ नीकी । अवधि आस सम जीवनि जी की ॥१॥*
*। नतरु लखन सियराम बियोगा । हहरि मरत सब लोग कुरोगा ॥२॥*
*। रामकृपाँ अवरेब सुधारी । बिबुध धारि भइ गुनद गोहारी ॥३॥*
*म.दो.* *। मागति आज्ञा नमुनि पदिं रामा धरिति हृदयासि ॥*
*॥ सुरपति उच्चाटित जनां कुटिल कठिण समयासि ॥३१६॥*
*म.* *। ती कुचाळि सर्वांना उत्तम - । जीवनि जीवा अवधि-आस सम ॥१॥*
*। न तर सिता प्रभु-लक्ष्मण-विरहीं । मरते हाय ! कुरोगिं सर्वही ॥२॥*
*। रामकृपेनें संकट टळलीं । गुणद साह्य सुर-धाड चि ठरली ॥३॥*

**अर्थ** - रामचरणीं प्रणाम करून भरतांनी आज्ञा (- निरोप) मागितली; (तेव्हां) रामचंद्रांनी त्यांस हृदयाशी धरले (मिठी मारली); अशा या कठिण समयीं सुरपतीने लोकांचे उच्चाटन केले.॥दो.३१६॥. ही कुचाळी (दुष्टपणा) अवधीच्या आशेप्रमाणे जीवाला उत्तम संजीवनी ठरली. ॥१॥ नाहीतर सीता, प्रभु राम व लक्ष्मण यांच्या वियोगरूपी कुरोगाने सर्व लोक हाय हाय ! करीत मेले असते.॥२॥ रामकृपेने सर्व संकटे टळली व देवांनी घातलेली धाड गुणकारक व साह्यच ठरली.॥३॥ (गोहारी = साह्य)

**टीका. दो. (१) सुरपति उच्चाटिति जनां** - जो उच्चाटनाचा प्रयोग पूर्वी केला होता तोच पुन्हा केला; त्यामुळे पूर्वीची द्विधा मनोगति नष्ट होऊन मनाचा ओढा अयोध्येकडेच लागला. पूर्वी ज्यांच्यावर उच्चाटनाचा परिणाम झाला त्यांच्यावरच आता झाला. **'भरत जनक मुनिजन सचिव ज्ञानि साधु वाचून ॥ ग्रासी सुरमाया जनां यथायोग्य पाहून'** (३०२) असेच घडले; असे पूर्व संदर्भाने मानणे योग्य आहे.

**चौ. १-२ (१) ती कुचाळि सर्वांना उत्तम जीवनि - जीवनि =** संजिवनि. सर्वांना म्हणजे भरतादि अपवाद सोडून सर्वांना. भरत व जनक यांच्यासुद्धा पथ्यावर पडलीच. बरोबर आलेले सर्व लोक खुषीने परत जाण्यास तयार झाले. कोणी हट्ट धरून मंदाकिनीच्या तीरी रडत प्रायोपवेशन करण्यास बसले असते,

तर भरत व जनक यांच्यावर एक नवे संकटच ओढवले असते. **(क) जीवनि जीवा अवधि आस सम** - चौदा वर्षांची मुदत संपताच राम परत येणार ही आशा जरी लोकांस जिवंत ठेवण्यास पूर्वी वियोग होताना कारण झाली. तशीच या वेळी होणाऱ्या वियोगांत जिवंत ठेवण्यास सुरपतीने केलेली कुचाळी उपयोगी पडली. **(ख)** हे उच्चाटन सुरपतीने केले नसते - तर भरतादि अपवाद सोडून बाकीचे लोक रामवियोगरूपी असाध्य रोगाने येथेच मेले असते.

**चौ. ३ (१) गुणद साह्य सुरधाड चि ठरली** - टोळ धाड आली व कोणी त्या धाडीला वृक्षादिकांवर उतरून दिली नाही तर त्या टोळांच्या ज्या लेंड्या पडतात ते उत्तम खत होते म्हणजे वृक्षांच्या जीवनाला गुणकारी व साह्यकारी ठरते तसेच रामकृपेने येथे झाले. रामचंद्रांनी आपल्या कृपेने या उच्चाटनाचा अनिष्ट परिणाम टाळला त्यामुळे हा प्रयोग गुणकारी व लोकांस परत पाठविण्यास साह्यकारीच ठरला. देवांना वाईट, दुष्ट वगैरे म्हणण्याचे कारण इतकेच की त्यांनी प्रजेचे रामप्रेम समूळ नष्ट करण्याचा प्रयत्न केला. पण रामचंद्रांनी आपल्या कृपेने तो त्यांचा कुटिल प्रयत्न निष्फळ केला. **'सुरमायें सब लोक विमोहित । अतिशय रामप्रेम न विरहित'** (३०२।४) याची टीका पहावी. लोकांचे रामप्रेम नष्ट करण्यात देवांचा हेतु होता की या लोकांनी पुन्हा रघुवराकडे येऊच नये. रामप्रेम नष्ट होण्यासारखे दुसरे महासंकट नाही, ते प्रभूंनी टाळले. पण घरी जाण्याची उत्पन्न केलेली इच्छा राहू दिली त्यामुळे रामवियोग सहन करण्यांस अनायासे साह्य झाले. येथे दाखविले की विघातक गोष्ट सुद्धा रामकृपेने गुणकारी व साह्यकारी ठरते.

***हिं.*** *। भेंटत भुज भरि भाइ भरत सो । राम प्रेम रसु कहि न परत सो ॥४॥*
*। तन मन बचन उमग अनुरागा । धीर धुरंधर धीरजु त्यागा ॥५॥*
*। बारिज लोचन मोचत बारी । देखि दसा सुर सभा दुखारी ॥६॥*
*। मुनिगन गुर धुर धीर जनक से । ग्यान अनल मन कसें कनक से ॥७॥*
*। जे बिरंचि निरलेप उपाए । पदुम पत्र जिमि जग जल जाए ॥८॥*

***हिं.दो.*** *। तेउ बिलोकि रघुबर भरत प्रीति अनूप अपार ॥*
*॥ भए मगन मन तन बचन सहित बिराग बिचार ॥३१७॥*

***म.*** *। कवळिति भाउ भुजानीं भरता । रामप्रेम-रस न ये वदतां ॥४॥*
*। तन-मन-वचनीं प्रेमा भरती । धीर-धुरंधर धीरा त्यजती ॥५॥*

*। वारिज लोचन वारी मोचति । बघुनि दशा सुर सभा दुःखि अति ॥६॥*
*। मुनि गुरु धीर-धुरीण जनकसे । ज्ञानानलिं मन कसित कनकसें ॥७॥*
*। जे विधिनें निर्लेप चि सृजले । पद्मपत्र सम जग-जलिं जगले ॥८॥*
म.दो. *। तेहि बघुनि रघुवर-भरत-प्रीत्यनुपमा अपार ॥*
*॥ होति मग्न तन मन वचनिं सहित विराग विचार ॥३१७॥*

**अर्थ** - भाऊ राम भरताला दोन्ही बाहूंत कवटाळून भेटले; तो रामप्रेमरस वर्णन करता येणे शक्य नाही.॥४॥ तनुमनवाणीत प्रेमाला भरती आली (उमाळा, पूर आला) व धीरधुरंधर असून त्यांनी धीर सोडला. (हुंदके देऊ लागले). कमलनेत्रांतून वारि वाहू लागले; तेव्हा ही दशा पाहून देव व सर्वसभा यांस फार दुःख झाले.॥६॥ विश्वामित्र वामदेवादि मुनिं, गुरु वसिष्ठ व ज्यांचे मन ज्ञानरूपी अग्नीत सोन्यासारखे तावून, सुलाखून निघाले आहे (कसले गेले आहे). असे जनकांसारखे धीरधुरीण - ॥७॥ ज्यांना ब्रह्मदेवाने जन्मताच निर्लेप उत्पन्न केले व जे या जगरूपी जलांत पद्मपत्रासारखे (नेहमी) जगले (राहिले) आहेत.॥८॥ ते सुद्धा रघुवर भरतांची अनुपम अपार प्रीति पाहून, ज्ञान वैराग्यांसहित तनुमनवाणीने (दुःख शोक) मग्न झाले.॥ दो. १३७॥ (प्रीति + अनुपमा = प्रीत्यनुपमा)

**टीका. चौ. ४-६ (१) रामप्रेम-रस न ये वदतां** - प्रेमाला अमृत, सुधा असे म्हटलेच आहे. प्रेम हा अदृश्य रस आहे. त्यांतही रामाचे भरतप्रेम व भरताचे रामप्रेम यांना उपमाच नाहीत; म्हणून हा प्रेमरस अनिर्वचनीय आहे. **(क) धीरधुरंधर धीरा त्यजती - शरीराला** कंप, रोमांच, स्वेद (घाम) व अश्रुप्रवाह; **मन** प्रेमाने वियोग दुःखांत मग्न; **वाणी** रुद्ध व हुंदके देत आहे. या प्रेमाच्या व वियोग दुःखाच्या पुरांत धैर्यवंताचे शिरोमणि असून त्यांचा धीर वहात गेला. ढसाढसा रडू लागले व घळघळा अश्रू वहात आहेत. **(ख) सुर सभा दुःखि अति** - सर्व सभा दुःखी, शोकांकुल झाली यांत नवल नाही; पण स्वार्थी देव सुद्धा फार दुःखी झाले कारण : I भरतापेक्षा रघुवरांसच भरत वियोग विशेष दुःखद झालेला दिसतो ! न जाणो बंधुवियोग असह्य होऊन गेले बरोबर तर ? असे वाटले. II आपल्यामुळे व आपल्यासाठी यांना दुःख भोगावे लागते; असे वाटून थोडे जास्त दुःख झाले. पण हे कारण गौण आहे. देवांची व सभेची दशा अशी होईल यांत नवल नाही.

**चौ. ७-८ व दोहा (१) मुनि गुरु धीरधुरीण जनकसे... जगले** - धीर सुटणे दुःखशोक मग्न होणे हे मनाचे कार्य आहे. ते मन ज्ञानरूपी अग्नीत तावून तावून व वैराग्यरूपी कसोटीवर सोन्यासारखे घासून घासून पूर्ण निर्विकार, निर्दोष व परम निर्मल होऊन धैर्याच्या सुमेरुसारखे झालेले; असे असून विश्वामित्र वामदेवादि मुनि, पूर्वी जनकांची समजूत घालणारे रामगुरु वसिष्ठ व विदेही म्हणून प्रसिद्ध असलेले जनकराजा सुद्धा ज्ञानवैराग्यांसहित तनुमन वाणीने दुःख शोकमग्न झाले. त्यांचाही धीर सुटला. उपजतच निर्लेप असून लिप्त झाल्यासारखे, ज्ञानीविरागी असून अज्ञानी विषयी जीवांसारखे शोकाकुल झालेले दिसले. **(क)** कमळाच्या पानांना पाणी कधीच चिकटत नाही; तथापि तलावांत पाणी एकाएकी फार वाढले की कमलपत्रेसुद्धा पाण्यात बुडतात, पण तेवढ्या वेळ पुरतीच; पुन्हा पाण्याच्या वर डोके काढतातच. जे दिसले ती 'सीतारामस्नेहमहत्ता' अशी दशा जेथे वसिष्ठ जनकादिकांची झाली तेथे इतरांच्या दशेचे वर्णन कोण व कसे करणार !

*हिं.* ***। जहाँ जनक गुर गति मति भोरी । प्राकृत प्रीति कहत बड़ि खोरी ॥१॥***
***। बरनत रघुबर भरत बियोगू । सुनि कठोर कबि जानिहि लोगू ॥२॥***
***। सो सकोच रसु अकथ सुबानी । समउ सनेहु सुमिरि सकुचानी ॥३॥***
***। भेंटि भरतु रघुबर समुझाए । पुनि रिपुदवनु हरषि हियँ लाए ॥४॥***

*म.* ***। जिथें जनक गुरु मति गति कुंठित । प्राकृत प्रीती वदणें अनुचित ॥१॥***
***। रघुवर - भरत - वियोग वर्णतां । कवि कठोर, जन म्हणति ऐकतां ॥२॥***
***। तो लज्जा-रस अकथ सुवाचे । स्नेह समयिंचा स्मरुनि संकुचे ॥३॥***
***। रघुवर भरता भेटुनि सांत्विति । रिपुदमना हर्षित हृदिं कवळिति ॥४॥***

**अर्थ** - जिथे जनक व गुरु वसिष्ठ यांच्या मतीची गति कुंठित झाली तिला प्राकृतांची प्रीति म्हणणे अनुचित आहे.॥१॥ रघुवर व भरत यांचा वियोग वर्णन केला असता तो ऐकताच लोक म्हणतील की कवि कठोर आहे-होता.॥२॥ तो लज्जारस सुद्धा सुंदर वाणीला अकथनीय आहे; (म्हणून) त्या समयींचा स्नेह आठवून ती लाजली.॥३॥ रघुवर भरतांस भेटले व मग त्यांचे सांत्वन केले; व हर्षित होऊन शत्रुघ्नाला हृदयाशीं धरून कवटाळला.॥४॥

**टीका. चौ. १ - (१) प्राकृत प्रीती वदणें अनुचित - भाव हा आहे** की जनकवसिष्ठांसारखे ज्या प्रीतीचा पार पावू शकले नाहीत ती प्रीती प्राकृत =

प्रकृति जनित = मोहजनित आहे, होती असे म्हणणे अनुचित आहे. 'स्नेह अगम रघुवर भरतांचा । स्पर्श न विधि हरिहर - चित्तांचा' (२४१।५).

**चौ. २-३ (१) कवि कठोर, जन म्हणति ऐकतां** - लोक म्हणतील की कवीचे हृदय पाषाणाहून कठीण होते. म्हणून त्यांना रघुवर भरत वियोगाचे वर्णन करता आले. **गूढभाव** हा आहे की रघुवरभरतवियोग पुष्कळ वर्णन करावा असे कवीच्या मनाला वाटते; पण वर्णन करण्याचा विचार करू लागताच बुद्धि त्या प्रेमात मग्न होते, वर्णन करता येत नाही. कवींनाच वाटत आहे की इतके वर्णन करता आले त्या अर्थी माझे हृदय फार कठोर आहे. **(क) तो लज्जारस अकथ सुवाचें** - कवीला कठोर म्हणतील म्हणून वर्णन करण्यास लाज वाटू लागली; हा जो लज्जारूपी रस तो सुद्धा अनिर्वचनीयच. **सुवाचें =** सुंदर वाणीने. वाणी जरी सुंदर असली तरी त्या समयीचा स्नेह वर्णन करण्याची सुद्धा शक्ति आपल्यांत नाही असे वाटल्यामुळेहि तिला लाज वाटली; त्यामुळे वियोग व स्नेह यांचे वर्णन करण्याची इच्छा असून करवत नाही. भाव हा की कवीची सुवाचा कुंठित झाली.

**चौ. ४ (१) रघुवर भरता भेटुनि सांत्विति** - येथे भरतभेटीचा उपसंहार केला. **(क) सांत्विति** -

*॥ भू-भूसुर-सुर-सुरभि-पालना । तुम्हिं जाणां मी वसत कानना ॥१॥*
*॥ सकल सहति दुःखें स्वार्थास्तव । प्राकृत लोकां स्वभाव हा तंव ॥२॥*
*॥ दुःखें लोकहितार्थी आपण । उभय सोसुं, रघुवंशी हा पण ॥३॥*
*॥ दुःसह जरि हा विरह वाटतो । लोकां शिकविल धर्मवाट तो ॥४॥*
*॥ वसतां तुम्हिं मम हृदयिं निरंतर । मी तुमच्या हि, नसे तिळ अंतर ॥५॥*
*॥ हें जाणुनि चौदा हे वत्सर । मजला स्मरतां जातिल सत्वर ॥६॥*
*॥ अधिक एकही दिवस काननीं । न राहतां मी येतो स्वजनीं ॥७॥*
*॥ विसरणार मी नाहिं तुम्हां क्षण । अवधि संपतां येतों तत्क्षण ॥८॥*

दो. *। लक्ष्मण आहे साह्य मज प्रजे तुम्हींच सहाय ॥*
*। दैवें संकटिं सकल जग दोघे करूं उपाय ॥१॥*
*॥ आतां पायिं न का तुम्हिं जाउं । होइल दुःख मला बहु भाऊ ! ॥१॥*

असे काही सांगून सांत्वन केले असेल.

हिं. *। सेवक सचिव भरत रुख पाई । निज निज काज लगे सब जाई ॥५॥*
*। सुनि दारुन दुखु दुहूँ समाजा । लगे चलन के साजन साजा ॥६॥*

*। प्रभु पद पदुम बंदि दोउ भाई । चले सीस धरि राम रजाई ॥७॥*
*। मुनि तापस बनदेव निहोरी । सब सनमानि बहोरि बहोरी ॥८॥*
हिं.दो. *। लखनहि भेंटि प्रनामु करि सिर धरि सिय पद धूरि ॥*
*॥ चले सप्रेम असीस सुनि सकल सुमंगल मूरि ॥३१८॥*
म. *। सेवक सचिव भरत मत बघुनी । लागति निज निज काजिं जाउनी ॥५॥*
*। ऐकुनि दारुण दुःख समाजां । गमनाच्या सजिती सब साजां ॥६॥*
*। युगबंधू प्रभुपदीं प्रणमुनी । निघति शिरीं रामाज्ञा धरुनी ॥७॥*
*। मुनि तापस वनदेवां विनवुनि । पुनः पुन्हा सन्माना देउनि ॥८॥*
म.दो. *। लक्ष्मणास भेटति; नमुनि शिरि सीतापद-धूळ ॥*
*॥ निघती प्रेमळ आशिषा श्रवुनि सुमंगल-मूळ ॥३१८॥*

**अर्थ** - सेवक व सचिव भरताची इच्छा (मत) पाहून गेले व आपापल्या कामाला लागले.॥५॥ (आता निघावयाचे हे) ऐकून दोन्ही (राज-) समाजात दारुण दुःख पसरले; व सर्व लोक निघण्याची तयारी करू लागले.॥६॥ प्रभूच्या पदकमलांना प्रणाम करून, रामाची आज्ञा शिरसावंद्य मानून दोघे भाऊ निघाले.॥७॥ मुनि, तपस्वी, वनदेव यांना प्रार्थना करून व त्यांना पुनः पुन्हा सन्मान देऊन - ॥८॥ लक्ष्मणास भेटले व सीतेला नमस्कार करून तिची पायधूळ मस्तकी धारण केली; व सुमंगलमूळ असे सीतेचे प्रेमळ आशीर्वाद ऐकून (भरत शत्रुघ्न) निघाले.॥ दो. ३१८ ॥

**टीका. सूचना - हिंदी दोह्यांत 'लखनहिं भेंटि प्रनामु करि - धूर'** असा शब्दक्रम असला तरी अर्थ क्रम शिष्टाचाराला व धर्मनीति मर्यादेला धरूनच घेतला पाहिजे. कोणी कोणास प्रणाम करावयाचा व कोणी कोणास भेटावयाचे हे पूर्वी कवींनी दाखविले असल्याने येथे संक्षेप केला आहे. 'भेंटि', शब्दाच्या पुढे अर्धविराम घेतला की अर्थ सरळ लागतो. 'लखनहि भेंटि; प्रनामु करि सिर धरि सिय पद धूरि' अर्थ वर दिलाच आहे. लक्ष्मणाने भरतांस प्रणाम केला व भरत त्यांस भेटले. शत्रुघ्नाने लक्ष्मणांस प्रणाम केला व लक्ष्मण शत्रुघ्नास भेटले.

हिं. *। सानुज राम नृपहि सिर नाई । कीन्हि बहुत बिधि बिनय बड़ाई ॥१॥*
*। देव दया बस बड़ दुखु पायउ । सहित समाज काननहिं आयउ ॥२॥*
*। पुर पगु धारिअ देइ असीसा । कीन्ह धीर धरि गवनु महीसा ॥३॥*
*। मुनि महिदेव साधु सनमाने । बिदा किए हरि हर सम जाने ॥४॥*

*। सासु समीप गए दोउ भाई । फिरे बंदि पग आसिष पाई ॥५॥*
*। कौसिक बामदेव जाबाली । पुरजन परिजन सचिव सुचाली ॥६॥*
*। जथा जोगु करि बिनय प्रनामा । बिदा किए सब सानुज रामा ॥७॥*
*। नारि पुरुष लघु मध्य बड़ेरे । सब सनमानि कृपानिधि फेरे ॥८॥*

म. *। सानुज राम नृपा शिर नमती । नाना विध करती स्तुति विनती ॥१॥*
*। देव ! दयेनें सुदुःखिं झालां - । सहित समाजा काननिं आलां ॥२॥*
*। पुरिं बळणें आशीस देउनी । गमन करिति नृप धीरा धरुनी ॥३॥*
*। मुनि महिदेव साधु सन्मानुनि । बोळविले हरिहर सम जाणुनि ॥४॥*
*। सासु - समीप बंधु युग जावुनि । वंदुनि वळले आशिस पावुनि ॥५॥*
*। कौशिक वामदेव जाबाली । पुरजन परिजन सचिव सुचाली ॥६॥*
*। उचित विनंति करोनी वंदन । बोळविती सानुज रघुनंदन ॥७॥*
*। श्रेष्ठ मध्य लघु नारिनरानां । कृपानिधी धाडिति सन्मानां ॥८॥*

**अर्थ** - अनुजासह रामचंद्रांनी जनकराजांच्या पायांवर मस्तक ठेऊन नमस्कार केला व मग त्यांची नानाप्रकारे प्रशंसा करून प्रार्थना केली. ॥१॥ देव ! आपण दयेने सर्व समाजासह वनांत आलांत व फार दुःखी झालांत. ॥२॥ आता आम्हांला आशीर्वाद देऊन नगरास वळावे. धीर धरून राजांनी प्रणाम केले. ॥३॥ मुनि, ब्राह्मण व साधू यांचा सन्मान (नमन, प्रार्थना इ.) करून, त्यांस हरिहरांसमान मानून निरोप दिला. ॥४॥ नंतर दोघे भाऊ सासवांकडे गेले व नमस्कार करून आशीर्वाद घेऊन आले. ॥५॥ कौशिक, वामदेव, जाबाली, सदाचारी (सज्जन), सचिव, पुरजन व परिवार - ॥६॥ यांना यथा योग्य प्रकारे विनंती वंदनादी करून अनुजासह रघुनन्दनांनी निरोप दिला. ॥७॥ श्रेष्ठ मध्यम, कनिष्ठ अशा सर्व नारीनरांना कृपानिधींनी सन्मानाने परत धाडले. ॥८॥

**टीका. - सूचना -** भरतांची इच्छा जाणून सेवकांनी जाऊन सर्व पुरवासी वगैरे लोकांना सूचना दिली. सचिवांनी जाऊन सैन्याला व राण्यांना वगैरे कळविले आणि भरत व राण्या वगैरेंच्या वाहनांची व्यवस्था लावली. नंतर भरत शत्रुघ्न रामचंद्रांस वगैरे भेटून पुढे गेले. आता इतर मंडळी क्रमाक्रमाने निघतात. इतक्या सगळ्या समाजास निरोप देताना रामलक्ष्मणांस किती धैर्य धरावे लागले असेल याचा विचार करावा. निरोप घेऊन जाणाऱ्यांस एकदांच विरह दुःख; पण निरोप देणाऱ्या एकट्या दुकट्या व्यक्तीस प्रत्येक व्यक्तीगणिक दुःख होणार !

(**क**) लक्ष्मण कोणाचेच नाते मानीत नाहीत व त्यांचे काम फार सोपे. राम ज्यांना जसे वंदन करतील त्यांस तसे वंदन करावयाचे इतकेच. छायेपेक्षासुद्धा काम कमी ! बोलण्याचे काम फक्त रामाचे. बोलणाराचे तोंड हलले म्हणजे छायेचे हलते; पण लक्ष्मण व शत्रुघ्न यांना तोंडसुद्धा उघडावे लागत नाही.

**चौ. २-३ - (१) पुरिं वळणे** - याचा अर्थ जनकांनी जाणला व ते थोडे आडवळण घेऊन अयोध्येस गेले हे पुढे दिसेलच. (**क**) **धीरा धरुनी** - सुचविले की राम बोलत असता त्यांना केलेली प्रशंसा वगैरे ऐकण्याने विदेहराज प्रेमवियोगव्याकुळ झाले होते व त्यामुळे आशीर्वाद न देण्यास पुरेसे कारण सहज सापडले; कारण रामविवाहानंतर वरात अयोध्येस जाण्यास निघाली तेव्हा जनकांनी बाकीच्या तिघांस आशीर्वाद दिले आहेत; पण रामचंद्रांस दिला नाही व रामचंद्रांस हृदयाशीही धरले नाहीत. येथेही रामलक्ष्मणांनी नमस्कार केल्यावर त्यांस भेटले नाहीत; म्हणून **'आशीस देउनी'** चा संबंध जनकांकडे घेता येत नाही. राम परमात्मा आहेत ही भावना येथेही कायम आहे. हे कारण आहे.

**चौ. ४-५-६ - (१) मुनि महिदेव साधु** - यांचा संबंध जनकांबरोबर आलेल्या व इतर मुनिब्राह्मणांकडे घेणे जरूर आहे. वामदेव जाबाली अयोध्येतले; व वसिष्ठांचा उल्लेख पुढे सर्वांच्या शेवटी दो. ३२० मध्ये आहे; म्हणून येथे **मुनि वसिष्ठ असा अर्थ घेता येत नाही.**

**सुचाली** = कुचालीच्या उलट; म्हणजे सदाचारी, सज्जन; इतर सज्जन लोक.

*हिं. दो. । भरत मातु पद बंदि प्रभु सुचि सनेहँ मिलि भेंटि ॥*
*॥ बिदा कीन्ह सजि पालकी सकुच सोच सब मेटि ॥३१९॥*
*हिं. । परिजन मातु पितहि मिलि सीता । फिरी प्रानप्रिय प्रेम पुनीता ॥१॥*
*। करि प्रनामु भेटी सब सासू । प्रीति कहत कबि हियँ न हुलासू ॥२॥*
*। सुनि सिख अभिमत आसिष पाई । रही सीय दुहुँ प्रीति समाई ॥३॥*
*म. दो. । भरत-मातृपदिं नमुनि प्रभु स्नेहें शुचि भेटून ॥*
*॥ बोळविती मेणा सजुनि लज्जा शुच निरसून ॥३१९॥*
*म. । सीता परिजन - पितरां भेटुनि । पूतं-पति- प्रेमा ये परतुनि ॥१॥*
*। प्रणामि सासुनां भेटति सकला । प्रीति - कथनिं उल्हास न कविला ॥२॥*
*। शिकवण अभिमत आशिस घेई । स्नेहीं उभय मग्न ती होई ॥३॥*

**अर्थ** - प्रभूंनी भरत मातेच्या पायांना वंदन केले व पवित्र स्नेहाने भेटून,

शोकलज्जा यांचे निरसन करून, सजवून आणलेल्या मेण्यांत बसवून तिला पोचविली. ।।दो.३१९।। (राम जनकांस भेटत असतां) माहेरचा परिवार, माता व पिता यांना भेटून पवित्र पतिप्रेम असणारी सीता परत आली ।।१।। (नंतर) सीतेने सर्व सासवांना प्रणाम केला व त्या सगळ्या तिला भेटल्या. त्या प्रीतीचे वर्णन करण्यास कवीला उल्हास वाटत नाही. ।।२।। शिकवण व मनोवांछित आशीर्वाद घेतले-मिळाले; व ती दोन्ही स्नेहांत मग्न झाली. ।।३।।

**टीका. - दो. (१) - भरत मातृपदिं** - कवींनी सुचविले की कैकईकडे 'कैकई' या दृष्टीने न पाहता आता भरतमाता या भावनेने पहावे. **शुचि स्नेहें** - ज्यांत कपट, अनादर, तिरस्कार इ. कोणताही विकार नाही अशा शुद्ध पवित्र मातृप्रेमाने भेटले. **(क) प्रभु** या शब्दाने सुचविले की प्रभूंनी आपले ऐश्वर्य थोडे प्रगटपणे सांगितले. सांगितले असेल की या सर्व गोष्टी माझ्याच इच्छेने देवांनी दैवानुसार केल्या आहेत. प्रारब्धाने तुम्हाला निमित्त करून माझे कार्य सुकर केले व विश्वावर उपकार केला. तुमच्याविषयी वडिलांचा जो ग्रह झाला आहे तो मी अयोध्येत परत येण्याच्या आधी बदलेल. तुम्ही जरा सुद्धा लज्जित होण्याचे व खेद पश्चात्ताप करण्याचे कारण नाही. आतां अयोध्येत कोणी तुम्हांला दोष देणार नाही. १४ वर्षे पुरी होतांच मी परत येईन; इत्यादी सांगून समजूत घालून बजावले असेल की मी जे रहस्य सांगितले ते कोणाला सांगू नका. **यावेळी सुद्धा प्रथम भरत मातेलाच भेटले.**

**चौ. १-३ - (१) ल.टे.** - येथे असा भ्रम उत्पन्न होतो की जनकराजांनी तर प्रयाण केले, भरत मातेला पोचविली व आता सीता मातांना वगैरे व सर्व सासूंना कशी भेटली? रामचंद्रांनी कोणाकोणाला निरोप दिला वगैरे क्रमाने सांगितले. सीतारामलक्ष्मण बरोबरच निघून जनकांच्या तंबूत आले. सीता परिवाराला व मातांना भेटण्यास गेली व रामलक्ष्मण जनकांस नमन करूं लागले. रामलक्ष्मण सासवांना भेटण्यास आत गेले तेव्हा सीता बाहेर येऊन पित्यास भेटली. नंतर रामलक्ष्मण मुनिमहिदेवादिकांना निरोप देण्याच्या कार्यास लागले व सीता आपल्या सासवांकडे परत आली; त्यांना सर्वांना प्रणाम केला; त्या तिला प्रेमाने भेटल्या वगैरे गोष्टी घडल्या. एकाचवेळी दोन ठिकाणी घडणाऱ्या गोष्टी काव्यांत एकाच वेळी वर्णन करता येत नाहीत; म्हणून एका बाजूचे वर्णन आधी करून दुसऱ्या बाजूचे नंतर करावे लागते; तसेच येथे घडले आहे.

सीता व सासवा यांच्या भेटीगाठी होतात न होतात तोच राम मातांकडे आले व प्रथम कैकयीला भेटले.

(२) **पूत पति प्रेमा -** पूत - पवित्र आहे पतिप्रेम जिचे अशी. अशी आहे म्हणून तर आईबापांना थोड्या वेळांत भेटून परत आली. **(क) स्नेहीं उभय मग्न ती होई -** पूतपतिप्रेम व सासवांवरील प्रेम, यांत मग्न झाली. कोणतेच प्रेम सोडता येत नाही व कोणाचाच वियोग होऊ नये असे वाटले; पण पूतपतिप्रेमाचा उल्लेख आधी करून सुचविले की त्याचाच विजय होणार व त्या आधारावरच हे प्रेम आहे.

**वि.ल.टे.** माण्डवी, उर्मिला व श्रुतकीर्ति माहेरच्या मंडळीस भेटल्याचे उल्लेख येथेही नाही; किंवा सीता त्यांना भेटल्याचा उल्लेख नाही. म्हणून **त्या आल्याच नाहीत हे पूर्वी केलेले अनुमानच याने दृढ झाले.**

*हिं. । रघुपति पटु पालकी मगाई । करि प्रबोध सब मातु चढाई ॥४॥*
*। बार बार हिलि मिलि दुहु भाई । सम सनेहँ जननीं पहुँचाई ॥५॥*
*। साजि बाजि गज बाहन नाना । भरत भूप दल कीन्ह पयाना ॥६॥*
*। हृदयँ रामुसिय लखन समेता । चले जाहिं सब लोग अचेता ॥७॥*
*। बसह बाजि गज पसु हियँ हारें । चले जाहिं परबस मन मारें ॥८॥*

*म. । रघुपति मेणे रुचिर मागविति । समजाउनि मातांना बसविति ॥४॥*
*। घडि घडि दोघे मिळुनी भेटति । स्नेहें सम जननींस पोचवति ॥५॥*
*। सजुनि वाजि गज वाहन नाना । भरत - भूप - दळ करी प्रयाणा ॥६॥*
*। हृदयिं राम सीता सह लक्ष्मण । जाती सगळे लोक अचेतन ॥७॥*
*। वृष हय गज पशु हृदय-भंगले । परवश मारुनि मना चालले ॥८॥*

**अर्थ -** रघुपतींनी सुंदर मेणे मागविले व समजूत घालून सर्व मातांना मेण्यांत बसविल्या. ॥४॥ दोघे भाऊ मिळून मिसळून (हिलिमिलि) वारंवार भेटले, समान स्नेहाने भेटले व सर्वजननींना पोचविल्या. ॥५॥ हत्ती घोडे वगैरे नाना वाहने सजवून भरत व राजा जनक यांचे सैन्य व समाज यांनी प्रयाण केले ॥६॥ सर्वांच्या हृदयांत लक्ष्मणासह रामसीता आहेत व सगळे लोक अचेतन - जडासारखे होऊन जात आहेत. ॥७॥ बैल घोडे हत्ती व इतर (उंट, खेचरे) पशु भग्नहृदय झाले आहेत. पण परवशतेमुळे मन मारून चालले आहेत. ॥८॥

**टीका - चौ. ४-५ - (१) मेणे =** पालकी (हिंदी), दरवाजे किंवा पडदे असलेली पालखी. **(क)** सर्व मातांना बसविल्या त्या कशा बसविल्या हे पांचव्या

चौपाईत सांगितले आहे. समजूत घालून वारंवार भेटून बसविल्या. सर्वांची समजूत रामचंद्रांनी एकदम घातली व नंतर दोघे आळीपाळीने भेटले एकेकीला व क्रमाने मेण्यांत बसविल्या. सर्वांच्या शेवटी सुमित्रा व कौसल्या यांना बसविल्या. चित्रकूटला माता आल्यावर दोघे ज्या क्रमाने भेटले त्याच क्रमाने भेटले व बसविल्या. **(ख)** मातांचे सांत्वन करावे लागले यावरून त्या प्रेमविरह विव्हल झाल्या होत्या. हे ठरते; व म्हणूनच आशीर्वाद दिल्याचा उल्लेख नाही.

**चौ. ६-८ - (१) सजुनि वाजि गज वाहन नाना - भरत भूप दल - दल =** सैन्य हा सामान्य अर्थ आहे; पण सैन्यांत वाजि गज व रथ सोडून दुसरी नाना वाहने नाहीत व **दल =** समूह, समाज हा दुसरा अर्थ आहे; त्यांत वाजि व नाना वाहने आहेत. पण हत्ती नाहीत; कारण जनकराज रथांतून आल्याचा उल्लेख पूर्वी केला आहे. म्हणून येथे सैन्य व समाज = दल असा अर्थ करणे उचित आहे. **(क) वृष हय गज पशु -** नेहमी पुढे हत्ती, मागे रथ, त्यांच्या मागे घोडे व त्यांच्या मागे उंट, खेचरे, बैल वगैरे पशु असतात. पण येथे कशास कांही शिस्त नाही. येथे पुढे बैल त्यांच्यामागे घोडे, रथ नंतर हत्ती व त्यांच्या मागे उंट वगैरे आहेत; म्हणजे पुरता उलटा क्रमही नाही. जाणारे लोक किती उदासीन आहेत याची यावरून कल्पना करावी. येताना गुरु वसिष्ठ व ब्राह्मण पुढे व जवळ होते आतां ब्राह्मण पुढे आहेत व वसिष्ठ अजून निघालेच नाहीत ! गेलेच पाहिजे म्हणून लोक कसेतरी निघाले आहेत इतकेच. **(ख)** पशू तर परतण्यासच कबूल नाहीत. त्यांची अत्यंत निराशा झाली आहे हे साहजिक आहे. प्रभुपादुकांचे दर्शन माणसांस होईल पण या पशूंना ते कसे होणार? त्यांना काहीच आधार मिळाला नाही. परवश असल्याने जिकडे जसे नेतील तसे जात आहेत. जणू काय त्यांचे मन मेले आहे व यंत्रासारखे जड पायांनी जात आहेत. **(ग) अचेतन -** वाहनांत बसलेले लोकही जडासारखे, तटस्थ आहेत. फक्त सर्वांच्या हृदयांत रामसीतालक्ष्मण आहेत; इतर कोणता विचारच नाही. आता अयोध्येतील सर्वाधिकारी गुरुमहाराज सपत्नीक मागे राहिले आहेत ते निघतील.

*हिं. दो.* *। गुर गुयतिय पद बंदि प्रभु सीता लखन समेत ॥*
*॥ फिरे हरष बिसमय सहित आए परन निकेत ॥३२०॥*

*हिं.* *। बिदा कीन्ह सनमानि निषादू । चलेउ हृदयँ बड़ बिरह बिषादू ॥१॥*
*। कोल किरात भिल्ल बनचारी । फेरे फिरे जोहारि जोहारी ॥२॥*

*म. दो.* *। गुरु गुरुनारिस नमुनि प्रभु लक्ष्मण सिता - समेत ॥*
*॥ परतुनि हर्ष विषादयुत पर्णनिकेतीं येत ॥३२०॥*
*म.* *। सन्माने धाडिला निषादा । जाइ भरुनि हृदिं विरहविषादा ॥१॥*
*॥ कोळि किरातादिकां फिरविले । घडि घडि जोहारुनी परतले ॥२॥*

**अर्थ** - सीता व लक्ष्मण यांच्या सह प्रभूंनी गुरु वसिष्ठ व गुरु नारी अरुन्धती यांना वंदन केले व हर्ष विषाद युक्त होऊन पर्णकुटीत परत आले. ॥दो.३२०॥ सन्मानाने निषाद राजाला परत धाडला; त्याचे हृदय विरहदु:खाने भरून आले व तो परत निघाला. ॥१॥ कोळी किरात भिल्ल (इ. वनवासी) यांना परत पाठविले व ते वारंवार जोहार करून परत गेले. ॥२॥

**टीका. दो. - (१) गुरु गुरुनारिस नमुनि प्रभु** - प्रभु, सर्व समर्थ भगवान असून गुरु व गुरुपत्नी यांच्या चरणांना वंदन केले. प्रभुच गुरूंकडे शेवटी आले त्यामुळे त्यांना आधी जाता आले नाही. प्रभुभावनेने पुढील गोष्टी विषयी कांही हितगुज करावयाचे असेल म्हणून ही युक्ती योजली असेल. सांगितले असेल की आम्ही आता लवकरच पावसाळा कमी झाला म्हणजे दंडकारण्यांत जाणार आहोत तरी कृपा करून आता अयोध्येतील कोणी मंडळी पुन्हा इकडे येणार नाहीत असे झाले तर चांगले इत्यादि. **(क) हर्ष विषाद** - आता देवकार्य निर्विघ्नपणे करता येईल या भावनेने हर्ष झाला व भक्तांच्या विरहदु:खाने विषाद वाटला. येथे हर्ष = उत्साह असा अर्थ आहे. या विषयी पूर्वी अनेकवेळां लिहिले आहे. १।२०८; १।२१०।१०; १।२१२।४ इ. पहावी.

**चौ. १-२ - (१) सन्माने धाडिला निषादा** - निषाद = निषादराज. त्याला प्रेमाने भेटले हा त्याचा सन्मान केला. **(क) कोळि किरातादिकां फिरविले** - हा चरण मागल्या निषादाकडेही घ्यावयाचा आहे. भाव हा की निषादराज प्रभूचा निरोप घेऊन निघाला तो चित्रकूटचे त्याचे प्रजाजन त्यास जोहार करण्यास आले. त्यांना त्याने निरोप दिला व परत पाठविले. ते प्रभुकडे पर्णकुटीजवळ आले तेव्हा त्यांना प्रभूंनी निरोप दिला व ते वारंवार जोहार करून परत फिरले. यांना मात्र विषाद विरह दु:ख नाही; कारण प्रभुदर्शन आता रोज होणारच आहे.

*हिं.* *। प्रभु सिय लखन बैठि बट छाहीं । प्रिय परिजन बियोग बिलखाहीं ॥३॥*
*। भरत सनेह सुभाउ सुबानी । प्रिया अनुज सन कहत बरवानी ॥४॥*
*। प्रीति प्रतीति बचन मन करनी । श्रीमुख राम प्रेम बस बरनी ॥५॥*

*। तेहि अवसर खग मृग जल मीना । चित्रकूट चर अचर मलीना ॥६॥*
*। बिबुध बिलोकि दसा रघुबर की । बरषि सुमन कहि गति घर घर की ॥७॥*
*। प्रभु प्रनामु करि दीन्ह भरोसो । चले मुदित मन डर न खरो सो ॥८॥*
म. *। प्रभु सिय लक्ष्मण वटतळि बसती । प्रिय परिजन - विरहें व्याकुळती ॥३॥*
*। भरत - स्नेह - सुशील - सुवाणी । प्रिये हि अनुजा वदति वानुनी ॥४॥*
*। मनवचकर्मी प्रतिती प्रीती । प्रभु निजमुखें प्रेमवश गाती ॥५॥*
*। त्या अवसरिं खग मृग जल जलचर । चित्रकूटचे म्लान चराचर ॥६॥*
*। विबुध बघून दशा रघुपतिची । कथिति सुमन वर्षुनि गति घरची ॥७॥*
*। प्रभुंनी नमुनि दिले आश्वासन । फिरले प्रमुदित मनिं भय भास न ॥८॥*

**अर्थ -** प्रभु सीता व लक्ष्मण वडाच्या खाली बसले व प्रिय परिजनांच्या विरहाने व्याकुळ झाले. ॥३॥ भरताचा स्नेह, सुस्वभाव व सुंदर वाणी प्रियेला व अनुजाला वर्णन करून सांगू लागले. ॥४॥ मन वाणी आणि कर्म यांतील भरताची प्रतीती व प्रीती प्रभु प्रेमवश होऊन आपल्या मुखाने वाखाणूं लागले. ॥५॥ त्या प्रसंगी पशुपक्षी जल जलचर (इत्यादी) चित्रकूटचे सर्व चराचर म्लान = खिन्न झाले. ॥६॥ रघुपतीची ही दशा पाहून विबुध (शहाणे देव) पुष्पवृष्टी करून आपल्या घरची दुर्दशा (गति) सांगू लागले. ॥७॥ प्रभूंनी प्रणाम करून त्यांना आश्वासन दिले (तेव्हा) ते प्रमुदित होऊन परतले कारण, मनांत भयाचा भास ही राहिला नाही ॥८॥

**टीका. - चौ. ३-५ - (१) प्रिय परिजन - विरहें व्याकुळती -** पूर्वी टीकेत सांगितले आहे की अशा वियोगाच्या वेळी एकाने अनेकांस क्रमशः निरोप देतांना त्याला स्वतःच्या हृदयांतील स्नेहाच्या व वियोगदुःखाच्या उमाळ्यांना पक्का बांध घालावा लागतो. सर्वांना निरोप देऊन झाल्यावर त्या दाबून बांधून ठेवलेल्या प्रवाहाला जोराच्या उसळ्या येतात व तो प्रवाह जोराने वाहू लागतो. तसे प्रभुचे झाले व ढसढसां रडण्यास सुरुवात झाली व ते पाहून सीता लक्ष्मण व्याकुळ झाले. १४१।३.६ पहा. प्रभू परमात्मा असून हे घडले याने भक्तांच्या **प्रेमाच्या प्रभावाची प्रचिती दाखवली.** **(क) प्रभु निजमुखे प्रेमवश गाती** - धाकटा भाऊ पुत्रासमान असल्यामुळे त्यांची प्रशंसा करू नये अशी नीति व शिष्टाचार आहे; पण भरताच्या त्रिविध प्रेमाला वश झाल्यामुळे भाऊ या नात्याने नव्हे तर भगवान प्रभु व भक्त या नात्याने प्रशंसा केल्याशिवाय राहवले नाही. **'अकामही भगवान सुज्ञ जरि । भक्त - विरह -**

**दुःखे दुःखी तरि'** (१।७६।२) असे शंकरांचेही वर्णन केले आहे. **(ल.टे.)** या सहा चौपायांत कवींनी प्रभु शब्दच वारंवार वापरला आहे. याने स्पष्ट केले आहे की बंधू या या नात्याने किंवा ऐहिक कौटुंबिक नात्याच्या संबंधाने ही व्याकुळता व भरताची प्रशंसा नसून भगवान (प्रभु) व भक्त या नात्याने हे सर्व आहे. **प्रिय भक्तांचा विरह भगवंतास किती दुःखद व दुःसह होतो हे येथे दाखविले आहे.** देवांनी मात्र रघुवर, रघुपति शब्द सहेतुक वापरला आहे.

**चौ. ६-८ (१) चित्रकुटचे म्लान चराचर -** प्रभु भगवानच शोकाकुल झाल्याने त्याचा परिणाम सर्व स्थावर जंगमांवर झाला यांत काही नवल नाही; पण भरताच्या रामप्रेमानेही असाच परिणाम झाला हे नवल आधीच दाखविले आहे. **'भरत भाव भूतळिं नसता जर। कोण करत चर, अचर, अचर चर'** (२३८।८) २३८।५; २२०।७ **पहा. (क) रघुपतिची - दशा बघून -** देवांना वाटले की कौटुंबिक नात्यांमुळेच रघुपति शोक करीत आहेत; कारण ते पडले विबुध; विशेष शहाणे ! त्यामुळे वाटले की हे असाच शोक करीत बसले तर आमच्या दुःखांची यांना आठवण सुद्धा होणार नाही व हे इथे च्त्रिकूटलाच राहतील. भरतादि वरचेवर येऊन भेटू शकतील म्हणून येथून जाणारच नाहीत व मग देवांचे, विबुधांचे कार्य होणार नाही; या भीतीने रघुपतींची दशा पाहून छातीत धडकीच भरली; म्हणून पुष्पवृष्टी करून आपले दुःखांचे रडगाणे गाऊ लागले. अशा प्रसंगी रघुवर, रघुपती रघुराज हेच शब्द वापरले आहेत. २४१।७; २६५।३; पहा. **(ख) प्रभुंनी नमुनि दिले - आश्वासन -** विबुध असून प्रभुंना रघुपति, रघुवरच समजले म्हणून प्रभु असून रघुपतीला शोभेल असे नमन केले. **'(तदपि) करिति सम विषम बिहारा। भक्त - अभक्त - हृदय - अनुसारा'** (२१९।५) **मनिं भय भास न -** याने सुचविले की आश्वासन मिळण्यापूर्वी **'सुरगण सभय भरे उरिं धडकी'** असे झाले होते. आता सध्या पुढील दोह्यात रामगिरीला रामराम ठोकून नंतर आपल्याला झटपट अयोध्येच्या मार्गाला लागले पाहिजे; पुन्हा येथे यावे लागेलच पण या कांडात नाही अरण्य कांडांत !

***हिं. दो.*** ***। सानुज सीय समेत प्रभु राजत परन कुटीर ॥***
***॥ भयति ग्यानु बैराग्य जनु सोहत धरें सरीर ॥३२१॥***

***म. दो.*** ***। सानुज सह सीते प्रभु राजति पर्ण-कुटीरिं ॥***
***॥ भक्ति ज्ञान विराग जणुं सह शोभती शरीरि ॥३२१।***

**अर्थ -** अनुज लक्ष्मण व सीता यांच्या सह प्रभु पर्णकुटीस असे विराजत

आहेत की जणू ज्ञान विराग आणि भक्ति शरीर धारण करून एकत्र शोभत आहेत. ॥३११॥

**टीका - दो. (१) भक्ती ज्ञान विराग - भक्ति** - स्त्री = **सीता, ज्ञान-पुरुष = राम व विराग पुरुष = लक्ष्मण.** रामाच्या डाव्या बाजूस सीता व उजव्या बाजूस लक्ष्मण बसले आहेत. हे भक्ती ज्ञान विराग या क्रमाने सुचविले. **'सानुज जिथ वसत राम लोकलोचनाभिराम । वाम-अंगि वामावर विश्ववंदिनी' (गीता. २।४३।१)** असे चित्रकूट वर्णनांतच म्हटले आहे. या उत्प्रेक्षेत दाखविलेल्या भावनेचा अरण्यकांडांत विशेष उपयोग होणार आहे. **'शोभे मुनिवेषीं जणूं मदन सरति ऋतुनाथ'** (१३३) असा राम चित्रकूटला राहिल्याचा उपक्रम केला. **शची जयंता सह जसे वासव अमरपुरीत'** (१४१) **'ज्ञानसभे जणुं धृत तनू भक्तिसच्चिदानंद'** (२३९) असे सीताराम भरत चित्रकूटास आल्यावर त्यांस दुरून दिसले; व भरत गेल्यावर आतां चित्रकूटनिवास वर्णनाच्या उपसंहारांत भक्ती ज्ञान विराग म्हटले.

**शंका** - येथे भक्तीला ज्ञानाची गृहिणी (पत्नी) असे म्हटले; पण श्रीमद्‌भागवत माहात्म्यांत भक्तीला ज्ञानवैराग्यांची माता असे म्हटले आहे; व महाराष्ट्रांत 'भक्ति ज्ञानाची माउली' असेच म्हणतात. **'अहं भक्तिरिति ख्याता इमौ मे तनयौ मतौ ॥ ज्ञानवैराग्य - नामानौ कालयोगेन जर्जरौ' (भा.मा. १।४-५). समाधान** - श्रवणादि नवविधा भक्तीने ज्ञान प्राप्ती होते; म्हणून **श्रवणादि नवविधा भक्ति ज्ञानाची माता आहे. (३।१६।६-८ टी.प.)** व येथे ज्या भक्तीचा उल्लेख केला आहे ती ज्ञानोत्तर भक्ति = पराभक्ति आहे. '**ज्ञान विमल जलिं करी स्नान जैं । रामभक्ति उरिं करी स्थान तैं** (७।१२२।११) नवविधाभक्ति साधनसाध्य आहे; पण प्रेमभक्ति पराभक्ति साधनाने साध्य होणारी नसून कृपासाध्य आहे. या प्रमाणे भागवत माहात्म्यवचन व रामचरितमानस यांत विरोध नाही. **'अद्वैतसिद्धि'** या प्रसिद्ध ग्रंथाचे कर्ते श्री मधुसूदन सरस्वती यांचा **'भक्तिरसायन' ग्रंथ पहावा** व श्रीमद्‌भागवत १०।८७ वेदस्तुति पहावी; म्हणजे मानसांतील सिद्धांत व भागवतांतील सिद्धांत एकच आहेत हे दिसेल.

*हिं.* *। मुनि महिसुर गुर भरत भुआलू । राम बिरहँ सब साजु बिहालू ॥१॥*
*। प्रभु गुन ग्राम गनत मन माहीं । सब चुपचाप चले मग जाहीं ॥२॥*
*। जमुना उतरि पार सबु भयऊ । सो बासरु बिनु भोजन गयऊ ॥३॥*
*। उतरि देवसरि दूसर बासू । राम सखा सब कीन्ह सुपासू ॥४॥*

*। सई उतरि गोमतीं नहाए। चौथें दिवस अवधपुर आए ॥५॥*

म. *। मुनी भरत गुरु भूप विप्रकुळ। रामविरहिं जन सगळे व्याकुळ ॥१॥*
*। गणिती प्रभुगुण - गणां मनानें। सब चुपचाप जाति मार्गानें ॥२॥*
*। यमुना उतरुनि समाज नेला। तो वासर विण भोजन गेला ॥३॥*
*। गंगा उतरुनि वस्ती दुसरी। रामसखा सुखसोयि सब करी ॥४॥*
*। सई उतरुनी स्नान गोमतीं। चौथे दिवसिं अयोध्ये येती ॥५॥*

**अर्थ** - मुनी भरत, गुरुवसिष्ठ, भूप जनक, सर्व विप्रसमुदाय आणि बाकीचे सर्व लोक रामविरहाने व्याकुळ झाले आहेत. ॥१॥ प्रभुंच्या गुणसमूहांचे मनाने चिंतन करीत सर्व मंडळी चुपचाप (मौन) मार्गाने जात आहेत. ॥२॥ (पहिल्या दिवशी) सर्व समाज यमुनेच्या पलीकडे नेला गेला व दिवस भोजनावाचूनच गेला. ॥३॥ गंगा उतरून (शृंगवेरपुरास) दुसरी वस्ती केली; तेथे रामसखा गुहाने सर्व सुखसोय केली. ॥४॥ सईनदी उतरून गोमतीत स्नान केले (तिसरी वस्ती) व चौथे दिवशी अयोध्येत आले. ॥५॥

**टीका** - (१) पहिला मुक्काम महिला घाटाजवळ यमुना ओलांडून आल्यावर केला. त्या दिवशी जलाहार करूनच राहिले. भरत आले तेव्हा नऊ मुक्काम करून दहाव्या दिवशी चित्रकूटास पोचले. आता तीन मुक्काम करून चौथ्या दिवशी अयोध्येस आले यांत नवल काहीच नाही. सीता पायी अनवाणी चालत आली आणि वाल्मीकी आश्रमांत आडवळण घेऊन गेले तरि पांच मुक्काम करून साहव्या दिवशी चित्रकूटास पोचले आहेत. शृंगवेरपुराहून सुमंत्र तर पुरता एक दिवस न लागतांच अयोध्येस आले आहेत. भरतांस खरोखर एक दिवस जास्तच लागला. सर्वच, वाहनांनी येत आहेत; पायी कोणीच चालले नाहीत. परत जाताना भरत भरद्वाजाश्रमांत किंवा प्रयागांत गेले नाहीत. आता अयोध्येत पोचल्यानंतरचा इतिहास -

हिं. *। जनकु रहे पुर बासर चारी। राज काज सब साज सँभारी ॥६॥*
*। सौंपि सचिव गुर भरतहि राजू। तेरहुति चले साजि सब साजू ॥७॥*
*। नगर नारि नर गुर सिख मानी। बसे सुखेन राम रजधानी ॥८॥*

हिं. दो. *। राम दरस लगिं लोग सब करत नेम उपबास ॥*
*॥ तजि तजि भूषन भोग सुख जिअत अवधि कीं आस ॥३२२॥*

म. *। जनक चार वासर पुरिं राहति। राज्यकार्य सब साजां पाहति ॥६॥*

*। राज्य सचिव - गुरु - भरतां सोपुनि । जाती मिथिले समाज घेउनि ॥७॥*
*। नगर नारि - नर गुरु वचनानीं । वसती सुखें राम - नृप - धानी ॥८॥*
*म. दो. । रामदर्शना सर्व जन करिति नेम उपवास ॥*
*॥ त्यागिति भूषण भोग - सुख जगती अवधी - आस ॥३२२॥*

**अर्थ** - जनकराजा चार दिवस नगरांत राहिले; सर्व राज्यकार्य आणि सर्व साज संच (सैन्य, कोष इ.) पाहिला. ॥६॥ नंतर सचिव गुरु व भरत यांच्या ताब्यांत राज्य देऊन (सोपवून) आपण सर्व समाजासह मिथिलेस गेले. ॥७॥ अयोध्येतील सर्व स्त्रिया व पुरुष गुरुवसिष्ठांच्या वचनांनी (उपदेशामुळे) रामचंद्रांच्या राजधानीत सुखाने राहिले. ॥८॥ श्रीरामदर्शनासाठी सर्व लोक नेम व उपवास वगैरे करू लागले; भूषणे व भोगसुखांचा त्यांनी त्याग केला आणि अवधीच्या आशेने त्यांना जगविले. (ते जिवंत राहिले.) ॥दो. ३२२॥

**टीका. - चौ. ६-७ - (१) राज्यकार्य सब साजां पाहति - 'चिंता गुरुनृप यां गृह वनिंची । शिरावरी गुरु मुनि मिथिलेशहि'** (३२५।१-२) असे जे राम म्हणाले ते जनक राजांनी चार दिवस राज्य कारभार चालवून सर्व व्यवस्था व शिस्त लाऊन आपल्यापुरते खरे करून दाखविले. **(क) राज्य सचिव गुरु भरता सोंपुनि. 'पालि पोषि अंगां सकल तुलसी सहित विवेक'** (३१५) यांतील विवेक शब्दाने मन बुद्धी = सचिव व गुरु सुचविले असे जे तेथे टीकेत म्हटले **त्यांची प्रतीति येथे पहावी ! 'गुरु विवेक सागर'** (१८२।१) त्यांनी कार्याची योग्यता अयोग्यता भरताने मुखाने (मुख्य मुखासम) विचारल्यावर ठरवावी. मग मुखाने तदनुसार सचिवांना आज्ञा द्यावी व त्यांनी कार्य पहावे अशी शिस्त लाऊन दिली. **'देश कोष पुरजन परिवारहि । यांचा गुरुपदरजिं सब भारहि'** (३१५।७) हे रामवचन यथार्थ ठरले.

**चौ. ८ - (१) गुरुवचनांनी । वसती सुखें रामनृपधानीं- नृपधानीं =** राजधानीत. **वसती सुखें -** विरोध न करतां, राहण्याचे मान्य केले. सुचविले की वसिष्ठांनी जर लोकांची समजूत, अयोध्या राम राजधानी आहे या मुद्यावर भर देऊन, घातली नसती तर लोक अयोध्येत राहण्यास कबूल झाले नसते. वसिष्ठांनी सांगितले असेल की -

*। राज्य राजधानी रामाची । खाण सदा जी सकल सुखांची ॥१॥*
*। राम-पादुका प्रतिनिधि असती । प्रजा राज्य पुर भरत रक्षती ॥२॥*
*। भरत रामसेवक तुम्हिं जाणां । भय शंका मनिं काहिं न आणा ॥३॥*

*। चौदा वर्षे पूर्ण संपता । राजाज्ञेची करुनि पूर्तता ॥४॥*
*। दुसरे दिनिं येतिल रघुराजा । करूं स्वागता सजवुनि साजां ॥५॥*
*। येतिल नगरिं नक्कि रघुनंदन । बसवुं राज्यिं करा मग वंदन ॥६॥*
*। मम वचनीं विश्वास राखणें । सुखें बंधुनों ! नगरिं राहणे ॥७॥*
*। चित्तिं अवधिभर धीरा राखा । रामराज्यिं सुख अनुपम चाखा ॥८॥*

**दो.** *। रामदर्शना करूं व्रत स्नेहें नेम यमादि*
*। ईशकृपें ना स्पर्शती कांहि दुःख शोकादि ॥१२॥*

**दो. - (१) रामदर्शना** - दो. ८६ व दो. १८८ टीका पाहणे. इतके सर्व झाले तरि १४ वर्षे पूर्ण होतांच राम येतील या एका आशातंतूवरच लोक जगले. **'जल अवधी प्रिय परिजन मीन'** (५७।२) असे कौसल्या रघुनाथास वनगमनाच्या वेळी म्हणाली तेच खरे ठरले.

**हिं.** *। सचिव सुसेवक भरत प्रबोधे । निज निज काज पाइ सिख ओधे ॥१॥*
*। पुनि सिख दीन्हि बोलि लघु भाई । सौंपी सकल मातु सेवकाई ॥२॥*
*। भूसुर बोलि भरत कर जोरे । करि प्रनाम बर बिनय निहोरे ॥३॥*
*। उँच नीच कारजु भल पोचू । आयसु देब न करब सँकोचू ॥४॥*
*। परिजन पुरजन प्रजा बोलाए । समाधानु करि सुबस बसाए ॥५॥*

**म.** *। भरत सुसेवक सचिवां बोधिति । आज्ञें निज निज कार्यी लागति ॥१॥*
*। बोलावुनि लघुबंधु शिकविती । सकल मातृसेवा सोपविती ॥२॥*
*। भूसुर अणवुनि भरत जुळुनि कर । नमुनी प्रार्थिति विनयानें वर ॥३॥*
*। कार्यि शुभाशुभ उच्च किं नीच हि । आज्ञा द्यावि विना संकोचहि ॥४॥*
*। प्रजा नि पुरजन परिजन अणविति । समाधानयुत सुखांत वसविति ॥५॥*

**अर्थ** - सचिव व उत्तम सेवक यांना भरतांनी उपदेश केला व आज्ञेप्रमाणे ते आपापल्या कार्याला लागले.॥१॥ (मग) धाकट्या भावाला (शत्रुघ्नाला) बोलावून उपदेश केला आणि सर्व मातांची सेवा त्यांच्याकडे सोपविली.॥२॥ (मग) भूसुरांना आणवून नमस्कार करून हात जोडून फार (वर) विनयाने प्रार्थना केली की - ॥३॥ चांगले-वाईट, उच्च-नीच (हलके) कोणतेही कार्य असो आपण संकोच न बाळगता मला आज्ञा देत जावी.॥४॥ प्रजा, पुरवासी व परिजन यांना बोलावून समाधानाने सुखांत वसविले (राहतील असे सांगितले).॥५॥

**टीका. चौ. १ (१) सुसेवक सचिवां बोधिति - यांना सांगितले असेल की**

**'असे सकल रघुपतिसंपत्ती' 'करी स्वामिहित सेवक तोही' आणि 'जिथें प्रजा प्रिय दुःखी भारी । तो नृप खचित निरयं अधिकारी'** (७१।६) हे श्री रघुनाथाचे वचन व **'मुख्य मुखासम पाहिजे'** ही सर्व वचने ध्यानात ठेऊन प्रजा सुखी राहील अशी दक्षता सर्वांनी बाळगली पाहिजे. जे जे कार्य ज्यांच्या ज्यांच्याकडे पूर्वी होते त्यांत बदल करण्याचा माझा अधिकार नाही. तो अधिकार रघुनाथांचा आहे. ते माझ्या शिरावर या पादुकांच्या रूपाने आहेत. मी राजा नसून रामराज्याचा सांभाळ करण्याची जबाबदारी प्रारब्धाने शिरावर पडलेला एक रामसेवकच आहे. **'पाळू आम्हीं तुम्हीं मिळोनी आज्ञे रामाचे । सरतिल राम-कृपेने सत्वर दिन हे दुःखाचे । योगक्षेमा चालविण्याला समर्थ हे पाय । दुःख संकटें सकल निवारिति अपणां भय काय** ॥ इत्यादी प्रकारे सर्व सचिव आणि सर्व मुख्य अधिकारी यांना सांगितले असेल. **प्रभुपादुका मस्तकावर घेऊनच भरताने सर्वांची समजूत घातली असा उल्लेख वा. रा.** २।११५।१५-१६ यांत आहे. त्या आधारावरच हे लिहिले आहे. (ओधना = गुंतणे, अडकणे असा शब्दशः अर्थ आहे).

**चौ. २-४ (१) घरची सर्व व्यवस्था** शत्रुघ्नाकडे सोपविली. **(क) भूसुर** शब्दाने सुचविले की त्यांना या पृथ्वीवरील देव मानूनच त्यांची प्रार्थना केली. हे नीच = क्षुद्र, हलके कार्य करण्याबद्दल सम्राट पुत्राला कसे सांगावे; रघुनाथ वनांत असता 'अमुक काम करा' असे दुःखी भरतांस कसे सांगावे वगैरे शंका मनात न आणता अगदी मोकळ्या मनाने कार्याची आज्ञा या दासाला, आपल्या सेवकाला देत जावी. श्रीरघुनाथ कृपेने व या सुखनिधानांच्या (पादुकांच्या) आश्रयाने हा आपला दास आपल्या अडचणी, सर्व दुःख संकटे निवारण करून आपणांस सुखी करण्याचा जिवापाड प्रयत्न करील.

**चौ. ५ (१) समाधानयुत सुखांत बसविति** - वसिष्ठांनी सर्व लोकांना ज्या प्रकारचे आश्वासन दिले (३२२।८ टी.प.) तसेच पण भरताच्या भावनेला अनुसरून गुरुवसिष्ठांच्या सामर्थ्याचा व आशीर्वादाचा प्रभाव सांगून सर्वांचे समाधान केले असेल.

*हिं.* *। सानुज गे गुर गेहँ बहोरी । करि दंडवत कहत कर जोरी ॥६॥*
*। आयसु होइ त रहौं सनेमा । बोले मुनि तन पुलकि सपेमा ॥७॥*
*। समुझब कहब करब तुम्ह जोई । धरम सारु जग होइहि सोई ॥८॥*

*हिं.दो.* *। सुनि सिख पाइ असीस बड़ि गनक बोलि दिनु साधि ॥*

*॥ सिंघासन प्रभु पादुका बैठारे निरुपाधि ॥३२३॥*

म. *। सानुज मग गुरुगेहिं पोचले । करुनि दण्डवत करयुग जुळले ॥६॥*

*। जर आज्ञा राहीन सुनेमें । तनु पुलकुनि मुनि वदले प्रेमें ॥७॥*

*। समजां वदां करां तुम्हिं जें ही । धर्मसार जगिं होइल तेंही ॥८॥*

म.दो. *। शिक्षा आशीर्वच महा मिळत दिवस बघवीति ॥*

*॥ निरुपाधी प्रभु-पादुका सिंहासनि बसवीति ॥३२३॥*

**अर्थ** - मग अनुजासह गुरुंच्या घरी जाऊन पोचले; दण्डवत करून हात जोडले. (व म्हणाले की) ॥६॥ जर आपली आज्ञा मिळाली तर मी उत्तम नेमाने राहीन म्हणतो. (ऐकून) शरीर पुलकित होऊन मुनि प्रेमाने म्हणाले की - ॥२॥ जे काही तुम्ही समजता व समजाल (मनात आणाल) बोलाल व कराल ते या जगात सर्व धर्मांचे सार होईल हे निश्चित (- ही) ॥८॥ (या प्रमाणे) शिक्षा (= उपदेश) व मोठा आशीर्वाद मिळाल्यावर (भरत घरी परत आले) व शुभ दिवस पाहविला आणि निरुपाधी प्रभुपादुका सिंहासनावर बसविल्या - स्थापन केल्या.॥३२३॥

**टीका. चौ. ६ (१) गुरु गेहिं पोचले** - वसिष्ठांचा आश्रम अयोध्येच्या बाहेर होता. हे पूर्वी टीकेत दाखविले आहे; हल्ली तेथे वसिष्ठ कुंड आहे. वा. रा. सर्ग ११५ मध्ये हे वर्णन सविस्तर आहे. तो सर्व सर्गच मुद्दाम वाचण्यासारखा आहे. मात्र पादुका स्थापन केल्या त्या अयोध्येत न करता नन्दिग्रामीच केल्या आहेत. वसिष्ठ, सचिव, सर्व सैन्य व सर्व लोक भरतांनी विनंती केली नसताही भरतांच्या रथाच्या मागोमाग नन्दिग्रामी गेले आहेत. येथे मानसांत मात्र फरक आहे. ज्या प्रभूंनी दिल्या त्या खडावा (पाँवरी) नंदिग्रामी नेल्या आहेत हे पुढे दिसेलच. येथे सिंहासनावर स्थापन केल्या त्या पादुका म्हणजे राम पूर्वी वापरीत असत त्या रत्नजडित सुवर्ण पादुका असे मानणे भाग आहे. यामुळे राम अयोध्येच्या सिंहासनावर आहेत अशी लोकांची भावना होईल व त्यांनाही रामराज दर्शनाचा आनंद व समाधान मिळेल. वनस्थ रामाच्या पादुका राजसिंहासनावर बसविणे भरताच्या व रामाच्या भावनानुसार योग्य नाही; म्हणून नगरस्थ रामाच्या पादुका नगरांत सिंहासनावर व वनस्थ रामाच्या पादुका नन्दिग्रामाजवळील वनात असा हा क्षीरनीर विवेक भरतांनी केला.

**चौ. ७-८ (१) जर आज्ञा राहीन सुनेमें** - रामसेवकाने या काळात ज्या

नियमांचे पालन करून राहिले पाहिजे त्या सेवकधर्माला योग्य अशा उत्तम नेमांचे पालन करून राहणार. मुनिवेष, मुनींचा आहार इत्यादी पुढे सांगतीलच. **(क) समजां वदां** - तुमच्या मनात तुम्ही जे ठरविले आहे ते योग्य आहे; तसेच करावे, हा समाजां = समजतां याचा एक अर्थ आहे व याला उद्देशूनच दोह्यांत 'शिक्षा' = उपदेश = 'सिख' हा शब्द आहे. **(ख) धर्मसार जगिं होइल** - हा वसिष्ठांचा आशीर्वाद आहे. 'यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः । स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते' (भ.गी.) **सर्व धर्मांचे सार आहे भगवत्सेवाधर्म** बंधु धर्म, राजधर्म इत्यादींचा आदर्श भरतांच्या चरित्रांत असला तरी मुख्य आहे सेवा धर्म. तो किती कठोर व किती दुष्कर आहे हे आतापर्यंतच्या भरत चरित्रांत उत्तम प्रकारे दाखविले गेले आहे.

**दोहा.** - दोह्यांतील महत्त्वाचे भाव आधीच वर स्पष्ट केले आहेत. **(क) निरुपाधी =** निरुपाधि = उपाधिरहित - उपाधिधर्मचिन्तायां कुटुम्बव्यापृते छले.' (विश्वमेदिन्यौ) धर्मचिंता, कौटुम्बिक जबाबदारीने व्यापलेला व छल = **उपाधि.** हे सगळे अर्थ येथे ग्राह्य आहेत. राम असते तर त्यांना धर्मचिंता करावी लागली असती; कौटुंबिक जबाबदारी पाठीस लागली असती; व छल-कपट त्यांच्याशी केले जाण्याचा संभव होता. यांतील कोणत्याच गोष्टीची शक्यता पादुकांच्या बाबतीत नाही. बसविणाऱ्या भरतांस आता धर्मचिंता राहिली नाही. राजा म्हणून पडलेली राज्यरूपी कुटुंबाची जबाबदारी राहिली नाही व पादुका बसविण्यात त्यांनी छलकपट केले नाही. उत्साहाने, आनंदाने बसविल्या. अशा रीतीने हा शब्द पादुका बसविण्याची क्रिया यांच्याबरोबर घेणे इष्ट.

***"सहित पादुका नगरिं निवर्तन" प्रकरण समाप्त.***



## भरत राहणी प्रकरण (शेवटचे)

हिं. *। राममातु गुरुपद सिरु नाई । प्रभु पद पीठ रजायसु पाई ॥१॥*
*। नंदिगाँव करि परन कुटीरा । कीन्ह निवासु धरम धुर धीरा ॥२॥*
*। जटाजूट सिर मुनिपट धारी । महि खनि कुस साँथरी सँवारी ॥३॥*
*। असन बसन बासन ब्रत नेमा । करत कठिन रिषि धरम सप्रेमा ॥४॥*
*। भूषन बसन भोग सुख भूरी । मन तन बचने तजे तिन तूरी ॥५॥*

म. *। राममातृ-गुरु-पदिं शिर ठेउनि । प्रभुपद पीठ-अनुज्ञा घेउनि ॥१॥*
*। नंदिगांविं कृत पर्ण-कुटीर । निवसति धर्म-धुरंधर धीर ॥२॥*
*। जटाजूट शिरिं, मुनिपटधारी । खणुनि महीं घालिति कुश-हथरी ॥३॥*
*। अशन वसन पात्रें व्रत-नेमां । प्रेमें करिति कठिण ऋषि धर्मा ॥४॥*
*। भूषन वसन भोग सुख भूरी । वचतनमनिं तृणसम कृत दूरी ॥५॥*

**अर्थ -** राममाता कौसल्या व गुरु यांच्या पायांवर मस्तक ठेऊन, प्रभुपादुकांची अनुज्ञा घेऊन - ॥१॥ नंदिगांवी पर्णकुटी बांधली (तयार करविली); व तिथे धर्मधुरंधर धीर अशा भरतांनी निवास केला.॥२॥ मस्तकावर जटा बांधल्या, मुनिवस्त्रे वल्कले धारण केली व जमीन खणून तेथे कुशांची हतरी (चटई, साथरी) घातली.॥३॥ अशन (आहार) वस्त्रे, पात्रे, व्रते व नेम आणि इतर कठीण ऋषिधर्म यांचे प्रेमाने पालन करू लागले.॥४॥ भूषणे, इतर वस्त्रे व विषयभोग यांचे भरपूर सुख शरीराने मनाने व वाणीने तृणासमान टाकून दिले. दूर केले.॥५॥ (तूरी = तोडून, मोडून)

**टीका. चौ. १ (१) राममातृ -** असा एकटीचाच उल्लेख आहे. पूर्वी **'सकल मातृसेवा'** (३२३।२) असे नुकतेच म्हटले. इतर कोणत्याही मातेला वंदन केले नाही हे ठरले. यावरून काय ते अनुमान करावे. **(क) प्रभुपदपीठ** - 'पाँवरी' 'चरनपीठ' म्हटले नाही हे लक्षात असावे. पद = स्थान; एकाच स्थानी स्थिर असलेल्या प्रभु पादुकांची अनुज्ञा घेतली. हे कसे शक्य आहे असे श्रद्धावंतांस सुद्धा वाटेल. हे घडते, या कलियुगातही घडते हे त्रिसत्य आहे; पण कसे घडते ते अनुभवाने कळते, चर्चेने कळण्यासारखा हा विषय नाही. दृढ सात्विक श्रद्धेने व अनन्यगतिक प्रेमाने, दीनतेने व परम लीनतेने दृढ अभ्यास केला म्हणजे कळते. फोटो, मूर्ती, चित्र आज सुद्धा विचारलेल्या वा आज्ञा मागितलेल्या कार्याला

संमती आहे की नाही हे सांगतात व उत्तम साधकाला सुद्धा सांगतील.

**चौ. २-३ (१) नंदिगांव** अयोध्येपासून पांच कोसावर अयोध्येच्या दक्षिणेस आजही आहे, भरतकुंड रेल्वेस्टेशनजवळच आहे. **(क) खणुनि मही** - त्या पर्णकुटीत जमिनीत गुहा तयार केली. योगी, ध्यानप्रिय, समाधीचा अभ्यास करणारे, यांच्या अशा गुहा-गुंफा नुसत्या मातीतच तयार केलेल्या आजसुद्धा विद्यमान आहेत. अशी पहावयाची असेल तर परांडा (बार्शीपासून १६-१७ मैल) येथील मंगळवार पेठेतील श्रीकल्याण स्वामींच्या मठांत जाऊन पहावी. दगडविटांनी बांधलेली नाही. **(ख)** भक्तिभावनेच्या दृष्टीने आपण उभे राहिलो असता आपले मस्तक पादुकांच्या उंचीच्या वर जाऊ नये व आपल्या मस्तकावर नेहमी पादुका असाव्यात; या भावनेने पर्णकुटीत जेथे राम खडावा ठेवावयाच्या (ठेवल्या) त्या जागेच्या खाली आपले मस्तक येईल अशा रीतीने गुहा खणली. **चासकमान** (किंवा कडूस) तालुका खेड, जि. पुणे येथील **गणेशगिरीवर** श्री दत्तपादुका वर मंदिरांत आहेत व अगदी बरोबर खाली दगडांनी बांधलेली गुहा आहे. तपश्चर्येला व अभ्यासाला पूर्ण एकान्त, शान्त, सुरक्षित व रमणीय स्थान आहे; पाणी जरा दूर इतकेच.

**चौ. ४ (१) प्रेमें करिति कठिण ऋषिधर्मा** - ज्यांचे आचरण ऋषींना सुद्धा कठीण अशा धर्मांचे पालन भरत सम्राट कुमार असून करू लागले. कळा देत, केलेच पाहिजे म्हणून, केव्हा एकदा या नियमांतून सुटू असे काही न वाटता अगदी मनापासून प्रेमाने करू लागले. **परमार्थाची तळमळ व सगुण साक्षात्काराची लालसा बोलून दाखविणाऱ्या साधकांनी काय तो बोध घ्यावा.**

**ल. टे.** - मानसांतील भरत व वाल्मीकी रामायणांतले भरत यांत महदंतर आहे. म्हणून नन्दिग्रामी (= नंदिगांवी) स्थापन केलेल्या पादुकांविषयी जे वर्णन वा. रा. आहे ते येथे घेता येत नाही. ते नगरांत स्थापन केलेल्या पादुकांना लावावे. येथे 'स्वयं दासाः तपस्विनः' आपले आपणच दास, सेवक.

**चौ. ५ - (१) भूषण वसन... कृत दूरी** - यांत वैशिष्ट्य हे आहे की जागतिक विषयसुखांचा गंध मनात सुद्धा नाही. कृतीने वाणीने विषयसुखांचा त्याग करणारे पुष्कळ; नुसत्या वाणीने त्याग करणारे तर वाटतील तितके; पण मनाने विषयसुखांचा त्याग करणारे फारच दुर्मिळ. मनाने त्याग करून कृतीने व वाणीने त्याग न केलेलेही दिसतील क्वचित; पण अन्तर्बाह्य त्यागी मिळणे फारच कठीण.

*हिं.* *। अवध राजु सुरराजु सिहाई । दसरथ धन सुनि धनद लजाई ॥६॥*
*। तेहिं पुर बसत भरत बिनु रागा । चंचरीक जिमि चंपक बागा ॥७॥*
*। रमा बिलासु राम अनुरागी । तजत बमन जिमि जन बड़भागी ॥८॥*
*हिं.दो.* *। रामपेम भाजन भरतु बड़े न एहिं करतूति ॥*
*॥ चातक हंस सराहिअत टेंक बिबेक बिभूति ॥३२४॥*
*म.* *। अवधराज्यिं सुरराजा ईर्षित । धनद कळत दशरथधन, लज्जित ॥६॥*
*। त्यापुरिं वसती भरत अरागें । जसा चंचरिक चंपक बागें ॥७॥*
*। रमाविलास राम-अनुरागी । त्यजिति वमनसम जन बहुभागी ॥८॥*
*म.दो.* *। रामप्रेमास्पद भरत बडे न या करतूतिं ॥*
*॥ चातक - हंसां प्रशंसिति टेक - विवेक - विभूतिं ॥३२४।*

**अर्थ -** अयोध्येच्या राज्यावर सुरराजा हर्षित होतात व दशरथांचे धन कळतांच (ऐकतांच) धनद-कुबेर लज्जित होतात.॥६॥ (पण) चंचरीक - भुंगा जसा चंपक बागेत राहतो तसे भरत त्या नगरीत आसक्तिहीन (अ-रागे) होऊन वसतात.॥७॥ रामप्रेमी महाभाग्यवान भक्त लक्ष्मीच्या विलासांचा ओकारी (वमना) प्रमाणे त्याग करतात.॥८॥ (मग) भरत तर रामचंद्रांच्या प्रेमाचे पात्र ! या कर्तृत्वाने ते मोठे ठरत नाहीत. चातक व हंस यांची त्यांच्या दृढनेम व विवेक या विभूतिमुळे काय म्हणून प्रशंसा करावी ? (तो तर त्यांचा ईश्वरदत्त जन्मजात स्वभाव आहे.)

**टीका. चौ. ६-७ (१) अवधराज्यिं सुरराजा ईर्षित -** याने अयोध्येतील सौंदर्य, ऐश्वर्य, विषयभोगसमृद्धि इत्यादींची अलौकिकता सांगितली. हे सर्व दृश्य गुण आहेत. पण धन = पैसा, तिजोरीत किती आहे हे असे दिसत नाही; ऐकल्याने कळते. दशरथांचे धन किती आहे हे कळले की कुबेर - धनद लज्जित होतो; त्याला वाटते की मी त्यामानाने रंकच ! अशा नगरीचे प्रशासक व अशा दशरथांचे प्रिय पुत्र असून भरतांस यांतील कोणत्याही गोष्टीबद्दल राग = आसक्ति नाही. फार काय या सर्व ऐश्वर्यादि, स्वर्गातही दुर्लभ असणाऱ्या, भोगांचा त्यांनी त्याग केला आहे. दृष्टांत देतात - **(क) जसा चंचरिक चंपक बागें -** सोनचाफ्यांच्या बागेत भुंगे येतात पण ते त्या फुलांना स्पर्शसुद्धा करीत नाहीत. त्या फुलांचा सुगंध त्यांना दुःसह होतो. म्हणून तर नारळाला भुंगा (भुरूड म्हणतात) लागला की गाभ्याजवळ सोनचाफ्यांची फुले घालून ठेवतात. भरतांस अयोध्यारुपी चंपक बागेत राज्यकारभारासाठी मधून मधून भुंग्याप्रमाणे यावे लागते; पण ते नगरीतील

संपत्ती वगैरेवर मनानेसुद्धा कधी भुलत नाहीत. भुंगा त्या सुगंधावर मनाने भुलत नाही असे म्हणता येत नाही; म्हणून दुसरा दृष्टान्त देतात. **(ख) रमाविलास...त्यजिति वमनसम** - वमन = ओकारी; ओकून टाकलेली वस्तु. ओकारी खावी, तिचा उपभोग घ्यावा असे मनुष्यांस जसे मनातसुद्धा कधी वाटत नाही त्याप्रमाणे भरतांस अयोध्येतील भोगविलास, धनसंपत्ती पाहून कधी मनातसुद्धा त्या विषयांची इच्छा उत्पन्न होत नाही. तनमनवाणीने विषयांचा त्याग कसा केला हे दाखविण्यासाठी हे दृष्टान्त दिले आहेत.

**दो. (१) रामप्रेमास्पद भरत** - प्रेम + आस्पद, पात्र, भाजन. रामचंद्रांनी आपले प्रेम ज्या पात्रांत, ज्या स्थानांत ठेवले आहे असे म्हणजेच राम ज्यांच्यावर अपार प्रेम करतात, त्या भरतांनी असा त्याग केला यांत त्यांची काही महती आहे असे नाही. असा त्याग नसता केला तरच आश्चर्य. चातकाने आपला प्रेमाचा नेम अत्यंत दृढतेने चालविला तर त्यांत काही आश्चर्य नाही; न चालवील तर त्यास चातक म्हणणारच नाहीत; तो चातक नव्हेच. तसेच हंसाने दूधपाणी वेगळे केले तर त्यांत काही आश्चर्य नाही. हे त्याचे स्वाभाविक ऐश्वर्य (विभूति) आहे. हंस असे न करील तरच आश्चर्य ! व न करील तर बदक ठरेल ! बगळे किंवा बदके नीरक्षीर विभागणी करतील तर आश्चर्य म्हणता येईल व वटवाघळे चातकांसारखी प्रेमनेम-निष्ठ झाली तर आश्चर्य. रामबंधु, रामप्रेमपात्र असे करणार नाहीत तर कोण करील ?

*हिं.* *। देह दिनहुँ दिन दूबरि होई । घटइ तेजु बलु मुखछबि सोई ॥१॥*
*। नित नव राम प्रेम पनु पीना । बढ़त धरम दलु मनु न मलीना ॥२॥*
*। जिमि जलु निघटत सरद प्रकासे । बिलसत बेतस बनज बिकासे ॥३॥*
*। सम दम संजम नियम उपासा । नखत भरत हिय बिमल अकासा ॥४॥*
*। ध्रुव बिस्वासु अवधि राका सी । स्वामि सुरति सुरबीथि बिकासी ॥५॥*
*। राम पेम बिधु अचल अदोषा । सहित समाज सोह नित चोखा ॥६॥*

*म.* *। दिन दिन होई शरीर दुबळें । घटे मेद, बल, मुखछबि न-ढळे ॥१॥*
*। रामप्रेमपण तु नव पीन हि । वृद्धि धर्मदल, मन न मलीन हि ॥२॥*
*। जस जल आटे शरत्प्रकाशित । विलसति वेतस, वनज विकासत ॥३॥*
*। शम दम संयम नियम उपास हि । भगण, भरत हृद् विमलाकाश हि ॥४॥*
*। ध्रुव विश्वास अवधि राकासी । स्वामी-स्मृति सुरवीथि - विकासी ॥५॥*

*। रामप्रेम अचल बिधु दोष न । सहित समाज नित्य अति शोभन ॥६॥*

**अर्थ** - दिवसें दिवस शरीर कृश होऊ लागले (कारण) मेद घटू लागला; पण बल व मुखकान्ति जरासुद्धा ढळत नाहीत.॥१॥ रामप्रेमाचा पण मात्र नित्य नवा व पुष्ट होत चालला; व धर्माचे सैन्य वाढू लागले; पण मन मलीन होत नाही.॥२॥ ज्याप्रमाणे शरद ऋतू प्रकाशू लागताच जल आटत जाते, वेत सुशोभित होत जातात व कमले विकासू लागतात.॥३॥ शम, दम, संयम, नियम व उपवास ही नक्षत्रे (= भगण) होत; भरताचे हृदय हे विमल आकाश होय.॥४॥ विश्वास हा ध्रुव (तारा) आहे, अवधि पौर्णिमेसारखी आहे, स्वामींची विकासणारी स्मृति ही आकाशगंगा (सुरविथि) आहे.॥५॥ आणि रामप्रेम हा अचल व दोषरहित चंद्र आपल्या समाजासह नित्य अति शोभायमान आहे.॥६॥

**टीका. चौ. १-३ (१) दिनदिन =** दिवसें दिवस हे शब्द पुढील प्रत्येक गोष्टींशी संबंधित घ्यावयाचे आहेत. **दुबळें =** कृश; कारण मेद घटू लागला, जसे शरद ऋतू सुरू झाला म्हणजे जलाशयांतील पाणी आटत जाते व तलाव कृश होत जातात तसे शरीर कृश होत चालले कारण की मेद झडत चालला. **(क) बिलसति बेतस =** पाण्यात वाढणारे वेत पाण्यात असतात तोपर्यंत फुगलेले असतात; पण पाणी आटू लागले व ते पाण्याच्या वर राहू लागले म्हणजे त्यांची जाडी-फुगीरपणा कमी होत जातो पण कणखरपणा वाढत जातो. तसेच तपस्यारूपी शरदातपाने शरीर कणखर-काटक होऊ लागले. वेत वाळू लागले म्हणजे त्यांस फुले येऊन ते सुशोभित दिसू लागतात तसे शरीर तपाच्या तेजाने - प्रकाशाने अधिक सुशोभित दिसू लागले. शरद सुरू झाला की कमळे जशी अधिकाधिक प्रफुल्ल व तेजस्वी दिसू लागतात तसे भरताचे मुख कमल अधिकाधिक प्रसन्न व कान्तिमान व सुंदर दिसू लागले. **(ख) रामप्रेमपण तु नव पीन हि - तु =** परंतु, जशी शरदांत रोज नवी नवी कमले फुलतात व पुष्ट होत जातात तसा रामप्रेमाचा पण दररोज नवा म्हणजे ताजातवाना व पुष्ट होत चालला. **(ग) वृद्धि धर्मदल =** धर्मदलाची वृद्धि होऊ लागली. दृष्टान्त वनजांचा, कमळांचाच आहे. शरदांत जशी तलावांतील कमलांची वृद्धि दिवसेंदिवस होत जाते तशी धर्मदलाची दिवसेंदिवस वृद्धी होत आहे. **I धर्मदल =** धर्मसमूह **'जपयोग धर्मसमूहिं मनुजा भक्ति अनुपम मिळतसे'** (३।६ छं.) **'जप तप नियम योग निज धर्म हि। श्रुतिसंभव नाना शुभ कर्महि ॥ ज्ञान दया दम तीर्थी मज्जन । वदति धर्म जितके**

**श्रुति सज्जन'** (७।४९।१-२ टी.प.) या प्रत्येकाला धर्म म्हणतात व हे सर्व धर्म म्हणजे धर्मसमूह = धर्म दल. यांची दिवसेंदिवस वृद्धि होत चालली. **(घ) मन न मलीन** - शरदांत तलावांतील कमळांची वृद्धि झाली. वेत फुलू लागले तरी जसे जल मलीन होत नाही; पण उलट अगदी स्वच्छ, प्रसन्न होत जाते त्याप्रमाणे हे सर्व साधन करीत असता मनात त्यांचा कंटाळा, त्यांमुळे खेद, कष्ट वाटत नाहीत पण उलट मन अधिकाधिक स्वच्छ व प्रसन्न होत आहे. 'प्रेमें करिति कठिन ऋषि धर्मा' याचाच येथे विस्तार आहे. ल.ठे. या प्रमाणे या तीन चौपायांत शरदांतील दिवसाच्या स्थितीचे निसर्गातील वर्णन करून त्या दृष्टान्तानी तपश्चर्येचा शरीरावर व मनावर होणारा परिणाम दाखविला. आता शरद ऋतूंतील पौर्णिमेच्या रात्रीच्या रूपकाने भरतांच्या हृदयांतील स्थितीचे वर्णन करतात.

## रूपक शरद्राकावर्णन

**सूचना** - शरद ऋतूंतील निर्मल आकाश, पौर्णिमा, रात्र, सत्तावीस नक्षत्रे, ध्रुव (तारा) आकाशगंगा, चंद्र व इतर ग्रह या गोष्टी निसर्गात असतात; पण नित्य नसतात. चंद्र चलायमान असतो व सदोष असतो. रोहिणी, बुध, इतर ग्रह, सगळी नक्षत्रे व आकाशगंगेचे सर्व पट्टे एका कोणत्याही रात्री नसतात. भरताच्या निर्मळ हृदयरूपी आकाशात या सर्व गोष्टी नित्य, निश्चळ व निर्दोष आहेत. असे **हे अधिक अभेद सांग रूपक आहे.**

**चौ. ४ (१) शम दम संयम नियम उपवास -** श्रीमद् भागवतांत यम बारा व नियम बारा वर्णिले आहेत. संयम = यम, शम, दम, बारा यम, बारा नियम व उपवास = २७. भगण = नक्षत्रे २७ आहेत. ही अश्विनी आदि सत्तावीस नक्षत्रे आकाशगंगेतच असतात. अभिजित नक्षत्र आकाशगंगेच्या बाहेर असल्याने व नित्याच्या पंचांगात त्याची गणना नसल्याने येथे घेतलेले नाही. यमनियमांचे वर्णन ७।११७।१० च्या टीकेत व शमदमांचे वर्णन १।४४।२ च्या टीकेत आहे. भरताचे निर्मल हृदय हे शरदांतील पौर्णिमेच्या रात्रीचे निर्मल आकाश आहे.

**चौ. ५ - (१) ध्रुव =** ध्रुवाचा तारा = **विश्वास.** ध्रुव अचल अढळ आहे; तसा अढळ विश्वास आहे की राम मुदत संपल्याबरोबर परत येतील. ध्रुव रात्रीच दिसतो; पण रात्र कोणती ते या रूपकात सांगितलेले नाही. **रामविरह ही रात्र आहे;** कारण राम 'भानुकुल कमल दिवाकर' (७।४।१) आहेत. हा भानु

अयोध्येत नाही म्हणून रात्र आहे. **(क) अवधि राकासी** - राका = पौर्णिमा. १४ वर्षांची मुदत ही पौर्णिमा आहे म्हणून ठीक आहे; नाहीतर अमावास्याच झाली असती; साधी अमावास्येची रात्र नव्हे तर 'दिसे अयोध्या भयाण भारी । **काळरात्र** कीं जणुं **अंधारी'** (८३।५) याच्या पुढील चौपायाही पहाव्या. पौर्णिमेचा चंद्र असला व आकाश निर्मल असले म्हणजे शरदातपाचे दुःख रहात नाही. **(ख) विकासी स्वामीस्मृति सुरवीथि** - विकासी = विकास पावणारी. सुरवीथि = आकाश गंगा. चंद्र २७ नक्षत्रांच्या मंडळांतून भ्रमण करतो; व २७ नक्षत्रे आकाशगंगेत आहेत. शम दम यमादि २७ नक्षत्रे असली तर त्यांत चंद्र असावयाचा; पण आकाशगंगा असेल तरच नक्षत्रे असणार, म्हणजेच शमदमादिकांचा खरा उपयोग होणार. म्हणून आकाशगंगा कोणती ते येथे सांगितले. स्वामी रामचंद्रांची, विकास पावणारी स्मृति ही आकाशगंगा आहे. दुधाच्या सारख्या वर्णाचे प्रकाशमय पांढरे पट्टे रात्री आकाशात दिसतात. त्यांस आकाशगंगा (सुरविथि) म्हणतात. **हे पट्टे नऊ आहेत** व प्रत्येक पट्ट्यांत तीन नक्षत्रे आहेत. रामाचे स्मरण हे ते नऊ पट्टे आहेत. नऊ हा अंक निर्विकार आहे. तसे हे स्मरण निर्विकार आहे. हे नऊ पट्टे मिळून एक अखंड मंडल होते; तसे अखंड मंडलाकार स्मरण चालू आहे. आकाशगंगा म्हणजे कल्पनातीत अंतरावर असलेल्या अनंत ताऱ्यांचा समुदाय आहे; हे आधुनिक खगोलशास्त्राससुद्धा मान्य आहे. **रामाचे अनंत गुण** कल्पनातीत अंतरावर आहेत. **त्यांचे क्रमशः सतत स्मरण अखंड चालू आहे. (ग) नऊ सुरविथींची नावे** - सुरविथि नऊ असल्याचा पुरावा व त्यांची नावे नारदपुराणात सहज सापडली. नाग, इभ, ऐरावत, वृष, उष्ट्र, खर, मृग, अज आणि दहन अशी या नऊ पट्ट्यांची नावे आहेत. (ना.पु. पूर्वभाग पाद २ मधे)

**चौ. ६ (१) रामप्रेम अचल बिधु** - अचल रामप्रेम हा अचल विधु चंद्र आहे व तो **'दोष न'** = निर्दोष आहे. चंद्रांतील दोषांचे वर्णन पूर्वी अनेक वेळा आले आहे व पुढे सविस्तर आहे. अचळ, अढळ, शुद्ध, निर्दोष प्रेमाने रामगुण, यश, चरित्र, नाम यांचे गंगाप्रवाहाप्रमाणे अखंड स्मरण चालत असता, शमदम यमनियमादींचे प्रेमाने पालन केले जात आहे; कारण चंद्र नक्षत्र मंडळातच असतो. **(क) सहित समाज नित्य अति शोभन** - सीता रोहिणी, लक्ष्मण बुध, धनुष्य बाण, भाता वगैरे समाज आहे. यांच्या प्रेमासह रामप्रेमचंद्र सुशोभित झाला आहे.

**सूचना** - किष्किंधा कांडांतील शरद ऋतूच्या वर्णनाशी याची तुलना करावी म्हणजे अर्थ अधिक स्पष्ट होईल. विस्तारभयास्तव व वाचकांना काही विचारस्वातंत्र्य, कर्मस्वातंत्र्य या व्यक्ति स्वातंत्र्याच्या काळात पाहिजेच म्हणून येथे ती तुलना नको.

*हिं.* ***। भरत रहनि समुझनि करतूती । भगति बिरति गुन बिमल बिभूती ॥७॥***
***। बरनत सकल सुकबि सकुचाहीं । सेस गनेस गिरा गमु नाहीं ॥८॥***

*म.* ***। भरतभाव राहणि कर्तूती । भक्ति विरति गुण विमल विभूती ॥७॥***
***। वर्णत सकल सुकवि संकोचति । कुंठित शेष गणेश - गिरा-गति ॥८॥***

**अर्थ** - भरताची भावना (समुझनि) राहणी, कर्तृत्व, भक्ति, वैराग्य, विमल गुण व विमलविभूती - ॥७॥ यांचे वर्णन करण्यास सगळे सुकवि संकोचतात (कारण) शेष, गणपति, व सरस्वती यांच्या बुद्धीची गति सुद्धा कुंठित होते.॥८॥

**टीका**. (१) येथे भरतचरित्राचा उपसंहार करण्यास प्रारंभ झाला. **(क) भरत भावना** - 'असे सकल रघुपति संपत्ती' 'करी स्वामिहित सेवक तोही' 'आज्ञेसम न सुसाहिब-सेवा' इत्यादी २०।२५ वचने तरी मागील चरित्रांत सापडतील. **(ख) राहणी** - नंदिगावी कसे राहतात हे नुकतेच वर्णन केले आहे व पुढे थोडे आहे. कर्तृत्व - चित्रकूटला पायी अनवाणी चालत जाणे, चित्रकूट यात्रा शत्रुघ्न व सचिव यांना कार्यास लावणे व प्रजा पुरवासींना समाधानात बसविणे वगैरे. **भक्तीची** उदाहरणे देणे. म्हणजे दिवटीने भानु दाखविण्यासारखे ठरेल. **विरति - 'जसा चंचरिक चंपक बागें'** व सर्व विषयभोग वमनासमान याने दाखविले आहे. सहज मिळत असलेल्या साम्राज्याचा त्याग केला. **'अर्थ न धर्म न काम रुचि नको गतिहि निर्वाण' विमलगुण** - मागल्या सहा चौपायांत वर्णन केले ते; शिवाय विनय, दीनता, सुशील इत्यादी अनेक. **विमल विभूती - 'गुरु पितृमाता स्वामि - निदेश'... कीर्ती सुगति भूतिमय वेणिहि'** (३०६।२-४) टीका पहावी. भूति = विभूति, 'विभूतिर्भूतिऐश्वर्यम् अणिमादिकमष्टधा' (अमरे) अणिमादिक विभूती विमल म्हणता येत नाहीत पण वरील चौपायांत वर्णन केलेली विभूति विमल आहे. **ल.टे.** - येथे सुद्धा सात गोष्टींचाच उल्लेख आहे. **'भरतचरित्र कीर्ती कर्तूती । धर्म शील गुण विमल विभूती'** (२८८।७) यांतसुद्धा सातच गोष्टी व सातव्या चौपाईतच ! येथे सातव्या चौपाईतच आहेत. **(ग) कुंठित शेष - गणेश - गिरागति - विधि गणपति शिव शेष शारदा । कवि कोविद बुध मति विशारदां'**

(२८८।६) यांना सुद्धा वर्णन करवत नाही. दो. २८८ पहावा.

*हिं. दो. । नित पूजत प्रभु पाँवरी प्रीति न हृदयँ समाति ॥*
*॥ मागि मागि आयसु करत राज काज बहु भाँति ॥३२५॥*

*हिं. । पुलक गात हियँ सिय रघुबीरू । जीह नामु जप लोचन नीरू ॥१॥*
*। लखन रामसिय कानन बसहीं । भरतु भवन बसि तप तनु कसही ॥२॥*
*। दोउ दिसि समुझि कहत सबु लोगू । सब बिधि भरत सराहन जोगू ॥३॥*
*। सुनि ब्रत नेम साधु सकुचाहीं । देखि दसा मुनिराज लजाहीं ॥४॥*

*म. दो. । प्रभूखडावा सदार्चिति हृदयिं न मावे प्रीति ॥*
*॥ घे घेउनि आज्ञा करिति राज्य कार्य बहुरीति ॥३२५॥*

*म. । पुलकित, हृदिं सीता-रघुवीर । जीभ नाम जपि लोचनिं नीर ॥१॥*
*। लक्ष्मण राम सिता वनिं वसती । भवनीं भरत तपें तनु कसती ॥२॥*
*। बघुनि उभय दिशिं वदति सर्व जन । भरत किं सर्वपरीं स्तुतिभाजन ॥३॥*
*। ऐकुनि नेमां साधु संकुचित । दशा बघुनि मुनिराजहि लज्जित ॥४॥*

**अर्थ** - भरत नित्यनियमाने (रोज) प्रभूच्या खडावांची पूजा (अर्चन) करतात (व त्यावेळी) प्रीति हृदयांत मावत नाही. वेळोवेळी आज्ञा (खडावांची) घेऊन बहुत प्रकारची राज्यकार्ये करतात. ॥दो. ३२५॥ शरीर पुलकित झालेले आहे हृदयांत सीता व रघुवीर आहेत,जीभ नामजप करीत आहे व नेत्रांतून नीर गळत आहे ! ॥१॥ लक्ष्मण राम व सीता वनांत राहतात व भरत भवनांत राहून सर्वप्रकारे तपाने तनु कसतात (कष्टवितात) ॥२॥ दोन्हीकडे पाहून सर्वलोक म्हणू लागले की भरत सर्व प्रकारे स्तुतीस पात्र आहेत (प्रशंसनीय आहेत.) ॥३॥ भरताच्या नेमादिकांना ऐकून साधु = भक्त संकोचित होतात व भरतांची प्रेमदशा पाहून मोठमोठे मुनि (मुनिराज) लज्जित होतात. ॥४॥

**टीका. - दो. - (१) प्रभुखडावा (पाँवरी) सदा अर्चिति** - सदा + अर्चिती = सदार्चिति- येथे पुन्हा प्रभूच्या खडावांचा उल्लेख केला. ३१६।४ मध्ये **'प्रभु परि कृपे खडावा देती'** (**पाँवरीं** दीन्ही) असे म्हटले. तोच शब्द येथे वापरून सुचविले की ज्या खडावा प्रभूंनी दिल्या त्याच येथे नंदिगांवी पर्णकुटीत आहेत. सिंहासनावर बसविल्या त्यांना पाँवरी न म्हणता 'प्रभु पदपीठ' म्हटले आहे. ते नंदिगांव अयोध्येपासून दहामैल दूर आहे. पूजा करण्यासाठी रोज अयोध्येत जात असत असे मानणे चुकीचे व आचारधर्मविरुद्ध ठरेल, कारण प्रभूच्या पूजेसाठी वाहनांतून

जाणे हा सेवक धर्म नाही. पूजा हे नित्यकर्म आहे. नित्यकर्म उरकून आवश्यक असेल त्या दिवशी वाहनांतून जात असत राज्यकार्यासाठी असे मानणे सयुक्तिक आहे. शिवाय वेळोवेळी रोज आज्ञा घेण्यासाठी १० मैल जाऊन परत येणे हे शक्य नाही. नंदिग्रामी पादुका स्थापन केल्याचा उल्लेख सर्व प्रसिद्ध रामायणांत आहे. मानसांत आधी सिंहासनावर पादुका बसवून मग नंदिग्रामी आले आहेत; म्हणून प्रभूंनी दिलेल्या पादुका नंदिग्रामी आणल्या असे मानणेच युक्त आहे. **(क) हृदयिं न मावे प्रीति** - भाव हा की प्रीतिरस हृदय पात्रांतून बाहेर सांडत असलेला दिसू लागतो. रोमांच, अश्रू, कंप, कंठ गदगद होणे इत्यादी सात्विक भाव खडावांची पूजा करताना प्रगट होतात, हे पाहूनच मुनि लज्जित होऊ लागले. पूजा करताना असे झाले **तरच ती भक्ति** !

**चौ.** - (१) नामजप, नामोच्चार, नामस्मरणादि कसे करावे व कसे झाले पाहिजे हे येथे अगदी स्पष्ट दाखविले आहे. हृदयांत ध्यान, जिभेने जप (मनांत नव्हे) अंगावर रोमांच व नेत्रांत अश्रू असे झाले पाहिजे. **याचे नांव प्रेम, याचे नांव भक्ति** ! असे प्रदीर्घकाळ अखंड झाले तरच सगुण साक्षात्कार शक्य आहे. **विरहाचा दाह व तपाचा ताप यांत तावून निघेल हृदय तेव्हाच अशी अति दुर्लभ दशा प्राप्त होईल.**

**चौ. २ - (१) भवनीं भरत तपें तनु कसती** - तपश्चर्येने तापवून तापवून देह तनु = कृश करीत आहेत, तनु = कृश (मेदिनी) शुद्ध करण्यासाठी कष्टवीत आहेत. **'अत्रि आदि मुनिवर बहु वसती। जप तप योग करित तनु कसती'** (१३२।७) अशा मुनिवरांनी, मुनि राजांनी भरताची ही दशा पाहिली की त्यांची त्यांनाच लाज वाटते की आपली तपश्चर्या व वैराग्य भरताच्या पासंगालासुद्धा पुरणार नाही, मग आम्ही वनांत राहून मुनि - ज्ञानी - म्हणवून काय साधले? **(क) शंका** - भरत नंदिगावी पर्णकुटीत रहात असून भवनीं - घरांत राहतात असे कां म्हटले? पर्णकुटीत रहात असले तरी घराच्या जवळच राहतात; रथाने अयोध्येत जातात येतात. प्रेमाची माणसे बहुधा रोज भेटतातच; मंत्री, अधिकारी आज्ञा, हुकूम, सल्ला घेण्यासाठी येतातच. याप्रमाणे **घरचा संबंध सुटलेला नाही, म्हणून घरी राहतात असे म्हटले.** याने दाखविले की अशा रीतीने रोज किंवा वारंवार वरच्यावर घरचा संबंध राहील तो पर्यंत दहा कोसांवर पर्णकुटीत राहिलांत तरी घरी राहिल्यासारखेच आहे.

**चौ.** - ३ - (१) एका बाजूस राज्याचा व सर्वस्वाचा त्याग करून पत्नी व बंधुसह वनांत राहणारे राम व दुसऱ्या बाजूस जनांत भवनांत राहणारे भरत यांची लोक तुलना करू लागले तेव्हा ठरले की अधिक प्रशंसनीय भरतच ! राम सर्व सोडून वनांत राहतात ते स्वतःच्या इच्छेने नव्हे, भाग पडले म्हणूनच. भरत जे तपादि करीत आहेत ते तसे काही कारण नसतां स्वतःच्या इच्छेने करीत आहेत. **'रामदास रामाहुनि मोठे'** हे सर्वांच्या मुखाने बाहेर पडू लागले.

**चौ** - ४ - (१) साधूंना भक्तांना प्रेमाच्या नेमांबद्दल लाज वाटते; साधु = ज्ञानी भक्त, ज्ञानी- महामुनींना लाज वाटते ती प्रेम नाही व वैराग्य कमी म्हणून वाटते. चातक प्रेमनेम निष्ठ व हंस (= ज्ञाननिष्ठ) यांना सुद्धा भरतांचे आचरण पाहून लाज वाटते. याचा अर्थच असा की चातकांस व हंसास भरताची सर नाही. **'भरत भरत सम नान'** (२८८) असे पूर्वी म्हटलेच आहे; तेच येथे उपसंहारांत सुचविले.

*हिं.* ***। परम पुनीत भरत आचरनु । मधुर मंजु मुद मंगल करनू ॥५॥***
***। हरन कठिन कलि कलुष कलेसू । महामोह निसि दलन दिनेसू ॥६॥***
***। पाप पुंज कुंजर मृगराजू । समन सकल संताप समाजू ॥७॥***
***। जन रंजन भंजन भव भारू । राम सनेह सुधाकर सारू ॥८॥***

*म.* ***। भरताचरण पुनीत परम हीं । मधुर मंजु मुद - मंगल - कर ही ॥५॥***
***। हरण कठिण कलि कलुषें क्लेश हि । महामोह तमि दलन दिनेशहि ॥६॥***
***। पापपुंज - कुंजर - मृगराजा । शमन सकल संताप - समाजा ॥७॥***
***। जन - रंजन भंजन भवभार हि । रामस्नेहिं सुधाकर सार हि ॥८॥***

**अर्थ** - भरताचे आचरण परम पुनीत आहे आणि मधुर, मनोहर (मंजु) व आनंद मंगलकारक आहे. ॥५॥ कठिण कलिकालांतील दुष्कृतांचा (कलुषें - अधर्म) व क्लेशांचा (अविद्यांदिपंच) नाश करणारे आहे. व महामोहरूपी रात्रीचा (तमि, तमी) विनाश करणारा दिनेश - सूर्य आहे. ॥६॥ पापराशीं रूपी हत्तींना सिंहासारखे असून सर्व संतापांच्या समूहांचे (समाज) शमन (नाश) करणारे यमराजा सारखे आहे. (शमन = यमराज) ॥७॥ भक्तांचे मनोरंजन करणारे व भवभार भंजन करणारे असून रामस्नेहांत सुधाकराचे सार (चंद्राचे सार = चंद्रामृत) आहे. ॥८॥

**टीका.** - सूचना - या चार चौपायांत व छंदांत भरताच्या आचरणाचा

चरित्राचा महिमा व फलश्रुति सांगितली आहे. मानसाच्या उपसंहारांत कवि रामचरित्राची महती व फलश्रुति सांगतात ती उ.कां. १३० च्या शेवटच्या चार चौपायांत व तीन छंदांत आहे; पण येथे भरतचरित्राची जी फलश्रुति सांगितली आहे तीच तेथे थोडी विस्ताराने उदाहरणांसह सांगितली आहे. वाचकांनी तुलना करून पहावी.

**चौ. ५** - (१) या व पुढील तीन चौपायांत भरतांचे रामभक्तिप्रेमाचे आचार्यत्व (गुरुत्व) दाखविले आहे. भरत रामप्रेम भक्तिमार्गाचे मूळ गुरु आहेत. **तुलना पुढे आहे.**

**चौ. - ६-७** - (१) **कलुषें क्लेशहि - कलुष =** दुष्कृत, दुष्कृत्य, असा अर्थ येथे घेणे जरूर आहे; कारण पुढे 'पापपुंज' असा निराळा उल्लेख आहे. **'कुलुषं.... दुरित दुष्कृतम्'** (अमरे) दुष्कृत्याने पाप पदरांत पडते. **(क) क्लेश** - अविद्याऽस्मितारागद्वेषाऽभिनिवेशाः पंच क्लेशाः' (पा.यो.) 'क्लेशहारिणी' (१ मं. श्लो. ५ टी. प.) **(ख) महामोह =** अज्ञान, तमि = रात्र, 'तमी, तमिः तमा' (अ. व्या.सु.) भरतचरित्र श्रवणाने व मननाने या सर्व गोष्टी सहज होतात, अज्ञान नाशापर्यंत सांगितले. **(ग) पापपुंज कुंजर मृगराजा** - सिंहाच्या नुसत्या गर्जनेनेच हत्तीचे कळप पळून जातात. तसे भरतचरित्र श्रवणाने पापांचे पर्वत नष्ट होतात. **(घ) शमन सकल संताप** - समाजा - कामक्रोध लोभादिकच संतापांचा समूह आहे. यांच्या योगानेच संताप = अति ताप होतो, दुःख होते. 'शमनो यमराड् यमः' (अमरे) कामक्रोध व विशेषतः ज्ञान प्राप्त झाल्यावर त्याचा मद अहंकार उत्पन्न होतात; त्यांचा नाश येथे सुचविला आहे. 'मदादिदोषमोचनम्' (३।४।२ टी. पहा) राम आहेत.

**चौ. ८** - (१) **जनरंजन** - भक्तांच्या चित्तास रमविणारे, प्रसन्न करणारे भरताचरण आहे. याने भक्तीची प्राप्ति सुचविली. भक्ति प्राप्त झाल्यानेच भक्तांचे चित्त सदा प्रसन्न राहते. भक्ति प्राप्त झाली की **भवभारभंजन** - ती दृढ झाल्याने होते. राम **'मुनीन्द्र - संत रंजन'** आहेतच. (१।४।४) भव = जन्ममरणपरंपरा; तिचा भार प्रेमभक्ती शिवाय नष्ट होत नाही असा मानससिद्धान्त आहे. **(क) भव =** संसार, जग, भरतांनी रामचंद्रांस परत आणले असते तर भूभारभंजन झाले नसते, व अधमरूपी भार आणखी वाढला असता; म्हणून या दृष्टीनेही भरतचरित्र भवभार भंजन करणारे आहे. **'नौमि राम भंजन महिभारं'** (३।११।१२)

असे राम आहेत. (ख) **रामस्नेहिं सुधाकर सारहि** - रामस्नेह हे भरत पयोधीतून काढलेले अमृत पीयूष आहे व त्यांत भरतांचे आचरण हे चंद्राचे सार म्हणजे चंद्रामृत आहे. **'भरत व्यवहार हि। कनकिं सुगंध सुधे शशिसार हि'** (२८८।१) सुधें शशिसार'च्या टीकेत विस्तार पहावा. सार हे आहे की रामस्नेह असून भरताच्या आचरणासारखे आचरण नसेल तर भवताप शमन होऊन सदा प्रसन्न राहता येणार नाही. भरतचरित्राच्या श्रवणाने हे सुधाकरसार सहज प्राप्त होईल व खरे अमरत्व प्राप्त होईल ही फलश्रुति येथे सुचविली आहे. रामस्नेह, रामप्रेम हे अमृत पीयूष आहे इ. आता सांगतील.

| **भरत** | **सद्गुरू वा सद्गुरुपदरज** |
|---|---|
| परम पुनीत आचरण, विमल विभूती | सकृति शंभतनु. विमलविभूती |
| मधुर मंजु मुद-मंगलकर | सुरुचि सुवास, मंजुल मुदमंगला प्रसूती. |
| हरण कठिण कलि कलुषें | जनमन मंजु मुकुर - मल हरणी. |
| महामोह तमि दलन दिनेश | महामोह तम पुंज... रविकर निकर |
| शमन सकल संताप-समाजा | शमन सकल भवरुज - परिवारू |
| सुधाकर - सार | सरस अनुराग |

ही सद्गुरु व गुरुपदरज यांविषयीची वचने बाल कां मं सो ५ व पुढील चार चौपायांत आहेत. कलुषें = मल.

*हिं. छं.* *। सिय राम प्रेम पियूष पूरन होत जनमु न भरत को ।*
*॥ मुनि मन अगम जम नियम समदम बिषम ब्रत आचरत को ॥*
*। दुख दाह दारिद दंभ दूषन सुजस मिस अपहरत को ।*
*॥कलिकाल तुलसी से सठन्हि हठि राम सनमुख करत को ॥१॥*

*हिं.सो.* *। भरत चरित करि नेमु तुलसी जो सादर सुनहिं ॥*
*॥ सीय राम पद पेमु अवसि होइ भव रस बिरति ॥३२६॥*

*म. छं.* *। श्रीराम - सीता - प्रेम - पीयुष - मय न जन्मत भरत कीं ।*
*॥ व्रत विषम शम दम नियम यम मुनि - मन - अगम कुणि करत कीं ॥*
*। दारिद्र्य दूषण दंभ दुःखानल सुयशमिषिं हरत कीं ।*
*॥ कलिकालिं तुलसी-सम शठां कुणि राम-संमुख करत कीं ॥१॥*

*म.सो* *। भरतचरित युत नेम तुलसी सादर जे श्रवति ॥*
*॥ सिताराम - पदिं प्रेम होइ नक्कि भवरस विरति ॥३२६॥*

**अर्थ** - श्रीसीताराम - प्रेमरूपी अमृतमय असे भरत जन्मले नसते तर मुनिमनांस अगम असे कठिण (विषम) व्रत व शम दम यम नियम यांचे आचरण कोणी केले असते काय? आपल्या सुयशाच्या निमित्ताने (मिषाने) दारिद्र्य (= मोह) दोष, दंभ व दुःखरूपी आग यांना कोणी दूर केली असती काय? व या कलिकालांत तुलसीदासासारख्या शठांना कोणी राम-संमुख केले असते काय? ।।छंद।। तुलसीदास (आशीर्वादरूपाने) म्हणतात की जे कोणी भरतचरित्राचे आदराने व नेमाने श्रवण करतील त्यांना सीतारामपदी प्रेम नक्की मिळेल व सांसारिक विषयरसांत वैराग्यही नक्की प्राप्त होईल. ।।३२६।।

**टीका - छंद - (१) श्रीरामसीताप्रेम - पीयुषमय भरत न जन्मत** - मागल्या चौपाईत 'रामस्नेहि सुधाकर सार' यांत फक्त रामस्नेहाचाच उल्लेख केला येथे दाखविले की रामस्नेह = रामप्रेम = सीतारामप्रेम, हे पीयूष = अमृत आहे. हे अमृत भरतांच्या ठिकाणी जन्मापासूनच होते. **'प्रेम अमृत मंदर विरह भरत पयोधि गभीर'** (२३८) यांत हेच सांगितले आहे. (२) **चरण दुसरा - अन्वय** मुनिमनअगम-विषम व्रत शमदम यम नियम कुणि करत की? विषम = आचरण्यास कठीण. **अगम** - ज्यांत गम = गमन करतां येत नाही असे 'प्रस्थानं गमनं गमः' (अमरे). ज्यांत मुनींचे मन सुद्धा गमन करू शकत नाही ते **मुनिमन अगम व्रत** इत्यादि. ज्यांचा विचार सुद्धा मुनींच्या मनांत येणे कठीण ती व्रते भरतांनी लहान वयांत, सम्राटपुत्र असून पालन करून दाखविली. त्यामुळे आता त्यांचे पालन करण्यास मुनींना धीर होऊ लागला व त्यांचे पाहून इतर करू लागले. भरतांचा जन्म झाला नसता तर हे कोणाला करता आले नसते.

(३) **चरण तिसरा - अन्वय** - सुयशमिषिं दारिद्र्य, दूषण, दंभ, दुःखानल (कुणि) हरत की? **सुयशमिषिं =** सुयशाच्या मिषाने, निमित्ताने भरतांचे, सुयशमय चरित्र हे एक फार प्रभावी साधन आहे. त्याच्या सादर श्रवणाने व मननाने मोहरूपी दारिद्र्य व त्याच्यापासून उत्पन्न होणारे काम, क्रोध लोभ **हे त्रिदोष** व दंभादिक अनेक मानस रोग आणि मोहरूपी दारिद्र्यामुळे सोसावा लागणारा दुःखांचा वणवा यांचा सहज विनाश होईल. **'दारिद्र्यासम जगीं दुःख ना'** (७।१२।१३) **'निकट मोह दारिद्र्य येत ना'** (७।२०।४) **मोह सकल रोगांचे मूळ हि'** (७।१२१।२९) **'काम वात कफ लोभ अमित तो। क्रोध पित्त -'** (७।१२१।३०) काम, लोभ व क्रोध वात, कफ व पित्त हे त्रिदोष आहेत. हे नरकाचे द्वार

आहेत. या सर्वांचा समूळ नाश भरत चरित्र श्रवणाने जसा होईल तसा इतर कशानेही होणार नाही.

(४) **चरण चौथा - कलिकालिं** - या कराल, कठोर कलिकालांत केवळ कर्म किंवा योग साध्य होणे फार दुरापास्त आहे; व त्यामुळे केवळ ज्ञानमार्गाचे अधिकारींही अत्यंत दुर्लभ, भगवंतास शरण गेल्याने = **रामसंमुख झाल्याने** सर्व दोषांचा नाश होतो व असाध्य गोष्टी रामकृपेने सहज प्राप्त होतात; हे भरत चरित्रात वारंवार, पदोपदी ऐकण्यास सापडल्याने, सतत सादर श्रवण केल्यास श्रोत्यांची तिकडे सहज प्रवृत्ति होते व नकळत, बलात्काराने ढकलल्याप्रमाणे या साधनमार्गाला लागतात. **(क) तुलसीदास स्वतःला शठ म्हणत आहेत हे आम्ही लक्षांत ठेवणे फार हिताचे आहे. मानसाच्या उपसंहारांत तुलसीदास म्हणतात 'ज्यांच्या कृपालेशामुळे अति दास तुलसी मंदधी। पावे परम विश्राम'** हे परमविश्रामरूपी फळ मिळण्यास तुलसीदास येथे सांगतात की भरतचरित्र कारणीभूत झाले. भरतचरित्रांत त्यांची परम दीनता व कार्पण्य व रामप्रेम या गोष्टी जशा प्रामुख्याने पदोपदी दिसतात तशाच तुलसीदासांच्या ठिकाणी मानसांत अथपासून इतिपर्यंत वारंवार दिसतात. येथील शठ शब्द दीनता व कार्पण्य यांचा पुरावा आहे. निराभिमान वृत्ती व दीनता भगवंताला फार प्रिय आहेत; ते दीन बंधु आहेत. **'ईश्वरस्याऽपि अभिमानद्वेषित्वात् दैन्यप्रियत्वाच्च।' (ना.भ. २७)**

**सोरठा** - यांत भरतचरित्राची फलश्रुति सांगून त्या निमित्ताने अयोध्याकाण्डाची फलश्रुति सांगून या काण्डाचा उपसंहार केला आहे. हा सोरठा आशीर्वादात्मक आहे. **(क)** नेमाने व आदराने म्हणजे एकाग्रचित्ताने संत-गुरु-मुखाने श्रवण करणे हे साधन आहे. सीतारामपदी प्रेम प्राप्ति व सांसारिक विषयांतील रस = रुचि, आवड नष्ट होणे हे साध्य आहे. या विषयांची इच्छाच नष्ट होणे हे मुख्य वैराग्य आहे. विषयांचा त्याग केला म्हणजे वैराग्य प्राप्त झाले असे ठरत नाही. **'विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः॥ (पण) 'रसवर्जं, रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते' (भ.गी.)** विषयांचा आहार = ग्रहण सेवन - न केल्याने विषय दूर राहतात पण रस दूर राहतोच असे नाही. तो पर जो परमात्मा त्याचे दर्शन झाल्यानंतरच जातो.

अनेक पोथ्यांत व छापील पुस्तकांत या काण्डाच्या शेवटच्या पुष्पिकेतील नांवांत भेद आहेत. परंतु या काण्डांतील शेवटचा चरण वैराग्य प्राप्ति हे फळ

सांगतो व त्या फळांतील रस सीतारामप्रेम आहे. हे बा. कां. मंगलाचरणाच्या टीकेत साधार सविस्तर दाखविले आहे व नंतरच्या ४३ दोह्यातही तोच क्रम अनेक ठिकाणी दाखविला आहे.

**इति श्री रामचरितमानस गूढार्थचंद्रिका - टीकायां अयोध्याकाण्ड - द्वितीय-सोपान - टीका समाप्ता**

**श्रीसीताराम-भरत चरणारविन्देषु सविनयं साष्टांगं प्रणम्य समर्पिताऽस्तु**

## अयोध्याकाण्ड परिशिष्ट पहिले

## श्रीभरतचरित्र व श्रीरामचरित्र संक्षिप्त तुलना

| श्रीभरतचरित्र | श्रीरामचरित्र |
|---|---|
| १) भरताचरणपरम पुनीत हि | पावन गांगतरंगमाल से |
| २) मधुर मंजु मुद मंगलकर | 'रघुवरकथा मधुर' 'रामकथा जगमंगलकारी 'रामचरित राकेशकर सुखद सर्वास.' |
| ३) हरण कठिण कलिकलुषें क्लेशहि | 'रामकथाकलि कलुष विभंजनि' 'दारुण अविद्या पंच जनित विकार... हरी' |
| ४) महामोहतमि दलन दिनेशहि | 'हरण मोहतम दिनकर करसे' 'महामोहमहिषेश विशाल हि। रामकथा कालिका करालहि' |
| ५) पापपुंज -कुंजर - मृगराजा | कामकोपकलि कलुष करिगणां। केसरि शावक |
| ६) शमन सकल संताप-समाजा | शमन पाप संतापा शोका |
| ७) जनरंजन | सकल जन रंजनि |
| ८) भंजनभव भारहि | भवभंजन गंजन संदेह. |
| ९) सुधाकर सार | ती वसुधातलिं सुधातरंगिणि, 'कथासुधा' |
| १०) दारिद्र्य दुःखानल हरत | कामद घन दारिद्र्यदाविं. |
| ११) सितारामपदिं प्रेम होइ | जननिजनक सियरामप्रेमा |

| | |
|---|---|
| १२) भरतचरित जे सादर श्रवति | जे... सावधान समजुनी ऐकतिल |
| १३) होई भवरस विरति | मंत्रमहामणि विषयां व्यालां |
| १४) व्रत विषम शम दम नियम... | बीज सकल धर्मा व्रतनेमां |

१५) दोघांच्या नामाचे साम्य, (२६३),

१६) रूपाचे साम्य

१७) महिमा अनिर्वचनीय (३०३।५-८)

१८) सुयश (३०३) यांची समता पूर्वी टीकेत आखविली आहे. ही तुलना आणखी पुष्कळ वाढविता येईल; पण शितावरून भाताची परीक्षा होऊं शकते म्हणून इतकी पुरे.

## अयोध्याकांड परिशिष्ट दुसरे

### श्रीरामवन - चित्रकूट - गमन मार्ग

**सूचना** - श्रीयुत रायसाहेब धर्मविनोद पं. परमेश्वरदत्त मिश्रजींच्या तीर्थमाला मणि ४० वा 'रामवनगमन महत्तीर्थ' संबंधी अप्रकाशित लेखावरून मा. पी. संपादकांनी मा. पी. अ. कां. पृ ११६३ वर जी माहिती दिली आहे तिच्या आधारे पुढे वर्णन केले आहे. [चौकोनी कंसातील मजकूर या लेखकाचा आहे.]

प्रभु कोपभवनांतून दशरथांस नमस्कार करून निघाले. तेथून वसिष्ठाश्रमाजवळ येऊन थांबले; तेथे आता **वसिष्टकुंड** आहे.

**१)** येथून रानोपालीच्या सडकेने **'दर्शननगर'पर्यंत** जाऊन, तेथून दक्षिणेच्या साध्या, कच्च्या सडकेने **सात कोस** गेल्यावर **तमसातीर** हे पहिले महत्तीर्थ लागते. **चकिया** ग्रामाजवळ याचा [सीमेचा] दगड पुरलेला आहे. हे स्थान नंदिग्रामच्या **भरतकुंडापासून** एक कोस आहे. हे पहिल्या मुक्कामाचे स्थान होय. [दो. ८४ पहा] **२)** येथून सुलतानपूर - प्रतापगढ सडकेने जाऊन गोमती व सई नदी पार करून गंगातटी शृंगवेरपूर (सिंग्रौर) आहे तेथे दुसरा निवास केला. (८५-८९।१ प.) तमसा तटाहून भरतकुंड स्टेशनावर जाऊन रेल्वेने प्रतापगढ २६ कोस आहे. प्रतापगढाहून जेठवारा ठाण्याच्या सडकेने २० कोस गेल्यावर **शृंगवेरपूर** लागते; हे **तमसातटा पासून ४६ कोस आहे.** सिंग्रौरघाट तहसील [तालुका] सोराँ जिल्हा अलहाबादमध्ये आहे. येथे जेथे संध्या केली तेथे घाट आहे. [मानसात रामघाट म्हटले आहे. १९४।४ प.] **३)** शृंगवेरपुराहून गंगापार करून रस्त्यांत एका वृक्षाखाली तिसरी वस्ती झाली. (१०४). कोरई घाटापासून तीन कोस

दक्षिणेस **चरवा ग्राम** आहे; तेथे **'श्रीरामजूठा'** नावाचा तलाव आहे; त्याला **कोइरी मुहधोईताल** [मुखक्षालन तलाव] असेही म्हणतात. येथे एक श्रीराममंदिर आहे. हे **तिसरे महत्तीर्थ.** [येथून प्रभु प्रयागास गेले] ४ येथून राजापुरावरून चित्रकूटचा रस्ता जवळ असला तरी प्रभूंना भरद्वाजांच्या दर्शनास जाणे असल्याने ते त्या रस्त्याने गेले नसावेत. **रामजूठाताल पासून प्रयाग १० कोस** आहे तेथे प्रभु गेले. (१०५) येथे रामघाट आहे. [हे चौथे महत्तीर्थ] ५) शहराबाहेर पडून **राजरूपपुरास** जावे. येथून वाकड्यातिकड्या रस्त्याने सराय - आकिलवरून श्रीयमुना **महिला घाटावर** पार करून तहसील मऊ (जि. बाँदा) त पलीकडील डिस्ट्रिक्ट बोर्डाच्या सडकेने जावे. तिच्यावर मऊ, रामनगर, रायपुरा, वाल्मीकी आश्रम आणि कर्वी सबडिव्हिजन ही प्रसिद्ध स्थळे आहेत. मऊहून **रामनगरला** यावे. या गांवाच्या बाहेर सडकेजवळ परम पवित्र **ताल** [तलाव] **'कुंवँर दो'** आहे, जेथे दोन्ही राजकुमारांनी प्रयागहून गेल्यावर विश्रांति घेतली. तो सुमारे १५ बिघे मोठा लांब रुंद आहे. उत्तरेला चांगला मोठा घाट आहे व पश्चिम कोपऱ्यावर एक जीर्ण शिवालय आहे. **प्रयागाहून** हे स्थान सुमारे **२० कोस असेल.** [११५।३] [चाळीस मैल चालल्यावर सीता न दमेल तर काय होईल !] [हे पाचवे महत्तीर्थ] ६) 'कुंअँर दो' तलावापासून वाल्मीकि आश्रम ६ कोस आहे. [वाटेत एक वस्ती केली ती कुठे? १२४।३-५ प.] नंतर वाल्मीकी आश्रमांत जाऊन तेथून चित्रकूटला साहव्या दिवशी गेले. पोचले. [वाल्मीकी आश्रमापासून चित्रकूट १८ मैल आहे.] [ल.ठे.] शृंगवेरपुरापर्यंत रथांतूनच आले. पुढे श्रीजनकनन्दिनी पहिल्यादिवशी तीन कोस चालल्या; दुसऱ्या दिवशी १० कोस; तिसऱ्या दिवशी सुमारे २३ कोस, व चौथ्या दिवशी ११ कोस पायी अनवाणी चालल्या इतके ठरले. भरतांनी पहिला पायी प्रवास १३ कोसांचा केला; पण पुढील १० कोस जाण्यास दोन दिवस लागले !

**अयोध्याकांड परिशिष्टे समाप्त**

**द्वितीय सोपान - अयोध्याकाण्ड समाप्त.**

